# श्रीज्ञानेश्वरी–सुबोधिनी

## अध्याय १२ वा–'भक्तियोग'

॥ श्रीज्ञानेश्वरमहाराज ॥

डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर



डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर

# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

अध्याय बारावा

'भक्तियोग'


लेखक

डॉ. गोविंद रामचंद्र उपळेकर

फलटण





फलटण १९५२

दिसतें. स्थितप्रज्ञाची भूमिका साधावी व मग तोच साक्षात् कर्मयोग होय किंवा कर्मयोग तरच आचरला जातो, तरच ती आज्ञा – ब्रम्हदेवाची आज्ञा - पाळिली असे होतें, जर ती कर्मयोगाकरिता लागणारी ती स्थितप्रज्ञभूमिका ही पाळिली, साधिली, आचरिली गेली असेल आत्मा हा कांहीं एकास माझा व दुसऱ्यास निराळा असे म्हणत नाहीं. सर्व प्राणिमात्राच्या ठिकाणचें जे जीवित – तेंच मुळीं अमरपण - ते सर्वांना सारखेंच लागू होतें. म्हणून त सिद्ध केलेले आमरपण तेच आता आज्ञा पाळून – आज्ञेप्रमाणे वागून – अंगीं बाणून – ते पूर्णतेच्या सिद्धतेस आणले असे असावें तरच बरें.

**श्रीसद्गुरुं तं नमामि ! अहो ! हे ब्रम्हरूपा !**

श्रीगुरूचे कृपासर्वस्व, दयासर्वस्व, दृष्टिमय दिव्यज्ञाननेत्र ज्यास कृपेनें पाहातो त्याचे ठिकाणीं सर्व विद्या उदय घेऊन येतात. तो सकळ विद्यांना जन्म देणारा जसा ब्रम्हदेवच एक होतो

प्राण हा प्राणास, जीवित्वास, प्राणाने कां जीवित्वाचें तेथे प्रस्थापन होण्यानें येतो, प्राण, जीव सर्वस्वाचा होतो. विद्या ही विद्यत्वानें विद्यमानाची होते, त्याप्रमाणे दयासर्वस्व हे ब्रम्हरूपानें – जे ह्या मनुष्यजन्मास येऊन त्या महत् पदास पोहोंचलेले – शोभवीत असलेले जे श्रीगुरु (ब्रम्हपद शोभत असलेले प्रत्यक्ष ज्ञान – प्रत्यक्ष ब्रम्ह ते) त्याच्या कृपेनें जीव जो तो ह्या जीवपदास आलेला जरी अल्प, तरी तेथें ऐक्य झाल्यामुळे उच्च पदाचा होणारा होतो. तेथे ब्रम्हच मूळ एक जसे ते आपले ज्ञानलक्षण पाहात असलेले होय.

म्हणून येथे ब्रम्हरूपच ते तेच प्रशंसेचें केलें, महत्त्वास आणिले गेल्यानें तेच मुळीं हा जीव ‘ परमात्माचि परि दूसरा ’ रूपास आला – नावारूपाचा झाला असे होय – ‘ अस्ति, भाति, प्रिय ’ तेच ब्रम्हरूप म्हटले जाणारें.

**कृपा ती कूर्मदृष्टीच जशी सांभाळणारी !**

कृपेचें पात्ररूप ह स्तन्यच एक देण्यानें हा जीवितभार हा व्यवहार्य झाला, केला पण जेथे अहो ! एक संपूर्ण दृष्टि ही कृपाच एक सर्वस्वाची ! तेथे नुसत्या दृष्टीनेच मुळी पोषण केले जाणारें, तेथे स्तन्य तेंच दृष्टीमध्ये असलेले. तेंच मुळीं सर्व कृपादृष्टीचें जे ते मार्गावर आरुढ झालें. ज्या ज्या मार्गामधून ती दृष्टि जाणारी तेथ सर्व प्रकाशच एक ! तेथे ब्रम्हच एक सागरासारखें व्यापक तेंच प्रकाशमान झालें, ज्ञानास आलें, लक्षणाचें झाले

नुसत्या दृष्टीनेच सांभाळ करण्याचें सामर्थ्य तेंच मुळी ह्या डोळ्यामध्ये असणारें सूक्ष्म रूप ह्या जीवदशेचें तेंच मूर्त होणारें ते श्रीगुरुकृपेनेच सर्वच्या सर्व (आयु, आरोग्य, बल, विद्या, ख्याति इत्यादि) योग्यता पावणारें : म्हणून येथे ती ती प्रशंसा, प्रशस्ती, महति जर बरोबर आपल्या महत्त्वाने पाहिली गेलेली असेल, तर तीच मुळीं त्या ब्रम्हरूपाचें एक इत्थंभूततेचें वर्णनास येणे होय. तेथे अनेक दुसऱ्या बाजू ह्या आपले शब्दरहस्याचे अंग टाकून देऊन ह्याच एका प्रशस्तीच्या आगचें पाणीच मुळीं होऊन असतात. म्हणून शब्द लहान तरी तेथे जर ज्ञानसागरासारखें प्रकाशणेंच एक व्यापकत्व घऊन असेल, तर तेंच मुळीं ह्या श्रीगुरूंचें – ब्रम्हत्वाचें – ब्रम्हस्वाचें - ज्ञानलक्षणाचे – दयासर्वस्वाचे, कारुण्यतेचें, उपायप्रयोजनाचें असल्यानें, जीव हा अज्ञानात अभावांत नच वृत्तीचा असा – निर्वृत्तिकतेचा तोच मुळीं प्रवृत्तीचा असो अथवा नसो पण त्याजमुळे सर्व जगत् हेंच मुळी त्या ब्रम्हरूपानें जीवित्वास आणले गेले असे होते ‘ शब्द हाच देव होतो ’ म्हटलेले ! तेथे ती ती त्या प्रकृतीची ती महती महिमा ही महत्तत्वास आल्यानें, तेथे ह्या त्रिगुणाची जी प्रकारणा तीच वावरूं लागणारी होय.

हा जीव, प्रकृतीचे महत भाराने त्रिगुणांना पाहणारा, तेथें सत्व हेच मुळीं सर्व समर्थतेचा धडा गिरविणारे जरी, तरी पण तेथे अभिमान हाच बंधारा घालणारा झाल्यानें, तेथें मोक्षाचें नांव हें पाहाणें होतेंच पण जेथे एकाच वृत्तीने चालणे केलेले तेथे बंध का मोक्ष अशीं बोलणींच न येणारीं होत.

जीवित जगणे हे ह्या तिन्ही गुणाना महिमा देणारें - तसेचहि पण मरण हेहि ह्या तिन्ही गणाना अधिक्यतेनें - तमोगुणानेच जसे बाकीच्या गुणाना आपल्या पाठीवर वाहून चालविणारे होते हे केव्हाहि !

## उपाय व प्रकृति

म्हणून येथे प्रकृतीसच मुळीं ती सृष्टी महत्त्व देते व सृष्टी ही ह्या दृष्टीमुळेच आपले योग्यपण ते कसे का किती हे उमजूं लागून तेथे ती ती पूर्णता येण्यास तो तो उपाय हा उपायाचा व्हावाच, करावाच असे योजणें प्रकृतीचे होऊन मगच मुळीं ती दृष्टी ही सृष्टी झाली व प्रकृतिभारास आली असे होय

येथे आतां प्रकृति हीच मुळीं विद्यमानाची ती प्राणानें 'जीव कीं प्राण' ती उपाय योजना उचलण्याने वर महत्त्व मिरवं लागणारी : येथे ब्रम्हसत्ता ( ब्रम्हपद म्हणजेच श्रीगुरु ) ही श्रीगुरूंच्या कृपेनेच मुळीं त्या जीव आत्म-पदास कां योग्यतेस योग्यता देणारी, आणणारी, पोहोचविणारी होते तेथे हा मनुष्यदेह जो ह्या उजव्या डाव्या बाजूंनीं कां दोन बाजूंचा असलेला तो जसा एकच देह तेथे जीवित हे अर्धयोग्य ते कोणत्या अर्धाने समरूप (शिवत्व का) शिवच जसा का (ब्रम्हत्वच का) ब्रम्हच एक ते ह्या (प्रकृति अव्यक्त, रचनेस येण्याची वाट पाहात असलेले ते ह्या मनुष्यजन्माने अमरपदाचे ते जसे आजमावण्यास आलेले होय म्हणून तेथे ते पद हे आपल्या मूळ महावाने जर हा भार योग्यतेने उचलील, तरच ते ज्ञानलक्षण ब्रम्हपदाने कां जीव-परमात्म (समाहित चेतसा) पदाने शोभविले असे होय : याच कारणास्तव तेथे वासना, संस्कार, सूक्ष्म देह इत्यादिनीं हा देह (देह × आत्मा : आत्म × तत्पर परम : परमात्मा : : जीव ब्रम्ह × परब्रम्ह, श्रेष्ठ पुरुष दिव्य ) जो तोच मुळीं सर्वच्या सर्व ( कां सर्व कांहीं) योग्यता घेऊन आहे असे समजून चालले, तर तेथे प्रकृतीचे गुण महत्त्व महत् तत्वावर वाजूं लागण्याने तेथे मनुष्याचे भाबावणें होणारे केव्हाहि !

## प्रकृतीचें ओहोटविणें होणारें जें

म्हणून ही जी उपाययोजना हीच मुळीं सर्व महत्त्व पाहून असल्याने तो उपाय हाच मुळीं श्रीगुरूंचे येणेच होय. नाहीं तर ते प्रकृतिमंत महततेचे ते काय सुंदर ! काय बाधा ! काय अहो ती बाधणी ! असे बाहेरचे पाहाण्याने भुलणारे (भुलविणारे) ते तेथे तोंडाकडेसच पाहाणे झाल्याने, मुळीं पाहाणारे मुखच त्याच्या वाहनाचे, आसनाचे का बैठकीचे झाल्याने, तेथे उपाय हाच मुळीं त्या प्रकृतिमंततेने लाबविला गेला व आता उपायाचे नाव नाहीं - का योजनेचे महत्त्व ते कसचें न काय! असे ते तम - त्रिगुणाचे ते अज्ञान का देहच एक जडत्वास पाहाणारा झाल्याने, तेथे ही देहजीवितलक्षणा हीच मुळीं दुसरीकडेच म्हणजे त्या प्रकृतिमंततेसच पोहोचली गेली - येथे दोनीकडे वागणारे तें एकच तत्त्व जरी, तरी येथे मार्गापराध का वाटवधतेचे तेच अंग प्राधान्य लक्षणाने आपल्या संपूर्ण भाराने प्रकाशणारे होय तेथे श्रीगुरुच ते पद (ब्रम्हस्व का ब्रम्हत्व) शोभविणारे झाले तर मात्र अज्ञानाचा कल्लोळच एक ह्या देहबुद्धीचे सर्व जडत्व पाहाविणारा झाल्यानें, येथें एक तऱ्हेचे त्या देवतेचें अभिमान लक्षण महत्त्वास येऊन आहे असे होय आता येथे श्रीगुरूंनींच तो तसा तसल्याच संचिताचा ह्या

## लेखकाचे दोन शब्द —

लिखाणासंबंधींची एक मोठी घोडचूक ती नेहमीं लक्षांत असावी ती म्हणजे हें जे कांहीं सांगणें, बोलणें कां लिहिणे तें कोणा तरी अज्ञ, मूर्ख कां निरक्षर माणसाकरितां असून, येथें मी म्हणजे सर्व शहाणा असा मानिला जाणारा मनुष्य होऊन असतो. येथेच मुळीं ही कहाणीची किंवा तथ्यतेची जी तडफ ती आपला ठाव शहाणिवेचा असा समजते व हे लिहिलेले हें कदाचित्च किंवा क्वचित्च लक्ष लावण्याचे - लक्षात घेण्याचे असे - असतं. तें गुणाचें आचरणें हे तरी काय हे पाहाण्याचें नच करून, हे लिखाण म्हणजे एक स्तुतिच सर्व अशी ती निराळेपणानें वागणारी किंवा निराळेपणाने असणारीं अशीं स्तुतिस्तोत्रेच होत असेच एक मानणें होतें; स्वतःकडे मोठाच बडेजाव घेते : स्वतःच मुळीं महत् अशा दीर्घ लक्षणाचे तें स्वतःपण स्वतःस पाहातें तेथें स्वयं म्हणजे शुद्धि, सिद्धि कां बुद्धि ही क्रियारूप होऊन असणारी तीच मुळीं हरवली का दुसऱ्याकरितां आहे असें समजून जेव्हां तेव्हां हास्याचा विषयच स्वतःस करीत असल्यानें, येथेच मुळीं ती खबरदारी ही घ्यावी लागणारी होय. स्वयंभाव, स्वयंपाक, सैपाक ह्या मनोवृत्तींचा - का प्रकृतिप्रामाण्याची जी जोड ह्या जीवदशेच्या गोडीची होऊन असलेली - तोच दुसऱ्याकडे बोट करून दुसऱ्याचा विषय करून असल्यानें, तेथें मनुष्य स्वतःस तर आचार्यांच्या कां मोठेपणाच्या कोटींत बसवून, इतरें जीं तीं सर्व बालकेच का शिष्यवर्गच एक शिक्षण घेण्यास आलेला असे मानीत असतो. येथें बुद्धि ही कुणास पाहिजे, शुद्धि कशाची केलेली असते, कां सिद्धि ही कसल्या यंत्राची कां तंत्राची याची जाणीवच मुळीं नाहीं असें होऊन असल्याने, येथें उपदेश-परच जसे हे सर्व रचिले गेले आहे अशीच कल्पना घेऊन, जो तो मनुष्य हा स्वतःसच फसवीत गेल्यानें, येथें ती जी निराळी म्हणजे निराळावर उभी होणारी बोली ती केव्हां व कशी आपल्या स्वतःच्या कल्याणाची गोष्ट पाहाणारी होईल हे वादग्रस्त राहिल्यानें, येथें मनुष्यानें अगोदरच मुळीं जबाबदारीची खबरदारी कां खबरदारीची जबाबदारी घ्यावी लागणारी होय म्हणून येथें ते प्रकाराचें जे लिहिणें तेथें संतस्तवन हेंच रचिले जावे - कर्मसंभावना हीच जशी मांडली जावी - व निराळीच ती एक शास्त्रीय बोली बोलली जावी - शास्त्रांतली ती बोली अशी होऊन यावी. म्हणून येथें सरसिकतेस किंवा रसांना अतिशयनेमुळें उल्लंघून न जातां परत आपल्या कुमुदतेस कां मुकुलपणास येऊन - प्रफुल्लिता पणाच्या अशा उमलतेपणास येऊन - या ग्रंथाचा अर्थच उजळिलेला व्हावा असें करावें : हा ग्रंथ आपल्य-योग्यतेस यावा असे करावे : तो व त्यांतील वचनें हीं आदरिलेलीं व्हावींत - तीं वागविण्याचें असें सर्वथैव लक्ष असावें : प्रामाणिकपणे त्या म्हणी कां उक्ती ह्या स्वतःत वागवाव्यात व तसें वागून अल्पार्थांच्या उक्तींना आदर द्यावा : आचार्यपणावरच उभे होणें केलें असें ते सन्मानानीयतेनें अंगात ठसवून घेऊन वागवावें व तीं तीं वचनें हीं संतलक्षणेंच जशीं आपलीं होणारीं व्हावींत. येथे हृदयामध्ये असणारा जो उखेचा प्रकाश - मंगल असा उषःकालच - तेथें उगवूं दिला, उषेचा वर जो तोच तेथें प्रकाशमान झाला, आपलेपणास आला व असे तें उषःकालाचें ब्रम्हशांत किंवा शांतब्रम्हाचे तें हृदयीं असणाऱ्या आत्मारामास न बोलण्यानें बोलण्याचे करणें - खूणच एक पटविली - असें ते करावेंच करावें ह्या मदनाचा कां चेतनावर्गाचा जो चैतन्यस्वभाव - जो या ब्रम्हभावावर उभा होणारा, ईशत्वभावानें वागणारा - तो मदन जसा असा असल्याने, तेथें तो जो व्यूह कां बंध किंवा महान् असा आशय - अंतर - त्यास पुढे घेऊन, आळविणें करून ती ती ह्या वासुदेवाची गोष्ट ( वसुप्रदसर्वेश्वरपूजन ) हीच मुळीं अंतःकरण पंचकाची ती चित्तचतुष्टयावर उभी होणारी असते. तेथे ती जी त्या अनिरुद्धावर अनुरक्त झालेली उषा हिजला आपलाच तो आत्मा कां प्रियकर तो कुठे पाहण्यास मिळेल म्हणून एक सर्व वेडच - चित्ताचें चंचलपण - हेंच तिजला कांहीं सुचूं

देत नाहीं. तिजमध्यें तो अनिरुद्ध – विसुरा – ईश्वरभाव – हा रात्रंदिवस आकर्षण करून हृदयांत वास करीत असल्यानें, तेथीलची गांठभेट, स्वेव, आलिंगन, दृष्टिसाफल्य, जीवितसेवा, जीवनयात्रा हा आपलेपणाप्रत येऊन असावी. तेथे प्रत्यक्ष भेटच व्हावी. अशी ती या चित्ताने घेतलेली ती रम्यावस्था ती अति गोड गोड अशीच मुळीं विरहविहारणा ही नेहमींची असावी अशीच घोषणा ही देहरचना करीत राहिल्यानें, ह्या चित्तानें तसलीच ती विरहदशा पाहिल्यानें, नेहमींच आपण तेथीलच्या दशेचे होऊन असावे असेच जीवदशेनें घेतलेलें असते. तेथे आतां खरेपणाने ते त्याप्रत येणे – स्वस्वरुपात स्वरूप मिळवून असणे – स्वरुपाच्या दर्शनस्पर्शनाचें होणें हें केव्हां बरें होईल अशीच एक बंधतेची गोड अशी गोष्टच मुळीं नेहमीं समोर होऊन येते. तेथे त्या मुखाकडे पाहून तो आपला प्रिय का प्रिया येथें आहे कां तेथे अथवा दुसरीकडे कोठे असेल बरे अशी उत्कंठा वागवीत राहिल्यानें, ह्या मनुष्यानें हे प्रेमलक्षणाचें होणे हे केव्हां बरे भेटीस येईल, क्षेम देईल, आलिंगनानें सुखशात असे करील असे चिन्हांकिततेचें तें प्रश्न करणें कां विचारपूस करीत राहाणे नेहमीं होत असणारे : तेथें श्रीगुरुकृपेनेच तें फाकलेले कां पसरलेले चित्त हे आपलेसे करून ती भेटी ही होणारी होते – अनंत मुखाच्या डोहींचा तळच पाहिला जाणारा असे होते व मग वासनाअंतराची विवंचना ही सहजच मग पारुखते, नाहींशी होते.

अहो, नेहमीं विचारच करीत बसणे कां काळजी वाहणे – सहज भोळेपण, सहज सभ्य – हेंच महत्त्व, आश्चर्य घेऊन आहे; तेथे दुसऱ्यासच पाहाणे करणें तें – बुद्धीनें श्रद्धेचें, स्थितीचें का निष्ठेचें होणे तेथें कांहींच एखादे देवस्तुतीचे वाक्य कां स्तवनाचें निमित्त नच पुढे झाले, तर ते वळण घेणारे होतच नाहीं. म्हणून या प्रकृतीचे स्वास्थ्य, मिजाज कां तब्यतीचे कृपेस येणे येथे कांहीं एखादे (बहिर्मुखतेचें असणे जे) अपराध क्षमा व्हावेत असे देवस्तुतीचे एखादे वाक्यच उगवत नाहीं. म्हणून आतां ह्या भक्तीनें त्या परमातुची कां प्रकृतीची अथवा तब्यतीची कास घेणे हे व्हावे. व तसे ते कासेस लागल्याशिवाय कां शरण म्हणजे मला आपला आश्रय असावा असे विनवणे झाल्याशिवाय पदरांत मुळीं काहीं पडणारे होत नाहीं. बुद्धि ही काहीं प्रमाणांत का होईना पण आपले जागतेपण – जगत् – देह – मापन हे पाहती व्हावी. त्यामुळे तिजला प्रकाशाचे का एखाद्या मार्गाचे सापडणे व्हावे – आणि म्हणून तेथे एकच देवदिव्य दोहों ठायीं वागत असलेले त्यास या सेवासंबंधाने सेवेची जेव्हा का क्षमा व्हावी असे विनवावें, तेव्हांच मुळीं ती प्रेमाने पाहाणारी कृपेची ओल ही आंत येऊन कृपेचे पांघरुण घालणारी होते. म्हणून येथे ती कृपेची गुरुकृपादृष्टी ही येण्यास जे देवदिव्य तेच मुळीं आपला ठाव पाहाणारे झाल्याने, ती ह्या प्रकृतीभक्तीस आपले म्हणविते व स्तवन, स्तुतिक्षम्य इ नीं शातपण अंगीकारते, तेव्हांच मुळीं ती शांतलक्षणा कां प्रेमधारणा का मनाच्या उदारपणाची प्रीतिवाहिनी ही प्रकृतीसच मोठेपण देऊन तिजकडून सहज सेवाभाव रम्यतेस येणे करणारी होते म्हणून ह्या सहज प्रेमधाकानेच मुळीं ह्या देहाची जी अहंमन्य देहअहंता हीच फेडून काढून एका प्रेमास आली व आईबापाच्या वात्सल्यतेच्या आंगास पाहूं करणारी झाल्याने, तेथे सहज प्रेम हे उदार भावच जसा पुढे करून असते, व या मनास त्याचें प्रसन्नपण हे अंगीकारवून स्तुतिस्तवनाचे मिसच का महत्त्वच एक त्याने ते आपल्या सर्व महत्त्वाचें व्हावे असें होऊन येते. म्हणून येथे प्रार्थना ती कशी हे समजविले. ज्या दिव्यदृष्टीनें अर्जुनाचा देहभाव नाहींसा होऊन एक योगभावच पुढे झाला, देवच तेथे तो आपले दिव्य दाखवूं लागलेला — त्याचीच मुळीं ती दिव्यदृष्टी कां दिव्यता कां आत्मयोग अथवा कृपादृष्टी ही सर्व योग्यता पाहविणारी अशी, म्हणून येथे तीच कृपादृष्टी श्रीज्ञानलक्षणाची अपूर्वता हीच स्तविली व ते जे योगदिव्यतेचें दिव्य आपलेपणास आले तेच आतां स्तविले : तेथेच आतां गहाण व्हावे असेच ते

जसें कां सर्व योग हा झेपला जातो व प्रकृति हीच मुळीं ती भक्तिमाता अशी परमातु का परमहंसच एक – म्हणून येथे आतां आपण तेच ते स्तवन करून त्या दिव्यदेवतेस आपल्या सकरुणतेचें व्हा असे प्रार्थू – आठवूं – विनवूं

संख्यायते तनुः । सर्व जीवित हे या बुद्धिरूपी रणागणावर उभे केले, तेथे सर्व विश्व हे जसे श्वास घेऊं लागले – जागते किंवा जिवंत असा जीविताचे झाले कर्मधर्मसंयोगाने पापपुण्य सम झाले जेव्हा, तेव्हांच हा नरदेह प्राप्त झालेला येथे आता सर्व विश्व हेंच कर्मिन असे म्हटले गेले. "स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः ॥ यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम । स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः ॥ म्हणून हे सर्व जग कर्मिन किंवा कर्मयोगीच होय, कर्मयोगानें आवरिलेले होय येथे आतां तो योगीच जसा, कर्मयोगीच जसा, सांख्ययोगीच जसा कां ज्ञानयोगीच जसा ह्या जीवितावर जय मिळविणारा, आत्मा सांपडला असे करणारा – तेथे देह हें आत्म्याचे अमरत्वच का देवच झाले जसे का येथे स्वहित कां भूतकल्याण पाठीवर वाहून असणारी जी अभिहितारूपी कल्याणी का सांख्यायिनी ती हरतऱ्हेने ह्या आत्म्याचें अमरत्व सिद्ध करण्यास लागणारी जी क्रिया किंवा प्रज्ञाभार तो दारवर्तत असणारी अमरत्वावरच उभी असणारी होय म्हणून कर्मयोग कर्मयोग असे जे काहीं म्हटलेले ते ह्या बुद्धिसंख्येवर उभे झालेले विश्व होय कर्मकांडामध्ये विश्वाकार संभावन हेच प्रामुख्याने प्रस्ताविले – तेच योगक्रियारूपी कर्म म्हटले. येथेच ही बुद्धि किंवा जगत हे अक्षराने सर्व श्वासभार जिंकिला असे जे स्पष्ट करून सांगितलेले त्यासच बुद्धियोग असे म्हटले आता येथे जे काहीं चिकाटी धरून वरील तत्त्व आपलेसे करणे ते फक्त एका बुद्धियोगाने होय

येथे ती आवड का ते वेदन कां ते विश्व हे जेव्हां बुद्धिरूपी तेजाने आपल्या महत्त्वाचे होते, आपल्या महत्त्वास येते, तेव्हा तेथे अक्षर हेच मुळीं सर्व जीविताचा भार उचलून असते व ते अक्षर हेच मुळीं तेजभारास आल्याने, वरील जो कंप त्यास आपल्या वरचढ होऊं देत नाहीं म्हणन येथे बुद्धियोग हाच प्राधान्य दिलेला व तो जेव्हा या जन्माने आपलासा केला जातो, तेव्हा सर्व विश्व का जगत का देह का बुद्धि ही आपल्या प्रगल्भतेने ते नाम का देवत्व पाहू लागते

संख्येवर उभी राहिलेली बुद्धि ती प्रज्ञाभार होय, भक्तियोगावर उभी राहिलेली बुद्धि ती प्रभाभार होय व ज्ञानयोगावर उभी राहिलेली बुद्धि ती वेदनभार होय म्हणून हे सर्व एकत्वास जेव्हां येते, सर्व भूतमात्राचा भाव हा एकस्थ जेव्हा होतो, तेव्हा ब्रम्हसंपदाच ही ज्याचे मूळ आहे असे ते ब्रम्हपद उमजूं लागते, समजूं लागते : तेथे पुरुष देहात असून देहातीत, साक्षी केवळ, त्यास द्रष्टा (ब्रह्मा: प्रभु साक्षी) म्हणतात, अनुमोदनाने असणारा त्यास अनुमंता म्हणतात, धारणपोषण करणारा त्यास भर्ता (विष्णु) म्हणतात व ब्रम्हादिकांचा स्वामी असल्याने त्यास महेश्वर (शिव : निवास : शरण) म्हणतात व शुद्ध सच्चिदानंद असल्याने परमात्मा म्हणतात

भक्ति ही जीविताच्या ठायीं जडलेली आवड असून, तेथे ती अनेक तऱ्हांचा भार बाजूस करून, त्या भाराचे न होतां, आपलेपणाने त्या तत्त्वातच बसते तेथे संवेदन होणारे जे तेच जाणिवेप्रत आले, ज्ञानाचे झाले म्हणन जी कांहीं जाणीव शुद्धीची झाली, आवड जीवित्वास आली, ते ह्या कर्मयोगाने म्हणजे या विश्वाने – ह्या देहाने – ते संख्येप्रत आलेले ते बुद्धितत्त्व ते छाननी करून, योग्य जें, जीविताचें जें, आवडीचें जें, सज्ञानतेचें जे, चैतन्याचें जे तेवढेच घेतले म्हणून येथे हे सर्व एकत्वास आल्याने. तेथे वेगळेपण नाहीं, दुजें असे नाहीं आतां विशिष्ट आवडीचे विशेष जे काहीं ह्या देहप्रारब्धाने. जगदरूपी बुद्धीनें पुढे घेतलेले किंवा केलेले होते, तेच ह्या देहास प्रारब्धभोग भोगण्यास दिलेले असे असते. येथे अथपासून इतिपर्यंत वेदांतांतील रज्जुसर्पन्याय – जेथे ही देहबुद्धि कंपायमान होणारी – का या

दृष्टीमधील जे शुभ्र तेज ते आकाशच एक असें का तें हादरविलें गेल्यानें, सर्व जीवितभार हाच आपल्या मुळामधून उपटविला जावा असा – नसत्या भीतीनें आक्रमण केला असा होय. तेथें हा श्वासभारच गागरलेला होऊन पलीकडच्या प्रदेशांतच क्रमण करणारा होतो. तेथें भीतिच ही जणूं व्यक्तिरूप होऊन ती सर्व जीवित व तेथीलचें सर्व कांहीं आपलेंसें करते म्हणून हाच न्याय सर्व महत्त्व घेऊन असलेला होय.

कर्मकांडामध्यें विश्वाकार संभावन हेंच प्रामुख्यत्वेंकरून प्रस्ताविलें – योगक्रियारूपी कर्म म्हटलें. देवताकांडामधील भक्तियोग जो तो ह्या अनेक गुणांना देवतारूप करणें हा असून, तेथें मन, बुद्धि, चित्त व अंतःकरण ह्या चित्तचतुष्टयाची ईषप्रेमाच्या ठिकाणीं भक्तिच जडली एकविधतेची असें होय. तेथें या साख्यायिनीचें, विश्वाकारसंभावनेचें व अंतःकरणचतुष्टयाचें इत्थंभूततेनें वर्णन केलें आहे. आतां भक्तियोग जो आहे तोच मुळीं सरस्वती बीज का परमहंस योग असून, तेथें साख्यायिनीचें म्हणजे कर्मयोगाचें, भक्तियोगाचें व ज्ञानयोगाचें एकीकरण केलें, व हे तिन्ही योग एका मालिकेत आणून बसविले : किंवा सांख्ययोगी व कर्मयोगी यांची एकात्मता ही भक्तियोग भूमिकेनें दाखविली आहे. येथें भक्तियोग म्हणजे सर्व जीवाचा जीवच होऊन, आत्म्याचें अमरत्व सिद्ध करण्यास लागणारा साख्ययोग व तेथील क्रियारूप असणें जे तो कर्मयोग हे दोन्ही आपणच झाला. येथें प्राधान्येंकरून रज्जुसर्पन्याय हाच एक न्याय वागविला गेला व देहबुद्धि सोडून वस्तुरूपच किंवा सगुणच एक होणें केलें व तेच परम शांत अशा ब्रम्हशक्तीचें लेणें होय. म्हणून येथें हे सर्व योग जरी निरनिराळे दिसतात, तरी त्यांचें समन्वयत्वच आहे. कर्मकांडामध्यें कर्मयोगास लागणारे जे गुण तेच मुळीं या साख्ययोगांत सांगितले असून, तेथें प्रज्ञायोग किंवा स्थितप्रज्ञयोगी येथें प्रज्ञा स्थिर होण्या करितां लागणारी जी क्रिया किंवा बुद्धीचें प्रागल्भ्य, का तपभार, कां यज्ञरहस्य कां दातृत्व ते कसें फेर-बदलानें आपलेंसें होणारे तेच सांगितलें. तो तो योग आपल्या महत्त्वावर उभा असल्यानें तो जसा अगदीं निराळा असा दिसतो परंतु साख्ययोग घेतला तरी त्यांत ज्ञान व भक्ति आहे, भक्तियोग घेतला-तरी त्यांत ज्ञान व कर्म आहे व ज्ञानयोग घेतला तरी त्यांत कर्म व भक्ति आहे भक्ताचीं लक्षणें तींच मुळीं कर्मयोग्याचीं लक्षणें होत. येथें कर्मयोगी ते सांख्ययोगी म्हटले गेले व भक्त तेहि तेच म्हटले गेले. असें ज्ञानकांडांतील वर्णनाचें इत्थंभूतपण आत्मसात करावें त्या त्या योगानें, व असें जर केलें तर तेच ते प्रत्यक्ष होऊन असणें होय तेथें भक्त का ज्ञानी कां योगी असो, तन्मयता सिद्ध झाल्यावर तेथें मग युक्ततम असेंच म्हणणें होतें – तेथीलचा बोध किंवा अन्वय हा एकच होय.

स्थितप्रज्ञता हीच मुळीं कर्मयोग्याची भूमिका होय. स्थितप्रज्ञ होऊन मगच कर्में करावींत असें होय स्थितप्रज्ञ नाहीं तर कर्मयोगी नाहीं व कर्मयोगी नाहीं तर स्थितप्रज्ञ नाहीं कारण कर्मयोगा-करिता ( संभावन : विश्वप्रतिष्ठा : क्रिया ) करावीं लागणारीं अशीं कांहींच वचनें निराळीं सांगितलीं नाहींत कमयोग (क्रियाभार · देह) हा मुळीं आपल्या प्रतिष्ठेस येण्याकरिता सांगितलेले जे कांहीं एक प्रेम, प्रीति किंवा परस्पर भावना ह्यानींच देव संतुष्ट होणारे, व असें ते देव संतुष्ट होणें म्हणजेंच परस्परांना परस्पराची योग्यता देणें होय – व ती म्हणजे प्रेमाची का प्रीतीची देवघेव करणारी अशी विश्वसूत्र किंवा चक्रचालना असून, ती जरूर म्हणजे सर्व प्रकारें मूळच या जन्माचें होय. तेथें अनुस्थिति का शील हेंच होय. तुम्ही देवांना संतुष्ट करा व मग ते देव तुम्हांस तुमच्या जरूरी पुरवितील, तुमची सेवा करतील अशा परस्पर प्रीतीनें जे कांहीं मिळेल ते देवांना अर्पण करून मग सेवन करीत असावें म्हणजे ते देव हे नेहमींचे असे जागे असणारे ते तुमच्या ठिकाणीं जागे राहून तुम्हास लागणारा सर्व भार (विद्या : प्रतिष्ठा : बुद्धि : क्रिया) पुरवितील. म्हणून स्थितप्रज्ञावरच ही सर्व मदार टाकली असें

मनुष्यजन्माचा भार वाहिला गेलेला केव्हाहि! पण कारुण्य जे, कां दयासर्वस्वाचें दर्शन, तें श्रीगुरूचें अपर्ण्यानें, करुणाकल्लोळाचें तें (श्रीवागेश्वरी) वाणीऋण ज्ञानमय - तें ऋण जे तें फिटणारे नच.

अशी ती शुद्धीस पाहणारी जी भावना तेथें श्री वागीश्वरी - चारी वाणींनीं जे ज्ञानभावास येणें तेच मळी त्या वाचेचें ऋण हे मरूनहि म्हणजे मरणें केलें तरी फिटणारे नाहीं, पण तेच श्रीगुरूंच्या चरणीं अति नम्र होऊन वंदन करण्यानें फिटणारे होते. (जीव हा जर तेथें महत्त्व पाहूं लागला, तर श्रीगुरूच्या पाया पडूनच मीं तें ऋण सोडविलें असे म्हणणारा होऊन असतो केव्हांहि.) तेथीलचे ते माहात्म्य वाचेनें बोलता येनच मुळीं नाहीं, म्हणून श्रीगुरूचें दयासर्वच हेच अति महत्त्वास आलेलें होय असे केव्हाहि!

**श्री-गुरुस्तव-महिमान-माहात्म्य!**

पण! ब्रम्ह ते ब्रम्हच! श्रीगुरूंचें ऐश्वर्य तें ईश्वरत्वच उदार लक्षणाचें-सौभाग्य ते औदार्याचें एक ह्या ब्रम्हविद्येस कुंकू लावणारे! सिद्ध लक्षण जे ते प्रसिद्धपणाची सीमाच घेऊन असल्यानें, तेथे कीर्तिच एक ह्या ब्रम्हांडभर पसरलेली ती सिद्ध सिद्ध अशीं सर्व साधनें सिद्ध होऊन आपल्या ब्रम्हतेस पाहू करणारी अशी ब्रम्हपदाची। शुद्ध स्वरूप हे प्रत्यक्ष ब्रम्हच! ते शुद्ध म्हणजे तत्पर (तत्त पर) जागत असे ते उपचार का उपाय समृद्धतेची सीमाच एक ह्या जगतास देऊन असते. का जगत रूपानें -- उपायानें सामोपचारास - आस्था, आदर, गौरव, महिमान, स्थिर करणारी - आलेली अशी ती आपल्या जगताच्या ( विश्व × देहप्राणी ) बुद्धीने शुद्धीवर असणारे असे ते निर्मळ ब्रम्हच एक! परम आनंदास आलेले - त ह्या जीवभावास आपले आनंदाचे राजणेंच एक व्यापक असे होऊन आहे! देऊन आहे! असे ते आनदघनतेचे देशहीन, स्थानहीन, सर्वत्र वावरणारे, व्यापणारे असे ब्रम्हरूपच होय : : परमात्म स्वरूपच होय! व तेच श्रीगुरु होत! ज्ञानच एक ते! ब्रम्हभावना का प्राणच प्रतिष्ठित झाला ह्या लोकीं असे ते ब्रम्हच ते ह्या मनुष्यलोकास शोभविणारे होय! तेथें सकल वैभवाचें विभुत्व का देवताचे दिव्यत्व (अधिष्ठानानें) असणारे असते केव्हांहि!

निकड नाहीं तर महत्त्व नाहीं. तितकी आंच बसली नाहीं, तर प्रेमाच्या एकत्वाच्या एकतानतेस येणे नाहीं प्रेम नाहीं तर महत्त्व नाहीं महत्त्व नाहीं तर स्वतःचे स्वतःस काहींच किमतीचें करणें नाहीं म्हणून हे सर्व जीवितच तोललें जाते ह्या एकाच आंचेच्या वृत्तीनें - तेथे सर्व जीव एकवटला व आपल्या स्वतःच्या उत्तमत्वास पाहूं लागला - सर्व जगच मुळी तेथ दृष्ट काढणारे! आश्चर्यानें पाहणारे! त्या तसल्या जीवभावाच्या प्रेमगोडीचे जाज्वल्य सर्व देहास दिवसाच्या प्रकाशाचे करत. सर्व बुद्धि ही तेथे महत्त्व पावली - देहजगताच्या देवदिव्यतेची झाली येथे दिव्यता हीच मुळीं कर्मदिव्य होय व तीच देव म्हणजे प्रकाशणारी, चहूंकडे आपलेपण पसरविणारी झाली. अशा या वैलक्षण्यानें तेथे देवच जो एक दिवि नेहमींच असणारा तोच मुळीं आता ह्या भूमीवरच उतरला व ह्या कोटीसच त्यानें आलिंगिलें, पत्करिलें असे होणारे केव्हांहि! म्हणून ती एकनिष्ठतेची सीमा ही पुरुष प्रकारास आल्यानें, आतां अनेक देवानीं एकत्वानेंच मुळीं तीं दैवी दिव्यता आपल्या अंगावर घेऊन आपणच तेथीचे झाले. तेथे सर्व प्रशस्तपणच एक व आता 'देवो कृपासिंधु' असे सर्व जगताचे का देहाचे प्रसन्नत्वच एक मनोरम असे.

उत्तमत्व शीलाचे ते मुळींच कांहीं न बोलणारे, पण तेथे ते तसले ह्या दैवाचे केव्हां बरे पाहविलें जाईल असेच एक विचारणारे होऊन असते जरी, तरी पण प्रत्यक्षत्वानें ते गुणगणाचे आपल्या अंगीं वागविल्याशिवाय काहींच मुळीं तेथें गम्यत्व नाहीं. व ते ह्या प्रकृतीनेंच वाहविले गेले. तेथे अनेक भार या बुद्धयांचे ते आपलेपणाच्या महत्त्वास आले असे होत. असे ते बुद्धीचे मंडण जगतास केव्हांहि

पटणारें असल्यानें, जो तो तेथीलच्या महतीस आपलें अंग देऊन असतोच असतो. महत्त्वानें सर्व महत् जे तेच बुद्धिभारास आले असे झाल्यानें, तेथे हृदयच मुळीं प्रसन्नतेच्या प्रकारास आले – अलंकृत झाले.

चतुरपणें चतुराननु पै भागला।
शिवुपणें शिवरुपु पै जाहला ॥ १ ॥
हरिपणें हरि अंग रिघाला।
या तिहींचा मेळा न दिसे गे माये ॥ २ ॥
बापरखुमादेवीवरू तिहीं गुणांवेगळा।
शक्ति नव्हे दादला गे माये ॥ ३ ॥

भगवान श्रीहरि आपल्या चतुरपणानें ब्रम्हदेव होऊन सृष्टि निर्माण करितां करितां भागला, शिव म्हणजे शिवरूप झाला, विष्णुपणाने विष्णु झाला : ब्रम्हा, विष्णु, महेश या तिहींचा समुदाय शुद्ध परमात्मस्वरुपाच्या ठिकाणीं दिसत नाहीं. रखुमादेवीवर जो श्रीविठ्ठल तो तीन गुणांहून वेगळा आहे तीन गुण जिच्या ठायीं असतात ती माया म्हणजे ईशशक्ति ही परमात्मा नाहीं, तर परमात्मा तिचा दादुला म्हणजे नवरा आहे ! ग माये बाई !!! ( ज्ञा. गा. )

विरूपाक्ष विश्वेश विश्वादिदेव।
त्रयीमूल शंभो शिव त्र्यंबक त्वम्।
प्रसीद स्मर त्राहि पश्याव पुष्य।
क्षमस्वाप्नुहि त्र्यक्ष पाहि क्षियामः ॥

( शिवभुजंगप्रयातस्तोत्र )

अशी ही मांडणी श्रीज्ञानेश्वरमाऊलीचे प्रेमास पात्र व्हावी असे आम्ही इच्छितो – ती त्यांचे कृपाप्रसादाच्या योग्यतेनें असो !

या अध्यायाचें काम मोहन-मुद्रेने शक्य तितकें लवकर केले याबद्दल त्यांचे आभार आहेत. तसेच या अध्यायाचे प्रकाशनकामीं नगरचे सुप्रसिद्ध कॉंट्रॅक्टर व उदार गृहस्थ श्री. आर. एन राजूरकर यांनीं आपले वडील कै. रा. रा. एन्. एस्. राजूरकर यांचे स्मरणार्थ रुपये १००० ची स्तुत्य मदत करून श्रीज्ञानेश्वरमाऊलीबद्दलचे आपलेपणाचे प्रेम व्यक्त केलें याबद्दल त्यांचे आभार होत.

शेवटीं सर्वांचे आभार मानून, संतसज्जनांचें प्रेम हे याचनेचें करून, श्रीज्ञानेश्वरमाऊलीचे चरणीं मस्तक ठेवून व एका 'पुंडलीक वरदेन' त्यांस साष्टांग वंदन करून मी ही प्रस्तावना पुरी करतों.

संतांचा दासानुदास
**गोविंद रामचंद्र उपळेकर**

---

*

# बाराव्या अध्यायाची भूमिका

**अर्जुन म्हणाला:—**

हे कमलपत्राक्षा, तुमचे अविनाशी माहात्म्य, भूतांची उत्पत्ति व प्रळय आपणांकडून ऐकिलें. तुम्हीं सांगितलें तसेंच तें आहे व आतां आपलें ईश्वरी स्वरूप मी पाहूं इच्छितो. मला तें स्वरूप पाहतां येणें, दिसणें, शक्य आहे असे तुम्हांला वाटत असेल, तर तें आपलें तेजस्वी ऐश्वरम् म्हणजे ईश्वरी रूप मला दाखवा. यावर

**श्रीभगवान म्हणाले:—**

हे पार्था, आतां तं माझीं रूपें तीं नानाप्रकारचीं, नानारंगाचीं, नानाआकाराचीं, शेकडों, हजारों अलौकिक अशीं तीं पाहा. बारा आदित्य (अदितीचे द्वादश पुत्र), अकरा रुद्र, दोन अश्विनीकुमार, एकूणपन्नास मरुद्गण यांना पाहा. तसेंच पूर्वी कधीहि न पाहिलेलीं अशीं रूपें व आज येथं मजमध्ये एकत्रित झालेले चराचर जगत्, तसेंच आणखी जें कांहीं पाहूं इच्छितोस तेहि पाहा. पण तुझ्या या चर्मचक्षूंनीं तूं मजला मुळींच पाहूं शकणार नाहींस, म्हणून तुजला दिव्य दृष्टी म्हणजे अलौकिक असें पाहाण्याचें सामर्थ्य - देखणेंपण - (दिव्यं ददामि ते चक्षुः) देतों. त्या दृष्टीनें माझे ईश्वरी सामर्थ्य तूं पाहा.

**संजय म्हणाला:—**

याप्रमाणें बोलून महायोगेश्वर व सर्व पाप हरण करणाऱ्या श्रीहरींनीं म्हणजे श्रीकृष्णांनीं आपले परम श्रेष्ठ ईश्वरी स्वरूप पार्थाला दाखविलें. त्या विश्वरूपामध्ये अद्भूत दर्शनें होतीं त्याला अनेक तोंडें, अनेक डोळे होते. त्या दर्शनाला दिव्य अलंकार घातले होते. त्यानें हातांत अनेक दिव्य आयुधें उचलून धरिलीं होतीं त्या विश्वरूपाच्या अंगावर दिव्य माला व वस्त्रे असून अंगाला गंधाची उटी लाविली होती असे तें अत्यंत आश्चर्यकारक, प्रकाशमय, अनंत आणि विश्वतोमुख विश्वरूप भगवंतांनीं अर्जुनास दाखविलें. सहस्र सूर्यांची प्रभा (प्रकाश, तेज) जर एकाच वेळीं प्रगट होईल, तर तें त्या विश्वरूपाच्या प्रभेसारखें कदाचित् दिसेल. त्या समयीं अर्जुनानें नाना प्रकारांनीं विभागलेले सर्व जग त्या देवदेवाच्या देहांत - विश्वरूपांत – एकत्र झालेले (स्थित झालेले) पाहिलें, व तो आश्चर्यचकित झाला त्याचे अंगावर रोमांच उभे राहिले व दोन्ही कर जोडून देवदेवाला शिरसानमस्कार करून

**अर्जुन म्हणाला:—**

देवा, तुमच्या देहांत सर्व जग, निरनिराळ्या प्राण्यांचे समुदाय, कमलासनस्थ ब्रम्हदेव, महादेव, सर्व ऋषी आणि दिव्य सर्पहि मला दिसत आहेत सर्व बाजूंनीं तुम्हांला अनंत बाहू, उदरें, मुखें, नेत्र असून, सर्व बाजूंनीं तुम्हांला अनंत रूपे आहेत असें मी पाहात आहे. हे विश्वेश्वरा, विश्वरूपा, तुमचा आदि, मध्य, अंत मला दिसत नाहीं. मुकुटगदाचक्र धारण करणारे, सर्व बाजूंनीं प्रकाशमान, तेजाचा निधि, प्रज्वलित अग्नि व सूर्य याप्रमाणें दैदीप्यमान, तें पाहतांना माझे डोळेच दिपत असल्यामुळे अमुक प्रकारचें तुमचें रूप आहे असा अंदाजच मला करता येत नाहीं. असे तुम्ही सर्व ठिकाणीं मला दिसत आहां. मला वाटतें तुम्ही जाणण्यास योग्य (ज्ञेय) असे अक्षर परब्रम्ह आहांत. या विश्वाचें परम आश्रयस्थान आहांत. शाश्वत धर्माचे रक्षक आहांत. अविनाशी सनातन पुरुष आहांत

कीं अहो. तुम्हीच आदिमध्यअंतरहित असे अनंतवीर्य (शक्ति), अनंतभुजा, चंद्रसूर्य तुमचे डोळे व प्रज्वलित अग्नि हे तुमचे मुख असे तुम्ही या विश्वाला तापवीत आहात, प्रकाशवीत आहात असे मी पाहात आहे. हे महात्मन्, आकाश व पृथ्वी यामधील अंतर आणि दाही दिशा तुम्हीं एकट्यानेच व्यापिल्या आहेत. तुमच्या या अद्‌भूत उग्र रूपाने त्रैलोक्य अतिशय व्यथित म्हणजे भयभीत होऊन आहे. सुरदेवसंघ हे तुमच्यांत प्रवेश करीत आहेत, तुमच्या आंगचे होत आहेत कित्येक तर भीतीमुळे प्रांजळपणानें हात जोडून तुमच्या नामांची व गुणाची उच्चारणा करीत आहेत. महर्षि व सिद्ध यांचे संघ "स्वस्ति म्हणजे जगाचे क्षेम असो" अशा आशीर्वादाने 'स्वस्ति' असे शब्द उच्चारून उत्तमोत्तम उत्कृष्ट अशा स्तोत्रांनीं तुमचे स्तवन करीत आहेत. अकरा रुद्र, बारा आदित्य, आठ वसु, साध्यदेव, विश्वदेव, अश्विनीकुमार, मरुद्‌गण, उष्मप (पितृगण), तसेच गंधर्व, यक्ष, असुर, सिद्ध, साध्य इत्यादि सर्व विस्मित होऊन (वीक्षन्ते - ईक्षणे हे विणारे होऊन) तुम्हांस पाहात आहेत, चित्तक्षुब्ध अशा डोळयांनीं, विस्मित अशा नेत्रांनीं तुमच्याकडे पाहात आहेत तुमचे महत् रूप – बहु वक्त्रे व नेत्र असलेले, हे महाबाहो ! बहु बाहु, ऊरु, पाय, उदर व कराल दंष्ट्रांनी युक्त असे पाहून, सकल लोक हा भयभीत होऊन आहे, व्याकुळ होऊन आहे माझीहि पण तीच अवस्था होऊन आहे आकाशास भिडलेले, दीप्त, अनेक वर्णाचे पसरलेले मुख, दीप्त आहेत विशाल नेत्र ज्याचे अशा तुम्हाला पाहून माझा अंतरात्मा व्याकुळ होऊन गेल्यामुळें मला धैर्यच येईना व शम म्हणजे शांतिहि पण मिळेना, भेटेना अग्नीसारखीं तुमचीं मुखें पाहून मला दिशा समजेनात व सुखहि पण वाटेना यासाठीं हे देवेशा ! हे जगन्निवासा ! प्रसीद, मजवर प्रसन्न व्हा, मजवर कृपा करा हे विष्णो ! तुमच्या उग्र प्रभा आपल्या प्रखर तेजाने जगाला व्यापून तापवीत आहेत असे उग्र रूप धारण करणारे आपण कोण आहांत ते मला सांगा. हे देवश्रेष्ठा, नमोऽस्तु ते ! देववर प्रसीद ! आपणास नमन असो ! आपण प्रसन्न व्हा ! भवन्तमाद्यन्तं विज्ञातुमिच्छामि – आपणा आदिपुरुषास तत्त्वतः जाणण्याची माझी इच्छा आहे. तुमची लीला मला समजेना.

**श्रीभगवान म्हणाले:—**

इंद्रिये ही कर्माच्या ठिकाणीं वाढ घेऊन आहेत असा माझा आत्मा प्रवृद्ध झाल्यामुळें मी वाढलेला महाकाळच समज. येथे इह लोकान् समाहर्तुं प्रवृत्तः। तूं युद्ध केले नाहींस तरी येथे सैन्यात उभे असलेले योद्धे उरणार नाहींत – न भविष्यन्ति यासाठीं उत्तिष्ठ, जागा हो, यश मिळीव आणि शत्रूंना जिंकून धनधान्याने समृद्ध अशा राज्याचा उपभोग घे हे सर्व शूरवीर मी पूर्वीच जिंकले आहेत. अशा हे सव्यसाची, तूं फक्त निमित्तास कारण हो. करिता शत्रूंना जिंक, भिऊं नको, युद्ध कर. रणात तूं विजयी होशील.

**संजय म्हणाला:—**

श्रीकृष्णाचें हे भाषण ऐकूण थर थर कांपत असलेला अर्जुन पुनः पुनः हात जोडून व फिर फिरुन नमस्कार करीत असलेला, भीत भीत व सद्‌गदित कंठाने म्हणाला.

## विश्वरूपाची महती, प्रार्थना

**अर्जुन म्हणाला:—**

**स्थाने हृषीकेश तव प्रकीर्त्या जगत् प्रहृष्यत्यनुरज्यते च।**
**रक्षांसि भीतानि दिशो द्रवन्ति सर्वे नमस्यन्ति च सिद्धसङ्घाः॥ गीता**–अ ११-३६॥

अहो हे श्रीहृषीकेषा, हें अहो योग्यच आहे कीं, तुमच्या नामगुणप्रभावाच्या कीर्तनानें सर्व जग आनंदभरित होत्साते तुमच्यावर अनुरक्त होऊन राहिले आहे. रक्षांसि भीतानि – राक्षसगण प्रवाही म्हणजे भयभीत होऊन दशदिशा पळत आहेत, सिद्धांचे संघ तुम्हाला नमस्कार करीत आहेत.

**कस्माच्च ते न नमेरन् महात्मन गरीयसे ब्रह्मणोऽप्यादिकर्त्रे ।**
**अनन्त देवेश जगन्निवास त्वमक्षरं सदसत् तत्परं यत् ॥ ३७ ॥**

हे महात्मन्, हे आदिकर्त्रे, हे अनंता, ब्रम्हदेवाचेहि आदिकर्ते व सर्वांहून श्रेष्ठ अशा तुम्हांला ते जे दशदिशा पळत आहेत ते का बरे नमस्कार करणार नाहींत? अहो हे अनंता, हे देवेश, हे जगन्निवासा, सत् व असत् व त्याहिपलीकडील जे अविनाशी तत्त्व असे जे सच्चिदानंद ब्रम्ह ते तुम्ही आहांत.

**त्वमादिदेवः पुरुषः पुराणस्त्वमस्य विश्वस्य परं निधानम् ।**
**वेत्तासि वेद्यं च परं च धाम त्वया ततं विश्वमनन्तरूप ॥ ३८ ॥**

हे अनंतरूपा, हे आदिदेवा, तुम्ही पुराणपुरुष आदिदेव, विश्वाचा परम आधार, विश्वाला जाणणारे व जाणण्यास योग्य असे आणि परमधाम म्हणजे श्रेष्ठ असे स्थान आहात. हे अनंतरूपा, तुम्ही हे विश्व व्यापिले आहे.

**वायुर्यमोऽग्निर्वरुणः शशाङ्कः प्रजापतिस्त्वं प्रपितामहश्च ।**
**नमो नमस्तेऽस्तु सहस्रकृत्वः पुनश्च भूयोऽपि नमो नमस्ते ॥ ३९ ॥**

अहो हे अनंतरूपा, वायु, यम, अग्नि, वरुण, चंद्र, प्रजापति आणि प्रजापतीचेहि पिता ब्रम्हदेव तुम्ही आहात. अशा तुम्हाला मी पुनःपुनः अनेक वेळा नमस्कार करतो.

**नमः पुरस्तादथ पृष्ठतस्ते नमोऽस्तु ते सर्वत एव सर्व ।**
**अनन्तवीर्यामितविक्रमस्त्वं सर्वं समाप्नोषि ततोऽसि सर्वः ॥ ४० ॥**

हे सर्वात्मका, तुम्हाला समोरून, पाठीमागून आणि सर्व बाजूंनीं (सर्वत एव सर्व) नमस्कार असो, मी नमस्कार करतो. तुमचा पराक्रम अगणित (अमित) व वीर्य अनंत असून तुम्ही सर्वत्र व्यापून राहिलेले आहात व त्यामुळे सर्वरूप आहात.

**सखेति मत्वा प्रसभं यदुक्तं हे कृष्ण हे यादव हे सखेति ।**
**अजानता महिमानं तवेदं मया प्रमादात् प्रणयेन वापि ॥ ४१ ॥**

हे अच्युता, तुमचा हा एवढा महिमा न जाणतां, तुम्हांस बरोबरीचा मित्र समजून, प्रेमानें किंवा प्रमादानें हे कृष्णा! हे यादवा! हे सखया! असे जे कांहीं मी अमर्यादतेचे बोललो असेन, त्या सर्वांबद्दल मी तुमची क्षमा मागतो.

**यच्चावहासार्थमसत्कृतोऽसि विहारशय्यासनभोजनेषु ।**
**एकोऽथवाप्यच्युत तत् समक्षं तत क्षामये त्वामहमप्रमेयम् ॥ ४२ ॥**

हे अच्युता, आहारविहारांत किंवा निजण्याबसण्यांत, एकांतीं अथवा चारचौघांत मी विनोदानें जो तुमचा अपमान केला असेल, त्या अचिन्त्यप्रभाव अशा तुमची मी क्षमा मागतो!

**पितासि लोकस्य चराचरस्य त्वमस्य पूज्यश्च गुरुर्गरीयान ।**
**न त्वत्समोऽस्त्यभ्यधिकः कुतोऽन्यो लोकत्रयेऽप्यप्रतिमप्रभाव ॥ ४३ ॥**

हे अतुलप्रभावा ! तुम्ही या चराचराचे उत्पादक, पूज्य आणि अत्यंत श्रेष्ठ असे (श्रेष्ठतम) गुरु आहात अहो हे अप्रतिमप्रभावा ! त्रैलोक्यात तुमच्या बरोबरीचा कोणी नाहीं - मग तुमच्याहून अधिक तो कोठून असणार ?

**तस्मात् प्रणम्य प्रणिधाय कायं प्रसादये त्वामहमीशमीड्यम् ।**
**पितेव पुत्रस्य सखेव सख्युः प्रियः प्रियायार्हसि देव सोढुम ॥ ४४ ॥**

म्हणून अहो हे देवा ! हा माझा देह आपल्या चरणावर ठेवून मी आपणांस प्रणाम करून स्तुति करावयास योग्य अशा आपणा ईश्वराला प्रसन्न होण्याविषयीं मी प्रार्थना करतों पिता पुत्राचे, सखा सखीचे (सख्याचे), पति पत्नीचे अपराध क्षमा करतो, त्याप्रमाणें अहो हे देवा ! तुम्ही माझे अपराध सहन करणे योग्य आहे तुम्ही माझे अपराध क्षमा करावेत हे केव्हांहि योग्यच होय.

**अदृष्टपूर्वं हृषितोऽस्मि दृष्ट्वा भयेन च प्रव्यथितं मनो मे ।**
**तदेव मे दर्शय देव रूपं प्रसीद देवेश जगन्निवास ॥ ४५ ॥**

हे देवेशा ! हे जगन्निवासा ! पूर्वी कधींहि न पाहिलेले ते आपले रूप पाहून मी तर हृषित म्हणजे हर्षभरित झालो पण भयानें तर माझे मन फार व्याकूळ झाले - होऊन आहे म्हणून हे देवदेवा ! तेच आपले चतुर्भुजरूप मला दाखवा. मजवर कृपा करा.

**किरीटिनं गदिनं चक्रहस्तमिच्छामि त्वां द्रष्टुमहं तथैव ।**
**तेनैव रूपेण चतुर्भुजेन सहस्रबाहो भव विश्वमूर्ते ॥ ४६ ॥**

हे सहस्रबाहो ! हे विश्वमूर्त, माथा मुकुट धारण केलेले व गदाचक्र घेतलेले असे तुम्हांस मी पाहूं इच्छितो हे विश्वमूर्ति, हे सहस्रबाहो, आपण त्या चतुर्भुजरूपानेच असा, प्रगट व्हा.

हे आपले विश्वरूप पाहून माझे मन आनंदित झाले, परंतु आतां मनांत अशी इच्छा आहे कीं, तुमच्याबरोबर गोष्ट करावी व आलिंगनाने तुमची जवळिकच भोगावी परंतु ह्या अशा या रूपांत ती गोष्ट करण्याचे ते कसे ? तुम्हांस गणना नसल्याने आलिंगन ते कोणास द्यावे, व कोणत्या मुखासी गोष्ट बोलावी ? म्हणून हें वाऱ्यावर धावण्याचे घडत नाही गगनास भेटणें शक्य नाहीं. जलक्रीडा खेळणें समुद्रामध्ये तें कसचें ? यालागीं देवा ! हा माझा जीव भीति घेत आहे म्हणून आतां एवढे करा कीं - असे पाहा कीं - हे पुरें. चराचर हे सहज विनोदाने पाहून आपल्या घरीं सुखानें येऊन राहाणें जसे, तसे हे तुमचें चतुर्भुज रूप ते आम्हास विसांवा आहे. आम्ही यमनियमादिसह सर्व योग जरी अभ्यासिले, तरी याच चतुर्भुजाच्या अनुभवाकरिता हे य शास्त्रे शिकावीं, अध्ययन करावे, पारगत व्हावें, ते याच सिद्धातास येण्याकरिता. आम्हीं केलेले यजयाग त्याचे फळ म्हणजे चतुर्भुज रूप होय तीर्थयात्रा करणें हेहि पण याजकरितां होय आणि ते जे काहीं दान पुण्य करावे त्याचें फळ म्हणजे हेंच चतुर्भुज रूप होय म्हणून तेथीलची आवड आम्हांस फार आहे. म्हणून तेच लगबगीनें देखण्याकरितां म्हणून जे काहीं आम्ही सकटानें असतों, ज्या कांहीं कष्टानें असतों ते कष्ट दूर करून आम्हांस तें चतुर्भुज रूप पुन्हां दाखवा. अहो, माझ्या जीवींचे जाणणारे तुम्ही, जगच वसविणारे तुम्ही, अहो देवांच्या देवा, हा जो मी तुमचे पूजन करून आहे त्या मजवर प्रसन्न व्हा. नीळकमळाना रावबून आकाशासच रंग लाविला,

तेजाची प्रभा किंवा झांक दाखवून इंद्रनील मणीच पुढे केला अंगाचा परिमळ झळकल्यामळे पाचूचे जसे जाहाले कां आनंदासच भुजा निघाल्या व ज्याचे गुडघ्यांनीं मदनास शोभाच जोडून आहे. मस्तकाने मुकुट लेईला का मुकटच मस्तक झाले, ज्याच्या आंगामुळे श्रृगारास श्रृगार लाधला, ज्याचे अंगच श्रृगार असे आहे. मेघाच्या आसनावर बैठकीवर इंद्रधनुष्य झळकते – शोभते, त्याप्रमाणे वैजयंतीने शारंगपाणी जो कृष्ण त्यास वेष्टिलेले आहे आतां त्या गदेचे उदारपण कसले ते, जी असुरासहि मोक्ष देणारी, त्याचप्रमाणे ते चक्र जे सौम्य तेजाने मिरवत आहे ते पाहण्यास, हे स्वामी, मी अत्यंत उत्कंठित आहे. म्हणून तसे चतुर्भुज तुम्ही व्हा आपण दाखविलेल्या विश्वरूपाचे सोहळे पाहून माझे डोळे निवाले व आतां वर वर्णिलेली जी कृष्णमूर्ति ती पाहण्याकरितां माझे डोळे भुकेले झालेले, हावरे झालेले आहेत, हपापलेले आहेत. त्या साकार कृष्ण रूपाशिवाय दुसरे कांहींहि पाहाणे आवडत नाहीं परंतु ते जर न पाहिले, तर माझे डोळे हया सर्व दृश्यास मुळींच मानीत नाहींत आम्हांस भोग मोक्ष इ. च्या ठिकाणीं श्रीमूर्तिच एक महत्त्व घेऊन असते – महतीची असते, म्हणून तसेंच तुम्ही साकार व्हा व हे पुरे करा. या अर्जुनाच्या बोलण्यानें विश्वरुपास आश्चर्य वाटले

**श्रीभगवान म्हणालेः—**

**मया प्रसन्नेन तवार्जुनेदं रूपं परं दर्शितमात्मयोगात् ।**
**तेजोमयं विश्वमनन्तमाद्यं यन्मे त्वदन्येन न दृष्टपूर्वम ॥ ४७ ॥**

हे अर्जुना, तुजवर प्रसन्न होऊन मी हे परम म्हणजे श्रेष्ठ रूप आत्मयोगानें तुला दाखविले तें तेजोमय असें व या अनंत विश्वाचें आद्य असेंच ते होय. ते तुजशिवाय दुसऱ्या कोणींहि पूर्वी पाहिले नाहीं.

या अर्जुनासारखा अरसिक कोणीं पाहिलेला नाहीं – कुठेच पाहाण्यास येणार नाहीं बा रे अर्जुना, ही अशी वस्तु केवढया तरी महत्त्वाची, अमोल अशी तूं पावून आहेस, तुला केवढी तरी वस्तु पावली आहे – अशा लाभाचा तूं संतोष मानीत नाहींस, वर तूं असे काय एककल्लीपणाचे बोलणे करीत आहेस, हे मला काहींच समजत नाहीं प्रसन्नपण जे तेथे अंगाचें देणे हे महत्त्वाचेंच, व आंगच जर नाहीं, तर जीव कोणाकरितां वेचायचा ? तुझ्याकरितां, तुझ्या आवडीकरिता या जीवास स्वरूपास आणून तेथें श्रमपूर्वक तें ध्यानच रचिले. अशी तुझ्याबद्दलची आम्हास आवड केवढी बरे ! अगा, आमची प्रसन्नता हाच वेडी होऊन आहे, म्हणून या जगीं गोप्य जे त्याची ही ध्वजाच जगीं लाविली अपरा व स्थूल प्रकृतीपेक्षाहि फार पलीकडे आहे जे – परात्पर असे – ते माझे स्वरूप – जेथूनच हे कृष्णादिक अवतार झालेले – हे निखिळ ज्ञानतेज होय – केवळ विश्वात्मक, अनंत असे, अढळ असे व सकळांनाहि आद्य असें आहे असे हे अर्जुना तुजवाचून कोणींहि पाहिलेले नाहीं, व ऐकिलेलेंहि नाहीं, कारण हे या देहसाधनास साधत नाहीं – आवरता येण्याजोगे नाहीं – शोभणारे नाहीं.

**न वेदयज्ञाध्ययनैर्न दानैर्न च क्रियाभिर्न तपोभिरुग्रैः ।**
**एवंरूपः शक्य अहं नृलोके द्रष्टुं त्वदन्येन कुरुप्रवीर ॥ ४८ ॥**

हे कुरुश्रेष्ठा ! वेदांच्या व यज्ञविद्येच्या अध्ययनानीं, दानानीं अथवा विधियुक्त कर्मांनीं अथवा उग्र तपांनीं माझे हे रूप तुझ्याखेरीज दुसऱ्या कोणालाहि या लोकीं पाहातां येणे शक्य नाहीं.

हे पाहून याचें ठिकाण जाणून, वेदांनीं मौनच घेतले, यज्ञ हे खरोखर स्वर्गाहून परत आले. साधकानीं येथे कष्टच पाहिले म्हणून योगाभ्यास टाकून दिला; तसेच येथे विज्ञान हे

गोडीचें होईना – अध्ययन हे योग्यता पाहाणारें होईना पूर्णत्वास आलेलीं अत्युत्तम अशीं सत्कर्मे त्यांनींहि पण आपल्या मोठेपणानें धाव घेऊन सत्य लोक प्राप्त करून घेतला तापसांनीं इंद्रादिकांचे ऐश्वर्य पाहिलें व उभ्याउभ्याच तें तपच सांडून टाकिलें म्हणून तपसाधनाला तें अत्यंत दूर राहिलें. असें तें ऐश्वर्य – विश्वरूप – तूं आज या मनुष्य लोकांत सहजच पाहिलेंस, असें हे कोणासच दिसलें नाहीं तूं एकटाच या ध्यानसंपत्तीकरिता सपन्न होऊन आहेस व असें हे परम भाग्य ब्रम्हदेवाच्याहि आगीं नाहीं.

**मा ते व्यथा मा च विमूढभावो दृष्ट्वा रूपं घोरमीदृङ् ममेदम् ।**
**व्यपेतभीः प्रीतमनाः पुनस्त्वं तदेव मे रूपमिदं प्रपश्य ॥ ४९ ॥**

हे कुरुश्रेष्ठा ! माझे हे घोर रूप पाहून तूं भिऊं नको, व भ्रमिष्ठ होऊं नको भय सोडून संतुष्ट मनानें प्रीतियुक्त होऊन तेंच माझे पूर्वींचे हे रूप पुन्हां नीट पाहा. भय सोडून मार्गप्रतिक्षाच करीत आहेस – प्रीतीची वाट पाहात आहेस – अशा प्रेमाचा होऊन पुनस्त्वं हे माझे रूप पाहा विश्वरूपावर प्रेम ठेवून यावेस व मग या चतुर्भुज रूपाची भेटी घ्यावीस

म्हणून या विश्वरूपाच्या लाभानें म्हणजे स्तुत्य अशीच प्रशंसा ज्यानें त्यानें करावी असा हो, भय मुळींच घेऊ नको व यावाचून दुसरें कांहींहि चांगलें आहे असें मानूं नको समुद्र अमृताचा भरला, तो अकस्मात् अंगावर लोटला – मग कोणीं तरी तो तेथें बुडणें हे होईल म्हणून त्यजिला आहे काय ? सोन्याचा पर्वत हा एवढा मोठा थोर चालायचा नाहीं, वापरावयास यायचा नाहीं, म्हणून त्याचा अव्हेर करणें व्हावें का ? चिंतामणी अंगावर घालावा परंतु ओझें म्हणून टाकून द्यावा ? कामधेनु न पोसवे म्हणून घालून द्यावी ? चंद्रमा घरीं आला त्यास उबारा करीत आहेस म्हणून बाहेर निघ म्हणणें जसें का ! किंवा दिनकरनाथ सूर्य त्यास पडछाया करतोस म्हणून बाजूस हो म्हणणें जसें ? तसें, हे अर्जुना, हे महातेजरूपी ऐश्वर्य तुझ्या हातीं सहज आलें आहे, येथें तुझी ती धावपळ, ती गडबड का व्हावी बरें ? येथें तूं गडबडावेस का बरें ? परंतु हे गावढळ अर्जुना, आता काय तुजवर कोपावें, का तर आंग जें तें सांडून तूं तर मुळीं ती सावलीच – छायाच – आलिंगण्याचें करीत आहेस हे छायेचें जे तें मी खरेपणाचें माझे जें रूप तें हे नव्हे नव्हे; येथें तर तूं आपलें मनच कच्चें करून, भित्रेपणाचा होऊन, पक्का नव्हे असा काचा होऊन, ह्या वस्तूचें – चतुर्भुजाचें, नांवारूपास आलेल्याचें, आकृतीचें – प्रेम धरीत आहेस. म्हणून या आकृतीचें – नांवारूपास आलेल्याचें – प्रेम तूं धरूं नकोस. म्हणून ह्या आकाराची, नांवारूपास आलेल्याची, आस्था बाळगूं नकोस, ती संवयीची करूं नकोस म्हणून तें विश्वरूप जरी घोर, विकृत, थोर असें, तरी तेथेंच तूं कृतनिश्चयाचा हो व तेंच आपलें घर कर कृपण जसा आपली चित्तवृत्ति ठेव्यापाशीं सर्वस्वपणें रोवून असतो व मग नुसत्याच देहानें जसा असतो, किंवा पक्षिणी आपला जीव घरट्यांत पिलांजवळ ठेवून अंतराळीं जाते, किंवा गाय डोंगरीं चरते, पण तिचें चित्त वत्साजवळ घरीं बांधून ठेविलेलें असतें, त्याप्रमाणें तूं आपलें प्रेम हें स्थानपति कर. दुसरें, जें वरवरचें चित्त आहे, तें बाहेरचें असें, बाहेरच्या अशाच सख्यापुरतें म्हणजे बाह्य सुखाकरितांच होय, व अशा त्या बाह्य चित्तानें त्या चतुर्भुज श्रीमूर्तीस भोगण्याचें करावें. येथें सुख – सख्य – हें वरवरचें का बाह्य असेंच होय तरी पुनः पुनः हे सांगणें कीं हा बोल विसरूं नयेस. जे कां या विश्वरूपाविषयींच्या आपल्या सद्भावास नच निघूं द्यावें त. हे असें कधीं पूर्वी पाहिलें नव्हतें म्हणून तुला भय उपजलें. म्हणून आता तें भय सांड व साचलेल्या प्रेमानें अस आतां तुझ्या – म्हणण्याप्रमाणेंच करूं. तें मागील रूपच आता न्याहाळून पाहा. असें विश्वतोमुखानें बोलिलें, व असें म्हणत म्हणत देव पुन्हा मनुष्य झाले.

**संजय म्हणालाः—**

**इत्यर्जुनं वासुदेवस्तथोक्त्वा स्वकं रूपं दर्शयामास भूयः ।**
**आश्वासयामास च भीतमेनं भूत्वा पुनः सौम्यवपुर्महात्मा ॥ ५० ॥**

याप्रमाणे भाषण करून वासुदेवाने आपले स्वरूप दाखविले व तो भ्यायला आहे असे पाहून, पुन्हा सौम्य देह धारण करून त्या माहात्म्याने त्याला आश्वासन दिले, धीर देता झाला, धैर्याचे केले

अहो श्रीकृष्ण उघडे कैवल्यच, याहिवर विश्वरूपाएवढे सर्वस्व ते अर्जुनाचे हाती दिधलेले, ते त्यास आवडेचना अहो, ज्या वस्तूची किमतच नाहीं अशी वस्तु घेऊन स्वतःच टाकून देणे, तेथे त्या रत्नास जसे दूषणच ठेविले, किंवा पसतीसाठीं कन्या पाहून मनास येत नाहीं असे जे म्हणणे ते येथे होत असणारे विश्वरूपाएवढी दशा जर पुढे घेतली, तर तेथे प्रीति ही कशी बरें वाढती होणारी ? पण येथे उत्तमत्व जे ते जर सर्व घेतले तर उपदेशाच सर्व महत्त्वाने आपलासा केला, तर ते म्हणजे सर्वस्वच एक या विश्वरूपास दिले – विश्वरूपच सर्वस्वाचे केले असे. सुवर्णाचा रवा मोडून हौसेचे लेणे केले, व मग जर ते आवडेना तर पुन्हा ते आटण्याचे होते त्याप्रमाणे शिष्याच्या प्रीतीमुळे जे झाले, कृष्णत्व विश्वरूप झाले व मनास येईना म्हणून पुन्हां कृष्णपणास आणिले जसे. अहो, शिष्याची किरकिर जिकीर सहन करणारे श्रीगुरु कोणत्या देशात सापडतील बरे ? कोणत्या बोलींत सापडतील बरे ? परंतु येथे आवड केवढी म्हणावी की, शिष्यावरची प्रीति तिने कृष्णरूप जे ते विश्वरूपाचे केले, पण ते काही मनासच येईना, आवडेना, म्हणून पुन्हा कृष्णपणास आणिले. विश्वरूपाच्या भ्यासूरपणाने त्याचे भयच मुळीं गेले, जसे भीतीने भीतिच मरते, भिणे नाहीसे होते तसे

**अर्जुन म्हणालाः—**

**दृष्ट्वेदं मानुषं रूपं तव सौम्यं जनार्दन ।**
**इदानीमस्मि संवृत्तः सचेताः प्रकृतिं गतः ॥ ५१ ॥**

हे जनार्दना, तुमचे सौम्य मानव रूप पाहून माझे मन पूर्ववत् सावध व स्वस्थ झाले आहे मी वृत्तीवर आलो आहे, प्रकृति गतः असा स्वस्थ होऊन आहे.

यावर जसे मागितले होते – सौम्य मनुष्यरूप – तसे त्या वीरविलास अर्जुनाने पाहिले व म्हणूं लागला कीं हे आपले सौम्य असे मनुष्यरूप पाहून – म्हणजे अर्जुन अर्जुनपणास आला – मला आता असे वाटत आहे की, मी जियालो, मी वाचलो बुद्धीने ज्ञान साडून रानच घेतले होते व मन हे देहबुद्धीसहित देशधडी झाले होते इंद्रिये प्रवृत्तीला भुलली होतीं, वाचा वाचकपणास – बोलण्यास – चुकली होती. अशी सर्व शरीरग्रामामध्ये अव्यवस्था झाली होती, दुर्दशा झाली होती, आतां पुन्हा ती प्रकृती या जीवास साप्रत भेटली असे झाले आता या श्रीमूर्तीमुळे मी जीवनच होऊन आहे अशा तऱ्हेने तो अति सुखी झाला व म्हणूं लागला की, आता हे तुमचे मानुषरूप पाहणे हे रूप दाखविणे, हे देवराया, म्हणजे चुकलेल्या मुलाला मायेने समजावून स्तनपान दिल्यासारखे होय विश्वरूपाच्या सागरांत मी पेसच नुसती मोजीत होतो, तो इतक्यांत आतां निजमूर्तीस येऊन पोहोचलों अहो द्वारकेतील वीरश्रेष्ठा, हे मित्रा, "आईके द्वारकापुर सुहाडा । मज सुकतिया जी झाडा । हे भेटी नव्हे बहुडा । मेघाचा केला ॥" अहो सुकत चाललेल्या मज झाडावर, अहो, ही साधी नुसती भेटीच नव्हे, तर मेघाची वृष्टिच झाली सहजच तहानेने फुटून गेलेलो जो मी त्यास हा अमृतसिंधुच भेटला व आतां मात्र जीवित्व हे सर्व भंरवशाचे असे होऊन आहे. माझ्या हृदयरंगणामध्ये हर्षलतांची लावणीच होऊन आहे, आणि आतां सुखरूपपणेंच मी समजुतीप्रत आलों आहे.

असें ते देवांचें विश्वरूप दाखविणे व पुनः आपल्या मूळ चतुर्भुजत्वास येणें तेथे जे कांहीं एक आदर, भीति, सहज प्रेमाचा धाक त्यानें त्याची ती प्रकृति जशी दैवी गुणाची झाली महायोगेश्वर जे त्यांनीं ( ते श्रीगुरुच जसे येथे त्या अर्जुनाच्या दृष्टींत बसलेले ) आपल्या भक्तावर प्रसन्न होऊन संपूर्ण कृपादृष्टीचा अभिषेकच केला – ती अमृताची वृष्टिच झालेली जशी. आता ती प्रकृति उपायास आली, दैवी झाली, ऐश्वरम् पाहू लागली – सत्ता ही सद्बीजाची झाली – तेथे मूळच्या वाग्बीजाच्या खाणीच शोभत असलेल्या, रचनेस आलेल्या, त्या परस्पर ऐक्यास येऊन तेथे एकटे ते महायोगेश्वरच दोहीं ठायीं वागत असलेले म्हणून आता प्रकृति हीच येथे स्तविली, भक्तीची झाली, व्यवहारास पाहू लागली – तेथे अनेक गोष्टी, अनेक मती, याना मानच दिली गेली भक्तिबीज हे प्रेमास आले, प्रियपणाचें झाले : ती भक्तिच मुळीं ती प्रकृति झाली, आपले सर्व बोधपण – बाळबोध वळणच जसे धूळाक्षराचें – तें दिव्य तेच पुढे घेऊन आपल्या योग्यतेस आल्याने, त्या चारी वाणी श्रीगुरुचरणीच परोपरीने लीन झाल्या– ऐक्यास आल्या येथे अनेक योग – सोहंभाव, हंसयोग, महत्तयोग, हठयोग, वज्रक्रमयोग, भावयोग, अभावयोग व योगांची आदि जी शांकरी विद्या तीच येथे आश्रय पाहून आहे. अनेक बीजे कां तत्वें हीं ऐक्याचीं झाल्याने, तेथे ते उत्तमत्व जे योगाचें तें प्रेमाचे झाले. आता जशी का ती ज्ञानलक्षणा ही श्रीगुरुकृपादृष्टीच एक सर्व – योगच एक आपलें ऐश्वर्य पाहू करणारा झाला, ऐश्वर्यास आला तेथे या वाणीचें ऋणच फेडले जसे का ह्या ऐक्यानें – तेथे अहं श्रीगुरूंना देऊन ऐक्यच साधले – श्रीवागीश्वरीस वंदन झालें.

---

*

*

# अध्याय बारावा – समन्वय

काय योग आहे पाहा, सहजच मी जात असतां ह्या नरतनूस प्राप्त झालों – अवचितच हा नरदेह मजला प्राप्त झाला. येथील धन्यवाद कां अप्रतिमतेचें ते भाग्य तेथें योगायोग एक आपल्या सर्व प्रसंगास आला : तेथीलचे भाग्य उत्कट असें पाहून तर मी अगदीं थक्क झालो व ह्या तनूचें महत्त्व महिमान हे पाहूं आल्याने अहो, येथे तर देवच एक योग होऊन आला असे : काय वर्षाची वर्षें – शाश्वतचें असेंच जणूं ह्या स्वर्गांत वास्तव्य करणें ते व तेथें हा स्वर्गहि पण शाश्वतच असाच मानिलेला व तेथील वस्तीकर होणें हे महत् भाग्यच पदरीं बांधून घेतले असे.

असा हा योग तो कसा व काय व त्यांत बसणें हे महत् भाग्यच पदरीं बांधिले असें : परंतु तेथीलचें भाग्य आपलेसे करणे हे क्वचित् एकाद्यासच लाभते : अशा ह्या योगावरच मुळीं सर्व जगताची मदार, नुसती मदारच नव्हे, तर परम विश्वासच मुळीं भाग्योदय पाहूं देईल असा – पाहा म्हणणारा असा आहे.

आतां येथें प्रकृति जी तिजला ते संचित प्रारब्धाचे डोंगर तसेच क्रियमाणाचे डोंगरच उसंतावे लागणारे, तेच जसे ह्या तब्यतीनें – प्रकृतीने हटयोगाचे होऊन – अभिमानास चढून ह्या भूतमात्राना मुळीं अगोदर तें जीविताचें करणें तें कांहीं पुरतेंच पडत नाहीं. स्वतःमधील अणूअणूचें जे ह्या योगास देणें ते तर ह्या उर्मीना कसें बरें पुरतें होईल – तेथें ते जीवितभोग हेच मुळीं स्वजीवित पुढे करून – योग अवलंबून – देणे देणे ते महत् कठिणतर असेच – तेथें सर्व देह खर्च झाला असे म्हटले तर ते विचित्र असेच बोलणें कां नव्हे बरें ! म्हणून येथें नुसते एक ह्या भूतमात्राना किंवा भूतजातांना ते जीवितस्पर्शाचे ते ह्या शीतउष्णाच्या मात्रा त्या सुख किंवा दुःख देणाऱ्या, तेथें जीवितधर्म हेच मुळीं आटोपशीर झाले असे होय : परंतु हे तर एक विचित्रतेचे असे ते योग साधणे हे कुणाकरितां व येथें गोडी ती काय हें समजेस येत नाहीं. तेथील कष्टाचें प्रमाण हे बहुत असेच होय

येथें निजगोडी जर तरच ते देणें दिलेलें तेहि पण गोड असेच केव्हांहि : म्हणून ह्या निजगोडीच्या क्रमासच एका अनुक्रमाने जीवितसौख्य आपलेसे करावे ते कसे हेच सहजपणें किंवा सौम्यपणानें वळलेले ते जर पुढे घेतलें, तर तेथें सख्य हे संख्य जसे जीवितच गणना करूं लागले, मोजमापाचें केले – ह्या बुद्धीचा जेवढा म्हणून फेरा किंवा रणभार तोच मुळीं येथे जसा का आंवरिला होऊन ह्या बुद्धीस ते नीटपणें शिकविणे केले. तेथें विश्वक्रमचक्र हेच समजविले – भक्ति-ज्ञान-योग-गुणातीतता – क्षम्यतेने जोड ह्या जीवितास मिळावी असे केले – तेथे ही जोड करण्याने तर जीवित तर अति शोभूं लागले; ते शोभिवंत झाल्यानें आतां जानच तें केवळ असे ह्या मनुष्यास उत्तमतेचा शृंगार कां वाणीदिव्यतेचा संसारच थाटविला असें करून, तेथें गीर्वाणवाणच एक पदरीं बांधलें असे होय.

जीवदशेचे गुण मापणे व गुणातीतता ती ह्या देवपणास पाहूं करणारी – तेथें अनेक अशीं भाडारे पुढे होऊन त्यांनीं ह्या गुणांचें - रिपूंचे कां उर्मीचे किंवा ( ह्या प्रकृतिमंततेचे ) मायेचा जो हाट त्याचें निरीक्षण ते कसे आपल्या एकपणाचें होऊन ते सर्व शांत असे लक्षण अंगिकारील तेच बोलिलें गेले व जो कांहीं भार ह्या देहानें उचलिला जाणारा तेथें साधन तेंच आडविलें जाणारे कसें ते समजविलें गेले. अभ्यास हा करावा हें तर खरेच पण तेथेहि कांहीं एक अटकळ किंवा युक्ति ही पाहिजेच, व

ती येथें कशी आचरणास घ्यावी तें ह्या बुद्धीस नीटसे समजेल अशा रितीनें सांगितलें : उत्तमत्व जे तें ह्या त्रिगुणाचें तेथेहि पण ह्या देहधारणेनें धारणपोषणादि व्यापार किंवा व्यवहार हे व्यवहार्यतेच्च असे जेव्हां, तेव्हांच मुळीं तें उत्तमत्व शोभूं पाहातें : म्हणून येथें तें त्रिप्रकाराचें ते कसें तें जसें का देव, पितर, भूत असें त्रिविधतेनें बोलून ह्या जीवदशेस सांगितले आहे.

जसें हे त्रिप्रकाराचें त्रिविध त्रिगुणाचें ते तेथें सौख्यादि बाजू ह्याहि तशाच प्रकारच्या त्या ह्या जीवदशेनें कशा झेंपल्या जाणाऱ्या बरें, जर हे जीवित अगदीं बुजणारे असे तर! येथें अभय हेच महत्त्व पावून त्याने ह्या सर्व भूतमात्रापासून अभय घेतले व तेंच त्यानें दिलेंहि पण, म्हणून येथें एक मित्रत्वाची भावना हीच परम दृढतेची सीमाच बांधून असलेली होय. आतां बुद्धि तर चतुर, तिजला हे समजण्याइतकी तिची तयारी व्हावी म्हणून हे समजवून देणें होतें : येथें जीवितगोडी जशी एक भक्तिच ती ह्या जीवितासहित सर्व जगास आपलें प्रियपण पाहूं देणारी अशी : व ह्या भक्तीच्या बरोबरीनें चालणाऱ्या ज्या दुसऱ्या आडवाट घेणाऱ्या अशा बाजू त्याहि पण आपलें महत्त्व ते ह्या भक्तीपेक्षांहि पण उच्चतम आहे असें म्हणणाऱ्या असतात : येथेंहि पण त्यांनीं ह्या भक्तीसच मुळीं पाठीवर वाहून असण्यानें तेथें त्यांचें तें तसें जाणें हे मानलें होतें व न होतेंहि : तपश्चर्याच जशी ती कोणीं करावी असा हा बंध आड येणारा असल्यानें, तेथें त्यांनींच मुळीं त्या भक्तियोगाची तपश्चर्या आडवून तिजलाच एक शह दिला व आतां तो शह कसा बसतो तें जर पाहिलें, तर तो उच्चाराच्या बिंबावर उभा झालेला असल्यानें, तेथें तें देवतेचें लेणेंच समजेना : म्हणून येथें जर झुंबरासारिखे ह्या नभास टांगिलेले, ते चंद्रसूर्य जर त्या उच्चारास कसे पुरते होऊन असतात हे पाहिलें, तर तेथेंच मुळीं ह्या भक्तिबीजास महत्त्व हे त्याच्या श्रमाचे उतराई होण्यानें त्याचे त्यास पावतें केलें, तर मग सहजच ही नड दुरुस्तीची झाली असे होतें

येथें कर्मयोग्याचीं म्हणजे स्थितप्रज्ञाचीं लक्षणें, भक्तियोग्याचीं व ज्ञानयोग्याचीं लक्षणें सांगून तेंथीलचें जे समन्वयत्व तें दृष्टोत्पत्तीस आणून दिलें : तसेंच ह्या योगाचें म्हणजे अभ्यासयोगाचें महत्त्व सांगितलें. हेंहि पण त्या गुणातीततेनें हा योग कसा कीं अभ्यासयोग कसा एकसारखाच आहे - या दोहोंमध्यें साम्यच नांदत आहे - तें दाखवून दिले आहे.

स्थितप्रज्ञ हीच मुळीं कर्मयोग्याची भूमिका होय, स्थितप्रज्ञ होऊन मगच कर्में करावींत असें होय स्थितप्रज्ञ नाहीं तर कर्मयोगी नाहीं, कारण कर्मयोगाकरिता करावीं लागणारीं अशीं कांहींच वचनें निराळीं सांगितलीं नाहींत. म्हणून स्थितप्रज्ञ हाच मुळीं कर्मयोगी होय. ज्यानें आत्म्याचें अमरत्व सिद्ध केलेलें तेंच आतां सिद्ध असें होतें दुसऱ्या अध्यायांतील सांख्ययोगातील बुद्धियोग तो कर्मयोग होय. दहाव्या अध्यायांतील बुद्धियोग तो भक्तियोगांतर्गत होय त्रिगुणाच्या पलिकडे राहून दृश्यमात्र आकळि लेलें पाहाणारा त्रिगुणातीत, अभ्यासयोग प्रस्थापन करून ज्ञानाने आवरिलेली योगसंवित्, अठराव्यातील ज्ञानयोगाकरितां सांगितलेला तो बुद्धियोग व बाराव्या अध्यायांतील तो ज्ञानोत्तर भक्तियोग हे सर्व एकाच भूमिकेवर आधारलेले असून त्या सर्वांचें समन्वयत्वच आहे. आत्म्याचे अमरत्व सिद्ध करणारी - अमरत्व पुढें घेऊन चालणारी - जी अभिहिता कल्याणी तिचें हे असें बोलणें आहे. आतां यावर जी कांहीं एक अक्षर ब्रम्हाची ठेवण ती कसें सांगत आहे पाहा : हीच मुळीं ती प्राज्ञ अभिमानाची जी अंतःकरण देवता विष्णु तिचें महत्व्यापकत्वानें असणें हे बुद्धिअवतरण घेऊन चालत असणारे ते विवरण हेच मुळीं ह्या सृष्टिरचनेची, विज्ञानशास्त्राची किंवा कर्मयोगाची जी संभावना तीच जेथें तेथें आचरिली जावी व हीसच मुळीं ती भावाची, विभूतीची योग्यता येणारी - एवं सांख्य स्वतःसिद्ध कसे करावें, बुद्धियोगानें तो भक्तियोग कसा आकळावा हीच मुळीं भावविभूतींची महति होय हेच पुनःपुनः ज्ञानकांडामध्यें

सविस्तरतेनें स्पष्ट करून सांगितलें आहे. म्हणून सांख्य, कर्म, बुद्धि, अभ्यास, विभूति, त्रिगुणातीत, कर्मसंन्यास हीं सर्व योगाचीं निरनिराळीं अंगे दिसलीं, तरी त्या सर्वांचें समन्वयत्वच होय.

**कर्मः**—सांख्य, अक्षरयोग, बुद्धियोग, कर्मयोगाची घटना, सृष्टीरचना, तप.

**भक्तिः**—विभूतियोग, भावमहति, अक्षरज्ञान, बुद्धिदान, भक्तियोग.

**ज्ञानः**—मोक्षसंन्यास, ज्ञानप्रस्थापन, संख्येनें त्रिगुणातीत होणे तें.

१ **कर्मयोगी-स्थितप्रज्ञः**—जो कोणी आपल्या मनांतील वासना सोडून देतो आणि आपल्या स्वरूपाच्या ठायीं संतुष्ट होऊन राहातो. दुःखात त्याचें मन उद्विग्न होत नाहीं, सुखात त्यास आसक्ति नसते. ज्यानें प्रीति, भय, क्रोध हीं नष्ट केलीं आहेत, जो सर्वत्र अनासक्त असतो. शुभाशुभ, बरेवाईट प्रसग प्राप्त झाले असतां जो त्याबद्दल हर्ष किंवा द्वेष करीत नाहीं. जो आपलीं इंद्रियें कासवाप्रमाणें सर्व बाजूंनीं त्यांच्या विषयापासून आंवरून घेतो. बुद्धियोगानें युक्त होऊन जो सर्व इद्रिये उत्तम प्रकारे आपल्या ताब्यात ठेवून परमेश्वराच्या ठिकाणीं मन स्थिर करतो, ज्याचीं इंद्रियें वश म्हणजे स्वाधीन झालेलीं असतात. स्वाधीन अंतःकरणाचा पुरुष रागद्वेषरहित होत्साता, इंद्रियानीं विषयांत वावरूनहि - विषयांचे भोग भोगूनहि - चित्ताची प्रसन्नता म्हणजे शुद्धता प्राप्त करून घेतो. त्या प्रसन्नतेच्या योगानें त्याच्या सर्व दुःखांचा नाश होतो व तशा प्रसन्नचित्त पुरुषाची बुद्धि परमात्म्यात लवकर स्थिर होते.

२ **ज्ञानी-सांख्ययोगी (संवित्)**:—अत्यंत शुद्ध बुद्धीनें युक्त होऊन, धैर्यानें आपल्या चित्ताचें संयमन करून, शब्दादि विषय सोडून, प्रीति व द्वेष टाकून देऊन एकाच ठिकाणीं वास करणारा, मित-हारी, वाचा, शरीर व मन ताब्यांत ठेवणारा, नित्य ध्यानयुक्त व विरक्त, बल, अहंकार, दर्प, काम, क्रोध, परिग्रह सोडून देऊन ममत्वरहित व शांत झालेला असा पुरुष ब्रह्मभूत होण्यास - सत्चिदानंद ब्रम्हांत अभिन्न भावानें स्थित होण्यास योग्य होतो. आणि ब्रम्हभूत झाला म्हणजे प्रसन्नचित्त होऊन तो कशाचाहि शोक करीत नाहीं व कशाचीहि इच्छा करीत नाहीं. तो सर्वांभूतीं सम होत्साता परमेश्व-राची पराभक्ति प्राप्त करून मोक्ष प्राप्त करून घेतो. हिलाच ज्ञानोत्तर भक्ति म्हणतात. भक्तीच्या योगानें परमात्मा कसा व कशा प्रभावाचा आहे याचें त्याला यथार्थ ज्ञान होतें. आणि याप्रमाणें त्याची तात्विक ओळख झाल्यावर तो त्याच्या ठायीं प्रवेश करतो. ईश्वरपरायण झालेला तो कर्म-ज्ञान-योगी सर्व कर्में करीत असताहि त्याच्या प्रसादानें शाश्वत व अविनाशी पदाला प्राप्त होतो. मनानें सर्व कर्में त्याला अर्पण करून तत्परायण होतो आणि समत्वबुद्धिरूप योगाचा आश्रय करून निरंतर परमेश्वराच्या ठायीं चित्त ठेवून असतो.

३ **अभ्यासयोगी**.—ज्यानें आपणच आपल्याला-मन, इंद्रियांसहित शरीराला-जिकले, तो आपल्या स्वतःचा मित्र होतो; पण ज्यानें स्वतःला म्हणजे मन व इंद्रियांसहित शरीराला जिकले नाहीं तो आपणच आपल्या स्वत.चा शत्रू असतो. तो स्वतःच स्वतःशीं शत्रुत्वानें वागतो. शीत, उष्ण, सुख, दुःख तसेंच मानापमान इ द्वंद्वात ज्याचे अंतःकरण शात म्हणजे विकाररहित असें असतें, अशा पुरुषाच्या ज्ञानात सच्चिदानंद परमात्मा उत्तम प्रकारे स्थित असतो. अर्थात् त्याच्या ज्ञानांत-जाणिवेंत-परमात्म्याशिवाय दुसरे कांहीं असतच नाहीं. ज्याचे अतःकरण ज्ञानानें व विज्ञानाने तप्त झालें, ज्यानें आपलीं इद्रियें जिंकलीं, जो कूटस्थ म्हणजे निर्विकार असा त्यास तो निःस्पृह असल्यामुळें त्यास मातीचें ढेकूळ कां दगड कां सोने हीं सारखींच असें जेव्हां, तेव्हां तो युक्त म्हणजे सिद्ध अथवा प्राप्त पुरुष म्हटला जातो. सुहृद, मित्र, वैरी, उदासीन, मध्यस्थ द्वेष्य, बंधु साधु, आणि पापी यांच्या ठायीं जी समबुद्धि ठेवितो तो अत्यंत श्रेष्ठ होय. योग्यानें एकांतांत राहून शरीर, मन व इंद्रियें आंवरून

आशा व परिग्रह टाकून, सतत योगाभ्यासास व परमेश्वराच्या ध्यानास लागावें. ज्याचे आहारविहार, कर्माचरण व निद्रा आणि जागृति हीं परिमित म्हणजे यथायोग्य असतात त्यालाच हा दुःखनाशक योग साध्य होतो. जेव्हां त्याने आंवरिलेले चित्त आपल्या ठिकाणीं स्थिर होतें आणि सर्व कामनाविषयीं तो निरिच्छ होतो, तेव्हां त्याला " युक्त " म्हणजे योगी म्हणतात.

**४ भक्त लक्षणें-भक्तिमान**:—कोणत्याहि भूतांचा द्वेष न करणारा व त्यांच्याशीं मित्रभावानें वागणारा, दयाळू, निर्मम (ममताशून्य), निरहंकार (अभिमानरहित), सुखदुःखाला सम मानणारा, क्षमाशील, सदा संतुष्ट, योगी (स्थिरचित्त), संयमी, दृढनिश्चयी, परमात्म्याच्या ठायीं मन व बुद्धि अर्पण केलेला भक्त, ज्याच्यापासून लोकांना त्रास व भय वाटत नाहीं, तसेंच हर्ष, क्रोध, भय आणि उद्वेग यांपासून जो अलिप्त असतो. निरपेक्ष, अंतर्बाह्य शुचिर्भूत, दक्ष, उदासीन, खेदरहित, सर्व काम्य कर्माचा अथवा कर्तृत्वाभिमानाचा त्याग करणारा असा भक्त, जो कधींहि हर्षित होत नाहीं, कोणाचा द्वेष करीत नाहीं, कधीं शोक करीत नाहीं, कशाचीहि कांक्षा किंवा इच्छा करीत नाहीं, शुभाशुभ कर्माचा त्याग करणारा असा असतो. शत्रु आणि मित्र, मान आणि अपमान, शीत आणि उष्ण, सुख आणि दुःख हीं ज्याला समान झालीं, ज्याला कसलीच आसक्ति नाहीं, निंदा किंवा स्तुति समान मानणारा, मौनी (मननशील), जे कांहीं मिळेल त्यांत संतुष्ट असणारा, घरादारात ममता व आसक्ति न ठेवणारा व स्थिरबुद्धि, भक्तिमान् पुरुष परमेश्वराला प्रिय होतो.

**५ गुणातीत पुरुषः**—सत्वगुणाचें कार्य प्रकाश, रजोगुणाचे कार्य प्रवृत्ति व तमोगुणाचें कार्य मोह हीं प्राप्त झालीं असतां तो विषाद मानीत नाहीं व निवृत्त झालीं असतां इच्छा करीत नाहीं. तो उदासीनाप्रमाणें साक्षीरूप राहून गुणांमुळे विचलित होत नाहीं. गुणच गुणात वर्तत आहेत, गुणच आपापलीं कामें करीत आहेत असे मानून सच्चिदानंद परमात्म्याचे ठायीं ऐक्य भावनेनें स्थित राहतो आणि या स्थितीपासून चळत नाहीं. सुखदुःख त्याला समान असतें. तो स्वस्थ म्हणजे आत्मनिष्ठ, माती, दगड व सोनें हीं सारखीं मानणारा, प्रिय व अप्रिय समान लेखणारा, धैर्याचा पुरा व त्याला स्तुति व निंदा सारखी वाटते. मान व अपमान यांना सम मानणारा तो मित्रपक्ष व शत्रुपक्ष यातहि समानतेनें वागतो. सर्व कर्मांत तो कर्तृत्वाभिमानाचा त्याग करतो. तसेंच जो पुरुष अव्यभिचारी म्हणजे एकनिष्ठ भक्तियोगानें परमेश्वरास भजतो, तो या तिन्ही गुणांना पूर्णपणे उल्लंघून सच्चिदानंद ब्रम्हाला प्राप्त होण्यास योग्य होतो. कारण अमृत व अविनाशी ब्रम्हाची, तसेंच शाश्वत धर्माची आणि अखंडैकरस आनंदाची प्रतिष्ठा म्हणजे सीमा अथवा आश्रय मीच आहे.

**६ सांख्य (ज्ञानी) म्हणजे कर्मसंन्यासी (काम्यकर्मत्याग)**:-सांख्य म्हणजे कर्मसंन्यास व योग म्हणजे कर्मयोग हे वेगळे आहेत असें ज्ञानी म्हणत नाहीं, कारण कोणत्याहि एका मार्गाचें अनुष्ठान चांगल्या रीतीने केल्यास दोहींचें फळ – परमात्म प्राप्ति – मिळते. जे स्थान सांख्ययोग्यांना (कर्मसंन्यास करणारांना) मिळतें, तें कर्मयोग्यांनाहि मिळते. यासाठीं सांख्य (ज्ञानयोग) व कर्मयोग हे फलरूपाने एकच आहेत असे जो पाहतो, तोच डोळस जाणावा. कर्माच्या कर्तेपणाचा त्याग (संन्यास) निष्काम कर्मयोगावांचून होणे फार कठीण आहे. योगयुक्तास – भगवत् स्वरूपाचें मनन करणाऱ्या कर्मयोग्याला – ब्रम्हाची प्राप्ति त्वरित होते. ज्याचें अंतःकरण शुद्ध आहे असा योगयुक्त झाल्याने, ज्याचें अंतःकरण निर्दोष पवित्र झाले आहे, ज्यानें आत्मा ( मूलस्वभाव ) जिंकिला आहे (पराजित केला आहे) व ज्यानें शरीर व इंद्रिये जिकलीं आहेत, सर्व भूताचा आत्मा हाच ज्याचा आत्मा झाला आहे असा कर्मयोगी पुरुष कर्म करीत असतांहि त्यांत लिप्त होत नाहीं. इंद्रिये आपापल्या विषयाच्या ठायीं वर्तत आहेत असें समजून वागतो व आपण कांहींच करीत नाहीं असें मानतो. शरीरानें, मनानें, बुद्धीनें

व फक्त केवळ इंद्रियांनींच – आसक्ति सोडून – देहाभिमान सोडून – अंतःकरण शुद्धीकरितां तो कर्मे करीत असतो. तो कर्मफल भगवंताला अर्पण करून भगवत्प्राप्तिरूप परम शांति मिळवतो. ज्याच्या मनामध्ये समभाव स्थिर झाला, त्याने येथेच – ह्या लोकींच – संसार जिंकिला व सर्व देहच साधनाचें करून हा लोकच त्याने मुळीं जिंकिला ज्याचे मन साम्य सिद्धींत स्थिर झालें, अशांना ब्रह्मच एक जें निष्पाप तें लाभतें – निर्दोष असे ते ब्रह्म सम किंवा सम ब्रह्म तेंच त्यांना मिळतें, म्हणून ते ब्रह्मपदींचें होतात - ब्रह्माच्या ठायीं स्थिर होतात ज्यांची बुद्धि स्थिर झाली असे ब्रह्मवेत्ते पुरुष प्रियवस्तु प्राप्त झाली असता हर्ष मानीत नाहींत व अप्रिय वस्तूबद्दल उद्वेग करीत नाहींत ज्याचें मन विषयासक्त नसतें, त्यांनाच आत्म्याच्या ठायीं असलेले सुख मिळतें व असे ब्रह्मयोगयुक्त पुरुष अक्षयानंदाचा उपभोग घेतात. ते अंतःसुखी अंतरात्म्यांतच आराम पावलेले व अंतर्ज्योतिरूप ज्ञानप्रकाश मिळालेले ते ब्रह्मरूप होऊन साते ब्रह्मांतच निर्वाण पावतात.

---

## व्रतगहनत्व अथवा महत्त्व

**अशोच्यानन्वशोचस्त्वम्** —क्रियमाण क्षोभणें म्हणजे आधि व्याधि – गुणक्षोभन – पोट दुखतें त्यावर रागावणें ते कुणावर : नेहमींच तोंड बरळ का उघडें तेथें थोडी विश्रांती ही दिलीच पाहिजे – चर्वितचर्वण ते काय ह्या मुखास आपली कड सापडवूं देत नाहीं, म्हणून बाजूस हो : एकान्ताचा अवलंब कर : फटकून अस : संग जो ह्या देहाचा तोच लंपटविला गेला – तो लंपट झाल्याने गिळगिळे झालेले मनहि श्रांत झालेलें, त तेथे दुःखाची सीमाच पाहाण्यास मिळाली असे होतें. म्हणून बाजूस हो, तरच मग ती शब्दरहस्याची घडी घडविणें तच मुळीं अवरिलें होतें व आपलेपणास येतें : नाहीं तर घडी ती मुळीं उलटविली गेल्याने आरोग्याचा धडा पुन्हा पहिल्यापासून शिकावा लागणारा होतो व मग काय तोच लाडू व तीच विटी पुन्हा खेळावी लागणारी : व येथें तर मुळीं तें शक्यच नसतें – व तसे केलें तर तें असे कोठवर तरी करीत राहाणार : येथें तर ती आरोग्याची घडीच मुळीं पुन्हां बसविणें तें कसे तें आपलेपणाचें होतच नाहीं. तेथें तर 'आवाटागर्द' म्हणजे इकडचें तिकडचें झाल्यानें हे आरोग्याचें कामच मुळीं वर पडतें, पण तें जर तच अवलंबिलें तर लावणीवर पडल्यान, तेथें आरोग्याचा धडा कुणीं पाहावा असें होतें

सहज उदाहरणच एक सोडवायास दिलें ते कसे तर गुणक्षोभ हा होऊन ह्या वाचेच्या पार मुळीं दशाच झाल्या – जेथे मौनच एक सर्वार्थपणाचें तेथें चढ दिला गेल्यानें अश्लीलतेशिवाय कांहीं पैस भरून काढणें नाहीं – व असे ते रागावणेंच एक ह्या दंतधावनावर : ती ती क्रियाच मुळीं व्रत, दान, तप इत्यादिनीं तें आगयाचें क्षोभणें शांत करावें लागणार, पण तेथें तर पुन्हा क्षोभच ज्यायोगें तीच मुळीं उदरभरणक्रिया केल्यानें, तेथें उपवासादि जागरणाचें विधान हें कुठचें व कुणाकरिता आहे कोण जाणे असें अपरिचिततेचें अनोळखीपण पुढें झाल्यानें मनुष्यास, ह्या संसर्गाची जाचणी बसून तें पार उलटविलें गेल्यानें, ह्या व्यक्तीची जी कांहीं संस्कारजन्य बांधणी तीच आतां हरविली गेली व इतरत्र तिनें आपलें गृह केलें – ती संसर्गगर्तेमध्येच फसूं लागल्यानें, तेथें दुसऱ्या अनेक जाति गौरवास आल्या व जो तो ब्रम्हविदतेचा अलंकार तोच मुळीं प्रकृतीचें पैसपणास आल्यानें, इतरत्र पसरला गेला तेथें तर विश्रांती ही नाहींच : जसें कामिनीला – कांविळेस दूध वावडें, तसेंच येथें ह्या द्विजदत्तांना

हा खाद्यपेयाचा व्यवहार बावडा व ह्यावर बोलण्यानें – ताशेरा, क्षोभ, रागे भरणें, चिथवणी नें तर पार तें असलें नसलेलें ह्या देहामधील अग्नीचें जे कांहीं एकादे दुसरें शिल्लक असलेलें विस्फुर्लिंग तेंहि पण विझविले गेल्याने, तेथें क्षोभ हा धोपटणारा होऊन, ह्या जीविताचे पार टाकेच हादरविले गेले – उसविले गेले व आतां पाहावे तो काय एक जर्जर होणें ह्या जीवितानें : तेथें मुळीं काहीं तें जीवितचैतन्यच नाहीं – ते कुठे लपले कोण जाणे असे झाल्याने – व असेंच वरचेवर – तेथें विनदिक्कततेचें ते जीवित हे तर मरणच नुसते देहानें चालणारें असें होय. तेथें कींव ती कोणीं बरे कुणावर करावी – येथेंच मुळीं ती ह्या खाद्यपेयाची कां स्वगत का स्वागताची ती दीर्घ अशी उपक्रमा ही तर काय महत्त्व, काय महिमान, ( काय तोरा, काय कुर्रा, काय ढंग, काय ऐट, काय नेट, काय ऐटबाजी, काय चाल, काय तऱ्हा) काय सन्मान चाहाणारे असें दासीपणाचें सर्वथैव केलेलें – तेथें जसें तेथील महत्त्व कसे स्वतःस पोहोचवावे हे न समजता, नुसतेच तें एक ह्या बाजीचे नसतें वाट पाहाणें का खडा पाहाराच करण्यास दिला असे ते – तेथें वेळ किती, काय, केव्हां, कशी हेच मुळीं नच ठरलेले उरकलेले असल्यानें तेथें दिवसच्या दिवस का महिनेच्या महिने तसेंच वर्षानुवर्षे नुसती ती चाहाच मुळीं व्हावी करावी अशीच ती ह्या जीविताच्या मर्जीची खातरजमाच करून ठेविली असे झाल्यानें, तेथें आतां ह्या जीविताची कोण कशी कींव करणारा भेटेल की नाहीं असे तोंडाकडे पाहाणेंच होतें. जें जे कांहीं भेटेल त्याचे तोंडाकडेसच पाहाणारें असे ते जीवित अत्यंत केविलवाणें असून, तेथें तो जो देवश्री हा कुठे असेल, कसा भेटेल हे तर त्याच्या मुळीं दृष्टीसमोरच होत नाहीं व्यक्तीचें व्यक्तीपण त तर मुळीं कोणत्या गावचे झाले कोण जाणे – व तेथें तर ही व्यक्ति म्हणजे नुसते एक परम दीनतेचे सर्व दीनपण, त्यास कोठेंहि दुसरीकडे जागा न मिळाल्याने, येथें मात्र ही दीनपणाची कमालीची अशी दीनता ही कदाचित् सदयतेचे जर एकादे हृदय असेल, तर तेथें सहृदयतेचें येणे होईल, मग तेथें तो देव तो कसा नव्हे असेच म्हणणे थोपविले गेलें व सर्व ह्या जीविताचा उपक्रमच मुळीं तेथेंच संपविला गेला. अहो ! येथें काय आईबापांचेंहि पण तें भलेपण हेच जसे तेथेंच लपविलें गेले व ह्या जीविताच्या सर्व कलांचे लोपणेंच झालें : असा हा अतिविचित्र रंग द्विजदंताच्या आयुर्घटनेचा असल्यानें, तेथें आता कसे काय कुणीं तें हे जीवित झेपले कोण जाणे. तें तर अहो त्या देवाधि-देवाच्याहि पण पदरांत पडेनासे होऊन, येथें तो जो परम देदिप्यमान व सर्व देवतांच्याहि देवहृदयाचें जे दिव्य तेथीचा जो तोच मुळीं येथें ही ब्रम्हांडघटना घडीची करणारा – व तेथें ते आपलेपरावे असे म्हणणें नसून, तेथें मूर्तिमंत दयाच एक सर्व सीमेची झाल्यानें, आपल्या गुणाने झळकूं लागणारी होय, व तीच मग ह्या जीविताची घडी काढून तरी सदय सदयतेनें परस्परावलंबी बसविणारी होते – असे हे विचित्र अंग आहे. येथें त्या दयामूर्तीस साष्टांग वंदन करितो – नेहमींच त्या चरणीं साष्टांग वंदन आहे – तिचे तें अशा प्रसंगांतून अशा ह्या प्राण्यास सोडविणे म्हणजे सर्व सृष्टीच मुळीं आपल्या चरणाची माती करून ठेविली असे : वर सेवाविधानाची परम दिव्य अशी उपकारकारणा हीच तेथीलचा सर्व संसार पाहाणारी होय.

व्रताचे माहात्म्य, आख्यायिका, महत्त्व, आख्य अशा ह्या परम अशा ब्रम्हावरच उभे झाल्यानें तेथें ह्या प्रकृतीसच सर्व रंग पोहोंचला – मायचा रंग मायेसच देऊन तीसच सर्व गौरवाचे केले – सर्व गौरवच तेथें पोहोंचता केला असें होय : तेथें जसें एक नडावणेंच ह्या ग्रंथीस कां ग्रंथास कां वाचनास व आतां तें जसे कांहीं एक मेहेरनजरेचे जसें देणें दिले – चिरीमिरीनेच मुळीं कदाचित् किंवा कसेंबसे तरी आपल्या ह्या जीवितक्रमास हातभार लावणारे, न लावणारे असे होय.

---

## थोडक्यांत बारावा

**अर्जुन म्हणाला** (निरंतर ब्रम्ह):—

असे जे सतत युक्त भक्त (त्वा पर्युपासते) व जे अव्यक्त अक्षराची परिउपासना करणारे त्या मध्यें उत्तम योग कोणीं जाणला ?

**श्रीभगवान म्हणाले**:—

मजमध्ये मन लावून (आवेश्य), परम श्रद्धेचे असे - जवळ जवळ पुरुषच असे - नित्ययुक्त - (नित्य ब्रम्ह) होऊन मला उपासितात ते श्रेष्ठ असे योगयुक्त (योगयुक्ततमाः) होत

**पण जे**:—अक्षर, अनिर्देश्य, अव्यक्त, सर्वत्रग, अचिन्त्य, कूटस्थ, अचल, ध्रुव उपासितात, असे ते इंद्रियग्राम आवरून असणारे, सर्वत्र समबुद्धि असे, सर्वभूताचें हित करण्यामध्ये रत असणारे ते, तेहिपण मलाच येऊन मिळतात. ( अक्षर = सूक्ष्म, अव्यक्त, निर्गुण, शून्य )

**तरी पण**:—देहाभिमान असणाऱ्यांना, अव्यक्ताच्या ठिकाणी ( आसक्तचेतसांना ) आसक्ति पसरलेली असल्याने अधिक क्लेश होतात व त्याची गति म्हणजे दुःखच होय ( अव्यक्तासक्तचेतसां देहवद्भिः गतिः दुःखं अवाप्यते । )

**परंतु**:—कर्म मजमध्ये सन्यासून, मत्पर राहून, अनन्यपणे मला ध्यातात जे (मय्यावेशित - चेतसाम् - ज्यांचे चित्त मजमध्ये आवेश घेऊन असतें) अशाचा मी जन्म-मृत्यु-संसार-सागरापासून लवकरच (न चिरात्) उद्धार करणारा होतो

**म्हणून**:—मजकडेस मन लाव (आधत्स्व) : बुद्धि मजमध्ये निवासाची कर (निवेशय) : माझा आश्रय केल्याने तूं उर्ध्व होशील : सत्वस्थ होशील : चित्त हे समधिगम्य होईल.

## बाराव्याचें सार

१ विश्वरुपाची - सगुण ब्रम्हाची भक्ति करणारे आणि अव्यक्त अक्षराची - निर्गुण ब्रम्हाची - उपासना करणारे या दोहोमध्ये श्रेष्ठ योगवेत्ते कोण :

२ सगुण - साकाराचे - उपासकच युक्ततम असे अत्यत श्रेष्ठ होत - आहेत :

३ दोन्ही उपासक मलाच येऊन मिळतात.

४ पण निर्गुण ब्रम्हरूपी उपासना करणाऱ्यास कष्ट अधिक होतात

५ आणि जे मन्निष्ठ होऊन, सर्व कर्मे मला अर्पण करुन, माझे ध्यान व भजन करितात त्या भक्ताचा मी त्वरित उद्धार करितो.

६ याकरितां माझ्या ठायींच मन लाव, माझ्या ठायीच बुद्धि स्थिर कर.

७ हे शक्य वाटत नसेल तर - एकाहून एक सुलभ व सुखकर अशी साधने सांगितलीं.

८ अभ्यासापेक्षा ज्ञान, ज्ञानापेक्षा ध्यान, ध्यानापेक्षा कर्मफलत्याग श्रेष्ठ, कारण त्यायोगे शांति प्राप्त होते

९ प्रिय भक्ताची लक्षणें

१० स्थितप्रज्ञ कर्मयोगी, भक्तिप्रिय भक्तियोगी, ज्ञानिये ज्ञानयोगी ह्यांचीं लक्षणे बहुताशी सारखींच आहेत.

११ कशाने मी भगवंताचा प्रिय होईन - तर ज्ञानी भक्ताचीं लक्षणे मजमध्ये किती उतरलीं आहेत व किती उतरावयाचीं आहेत असा पडताळा वरचेवर घेऊन ' प्रियभक्त ' पदवीच्या कसोटीस उत्तीर्ण होणे महत्त्वाकांक्षे जे अतरात बाळगून परिक्षेत उत्तीर्ण होण्याचा अभ्यास उत्साहाने केला पाहिजे.

# नारद-भक्ति-सूत्रें

**भक्तीची व्याख्या** - अथातो भक्तिं व्याख्यास्याम ॥ १ ॥ सात्वस्मिन् परमप्रेमरूपा ॥ २ ॥ अमृतस्वरूपा च ॥ ३ ॥ यल्लब्ध्वा पुमान् सिद्धो भवत्यमृतो भवति तृप्तो भवति ॥ ४ ॥ यत्प्राप्य न किंचिद्वांच्छति, न शोचति, न द्वेष्टि, न रमते, नोत्साही भवति ॥ ५ ॥ यज्ज्ञात्वा मत्तो भवति, स्तब्धो भवति, आत्मारामो भवति ॥ ६ ॥

**भक्तीचें स्वरूप:**—सा न कामयमाना निरोधरूपत्वात् ॥ ७ ॥ निरोधस्तु लोकवेदव्यापारन्यासः ॥ ८ ॥ तस्मिन्ननन्यता तद्विरोधिषूदासीनता च ॥ ९ ॥ … भवतु निश्चयदार्ढ्यादूर्ध्वं शास्त्ररक्षणम् ॥ १२ ॥ …

**भक्तीचें लक्षण:**—तल्लक्षणानि वाच्यन्ते नानामतभेदात् ॥ १५ ॥ पूजादिष्वनुराग इति पाराशर्य ॥ १६ ॥ कथादिष्विति गर्ग ॥ १७ ॥ आत्मरत्यविरोधेनेति शाण्डिल्य ॥ १८ ॥ नारदस्तु तदर्पिताखिलाचारता तद्विस्मरणे परमव्याकुलतेति ॥ १९ ॥ अस्त्येवमेवम् ॥ २० ॥ यथा व्रजगोपिकानाम् ॥ २१ ॥ तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवाद ॥ २२ ॥ तद्विहीनं जाराणामिव ॥ २३ ॥ नास्त्येव तस्मिंस्तत्सुखसुखित्वम् ॥ २४ ॥

**भक्तिसाधनविचार:**—सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा ॥ २५ ॥ फलरूपत्वात् ॥ २६ ॥ ईश्वरस्याप्यभिमानद्वेषित्वाद् दैन्यप्रियत्वाच्च ॥ २७ ॥ तस्या ज्ञानमेव साधनमित्येके ॥ २८ ॥ अन्योन्याश्रयत्वमित्यन्ये ॥ २९ ॥ स्वयंफलरूपतेति ब्रम्हकुमार ॥ ३० ॥ राजगृहभोजनादिषु तथैव दृष्टत्वात् ॥ ३१ ॥ न तेन राजपरितोष क्षुच्छान्तिर्वा ॥ ३२ ॥ तस्मात्सैव ग्राह्या मुमुक्षिभि ॥ ३३ ॥

**भक्तीचीं साधनें:**—तस्याः साधनानि गायन्त्याचार्या ॥ ३४ ॥ तत्तु विषयत्यागात्सगत्यागाच्च ॥ ३५ ॥ अव्यावृतभजनात् ॥ ३६ ॥ लोकेऽपि भगवद्गुणश्रवणकीर्तनात् ॥ ३७ ॥ मुख्यतस्तु महत्कृपयैव भगवत्कृपालेशाद्वा ॥ ३८ ॥ महत्सगस्तु दुर्लभोऽगम्योऽमोघश्च ॥ ३९ ॥ लभ्यतेऽपि तत्कृपयैव ॥ ४० ॥ तस्मिंस्तज्जने भेदाभावात् ॥ ४१ ॥ तदेव साध्यताम् तदेव साध्यताम् ॥ ४२ ॥

**उपसंहार**—इत्येवं वदन्ति जनजल्पनिर्भया एकमता कुमारव्यासशुकशाण्डिल्यगर्गविष्णुकौडिन्यशेषोद्धवारुणिबलिहनुमद्विभीषणादयो भक्त्याचार्या ॥ ८३ ॥

॥ य इदं नारदप्रोक्तं शिवानुशासनं विश्वसिति श्रद्धते स भक्तिमान् भवति स प्रेष्टं लभते स प्रेष्टं लभत इति ॥

# नारद-भक्ति-सूत्रें

( बाराव्या अध्यायातर्गत विषयास अनुरूप अशा सूत्रांचा येथे समावेश केला आहे. )

**भक्तीची व्याख्याः**–(१) आतां आपण भक्तीचे व्याख्यान करूं. (२) भक्ति ही ( भक्तिच एक ती ) परम प्रेमरूप ( परमात्म्याविषयीं ) अशी आहे. (३) तसेच ती अमृतरूप आहे, मोक्षरूप आहे. (४) भक्ति लाभली असतां मनुष्य कृतकृत्य होतो, सिद्ध होतो, अमर होतो, तृप्त होतो. (५) भक्ति प्राप्त झाली असता, पावली असता, मग तो दुसऱ्या कशाचीहि इच्छा करीत नाहीं, शोक करीत नाहीं, कोणाचाहि द्वेष करीत नाहीं, ऐहिक विषयाच्याठायी रमत नाही व कसलाहि हव्यास करीत नाही. (६) भक्तीचा आनंद भोगून तो उन्मत्त ( छदमत्त ) होतो, निष्क्रिय ( स्तब्ध ) होतो, आत्माराम होतो, तो आपल्याच ठिकाणी रमून असतो, रगलेला असतो, रंगला जातो.

**भक्तीचें स्वरूपः**–(७) भक्तीमध्ये भक्तीवाचून दुसरी कोणतीहि इच्छा नसते; दुसरी कसलीहि कामना नसते. कारण भक्तीचे रूप हेच मुळीं–भक्तीच एक तेथे – सर्व कामनाचा निरोध होय. (८) निरोध म्हणजे लौकिक व वैदिक कर्माचा न्यास; न्यास म्हणजे (९) भक्तीच्या ( देवाच्या ) ठिकाणीं अनन्यता व तत्प्राप्तीला विरोधी असणाऱ्याविषयीं उदासीनता. ( लौकिक व वैदिक कर्मामध्ये भक्तीला अनुकूल तेवढींच कर्मे अचारणे. ) (१०) [ अन्याश्रयाणा त्यागोऽनन्यता ।] भक्तीवाचून अन्य आश्रयाचा त्याग म्हणजे भक्ती-मध्येच अनन्यता. (११) [ लोकवेदेषु तदनुकूलाचरणं तद्विरोधेषूदासीनता च । ] लौकिक आणि वैदिक कर्मापैकी भक्तीला अनुकूल असतील त्यांचे आचरण करणे व विरोधी असतील त्याविषयीं उदासीन राहाणे. (१२) परमात्मप्राप्ती हेच नरदेहाचे सार्थक व ध्येय असा निश्चय दृढ करून व तेच आपले मुख्य ध्येय समजून तदनुरोधानें शास्त्ररक्षण करावे व वेदशास्त्राच्या आज्ञेप्रमाणे वागावे (ऊर्ध्व). (१३) [ अन्यथा पातित्याशकया । ] नाहीं तर पतित होण्याचा संभव. (१४) [ लोकोऽपि तावदेव किंतु भोजनादि व्यापारस्त्वा-शरीरधारणावधि । ] पूर्ण लौकिक कर्मामध्येहि तसेंच आहे असेंच समजावे. लोकज्ञान × ज्ञानीजन × लोकवेद यामध्येहि तेथे अनुकूल असें तेवढेच आचरणे व तद्विरोधी असे जे तेथे उदासीनता. भोजनादि कर्मे मात्र शरीर आहे तोपावेतो चालवावीत.

**भक्तीचें लक्षणः**–(१५) आतां वेगवेगळालीं मते (वेगवेगळ्या मतांप्रमाणें) भक्तीचीं लक्षणे कसकशीं करतात ते पाहूं. (१६) पूजादिकाच्या (पूजा, सत्कार, पूज्यता) ठिकाणी प्रेम असणे म्हणजे भक्ति असे व्यास (पाराशर्य) म्हणतात. (१७) कथाकीर्तनात-गुण कीर्तनात–रमणे म्हणजे भक्ति असे गर्गाचार्य म्हणतात. (१८) आत्मानुसंधान अखंड ठेवून त्यांतच रमणे (आत्मरति अविरोधेन) ही भक्ति असें शांडिल्य म्हणतात. (१९) सर्व आचरण हे तेथेच म्हणजे भक्तींतच अर्पण करणे, सर्व कर्म भगवताला अर्पण करणे व त्याचे विस्मरण

क्षणभर झालें तर परम व्याकुळ होणें ही भक्ति असें नारदाचें मत आहे. (२०) असें असें भक्तींतच असो जसें का : : आणि हेच खरे आहे. (२१) व्रजगोपिकांचे निस्सीम प्रेम हेच हया भक्तीचें उत्कृष्ट उदाहरण आहे. (२२) त्या गोपींच्या उदाहरणांत श्रीकृष्ण-माहात्म्याची त्यांना क्षणभरहि विस्मृति होत होती असा अपवाद, आरोप कोणालाहि करता येणार नाहीं. (२३) 'कृष्ण परमात्मा आहे' असें ज्ञान त्याना नसतें, तर तें जारप्रेम म्हणता आलें असतें. (२४) एवढेंच नव्हे, तर प्रिय पुरुषाच्या सुखानें सुखी होणें ही निरपेक्षताच मुळीं सुखी करणारी होय.

**भक्तिसाधनविचारः**-(२५) भक्ति ही कर्म, ज्ञान व योग यापेक्षांहि श्रेष्ठ आहे (२६) कारण भक्ति ही फलरूप आहे (२७) ईश्वराला अभिमान आवडत नाहीं, मन-मिळाऊपण आवडतें. त्यास दैन्यच—माणसपण-प्रिय आहे.(२८)भक्तीचें साधन ज्ञान हेच होय- भक्ति ज्ञानानें साध्य होते—असें कोणी म्हणतात (२९) भक्ति व ज्ञान परस्परावलंबी आहेत असें दुसरे कोणी म्हणतात. (३०) भक्ति ही स्वयंफलरूपिणी आहे असें नारदाचें मत आहे. (३१) राजगृह (राजवाडा) व भोजन (हे नुसते पाहाणें जे) हयाविषयींहि असेच दिसतें. (३२) कारण राजगृह नुसतें पाहून आल्यानें कांही राजाची प्रसन्नता जोडत नाही, किंवा भोजनाची नुसती तयारी पाहून कांही भुकेचें निवारण होत नाहीं. (३३) म्हणून मुमुक्षूंनी (संसारांतून तरून जाण्याची इच्छा करणारांनीं) तर भक्तीचाच मार्ग घ्यावा— भक्तीचाच अवलंब करावा.

**भक्तीचीं साधनें:**— (३४) भक्तिशास्त्राचे प्रवर्तक, भक्ति सुखानुभवी संत कां आचार्य भक्तीचीं साधनें कोणकोणती तीं प्रेमानें गाऊन सांगतात. (३५) विषयत्याग, संगत्याग. (३६) अखंड भजन (अखंड नामस्मरण) (३७) लोकांतहि भगवंताच्या गुणकर्मांचें श्रवणकीर्तन हीं भक्तिप्रेमाचीं साधनें आहेत. (३८) पण मुख्यतः संतसज्जनांची (महत्कृपया) कृपा जोडली पाहिजे, भगवंताचा कृपालेश तरी पाहिजे. (३९) महत्संग, सत्संग आधीं दुर्लभ आहे, बरें मिळालाच तर अगम्य आहे, पण मिळाल्यास मात्र अमोघ म्हणजे रामबाणासारखा कार्य करण्यास समर्थ आहे. (४०) आणि तो सत्संग—तर भगवंताची कृपा झाली तरच मिळणार आहे (४१) संत आणि भगवंत हे एकच आहेत त्यांत भेद नाहीं (४२) म्हणून भगवत्कृपाच (भक्तिप्रेम करून) जोडावी

**उपसंहारः**-(८३) लोकप्रवादाला न भिता भक्तीचें महत्त्व आणखीहि भक्तांनी सांगितलें आहे. सनत्कुमार, व्यास, शुकाचार्य, शांडिल्य, गर्ग, विष्णु, कौडिन्य, शेष, उद्धव, अरुणि, बलि, हनुमान, बिभीषण या भक्त्याचार्यांनी भक्तिमार्ग जगांत रूढवून भगवत्प्राप्तीचा उपाय भक्तिमार्ग हाच आहे असें एकमतानें प्रतिपादिलें आहे (८४) नारद महर्षींनीं सांगितलेलें हे जे कल्याणकारक भक्तिशास्त्र त्यावर विश्वास ठेवून तें जो श्रद्धापूर्वक आचरितो, तो भक्त या पदवीला प्राप्त होऊन आपलें परम कल्याण साधतो.

॥ श्रीगणेशायनमः ॥

# श्रीज्ञानेश्वरी-सुबोधिनी

## अध्याय-बारावा

### उपक्रम

जय जय वो शुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनवरत आनंदे । वर्षतिये ॥
जय जय वो प्रबुद्धे । उदारे प्रसिद्धे ।
अनंतवृत आनंदे । निर्विषये ॥

**ब्रह्मविद्या : गुरुकृपादृष्टीचा महिमा :** [ओव्या १-१०]

अहो! हे योगशक्ति! हे भक्तिमाता! हे तत्त्वमसि महावाक्यरूपिणी! अहो! हे सरस्वती वाग्विलासिनी! मी तुम्हांस नमन करतों व 'जय! जय!' अशा उच्चाराने नमस्कार करून म्हणतों कीं, अहो शुद्धे! अहो प्रबुद्ध अगा ब्रह्मशक्ति! ज्ञानवान् अगा ज्ञानयोग्यांची ज्ञानशक्ति! औदार्याबद्दल विख्यात असलेल्या दानशूरतेने मोठेपणाच्या अलंकाराची सीमाच जणू अशा तुमचा जयजयकार असो!! तुम्ही उदारतेच्या प्रसिद्धपणाची सीमा होऊन आहात – तेथें निरंतरचा आनद हाच वर्षाव्यास येणारा! निर्विषय म्हणजे सर्वव्यापी ब्रम्हरूपाचें ब्रम्हविद्यारूपानें जे ज्ञान ते येथे ज्ञानपणास येणारे! अहो हे ब्रम्हस्वरूपिणी! विषयसर्पानें दंश केल्यावर येणारी मूर्च्छना म्हणजे ताटस्थ्य ( जागती ज्योतच ) तुमच्या कृपादृष्टीनें निर्विष होऊन जाते. प्रसाद हाच तेथें रसाचा वर्षाव करणारा व परस्पर प्रेम हे सान्निध्यामुळे परस्परांत मिळून मिसळून कल्लोळाचे होणारे – आनंदाची लाटच जशी! अगे वो प्रेमळा, अगे निर्मळा! गुरुकृपादृष्टीच कल्याणरूपानें प्रसन्न झाली, पुरतेपणास आली! तेथें मग कुणाचें तें तापानें पोळणें (संतापण) कां कसचे ते शोकानें जळणे (दुःख) ! हे स्नेहाळे! अहो प्रेमस्वरूपिणी! तुमच्या सेवकास योग(क्रिया)सुखाचे सोहळे तुमच्या स्नेहमार्दवानें दिलेले होत, तेथें योगिनी सिद्ध अशी अशा स्वरूपाचा ब्रह्मभाव आपण पाळून असता. अहो ब्रम्हस्वरूपिणी! मूळमायेच्या मांडीवर त्याचे वयास येणे करून, त्यास पोषण देतां – त्याचे पोषण करतां – व अगा त्या सेवकास हृदयाकाशरूपी पाळण्यांत निजगुह्याचा उपदेश करीत करीत व आत्मउपदेशाच्या आदेशाचे झोके देत देत निजवितां – निजब्रह्मास आणतां! अहो उदारे! अहो सिद्धे! आत्मज्ञानाची ज्योत ओवाळून दृष्टच काढली जशी असेच ते : तेथें विश्वपत्नी ही जणु कांहीं ज्ञानज्योतिरूप दिव्यानें ओवाळणी करित्ये! मन पवन स्थिर करून खेळणींच खेळण्यास दिलीं व आत्मसुखाचे योग्यतेचे असावे असे बालबोध अलंकार त्यास करितां – सौंदर्य लेवविलें असेच ते होय. अहो निरंतर आनंदरूपिणी माये! ज्ञानकलेचे अमृतासारखे दूध पाजून, हृदयाच्या ठिकाणीं होणारा जो अनाहत ध्वनी – हंस-सोऽहंचा ( तें तत्त्व मी, तो मी ) – त्याचें गाणें गाऊन (क्रीडाच जशी ती एक), चित्ताची एकाग्रता, व्रत व मौन यांबद्दलचा बोध देऊन, समाधींत

स्थिर करतां – समाधीचा बोध देऊन निजवितां – विश्रांतीचें करितां ! आणि म्हणूनच हे श्रीगुरो ! हे विद्ये ! हे माये ! हे सरस्वती ! साधकांना तुम्ही माऊली आहांत ! आपल्या पाऊलांच्या येण्यानें वाङ्मय पिकतें, उभरून येऊन भाराचें होतें : या कारणास्तव, हे माऊलिये, तुमची ती प्रकाशमान अशी शांत साऊली मी सोडणार नाहीं मी येथें हात जोडून आहे – नमस्कार करून आहे. काय अहो सांगावें कीं, सहज प्रार्थनाच एक परिणामास आलेली अशी ही सद्गुरूची कृपादृष्टी ज्याना आपले असे म्हणते, कारुण्याने ज्यांना आपल्या प्रभावाचे करते, आपल्या अधिष्ठानाचे करते, तो विद्यांच्या सर्व सृष्टीच्या उत्पत्तिस्वभावाचा धाताच एक, ब्रह्माच एक, असा होतो. सद्गुरूचें कृपाकारुण्य ज्यास अधिष्ठानाचें सर्वस्वाचे करतें, तो सकल विद्यांचे सृष्टीचा पिता होतो, धारण करणारा होतो. म्हणून, अहो ऐश्वर्यशालिनी, अहो कीर्तिमान , अहो श्रीमंत अशा माऊलिये ! अहो आई ! आपले असे म्हणविलेल्यांना इच्छिलेले फळ देणारी कलाकुशल अशी स्वर्गांतील कल्पलता आपण आहांत. म्हणून हे श्रीमंते अंबे ! ग्रंथनिरूपिणीं मातें आज्ञापी – ग्रंथनिरूपण करण्यास आपली आज्ञा असावी.

**संस्कृताचें मराठीत अवतरण :** [ ओव्या ११-१९ ]

अहो हे ब्रह्मरूपिणी ! हे महद्ब्रह्म अंबे ! संस्कृतामधील गहनता, रस, शब्ददेवदिव्य, पद, भाव हे सोप्या रीतीनें मराठी भाषेत मांडावेत – ते सहज समजतील असें करावेत असा आदेश – अवतरविणेच जसे त्या संस्कृत वाङ्मयाचे मराठी बोलीमध्यें – हे सदगुरुमाऊलिये, आपण दिलेला : याकरिता नवरसाचे सागर उचंबळून येऊं देत नवरसानीं तरुण होऊन साहित्यभारास यावें. उपनिषदांतील योग्य अशा रत्नांच्या खाणीच उघडिल्या असे करा. सात्विक भावांच्या अर्थास रूपाप्रत आणून अति महत्वाचे श्रेष्ठ असे गिरीच निफजवा. अहो हे ब्रह्मरूपिणी श्रीमंते ! देशी भाषेच्या जमिनीत साहित्य सामुग्रीरूपी सुवर्णाच्या अशा खाणी घडवा – घडीवतेच्या केल्या जावोत विवेकस्वर्गवल्लीची लावणी मोकळ्या हातानें, उदारपणानें, दाटपणें होऊं देत संवादफळाचीं कोठारें – भांडारें – संवादफळरूपी द्रव्ये – गंभीरतेचीं अशीं निरंतरचीं होयोत सिद्धांताचीं गहन, खोल व दुर्गम अशीं उद्यानें – क्रीडावनें – लावणीचीं होऊन असावींत ब्रह्मविद्यारहस्यएकांत हा आगरच होऊन विपुलतेने असो. अहो हे ईश्वरी ! अनियंत्रित अशा नास्तिकवादाच्या दडून असलेल्या जागा मोडून टाकून त्यांना आस्तिक्य भावनेचे करावे वितंडवाद्यांच्या आडवाटा मोडून काढून ते सहज सरळ रस्त्यास येतील असें व्हावें तर्कवितर्कांचीं दृष्ट लागलेलीं व वाटवधेयाच्या हातीं सांपडलेलीं अशीं तीं सावजे बाजूस सारून आपल्या योग्यतेचीं होऊन असावींत अहो हे दैविकिये ! भगवान् श्रीकृष्णपरमात्म्याचे गुण गाण्यामध्यें माझी योग्यता ती मला सर्वमान्यपणें कृपेने पोहोंचती व्हावी श्रोत्यानीं श्रवणरसगोडीचे गहनत्व घेऊन असावे, त्यांनीं श्रवणअधिकारावर विराजमान व्हावें असें घडावें, घडून यावेंच, जी अहो ! हे सागरकन्ये लक्ष्मी ! हे शक्तिशोभा लक्ष्मी ! या मराठीच्या शहरामध्यें – मराठी भाषा नगरीमध्यें चतुरतेच्या बालबोध लिपीमध्यें – ब्रम्हविद्येचा सुकाळ – उत्कर्ष – व्हावा व जगाकडून सुखाकरितांच ब्रम्हानंद होईपर्यंत तिचें देणेघेणें व्हावें. इच्छा असेल त्यास ईश्वरीज्ञान ( ब्रम्हविद्या, चैतन्यतत्त्व ) सहज मिळावें असें सवंग करा अहो महद्ब्रह्म अंबे ! श्रीमाये ! आपण आपल्या प्रेमकृपारूपी पदराने मला पांघरूण घालाल, तर मी हे सर्व, अहो माये, त्वरित आताच निर्माण करतो पाहा. अशी विनवणी ऐकल्यावर, श्रीगुरूंनी आपल्या कृपामृत दृष्टीनें मजला अवलोकिले व म्हणणे केले कीं, भगवद्गीतेची मराठी भाषेत टीका सांगण्यास सुरुवात करावी, नच बोले बहु – अधिक कांहीं बोलणें नको. अहो जी स्वामी ! आपलें प्रसन्नत्व हाच आतां येथें मजवर महाप्रसादच झाल्यानें, तात्काळ आनंद उभरून आला आहे. दैवदिव्यतेचे दैव हे सर्वकाळ सदैवाचें होऊन आहे आतां गीताबंध हा प्रबंधरूपानें सांगतों – ग्रंथरूपानें पूर्वापार संगति लावून सांगतो – अवधान द्यावें.

**एकदेशी वा व्यापक :** [ ओव्या २०-२८ ]

[ लगडीचा कस तोच एका वालभराचा : म्हणून योग्यता सारखीच. ]

[ अर्जुन उवाच ] अहो, सकळ वीरांचा अधिराज म्हणजे श्रेष्ठ व सोमवंशाचा कुलदीपक असा तो पंडुराजाचा आत्मज म्हणाला कीं, हे देवा, आपण जे विश्वरूप मला दाखविले ते माझ्या मनास आले परंतु त्याचें अद्‌भूतपण पाहून माझे चित्त भ्याले मजला ह्या सगुण मूर्तीची संवय असल्यानें, तेथेंच मी आपला जीव लावून आहे, आपली सोयच करून आहे. परंतु ह्या मूर्तीवर प्रेम ठेवूं नकोस, तेथीलची सोय पाहू नकोस म्हणून आपण मला निवारले. आतां यथे माझे असे म्हणणे कीं, व्यक्त म्हणजे सगुण देहधारी मूर्ति व अव्यक्त म्हणजे निर्गुण निराकार तत्त्व हे दोन्ही निःसंशय तुम्ही एकच आहात. व्यक्त हे भक्तीने भेटते व अव्यक्त हे योगाने पावते हे श्रीवैकुंठा, तुम्हांस पोहोचण्याकरितां व्यक्त व अव्यक्त अशा दोन वाटा आहेत - जेथे व्यक्त व अव्यक्त अशा दोन दरवाजानीं जावें लागते. अहो, जो कस शंभर नंबराच्या लगडीला, तोच कस वेगळ्या अशा वालभर सोन्यास असतो म्हणून एकदेशी व व्यापक याची सारखीच योग्यता अमृताच्या सागरामध्ये सामर्थ्याची जी थोरीव लाभते, तीच एक चूळभर अमृत घेण्याने प्राप्त होते असा विचार माझ्या चित्तामध्ये आहे व त्याची प्रतीतीहि मला खरेपणाने आली आहे परंतु हे योगपति, हे योगनाथ, अहो योगशक्तीचे स्वामी, तुम्हास विचारतो ते एवढ्याचकरितां की, ब्रम्ह जे व्यापकपणाचें त्याचें तुम्ही एका क्षणाकरिताच जे अंगीकारणे केले, ते खरेपणाचे (साचचि) का तेथील कौतुकच एक जाणावे असे - का तेथील जाणणे हे कौतुकाचे व्हावे म्हणून ?

**योग(क्रिया)तत्त्वास जाणणारा ज्ञानी कां भक्त ?** [ ओव्या २९-३४ ]

[ योग(क्रिया) = तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधान इ. शुद्ध = परब्रम्ह, मायाविरहित शुद्ध असे जीवब्रम्हैक्य, केवल. बुद्ध = परमात्मा, ज्ञाता. ]

[ एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते ] वडीलपणाचा आधार घेऊन तुम्हांकरिताच ज्याचीं हीं सर्व कर्मे केलेली - तुम्हींच होऊन कर्म करणारे : तुम्हीच ज्याचें प्रथमचे असें ठिकाण : आपले सर्व मनोधर्म आपल्या जिव्हाग्रीं बसवून जे तुमच्या सगुण भक्तीस लागले - मनोधर्म विकूनच, हे श्रीहरि, ज्यानीं तुम्हांस आपल्या हृदयाशीं बाधलें : असे ते सगुण उपासक - [ ये चाप्यक्षरमव्यक्तं ] आणि जे प्रणवाच्यापलीकडे ( प्रणवातीत) आहे, भाषणास जे अवघड व मनाला जे कडु आहे, समतोलास येणार नाहीं असे जे अव्यक्त - अशी जी वस्तु, मूलगुण किंवा सत्य - ज्यास अक्षर (म्हणजे नाशरहित विष्णु, शिव) म्हणतात - जें दोषरहित, निर्दोष असे अनवच्छिन्न आहे, अशा त्या अक्षराची तो परमात्मा मीच या भावनेनें जे उपासना करतात असे ते ज्ञानी - असे ते निर्गुण उपासक [ तेषा के योगवित्तनाः ] या दोहोंमध्ये - सगुण उपासक ते भक्त व निर्गुण उपासक ते ज्ञानी यांमध्ये - हे श्रीअनंता, कोणीं तो आपला योग (म्हणजे तो क्रियायोग) मुख्यत्वेकरून जाणितला ते सांगावे. अर्जुनाच्या अशा प्रश्न करण्यानें ते जगन्नाथ अति संतुष्ट झाले व [ श्रीभगवानुवाच ] म्हणाले कीं, हो हो, तुझा हा जो प्रश्न आहे तो बरोबर आहे - तूं उत्तम प्रश्न विचारलास.

**चित्तसर्वस्व देणारे ते परम योग(क्रिया)युक्त :** [ ओव्या ३५-३९ ]

[ श्रद्धया परयोपेताः ] अगा अर्जुना, सूर्यबिंब मावळतेवेळीं रश्मिजाल हे सर्व आकाश व्यापून टाकतें म्हणजेच अस्तगिरीच्या आसपासच्या प्रदेशांत त्याच्या किरणांचा प्रकाश प्रतिबिंबित होऊन असतो - तेथें पूर्वादि दिशा ह्याहि प्रकाशित असतात : किंवा पावसाळ्यामध्ये नदी ही जशी उभरून

असत्ये, फुं होऊन असत्ये, सारखी आपल्या भारानें वाढत असत्ये, त्याप्रमाणें, हे पंडुसुता, नित्य नव्यानें आवडून घेतां – नव्या नव्या आवडीचे होऊन भजले असतां – श्रद्धा दिसूं लागते, पुरुषप्रकारास येते, पुरुषमय ती श्रद्धा होऊं लागते. [ मय्यावेश्य मनो ] सागरास मिळून गेल्यावर – सागरच होऊन गेली जरी असे झाल्यावर – तेथे मागून येणारा प्रवाह जसा तिला अनिवारण देतो, अशा त्या गंगेप्रमाणे अधिकाधिकपण किंवा भरतीवर भरती तेथीलच्या प्रेमास येते – तेथे भावच जसा उगवतो : अशा प्रकारे सर्व इंद्रियांसहित मजमध्ये चित्त रिगवून [ ये मां नित्ययुक्ता उपासते ] रात्र कां दिवस न म्हणतां जे उपासना करतात – सेवापूजा करितात, जे भक्त आपलें चित्तसर्वस्व मला – गुणमयीस, शांतब्रम्हास – देतात, [ ते मे युक्ततमा मताः ] तेच मी बहुततेने योग(क्रिया)युक्त असे मानतो.

**अव्यक्त-अक्षराची उपासना म्हणजे कष्टच :** [ ओव्या ४०–५९ ]

[ ' देहवद्भिः ' सहज सुखाने सिद्ध होणारी नाहीं अशी ]

[ ये त्वक्षरं ] आणि, हे पाडवा, दुसरे ते 'तो परमात्माच मी' अशा भावनेवर आरूढ होऊन, निरवयव, निर्गुण अशा अक्षरास झोंबतात : [ अनिर्देश्यं ] मनाला जे अचिंत्य व त्यास जेथे कसलाहि आधार सापडत नाहीं, जेथे बुद्धीच्या दृष्टीचा रिगावाहि होत नाहीं, असे जे ते इंद्रियांना आकलन होईल काय ? [ अव्यक्तं ] ध्यानासहि जे गूढ असते, एकाच ठिकाणीं जे सापडत नाहीं – व्यक्तीसी म्हणजे व्यक्तिरूपी आकारामध्ये ( माजिवडे ) माजण घेऊन असेल असे काहीच नाहीं : [ सर्वत्रग ] जे सर्वत्र सर्वपणे व सर्वहि काळीं असते : [ अचिन्त्यं च ] ज्यास पाहून चिंतवणे हे हिपुटी झाले. जे आहे व नाहींहि, जे नाहीं असेहि नाहीं व आहे असेहि नाहीं – व असे असल्यामुळे तेथे उपायच खुटतात. [ कूटस्थमचल ध्रुवं ] जे हलत नाहीं, जे ढळत नाहीं ( स्थिर ), जे संपत नाहीं, जे मळत नाही :: [ पर्युपासते ] ते आपल्या बळाने निर्गुण उपासक जे त्यानीं आपल्या आगचे करून घेतले. [ संनियम्येन्द्रियग्रामं ] त्यानीं वैराग्यरूपी पावकानें विषयाचे भारचे भार ( कटके ) नाहींसे करून बाजूस केले, व होरपळलेलीं इंद्रिये तंवकास चढलेलीं अशीं तीं धैर्यानें आवरून धरिलीं : ध्यान – धारणा – समाधी – अभ्यासाच्या रीतीचा पाश घालून, इंद्रिये उरफाटीं मुरडून, त्यानीं हृदयरूपी गुहेत कोंडून ठेविलीं : मग अपानद्वारास आसनाचा व मुद्रेचा बंध घालून आधारशक्तीचा मूळबंधरूपी बुरुज श्रृंगारिला ( पन्नासिला ) : आशेचे लागेबांधे – संबंध – तोडले, अधैर्याचा – अध्येयाचा – कडेलोट होईल अशा कठिण जागा बाजूस केल्या : निद्रारूप अज्ञानांधार त्यानीं शोधून शुद्ध केला – नाहींसा केला : वज्रासनयोग – वज्रयोगक्रमरूपी अग्नीच्या ज्वाळांनीं सप्तधातु हे अग्निच प्रसवूं लागले व मग देहामधील जीं यंत्रे – इंद्रियगोलक तींच ह्या व्याधींच्या मस्तकानी पूजिलीं : कुंडलिनीचा टेंभा आधारचक्रावर उभा करून, तेथील प्रभा ही मस्तकापर्यंत चोज करू लागली – योगपर्वताचा माथाच जसा गांठला : नवद्वाराच्या दारास इंद्रियनिग्रहाची खीळ घालून मस्तकांतील दशमद्वाराची ( क + अ = ककारातीची, सुषुम्नेची ) खिडकी उघडली : प्राणशक्तिरूप चामुंडेस संकल्परूपी मेंढे मारून मनमहिषाचीं मस्तके बळी दिलीं : उठावणास आलेले मन हे इतर गोष्टींचा पाल्हाळ ( संकल्प ) नच घेता, प्राणशक्ति स्थिर केली : इडा व पिंगला या नाड्यांचे ऐक्य ( म्हणजेच चंद्रसूर्याची बुझावणी ) करून, अनुहात ध्वनीचा गजर करून, सतराव्या जीवनकलेचें पाणी जिंकिले : मग मध्यमारूपी मध्यविवरांतून कोरीव असा दादर ओलांडून ( जिन्याने चढून ) मस्तकांतील शेवटचें स्थान जे ब्रम्हरंध्र ते गांठलें : मकाराचा अंत असें ते गहन सोपान सांडून, तेथीलचे गगन बगलेत मारले : अशा रीतीनें ब्रम्हस्वरूपांत जे मिळून जातात – ब्रम्हीं भरून असतात : [ सर्वत्र समबुद्धयः ] जे समबुद्धि होऊन ' तो परमात्माच मी ' अशी जी ' सोहंसिद्धि ' ती मुरवण्याकरितां योगक्रियारूपी अंबा ( योगदुर्गा, योगक्रियाशक्ति ) तीस सतत

आपल्या आंगचे करून असतात – सतत देहानें तेथीलचे होऊन असतात : जे आपल्या सर्वस्वाच्या मोबदल्यांत शून्यासच झोंबून असतात, त्वरिततेने शून्यच आपलेसे करून असतात : [ ते प्राप्नुवन्ति मामेव ] असे ते, हे किरीटी मजला पावतात : योगक्रियारूपी शक्तींचें बळ त्याना मिळते : त्या बळाशिवाय अधिक कसलीच प्राप्ति त्याना होत नाहीं : त्यांना विशेष अशा कष्टाचे ते योगक्रिया-आचरण होते.

**भक्तीशिवाय योगमार्ग म्हणजे पदोपदीं क्लेशच :** [ ओव्या ६०-७४ ]

[ देहवंत जीवदशेस महेंद्रादि पदे व ऋद्धिसिद्धीचीं द्वंदे आड पडणारीं होतात ]

[ अव्यक्तासक्तचेतसा ] काहींहि आधार नाहीं असे निरालंब व जेथे कांहींहि दिसत नाहीं असे तें अव्यक्त अशा ब्रम्हाच्या ठिकाणीं [ सर्वभूतहिते रताः ] भूतमात्राची प्रतिष्ठा स्थापन करण्याकरिता ज्यांनीं कंबर बाधली आहे, भक्तीशिवाय तेथीलच्या आसक्तीचे जे झाले आहेत, [ क्लेशोऽधिकरस्तेषां ] अशांना महत् अशीं इंद्रवैभवासारखीं पदे कुटुंबसंसार पळविणारी वाटमारेपण करितात, आणि सद्धर्म-तेचीं आंगे तसेच संसिद्धयोग्यतेची द्वद्वे चढास लागलेलीं होतात अनेक असे उपद्रव – कामाचे का क्रोधाचे – तेथे आड येतात आणि शून्याबरोबरहि त्याना आपले आंग झुंजवावे लागते. तहानलेपण हे तहानेलेपणानेंच भागवावें – तहान लागली असता तहानेले राहावे, भूक लागली असता भुकेलेच असावे व अहोरात्राची पेस वावानीच भरून काढावी जागे असणे म्हणजेच पहुडणे – देहदिवसाचे होऊन असणे – देह हा जसा दिवसच उगवला आहे असा प्रकाशभाराचा करून असणे म्हणजेच पहुडणे, क्रीडा करणे म्हणजेच निरोधणे. झाडाझुडपाबरोबर सोहभावाने बोलावे, शीत नेसावे, उष्ण पांघरावें व जेथून मुळीं ही वृष्टि होणारी तेथेच जसे असावे अगा अर्जुना, असा हा कष्टप्रद योग म्हणजे भरताराशिवाय करावा लागणारा – नित्य नवा असा, दुणेहिवरी नवा जसा – अग्निप्रवेशच होय तेथे स्वामीचें काज तरी काय कसचे ! कुलपरंपरागत धर्माचें का कुलाचाराचे निमित्त तरी कसचे ! परंतु ते म्हणजे मरणाबरोबरच झुंजावे जसे नेहमीं – ते मरण नेहमीं नवा दम घेऊन येणारे असे ! असे हे मृत्यूहूनहि तिखट भारेचे होय, कढत विषाचा घोटच घेणे होय – तेथे ते विष पिताना अहो, जसा का पापाचा डोंगरच गिळिला असा – तेथे ते विष गिळतांना मुख हे काय फाटत नाहीं ? ( बोलटे वाक्य निर्गुण ते पाप जाणावे. ) [ अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ] असे आहे म्हणून, हे अर्जुना, ज्यानीं योगाचा मार्ग पत्करला त्याच्या वांट्यास दुःखाचाच शेलका असा भाग आला असे पाहा कीं, बोचऱ्या माणसास लोखडाचे चणे खाण्याचा प्रसग आला, तर तेथे पोट भरणे होत आहे कां ' मरणे ' होत आहे याची मुळीं शुद्धिच नाहीं. समुद्र बाहुबलाने तरून जाणे शक्य तरी कसे ! गगन हे पायानीं मागे टाकले जाईल ? तुडविले जाईल ? रणांगणातील सैन्यसमुदायावर तुटून पडल्यावर, समोरून अंगावर एकहि प्रहार न होतां ( वीर व कीर्ति का ती ) सूर्याची बरोबरी करतां येईल ? पागुळला जो आहे त्याने वायूशीं हेवा करणे ते कसचे ? वायु जो सवत्र गतिमान आहे त्याची बरोबरी पागुळला काय करूं शकणार ? म्हणून, हे पांडवा, देहधारीपणाने जे जीव आहेत त्यांना अव्यक्ताची ( ब्रम्ह, अक्षर, विष्णु ) योग्यता कोठची ? असे असूनहि ज्यांनीं धैर्याच्या बहुवस-पणाने आकाशास बांधण्याकरितां जरी झोंबणे केले, तरी ते क्लेशाचे वांटेकरी होतात, क्लेशच त्यांच्या भागास येतात, सर्व क्लेशच तेथे.

**स्वयं फलद्रूप असल्यामुळें भक्तिपंथ सुगम व सुखावह :** [ ओव्या ७५-९६ ]

[ वर्णविशेषे भागा आलेलीं कर्मे सुखानें करितात : विधि पाळतात : निषिद्ध गाळतात : कर्मफळ माझ्या ठायीं अर्पून नाहींसें करतात : आणखी जे जे कांहीं कायिक, वाचिक,

मानसिक भाव त्यांना मजवांचून बाहेर धावणे नाहीं : असे निरंतर ते मत्पर ध्यानाच्या निमित्तानें माझें घर झालेले होत : ज्याच्या आवडीनें मजशीं कुळवाडी केलेली : तेथे भोग का मोक्ष हीं दीनवाणीं केलीं व कुळे हीं पण बाजूस केलीं : अनन्ययोगें मजला जीवें आगें मिळाले : तयाचें सर्व कांहीं मी करतो. ]

म्हणून, हे पार्था, जे भक्तिपथाचा आश्रय करून राहिले असे ते सगुण उपासक ही पीडा – दुःख – जाणीत नाहींत [ ये तु सर्वाणि कर्माणि ] जीं काहीं वर्णविशेषेकरून वांटयास आलेलीं कर्में तीं ते कर्मेंद्रियानीं सहजपणे करतात शास्त्रविधीचें पाळण करून निषिद्ध कर्म तीं टाकून देतात, [ मयि सन्यस्य ] व सिद्धकर्मफळे मला अर्पण करून तीं नाहींशीं करतात एवढेच नव्हे, तर कर्मफळाचे दास न होता, कर्मे मला अर्पण केलीं असे करून कर्मेच नाहींशीं करतात [ मत्पराः ] देहानें कां वाचेनें कां मनानें जे जे काहीं केले जाते, तेथे दुजेपण नगून मीच आश्रय केलेला असतो असे जे माझा आश्रय करून, [ मा ध्यायंत उपासते ] निरंतर सेवाधर्मानें असतात, ते जसे सहजध्यानानें माझ्या घरचेच झाले [ अनन्येनैव योगेन ] त्यानीं अशा गोडीनें मला जोडून घेतले – हरिनामाची शेतीच केली. तेथे सतत गाजणारे जे भोग व मोक्ष ते सालसपण पत्करून असतात – त्यांनीं इतर साधनाची घराणीं सोडूनच दिलेलीं असे जे अनन्यभावाने माझा आश्रय करणारे झाले, त्याचे सर्व कांहीं मीच करतो बारे अर्जुना, जो आईच्या पोटीं जन्मला, तो मातेच्या सोयरेधायरे संबधाचा कितपत असं शकेल बरे ? तो मातेस आप्तसंबंधाच्या सुखाचा ठाव देणारा होईल ? तसे, ते जसे असतील तशांना – कळिकाळापासून त्यांचे निवारण करून – त्याचा अधिकारपत्कर घेतला, ह्या मनुष्यदेहाचे भूषणच मीं आपल्या ताब्यात घेतले. अहो, जी समर्थाची पत्नी ती काय कोरान्न मागत फिरेल ? जी परमेश्वराच्या चरणाची सेवक आहे, ती काय भिक्षा मागणार ? ती देवीच. तसे ते माझे कलत्र – कुटुंब – जाणावे त्यांना संसाराची चिंता ती कां ? त्यांचा कसलाहि उणापुरा भार मी आपल्यावर घेण्यास लाजत नाही. [ मृत्युसंसारसागरात ] जन्ममृत्यूच्या लाटामध्ये सृष्टीच्या सृष्टी बुडून जात आहेत हे पाहून पोटीं कुटुंबवत्सलतेच्या प्रेमानेंच येणे केले संसारसिंधु हा अतिशय प्रबळ झालेला, त्याचा कोणास बरे धाक वाटत नाहीं ? येथें जरी ते माझे म्हणविलेले, तरी ते भितात [ न चिरात्पार्थ ] म्हणून हे पार्था, मूर्तीचा मेळावा ( अनेक मूर्ति – अव्यक्त ) करून – माझा आश्रय करून ते ध्यानाचे झाल्यामुळे – देह-धारीपण एकत्र करून सगुण झालों, नावारूपास आलों, तन्मयतेमुळे प्रेमगांवीं त्वरिततेने आलो सहस्र नामे जरी, तरी त्या नावाच होत – त्या नामारूपानें सजवून तारू झालों, तारक झालों. एकटे जे देखिले, त्याना ध्यानाचें स्तन्य दिले, परिवाराचे जे - कुटुंबवत्सल जे – त्यांना नामस्मरणरूपी नावेचा आश्रय दिला प्रेमाची सागड एकाचे पोटीं बाधली व त्याला सायुज्यसिद्धीच्या किनाऱ्यावर पोहोचते केले भक्त या नावानें अलकारिलेले ते चातुष्पादादि अवघे ( गजेंद्रादि ) वैकुंठींच्या राणिवेस शोभतील असे केले [ तेषामहं समुद्धर्ता भवामि ] म्हणून, हे अर्जुना, भक्तांस चिंताच मुळीं नाहीं – त्याचा मी उद्धार करणारा होतोच होतो. [ मय्यावेशितचेतसा ] त्यानीं आपले जीवित प्रेमाचें का भक्तीचे करावे, सेवा ही आदराची अशी करण्यास आपली चित्तवृत्ति द्यावी, व मीं त्यांचे अज्ञान-आळसादि विकार नाहींसे करण्यासाठीं त्याचे खेळींमेळी असावें असेच हे होय. याकारणे, हे भक्तराया पाडवा, तूं हे महत्त्वाचे सांगणे नीट आपलेसे कर व या भक्तिमार्गाचें आचरण करच कर.

**मन-बुद्धि स्वरूपीं निक्षेपण्यानें मीच सर्वव्यापी :** [ ओव्या ९७–१०३ ]

[ वृत्तिक मानस मजमाजीं प्रेमेसी करूनि घाली : मी – तूं असे मग उरतच नाहीं : अहंभाव हाच मनबुद्धिनिश्चयानें माझ्या स्वरूपीं निक्षेप. ]

[ मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धि निवेशय ] अगा अर्जुना, तं आपली बुद्धि सुनिश्चयाची करून मन जे तें सर्व वृत्तींसहित माझ्या स्वरूपीं सतत लाव – अव्याहत करून घाल मनरूपी सरोवर व बुद्धिरूपी डाळसपण हीं दोन्हीं चागलेपणाने – प्रेमाने – मजमध्ये स्थिरतीं झालीं, तर तं मला हे अर्जुना, पावशील [ निवसिष्यसि मय्येव ] जर मन व बुद्धि या दोहोनीं माझ्या ठिकाणीं घर केले, मला ठायींच केले, तर साग बरे मी व तं असे दुजेभावाचे उरणे उरेल काय? [ अत ऊर्ध्वं न संशयः ] दीप पालविला तर त्याजबराबरच तेज मालविले होते, रविबिंबाबरोबरच प्रकाश जातो, उचललेल्या प्राणाबरोबर इद्रिये हीं निघतात, त्याप्रमाणे मनबुद्धीबरोबरच अहभाव असतो तो जातो असे आहे म्हणन माझ्या स्वरूपी मन व बुद्धि हीं दोन्ही ठेव, खुणेचीं कर आणि एवढ्यानेच सर्वव्यापी जो मी आहे तोच तं होशील. या बोलण्यामध्ये कांहीं दुसरे निराळे, दुसरे अन्य असे नाही असे मी आपली आणच वाहून सागतो – खरोखर असेच ते आहे ही माझी आणच!

**अभ्यासयोग :** [ ओव्या १०४-११३ ]

[ आस्थेच्या अभ्यासाच्या बळाने कांहींच दुष्कर नाही : एक क्षणभर तरी चित्त माझ्या स्वाधीन देत जा : तें जा जो माझे सुख पाहील, तो तो भोगामधून निघून मीच होईल ]

[ अथ चित्तं समाधातु न शक्नोषि मयि स्थिरं ] अथवा चित्त हे मनबुद्धीसहित माझ्या हातीं समग्र देऊं शकत नाहींस, तरी निदान असे कर कीं, या आठ प्रहरामध्ये एक क्षणभर तरी ते चित्त माझ्या स्वाधीन – प्रत्यक्ष असे, साक्षात असे – देत जा निमिषभर का होईना दिलेले चित्त जो जो माझे सुख पाहील, तितके नावडतेपण ते विषयाच्या ठिकाणीं घेईल शरत्कालीं नदी ही जशी आटं लागते, तसे चित्त हें वेग घेऊन प्रपचातून स्वतःस बाजस करील किंवा पूर्णिमेनतर चद्रबिब हे दिसेन् दिस कमी कमी होत अमावास्येस नाहींसे होते, त्याप्रमाणे भोगामधून निघून चित्त मजमध्ये हळू हळू रिघेल व मीच होईल [ अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तु धनजय ] गा अर्जुना, जो अभ्यासयोग असा म्हणलेला तो हाच एक जाण यापासून सर्व कांहीं निपज शकते - मिळं शकते. असे पाहा की, अभ्यासाच्या बळावर, एकानीं अंतराळांत गति साध्य करून घेतली, कांहीं दुसऱ्या एकानीं व्याघ्रसर्पा सारख्यानासुद्धा गरीबने असे निरुपद्रवी ( प्राजळ, निर्वैर, आप्त ) असे करून ठेवले कांहींनीं विषसुद्धा पचविले, समुद्रीं पायवाट जोडली, भाषाजान हे तर स्वल्प म्हणजे लहानगे करून ठेवले, म्हणून अभ्यासास दुष्कर असे कांहींच नाहीं : एवढ्याचकरिता माझ्या ठायात अभ्यासाने मिळ, अभ्यासाने माझ्या ठायींचा हो.

**अभ्यासयोग : कर्मार्पण :** [ ओव्या ११४-१२४ ]

[ अभ्यास करण्याचा कस तुजमध्ये नाहीं, तर आहेस तसाच ऐस, पण जे जे कांहीं कर्म होईल ते मी करीत आहे असे न म्हण : ज्या परमात्म्यामुळे विश्व चळते, तो सर्व कांही जाणतो : निवांतपणे सर्व कर्म मजला अर्पावे. ]

[ अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि ] आतां अभ्यास करण्याचे तुजकडून होत नसेल, तुझ्या अंगामध्ये अभ्यास करण्याइतका कस नसेल, तर ज्या कांहीं भागामध्ये ( भगीं ) तं आहेस तसाच अस इद्रिये कोंडूं नको, भोगविलासाना सोडूं नकोस. स्वजातीबद्दलचा अभिमान वाहून अस. कुलधर्माचें आचरण कर, योग्यायोग्य तेहि पाळीत जा. मग तुला सरळ अशीच वाट दिलेली आहे. [ मत्कर्मपरमो भव ] यावर तुजला एकच महत्त्व पाहावे लागणार - जे तुझी वाट आडविणार नाहीं - ते म्हणजे मनाने, का वाचेनें कां देहाने जें कांहीं करणे कां व्यापार होत असेल, तो मी करीत आहे असे केव्हाहि म्हणं

नकोस. कारण जें कांहीं करणें ( व्यापार ) कां न करणें ते सर्व – विश्व ज्या परमात्म्याच्या सत्तेनें चालतें – तो जाणतो. उणें पडले कां पुरेसें झालें हे आपल्या ठिकाणीं काहींच उरूं देऊं नकोस स्वजीवित हे सर्व प्रेमच एक होऊन आलें ( स्वजात ) असे कर. 'स ईश्वरोऽनिर्वचनीयप्रेमस्वरूपः ।' परमात्म्यागीं हा जीव सजातीय (प्रेमाच्या जातीचा) आहे असे मान. ' सजातीयप्रवाहश्च विजातीय-तिरस्कृतिः ।' माळ्यानें पाणी जिकडे न्यावे तिकडे ते निवांतपणें जातें, तशो प्रेमाचो वाहाणी असूं दे. वृत्ति ही अखंडतेंने माझ्या ठायीं लाव, म्हणजे ती पाण्याप्रमाणें होईल. [ मदर्थमपि कर्माणि कुर्वन् ] प्रवृत्ति का निवृत्ति अशीं ओझीं या मतीवर ओढून घेऊं नकोस. चित्तवृत्ति ही अखंडतेने माझी आठवण घेऊन असावी. एरव्हीं पाहिले तर, वाट सरळ आहे कां वळणाची आहे याबद्दल रथ कांहीं विचार करतो का? तसे जे जे काहीं कर्म निफजेल, ते थोडें कां फार न म्हणता, निवांतपणें ( स्वस्थ अशा चित्तानें ) माझ्या ठिकाणीं अर्पण कर. [ सिद्धिमवाप्स्यसि ] अशा ह्या माझ्या आश्रयानें केलेल्या भावनेनें जर तूं तनुत्यागीं – प्रयाणसमयीं – असशील, तर तूं माझ्या सायुज्यसदनास पोहोंचशील – तुला सायुज्यता प्राप्त होईल.

**अभ्यासयोग : फळत्याग : कर्में सिद्धें जाऊं दे शून्यीं :** [ ओव्या १२५–१३६ ]

[ मातें बांधणें दुवाड जरी : सांडी माझा अतिसो : संयतीसी वसो बुद्धि तुझी : फळत्यागे सांडे ते कर्म न विरूढे : हा कर्मफळत्याग हा धुरेचा योग. ]

[ अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ] अथवा कर्म हे मजला देण्याचें तुला साधन नसेल तरी हरकत नाहीं हे पंडुकुमरा, अखंड चित्तवृत्तीने माझा आठव करणे ते कसे ते समजून घेऊन, कर्में करून मला भजणें, तसेच कर्में करण्याला उद्युक्त करणाऱ्या बुद्धीच्या पाठोपाठ किंवा अंतरानें – हातून जे कर्म होत आहे त्याचे अगोदर का नंतर – माझा संबध जोडणे हे जे कठिण असे ते तुझ्याकडून झालें नाहीं, तरी हरकत नाहीं. मजप्रीत्यर्थ कर्में करण्याचा आग्रह कां हव्यास असणे हेहि नको. [ ततः यतात्मवान् ] पण इंद्रियनिग्रहामध्ये तूं आपली बुद्धि असूं देत जा. [ सर्वकर्मफलत्यागं कुरु ] आणि जेव्हां जेव्हा म्हणून कर्में हीं घडतील, तेव्हां तेव्हा त्याचीं तीं फळे अपेक्षूं नको, तीं संपूर्णपणें त्यजीत अस वृक्ष किंवा वेली ह्या त्याना आलेल्या फळाचा त्याग करितात, तीं दूर लोटून देतात, त्याप्रमाणे सिद्ध अशीं झालेलीं तीं तीं कर्में तूं सांडित जा – त्या सिद्धकर्माच्या फळाचा त्यागी बन. परंतु मनांत मला धरून असावे, किंवा मत्प्रीत्यर्थ कांहीं एकादे काम करावे, कां मीच तेथे उद्देशाचा केला असेहि नको – ते सर्व शून्यामध्ये जाऊं दे. (शून्य म्हणजे तेथें कसलीहि वृत्ति न घेतां असणे किंवा तेच होऊन असणे – तेथें विचार करीत असणें किंवा बसणे नाहीं.) खडकावर पाऊस पडला, किंवा अग्नीमध्ये बीं पेरले, तसें कर्म हे स्वप्नच पाहिले असे समज. हे पाहा कीं, स्वत.च्या कन्येविषयीं जीव जसा निरभिलाष असतो, त्याप्रमाणे सर्व कर्मांमध्ये कर्मफलाविषयीं तूं निरिच्छ असा अस. ज्याप्रमाणे अग्नीचा झोत – विकारवन्हीची ज्वाळा – जसा आकाशांत व्यर्थ होतो, त्याप्रमाणे सर्व क्रिया ही शून्यामध्ये जिरूं दे. इच्छा नाहीं तेथें काम नसणारच – जसे, अतृणे पतितो वन्हिः स्वयमेयोपशाम्यति । असा हा फलत्याग, हे अर्जुना, निश्चयेकरून सुलभ असा आहे – आवडणारा असा आहे. सर्व योगांमध्ये हा धुरेचा म्हणजे कार्यभार वाहाणारा असा श्रेष्ठ योग होय. अशा फलत्यागानें सांडलेलें कां सोडलेलें कर्म वाढणारें होत नाहीं, वाढीस येत नाहीं – जशीं वेळूचीं झाडे एक वेळ व्यालीं म्हणजे पुन्हां वीत नाहींत. त्याप्रमाणें, हे अर्जुना, ह्या शरीरानें पुन्हां शरीरधारी होणें कां जन्मास येणे हे संपतें; किंबहुना शरीराच्या आधारानें असणें तें संपून, जन्ममरणाची वाटच बुजविली जाते.

**अभ्यास : ज्ञान : ध्यान : कर्मफलत्याग : शांति : या पायऱ्या :** [ ओव्या १३७-१४३ [

[ पायरीने अभ्यास केला असता ज्ञानावर उभे होणे होते. ज्ञानाने ध्यान सापडते : तेथे शांतिच एक सगळी : म्हणून प्रस्तुत अभ्यासच एक करणे होय. ]

आता असे पाहा कीं, पायरीपायरीने अभ्यासाचे झाले असता, ज्ञान हे स्थिर होऊं लागते – चित्त हे उभे होते. तेथे ज्ञान हे स्थिर झाल्यानें, ध्यानाची भेटी होते – मनच हे ध्यानरूप होते मग दुसरे सर्व भाव ध्यानासच आलिंगन देतात, तेव्हां सर्व जे काहीं कर्मजात आहे, ते दूर होते – मर्यादा धरून चालते. जेथे कर्मच मुळीं दूर झाले, बाजूस पडले, कर्मच मुळीं नाहीं, तेथ सहजच फलत्याग हा पूज्य होऊन येतो – सख्याचा होतो. आणि त्या त्यागास्तव शांतिच सगळी आंगीं येते, आगची होते, आत्मसात होते – सर्वांगांनीं शांतिच वरिली असे होते म्हणून शांति – शक्ति – प्राप्त होण्यासाठीं हाच ( योगाचा ) क्रम होय – येथे अभ्यासच करणे प्रस्तुतचे होय. [ श्रेयो हि ज्ञानमभ्यासात ] हे पार्था, अभ्यासाहून ज्ञान ह खोल होय. ते सहज साध्य होणारे, सोपे व बालबोध आहे. [ ज्ञानाद्ध्यान विशिष्यते ] ज्ञानापेक्षा ध्यान हे असामान्य आहे, अधिक गुणाचें आहे. [ ध्यानात्कर्मफलत्यागः ] कर्मफलत्याग हा ध्यानापेक्षा चांगला आहे. [ त्यागाच्छांतिरनंतरम् ] त्यागापेक्षा शांतिसुखाचा आंगवठा (विलास) तर अति चांग असा आहे – तेथे भूलोकावरील पावन करणारी सरस्वतीच जशी – तेथे शांतीच्या माजघरात प्रवेश केला असेच होय. वैकुंठीचे पेणें (पेठ, टप्पा) जे रामनाम तेच येथे मुक्कामास आले. शांतीचा पुतळाच एक तो जसा

**भक्तकोटी उपमा-सीमा : चैतन्य : प्राण : तोय : वसुंधरा :** [ ओव्या १४४-१६४ ]

[ भूतांच्या ठायीं आवडनावड नाहीं : मैत्रच एक तेथे : एकपणे मैत्री : कृपाळ : कृपेसी धात्री : माझे कांहींच न म्हणे : संतोषासच गृहाचें केले : निश्चयात्मिका बुद्धि : जीव-परमात्मा ऐक्य : सिद्ध : माझा अनुराग सप्रेम असा तोच भक्त तोच मुक्त : तोच वल्लभा मी कातु ऐसा पढिये : प्रेमा अनुवादणे नाहीं : प्रेमळ सवादिया : एक तुक गोडी : प्रिय प्रिया तूंचि : तया मी अंतःकरण बसूं घालतो. ]

[ अद्वेष्टा सर्वभूतानां ] तो सर्व भूतमात्रांच्या ठिकाणीं अप्रियपण कां द्वेषणे – आपले कां परावे – हे कसले ते जाणत नाहीं – जसे का सर्वगत विखळ चैतन्यच ते. [ मैत्रः ] उत्तमांनाच तेवढे आपल्या पाठीवर वाहावे, अधमांचा अव्हेर करावा हे वसुंधरेच्या ध्यानींमनींहि नसते. [ करुण एव च ] राय म्हणून एकासच जवळ घ्यावे व रंक म्हणून दुसऱ्यास दूर करावे असा तो नसून जसा का प्राणच तो कृपाळ कृपाळ असा. गाय म्हणून तिचीच तेवढी तहान भागवावी व व्याघ्र तो क्रूर म्हणून त्यास विष होऊन मारावे असे पाणी जसे करीत नाहीं – ते दोघांचेंहि सारखेच आर्त पुरवते : त्याप्रमाणें तो सर्व भूतमात्राना आधारभूत अशी दयाच होऊन असतो – एकपणाची मैत्री – सर्वस्वपणें कृपाच एक मातृतुल्य अशी. [ निर्ममो निरहकारः ] तेथे मी असे देहबुद्धीचे जाणणे नाहीं. माझे असे म्हणणेच नाहीं [ समदुःखसुखः ] हे सुख का ते दुःख याची जाणीवहि नाहीं. [ क्षमी ] क्षमाशील असा - जसा कां पृथ्वीच सर्व क्षमा अशी सर्व पवाड्याची, सहिष्णुतेची. संतोषास तर त्यानें आपल्या मांडीवरच घेतले आहे – आपल्या घरचें केले आहे [ संतुष्टः सततं ] वष काळाशिवाय सागर जसा नेहमींच परिपूर्ण असतो, त्याप्रमाणें तो भक्त पूजाउपचारांनींच फक्त काय तो संतोषित होणारा असा नसून, तेथे सहज उपचार आंत भरून आहेत असा एक तो संतोषाची मूर्तिच होय. [ यतात्मा दृढनिश्चयः ] त्रिभुवनांत दुर्मिळ अशी जी निश्चयात्मिका बुद्धि ती त्याच्याठायीं महत्त्व घेऊन असते – तीस जसे का त्यानें आपलें अंतःकरणच बसण्यास दिलेलें. तेथे खरेपणाचा भाव हाच वचन कां प्रतिज्ञेवर उभा झाला.

[ योगी ] जीवचैतन्य व परमात्मस्वरूप यांना ऐक्यरूपी आसन बसण्यास मिळाल्यामुळें, तीं त्यांच्या हृदयभवनामध्ये प्रकाशत्व करून आहेत – ऐक्याने विराजमान आहेत [ मय्यर्पितमनोबुद्धिः ] समृद्धतेने असणारा असा सततचा क्रियाभार – तेथे मन व बुद्धि हीं मलाच त्यानें अर्पण केलीं. आत व बाहेर सर्व योगक्रिया सिद्धपणाने आहे, तरीसुद्धा मजविषयीं सप्रेम अशा अनुरागाचा तो होय [ यो मद्भक्तः स मे प्रियः ] अर्जुना, असा तोच योगयुक्त भक्त, तोच योगी, तोच मुक्त, तो वल्लभा, मी कांत असा आवडीचा एक पाढाच जसा तेथे वाचला जातो. एवढेच नव्हे, तर तो जीवभावाबरोबर तुलला असता माझा जीवच जसा अशा प्रेमाचा असतो, व असे हे बोलणे हेहि पण थोकडेच होय, उणेच होय असो. पंढियंतं जे त्याची एकादी गोष्ट सांगावी – तेथे भारले जाणे का भुरळ पडणे हेच उभारणी दिली असे होते खरे पाहतां, ही असली बोलणीं बोलून दाखवूं नयेत, परंतु काय करावे, श्रद्धा जी तेथे ती बोलावयास लावते. म्हणून वरील उपमेने जे बोलणे ते सहजी उचंबळून आले. एरव्हीं पाहिले, तर प्रेम जे ते अनुवादणे होईल? प्रेमा तो काय शब्दाप्रत येणारा? उच्चाराने तो काय प्रेमाचा होणारा? प्रेम हे मूकच असते - बोलता नच येण्यासारखे असते. आता, हे किरीटी, हे असो. प्रिया जी, प्रिय जो त्याची गोष्ट करूं लागले असता, प्रेमच तेथे आवडतयाचे होऊन आल्याने, ते दुप्पट बळ घेऊन येते सिद्धाची गोष्ट तेथे आपला ठाव पाहाणारी असते. गोडी प्रिया का प्रियकराची ती उपमेनें सांगता येईल काय? गोडी ही गोडीसारखीच – कांटाळेच पुढे घेतले जसे : स्वतःस त्या प्रेमळपणाच्या गोडींत बसवून प्रेमळ असा संवाद करणारी प्रिय का प्रियकर हीं दोन्हीहि स्वतःच होणे जसे. असे आहे म्हणून, हे पंडुसुता, तूंच प्रिय ( वक्ता ) व तूंच श्रोता आहेस – प्रियाची वार्ता ही प्रसंगाप्रसंगाने पुढे झाली. प्रेमाचे वर्णन हे सहजपणे तुजकडून होऊ लागलेले असे म्हटल्याबरोबर देव तेथे डोलूंच लागले – त्याना डोलच आला देवाचे सुखात रिझणे होऊन तेथे देवसुख प्राप्ततेस आले, देवच झाले. देव म्हणूं लागले कीं, हे अर्जुना, ज्या भक्तास मी अंतःकरणात वाहून असतो, ज्यास आपले अंतःकरणात बसूं घालतो, अशा भक्ताचे लक्षण जाणून घे, सांगतो ऐक.

**भक्तलक्षणें : जो जीवें जीवो माझेनि : निजानंदच एक :** [ ओव्या १६५–१७१ ]

[ ज्यामुळें लोक उद्विग्न होत नाहींत : लोकामुळे जो उद्विग्नतेस येत नाहीं हर्ष, अमर्ष, भय, उद्वेगमुक्त जो तो मला प्रिय असा जाण : तो पूर्णतेचा वल्लभच ]

[ यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ] सिंधूच्या क्षोभाने त्यात वावरणाऱ्या जलजरांना भय वाटत नाहीं आंत असंख्य जलचर आहेत म्हणून समुद्र त्रासत नाहीं त्या प्रमाणे उन्मत्त झालेल्या जगामुळे त्यास वीट येत नाहीं व त्याच्या सहवासामुळे लोकहि पण शिणत नाहींत, त्रासत नाहीत. किंबहुना, पांडवा, आपण जीवपणाने असल्याकारणाने जसे शरीर अवयवास त्रासत नाहीं, त्याप्रमाणे अनेक जे जीव आहेत त्या सर्वांचा जीव आपणच आहो असें मानून त्याना तो कटाळत नाही. [ हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ] जगच देह झाले म्हणून प्रिय कां अप्रिय असे नाही, दुजेपण नसल्यामुळे हंसणें का रागावणें हेंहि पण तेथे नाहीं असा सुखदुःखादि द्वंद्वापासून निःशेषपणे मुक्त असा, भयोद्वेगरहित – भीति व अस्वस्थता यांनीं रहित – व याहिवर एक भक्त जसा कां मजविषयींच्या भक्तपणाचा बाणाच मिरविणारा असा तो होय त्याचा मला मोह पडतो काय सांगावा त्याचा तो प्रेमा, अहो! जीवपणाने ज्यांत जीवचैतन्याचा उदय झालेला आहे असा तो माझ्या प्राणाचाहि प्राण होय. तो निजानंदानें तृप्त झाला-पूर्णपणच तें आयुष्यास आले : पूर्णतेस आपला हृदयवल्लभच सांपडला : तिनें आपल्या ललाटीं कुंकुच लावले : तेथे निजानंदाचे लग्नच लागले.

**भक्त – उपमा : काशी : हिमवंत : गंगा : सूर्य : आकाश :** [ ओव्या १७२–१८४ ]

[ अपेक्षा नाहीं : ज्याचें असणें हेच सुखाचें माजण : काशी मोक्ष देण्यांत उदार, पण शरीरच तेथें वेचावें लागतें : शुचित्वें शुचि, पण बुडणें एक तेथें आहे : शुचित्वें तीर्थां कुवासा : आंत बाहेर निर्मळ : तत्त्वार्थी पायाळ देखणा : मानस हे आकाशाप्रमाणें व्यापक व उदास : संसारव्यथेनें फिटलेला : मोक्षाच्या आगचा : उपशम भागास आलेला ]

[ अनपेक्षः ] भक्ताच्या ठिकाणीं कसलीहि अपेक्षा नसते, हे त्याच्या कांहींहि नच मागण्यानें उमजावें त्याचें सान्निध्य हे जशी काहीं भरतीच आनंदास आली का सुखास येऊन आहे – ब्रम्हच आनंदाचें कां सुखाचें सर्व होऊन आहे [ शुचिः ] मोक्ष देऊन काशीक्षेत्र आपलें उदारपण दाखवितें, परंतु तेथें शरीर वेचावें लागतें – देह ठेवावा लागतो. हिमालय पाप नाहींसे करतो, परंतु तेथें जीवित्व-हानीची भीति असते तसलें शुचित्व सज्जनाचें नसतें – ते तारणारे, निष्पाप व शुद्ध असेच. आपल्या पावित्र्यावर उभी असलेली गंगा पवित्र आहे, तो पापतापहि नाहींसे करत्ये, परंतु तेथें बुडी द्यावी लागते, तिच्या पाण्यात स्नान करणारांना ती पावनहि करत्ये, कदाचित् बुडण्याचीहि भीति असते अति खोल, अति गहन अशा भक्तितत्त्वाचा अंगीकार केला, तर त्या अगाध अशा भक्तिनदीमध्यें भक्त बुडून नाश कधींहि होत नाहीं – जिवंतपणींच – जीवित्वानें नच मरणें करता – रोकडा मोक्ष तेथें लाभतो – जीवितसंसार मोक्षाचा होतो संत हे ब्रम्हभावावर उभे, ज्ञानगंगेत न्हालेले अशा त्या संताच्या स्पर्शानें – संगामुळे – त्यानीं गंगेत स्नान केल्यानें - गंगा मुळीं ही पावन होणारी, पापास जिंकणारी झाली मग तेथें संतांचें शुचित्व न कसें असेल बरें ? त्यांच्या स्पर्शानें कां दर्शनानें सहज स्नान, सहज भाव, सहज शुचित्व प्राप्त होणारें व असेहि पण – रामनाम केवळ गंगा। पावन करी सकळ जगा ॥ भक्तानें मनाचे मळ देशोधडी केले, म्हणून तीर्थें त्याच्या आश्रयास राहतात तो तीर्थांना आश्रयच होऊन असतो तो अन्तर्बाह्य शुद्ध - अन्तरमुखत्व व बहिर्मुखत्व हे शोधून शुद्ध केलेला असा असतो सुवर्णाप्रमाणें तेज पुंज, जसा का सूर्यच निर्मळ व उजाळ – मुख उजळिलें, स्वच्छ केलें, प्रकाशवंत केलें [ दक्षः ] आणि तत्त्वरूप धनाचा पायाळ म्हणून देखणा – पायाळाचे डोळे घेऊन देखणा झालेला, साम्यसिद्धीचा झालेला असा – तो होय [ उदासीनः ] आकाश ज्याप्रमाणें व्यापक व उदास असतें, त्याप्रमाणें त्याचें मानस सर्वत्र व्यापून असतें. [ गतव्यथः ] संसारव्यथेपासून दूर झालेला, निरिच्छेनें पूर्ण भरलेला असा तो व्याधाहातून सुटलेला असा पक्षीच एक होय तो नित्य अशा ब्रम्हाचा झाल्यानें, संततच्या सुखामुळे त्यास कसलीहि टोचणी पाहाणारी होत नाहीं – जसे कां गतायुष्य जो त्यास लज्जा ही नाहीं [ सर्वारंभपरित्यागी ] प्रवृत्तिरूप व्हावें आणि पुण्य करून स्वर्ग साधावा अशी अहंभावना त्याच्या अंगीं मुळींच नसते उपशम शांत भागाचा झाल्यानें, तेथें देहबुद्धीचें होणें नाहीं, का क्षोभाचें असणें नाहीं – ज्याप्रमाणें इंधनाशिवाय अग्नीचें विझूनच जाणें होतें. त्याच्या गुणांना शांतता कां निवृत्ति प्राप्त झाली आहे, तो तर मोक्षाच्या आगचा असा शांतीचा जिव्हाळाच होय – तेथें मोक्षच तो असें लिहिलेलें होय.

**देवांस भक्तांची आवड : जीवब्रम्हैक्य : सोहंभावाचा ठावच :** [ ओव्या १८५–१९६ ]

[ भक्तिसुखाकरितां दोन ठायीं वांटला : वांटून आंगीं सेवकें बाणे : येरा देहा नाम 'मी' : भजती वोज न भजतया दावी असा योगिया : तयाचें आम्हां व्यसन : तो आमचें निजध्यान : समाधान तो मिळे तैं. आत्मलाभच गोमटा : भोगविशेषें हरिखेना : आपणच विश्व : भेदभाव नाहीं : नावडणें हे संपलें : आपलें ते कल्पांतीं संपणारें नव्हे म्हणून

गताचें शोचीत नाहीं : आपले सर्वस्व आपणच झाला म्हणून आकांक्षणें नाहीं : सूर्यास नेहमीं दिवसच तसा तो बोधच निखळ : त्यासारखें दुसरे पढियंते आम्हा नाही, तुझी आणच वाहून सांगतो. ]

[ मद्भक्तः ] असा हा ठावच एक ह्या सोहंभावाचा ( परमात्मा मीच असा भाव ओतप्रोत भरलेला ) तो तर द्वैतपणाच्या पैलतीरावरच जाऊन पोहोंचला असे होय. त्याने भक्तिसुखाकरितां आपणांस दोन ठिकाणीं वांटून घेतले व सेवकपणाची महति हीच बाणविली आपणाहून दुसरा जो ( म्हणजे देह ) त्याला मी असे नाव ठेवून भजण्याची जी काहीं रीति, तेजस्विता ती – जो भजत नाहीं त्यास – तो दाखवितो [ स मे प्रियः ] अति आवड ही व्यसन एक – अशा त्या व्यसनरूपी आवडीने आसक्त होऊन तेथील दोष उठवन लाविले, दूर केले व आतां सर्व प्रेमच तेथे – प्रेमाशिवाय दुसरे काहीं नाहीं – अशी ही आवड आम्हास त्या भक्ताची का योग्याची होय. अहो, आमचे तो तर निजध्यानच होय. किंबहुना, सततचे असे अतुल समाधानच तो आम्हांस मिळतो तेव्हां – भेटतो तेव्हा. अहो, त्याजकरिताच मी रूपास येतो, स्वरूप धारण करतो, येथे असतो त्यावरून तर ह्या जीवप्राणाची कुरवंडीच करावी असाच तो आवडता [ यो न हृष्यति ] आत्मस्वरूपाच्या प्राप्तीइतके दुसरे कांहींहि मौल्यवान नाहीं असेच तो समजतो व म्हणून विशेषशः अशा विषयभोगाने तो आनंदित होत नाहीं. [ न द्वेष्टि ] तो कोणाचाहि द्वेष करीत नाही, तो कसलाहि शोक करीत नाहीं – कारण तो विश्वच झाला, त्याचा भेदभाव सहजच नाहींसा झाला. [ न शोचति ] आपले स्वतःचे जे विद्यमान सद्य ( साच ) ते तर कल्पांतीहि नष्ट होणे नाहीं, म्हणून गतगोष्टींचा शोक त्याच्याठायी नसतोच [ न काङ्क्षति ] आणि ज्यापलीकडे दुसरे असे कांहीच नाहीं असे तो आपणच आपल्या ठिकाणीं झाल्याने, त्यास दुसरी कसलीहि आकांक्षा नसते. [ शुभाशुभपरित्यागी ] सूर्य जो सर्व प्रकाश तेथे रात्र का दिवस होणे नाहीं, तसे बरे का वाईट अशा भेदाने पाहाणें त्याच्या ठिकाणीं नसते. [ भक्तिमान ] असा केवळ बोधच जो प्रत्यक्ष पूर्ण असा होऊन आहे, याहिवर माझ्याठायी भजनशील आहे, [ यः स मे प्रियः ] त्याजसारखे दुसरे आम्हास खरोखर पढियंते सोयरे असे नाहीं हे तुझी शपथ घेऊन सांगतो - शपथेवर सांगण्याचे करतो.

**भक्तकोटी : समसाम्य : दीप : वृक्ष : ऊंस : चंद्रिका :** [ ओव्या १९७–२०६ ]

[ वैषम्य नाही : रिपुमित्रा सरिसा पाडु : मानापमानीं सरिसा होतु : गगन तिन्ही ऋतूंत समान : सुखदु:खप्राप्तीं गृहस्थ गुणमध्यस्थ जसा : रायारंका चंद्रिका सम : सेव्य उदक जसे तसे त्यास तिन्ही लोक आकांक्षतात. ]

[ समः शत्रौ च मित्रे च ] काय रिपु, काय मित्र या दोहोंनाहि तो सारखेच मानतो. द्वैतभाव किंवा वैषम्यतेची वार्ता त्याचे ठिकाणीं मुळींसुद्धां नसते. घरचे म्हणून तेवढयांनाच उजेड करावा, कां परके ज त्यांना अंधेर करावा असे दीप जो तो करीत नाहीं : जो तोडण्यासाठीं घाव घालतो किंवा लावणी ज्याने केली अशा दोघांनाहि सारखीच सावली वृक्ष देतो : ऊस हा पाळणाऱ्यास गोड व गाळणाऱ्यास कडु असा केव्हाहि नव्हेच : त्याप्रमाणे काय अरि, काय मित्र अशा दोहोंच्या ठिकाणीं त्याचा समभाव असतो. [ तथा मानापमानयोः ] तो मानाने फुगत नाहीं, कां अपमानाने खिन्न होत नाही [ शीतोष्णसुखदुःखेषु समः ] तिन्ही ऋतूंमध्ये गगन हे समान जसें, तसें शीत कां उष्ण हे सारखेच असे तो मानतो. दक्षिणेकडील कां उत्तरेकडील वायूला मेरू हा जसा साम्यतेचा, तसे सुख लाभले कां दुःख प्राप्त झाले असतां त्याचे मध्यस्थच असे असणे होतें. चंद्रिका ही काय राव, काय रंक या दोघानाहि सारखीच आल्हाददायक होय, तसा तो सर्व भूतांना सरिसेपणेच आनंददायक,

सुखदायक असतो पाणी हें सर्व जगास सेव्य असेच, तसे तिन्ही लोक त्याची आकांक्षा करतात, तो असावा अशी मनीषा बाळगतात [ संगविवर्जितः ] तो आतबाहेर सर्व संग सोडून व सर्व संबंध सोडून एकाकी असा आपले अंग पेहलून असतो. आपले मन आंतल्या मनावर ठेवून असतो, आपल्या मनानेच मनास प्रसन्न करून असतो : देहबुद्धीचा संग बहिर्मुखत्वासहित सोडून परमात्माच मी असा जो भाव तेथीलच्या लाग्याबाध्याचा ठाव न देतां – तेथीलचा धागादोरा न हालविता – तेथीलच्या सूत्राचा लाग एकाकी, एकांताचा असा – आपले आंगच आपल्या आंगात मिळवून असणारा असा तो होय.

**विश्वचि माझें घर : चराचरीं आपण : निंदेस्तुति मानु एकें पांती :** [ ओव्या २०७–२१४ ]

[ प्राणवृत्ति जनीं वनीं विचरे : उन्मनी भोगण्यात माग घेत नाहीं : लाभानें तोषत नाहीं का अलाभानें पारुसत नाहीं · समुद्र जसा पावसाशिवाय सुकत नाहीं : कोठेंहि आश्रय ठेवून असत नाहीं : जगच विश्रांतिस्थान झालें : चराचर आपण झाला म्हणून हें विश्वच घर मानलें : याहिवर भजनीं आस्था, म्हणून मी त्यास माझ्या माथ्यावरचा मुकुटच करतो. ]

[ तुल्यनिंदास्तुति. ] निंदा ऐकली असतां तो तिचा होत नाहीं व स्तुति झाली असतां धन्यवाद मानीत नाहीं, जसें आकाशास लेप लागत नाहीं. निंदेस किंवा स्तुतीस एकाच पक्तीचा मान देऊन, आपला प्राण व आपली वृत्ति ही स्थिर करून, तो जनामध्ये का वनामध्ये विचरत असतो – प्राण हाच वृत्तिरूप असा, सर्व जनामध्यें का वनामध्यें विचरणारा असा [ मौनी ] साच म्हणजे खरें का लटकें म्हणजे खोटें असें दोन्ही तऱ्हाचें बोलणें तें मुळीच न बोलणारा असा मौनी – मननशीलच तो होय नच बोलतां येतें असा मुका नव्हे, असें त्यानें दुसऱ्या काहीं गोष्टी बोलून समजविलेले, म्हणून बोलोनि न बोले. पाचवी योगअवस्था जी उन्मनी ती तो भोगून असतो – ती भोगण्यास तो कधींहि कटाळत नाहीं [ संतुष्टो येन केनचित् ] जें काहीं सहज मिळेल त्यावरच तो संतुष्ट असतो, तृप्त असतो व जें मिळालें नाहीं त्यानें तो रुष्ट होत नाहीं, पारुखा होत नाहीं – जसा समुद्र पाऊस नसला तर सुकत जात नाहीं [ अनिकेतः ] वायूस काय एकेच ठिकाणी राहाणें होतें? तो सर्वत्रच असतो. त्याप्रमाणें तो कोठेच मुळीं आश्रय धरून असत नाहीं – कसल्याहि आश्रयावर टेकत नाहीं. आघवी आकाशस्थिति हीच जशी वायूची नित्य वसति, त्याप्रमाणें जग हच त्याचें विश्रांतीचें ठिकाण होय हें विश्वचि माझें घर [ स्थिरमतिः ] अशी ज्याची स्थिरमति झाली, त्याला सर्व चराचर आपणच होय – आपलें गृहच होय – असें नव्हे का ? इच्छा, उपदेश, मति ही ज्याची स्थिर अशी, त्यास विश्वच घर होय, किंबहुना, एवढेच नव्हे, तर तो आपणच मुळीं चराचर होऊन आहे – चराचर झाला आहे असा. [ भक्तिमान्मे प्रियो नरः ] हे पार्था, असा जो माझ्या भजनामध्यें आस्था बाळगून आहे, कळकळीचा आहे, त्यास मी आपल्या मस्तकावर धारण करतों – त्यास मी आपल्या माथ्यावरच मुगट करतो.

**उत्तमासी मस्तक खालविजे हें काय कौतुक !** [ ओव्या २१५–२१८ ]

[ पायाचें तीर्थ घ्यावें असा लोकांत मानलेला : श्रद्धावस्तूस आदरप्रकार – तेथें श्रीगुरु सदाशिव जर, तर महत्त्व आदराचें करणें तें काय : आत्मस्तुतीनें संचार, म्हणून तें – तसें नव्हे : मी तया शिरीं वाहे. ]

अहो, उत्तम जे काहीं त्याजपुढे मस्तक नम्र करणें, मस्तक खालविणे, हे स्वत:च्या आस्थेवाईक पणानें आपोआप होतें. येथें कौतुक असें म्हणणें हें तरी काय? स्वर्ग, मृत्यु, पाताळ असे तिन्ही लोक त्या चरणतीर्थास मानणारे – महत्त्व देणारे असतात – सन्मान्य असेंच करून असतात कीं नाहीं

श्रद्धावस्तूचा आदर कसा करावा हे श्रीगुरु शंकरापासून शिकावें. भगवंताच्या चरणापासून निघालेली जी गंगा ती तर त्यांनीं आपल्या मस्तकावर धारण केली आहे असा हा भक्तिआदर म्हणजे त्या श्रद्धावस्तूस दिलेलें महत्त्व ते काय महान् असेच होय. सदाशिव जे श्रीशंकर तेच सर्व महत्त्व वाहून असलेले होत परंतु हे आता असो. महेशाम वर्णितां आत्मस्तुति केल्यासारखे होऊन, परनिंदेचा संचार कां दोष तेथें डोकावूं लागेल – तेथें फिरणेच एक पृथ्वीवरील जसे – का संचार हा देवतांचा – मार्गामार्गासंबंधीं – तेथें जशी का प्रदक्षिणाच केली म्हणून येथे त्या जोडशब्दाची माडणी पुढे येते, ती म्हणजे आत्मस्तुति-परनिंदा होय ( येथे श्रद्धावस्तु जी तेथें प्रकार अनेक हे असामान्य असे असल्याने, तेथे ते जे ओंकाराचे प्रकारणे, तेथें ती श्रद्धावस्तु हीच आदराची अशी – प्रेम कां संस्कार झालेली, केलेली होय श्रद्धावस्तूचा आदर-महिमा पाहाता, श्रीविठ्ठलांनीं महेश जेणे मस्तकीं वंदिला – तो महेश आपल्या मस्तकींच धरिला आहे ) परंतु येथें मि ते नाहीं – परनिंदेचा दोष येऊ पाहात नाहीं अर्जुना, मी त्यास आपल्या शिरींच वाहातो – जसें कां फूलच मस्तकीं वाहिले, चरणतीर्थच वंदिलें, पुष्पभारांनीं पूजाच केली

**तयातें आम्ही नमस्कारूं : हातींचेनि लीलाकमळें पुजूं :** [ ओव्या २१९-२२७ ]

[ जगास चवथी पुरुषार्थसिद्धि आपल्या हातनीं देणारा : कैवल्याचा अधिकारी : मोक्षाची सोडीबांधी करणारा : पाण्याप्रमाणेच तळवट घेणारा . त्यास नमस्कार करू : तया आम्ही माथा मुकुट करूं : टाच हृदयीं धरू : तया गुणाचीं लेणीं आपल्या वाणीस लेववूं : कीर्ति श्रवणाचे अलंकार करूं : तो पाहावा हे डोहळे म्हणून मज अचक्षूसी डोळे : दोनवर दोन भुजा घेऊन आलो त्यास आलिंगावयास : त्या संगामुळे मज विदेहास रूप धरणे घडतें, तें निरुपम असेच आवडते : त्यासी आमचे मैत्र हे कांहीं विचित्र नव्हे : त्याचे चरित्र ऐकतां ते प्राणापेक्षाहि आवडतात : व प्रशंसा करणारेहि पण खरोखर आवडतात ]

सायुज्यसिद्धि – भक्तिपथरूपी दीपच – आपल्या हातीं घेऊन सर्व जगास त्याने विश्वासच जसा दिला – तेथें जीवितच चैतन्याचे झाले, प्रिय झाले, विश्वासास येऊन श्वास घेऊं लागलें, शरण शरण म्हणं लागलें : अशा त्या हाताकरिताच जणु जग हे तळमळत असलेले, वाट पाहात असलेले ज्ञानाचा केवळ – ज्ञानच मूर्त झाले – असा तो मोक्षमार्गाचा सांगाती होय : साधकाना मायबापच भेटलेला – ज्याच्या दर्शनाने तापच नाहीसा होतो – असा तो स्वर्गातील मोक्षद्वाराचा अधिकारीच होय तेथें जसे का पाणीच ते आसन झाले, आसधागवन ते आपल्या योग्यतेस आले – आपली पातळी पाहूं लागले – व्रताचे काठिण्य करुण झाले, व मग तेथें सर्व नम्रताच जशी. असा जो त्यास आम्ही नमस्कार करणार हे केव्हाहि. ( त्याच्या हातांना आमच्या नमस्कारण्यानें आमच्या हाताचें अवलंबन पोहोंचले असे होतें.) त्यास आम्ही आपल्या माथींचा मुकुट करूंच करूं, करतोच करतों. त्याची टांच आम्ही आपल्या हृदयावर वाहू (श्रीवत्सलाञ्छनच – विष्णुच) : त्याच्या गुणाचे अलंकार आम्ही लेववून असूं : त्याची नित्य नवी अशी कृति कीर्तीस आलेली ती आम्ही आपल्या श्रवणाचा अलंकार करूं : तोच पाहावा असे डोहळेच आम्हास होऊन असणारे हे कांहीं नवल नव्हेच. स्वाभाविकपणें जीव हा त्या गोडींत रमणारा, त्याने अचक्षु जो मी त्या मला डोळस केले, देखणे केले हातच मुळीं कमळासारखा सुंदर त्याने आपली लीलाच पूजास्थानाची केली तेथें त्याचें पूजनच झाले – आम्हींच ते केले असें एक घडणे मग सहजच देहास दोनच भुजा – या दोन भुजावर आणखी दोन भुजा घेऊन चतुर्भुज झालो – प्रेमानें बाधलों गेलो व आता सर्व आलिंगनच एक त्याचे आगास झाले. तेथे एकत्वच – भिन्न भावच नाहीं. असा जो अंगसंग मजला आनंदाचें करणारा त्यामुळे विदेह जो मी त्यास देह धरणे झाले –

निराकारास आकारास आणणें घडले, असे ते आता आपलेपणास आले व अतिशयतेने आवडूं लागले. आता येथे मैत्रीच झाली – सहज प्रेम स्वभावाचे, कलत्राचे जसे – तेथे बोलणे तरी कसचे? जेथे सर्व जीवित हे एकपणास आलेले, तेथे ते बोलून काय प्रेमाचे होईल? पण ते प्रेमाचे व्हावे असेच ते श्रवणाचे महत्त्व. ते आनदाश्रूंनी मूर्त होणारे असे ते ऐकणे हेहि पण त्या प्रेमात बसण्यास मिळाल्या मुळे आपल्या भारास आलेले होते हे अर्जुना जे कोणी भक्तचरित्रास प्रशंसितात, गायनप्रिय करतात, ते मला प्राणापेक्षाहि प्रिय असे आवडणारे होत – तेथे सर्व रस समरस होऊन आलेले होत. तेथ जीविताची सर्व इच्छा ही पूर्ण झाली आहे असे परम विश्रांतीचे, परम सौख्याचे, निरुपम असे जीवित – " सर्व समाधान " स्वरूपास आले, आपल्या गोडीने जोडीचे झाले असेच होय.

**सायंत समस्त योगरूप असा भक्तियोग : पुरुष प्रत्यक्षास आला :** [ ओव्या २२८–२३८ ]

> [ जेणे मी प्रीति करी, मनीं शिरसा धरी, एवढी थोरी ज्या (योग)स्थितीस : अशा ह्या रम्य गोष्टी : धर्मरूप अमृतधारा ऐकन जे प्रतीतिगम्य करतात : तसेच श्रद्धेच्या आदराने जोवीं थारा देऊन जे अनुष्ठानाचे करितात : येथे निरूपिलेली जशी अगदी तशीच मानसी स्थिति ज्यांची : तेथे मग काय सुक्षेत्रीच पेरणी झाली असे होय : मजला परम करून येथीलच्या अर्थामध्ये प्रेम धरून व हच सर्वस्व मानून जे घेतात : या जगी, हे पार्था, तेच भक्त व तेच योगी जाण : मजला त्याची अखंड उत्कंठाच : भक्तिकथेसी मैत्र यया पुरुषा : ते तीर्थ, ते क्षेत्र, तेच जगीं पवित्र : त्याचे आम्ही ध्यान करू : तें आमचे देवतार्चन होय : त्याशिवाय दुसरे काहीं गोमटे न मानूं : य प्रेमळाची वार्ता जे अनुवादतात ते आम्ही आपली परम देवता मानूं ]

आतांपर्यंत सांगितलेला जो तो, हे अर्जुना सायत असा भक्तियोग होय येथे योगाने – क्रियायोगाने, भक्तीने – रूपास येणे केले ज्या क्रियेने ते भक्तिबीज शोभविले जाते, तेच मुळी येथे योगाशीं समन्वय पावन रूपास आले. तेथे आतां प्रत्यक्षत्वाचें पूर्णपणच – नाथच तो, का सिद्धच तो रूपास आला, देव झाला भक्ताने नितांत प्रेमाने देवाशीं तादात्म्य पावणे केले, तेथे प्रीति शिरसावंद्य झाली – प्रीतीचे थोरपण हे स्थितीस आले तेथे यज्ञ, कां तप, का दान हे आपापलेपण पाहू करून मूर्तिमान झाले गुण हे अनेक मूर्तीनीं घडले गेले – मूर्तीमध्ये विलसू लागले व आता असेच म्हणणे कीं श्रीकृष्ण देवांचा अतिप्रीतीचा असा हा भक्तिरूप योग वर आला [ ये तु धर्म्यामृतमिदं ] तेथील अमृतधारा ही गुणाची झाली, तिने समत्व पाहिले : प्रतीति आली, ती अनुभवास आणिली : तेथीलच्या रम्यतेची नवाई ऐकून अमृततत्त्वच ते प्रतीतीचे धर्मपणास आणून तेच जे होऊन आहेत : सर्व मानस ह त्याच गुणातीततेचे झाले : मग तेथे काय बहारच – ती जशी काय उत्तम अशा क्षेत्रात पेरणीच झाली : तेथीलचे पीक अपार असे त्या सिद्ध शुद्ध मानसाच्या रम्यरमणीय स्थितीवरून लक्षात येणारे [ श्रद्दधानाः ] श्रद्धाच सर्व आदर होऊन आहे, [ यथोक्तं पर्युपासते ] तिने अणु अणु दैनंदिन तेच ते स्थितिरूप होणे केले – ती वृत्तिच एक एकसारखी त्या जीवदशेत आपला विस्तार घेऊन आहे, पुरुषच होऊन आहे – अशी अनुष्ठिती चर्याच ज्याच्या ठिकाणीं आहे, असे ते भक्त आपल्या जीवीचें तत्त्व ते पुरुषाप्रत आणत असतात. [ मत्परमाः ] याहिवर ते तर मलाच महत्त्व देणारे झाले : परम प्रतिष्ठा, अति प्रतिष्ठेचे असे ते माझे असणें त्यांनीं संपूर्णपणें मानलें : मला आपल्या सर्वस्वाचे केले, कसे तर ह्या तेथीलच्या अर्थावर प्रेम ठेवून, तेथीलचा अर्थ ( महत्त्व, सीमा, श्रेष्ठत्व, गहनत्व ) रमणीयत्वाच्या प्रेमाचा केला. [ भक्तास्ते अतीव मे प्रियाः ] हे पार्था, असे या जगामध्ये जे तेच भक्त होत, तेच योगी होत व तेच माझ्या प्रेमाचे होत. अशांच्या प्रेमासाठीं मी तर अखंड उत्सुकच – कधीं बरें ते प्रेम भेटेल अशी आवड घेऊन

असलेला असतो. तीर्थांना तीर्थत्व – रूप का स्वरूप असे – त्यांच्याचमुळें आलें. क्षेत्र कां पुण्यभूमि तेंहि पण त्यांच्यामुळेच क्षेत्रपणाचा म्हणजे देहदिवसाचा बाणा पाहू लागलें. एवढेंच नव्हे, तर तेथीलचें महिमान हें पावित्र्याचें असे मूर्तिमंत जेयच होय. त्याचें मित्रपण म्हणजे भक्तिकथेची रम्यता त्या पुरुषास आली – प्रेम हें तेथीलच्या अमृतकथेचा आश्रय होऊन पुरुषच प्रत्यक्षास आला. अशाचें आम्ही सर्वथा ध्यान करणारे व्हावेत हे काय कांहीं नवल कसचें? तें आमचें देवतार्चन होय. त्याच्याशिवाय दुसरें कांहींहि आम्ही गोमटें का चांगलें मानंच नये हें केव्हांहि त्याचें आम्हास व्यसन, आमुचें ते सर्व निधींचें निधानच एक – बहुत काय लिहिणें, परंतु ते भेटले तरच आम्हास परम समाधान मिळणारें. याहिवर प्रेमळाची वार्ता जे अनुवादण्याचें करतात, परमादरानें सांगतात, त्यांना तर आम्ही आमची परम श्रेष्ठ अशी देवता मानूं. पढियंता मात्र हा संग्रहाचा करून, शिकवून – देवहि आपण व भक्तहि आपण असे ते स्वतःस दोन्हीं ठायीं वाटून घेऊन – तेथील रम्यतेची नवलाई ही जे बोलाप्रत आणतात – ते जसें देवतांचें एक आसयच असे होत – तेथें देहाचें जे मनुष्यपण तें जसें देवत्वावर उभें झालें.

**निजानंद : जगताचा आदिकंद : मुकुंदरूपी आलय श्रीकृष्ण :** [ ओव्या २३९–२४७ ]

[ निर्मळ : निष्कलंक : लोककृपाळ : शरणागतप्रतिपाळु : लोकलालनलीळु : प्रणतप्रतिपाळु हा खेळ जयाचा : धर्मकीर्तिधवळु : अगाध दातृत्वानें सरळ : अतुळ बळानें प्रबळ बळिबंधनु : भक्तजनवत्सल : प्रेमळजनप्राजळ : सत्यसेतुसरळ : कलानिधि : तो श्रीकृष्ण वैकुंठींचा – चक्रवर्ति निजाचा – सांगत आहे व दैवाचा तो अर्जुन ऐकत आहे : यावर निरूपिती परी अवधारावी श्रीनिवृत्तिनाथाकडून संतसेवेची शिकवण ]

संजय म्हणाला, प्रेमळ जनांना आनंददायक असे, जगतामधील प्रथमचा म्हणजे पहिल्या दर्जाचा आनंद देणारे असे, जगाचें जे आदि का कंदच एक – हें जगच मुळी ज्या कारणावर उभें झालें आहे तेथीलच्या मूळाशीं असलेला आनंदाचा पिंडच असे ते आनंदकंद देवकीनंदन श्रीमुकुंदरूपी श्रीकृष्ण यांनीं वरीलप्रमाणें हा भक्तियोग अर्जुनास सांगितला हे राया धृतराष्ट्रा, ते भगवान् श्रीकृष्ण म्हणजे साक्षात कलंकाशिवाय लांछनरहित अशी निर्मळताच होत – शुद्धताच होत ज्यांनीं त्यांचा आश्रय घेतला त्यांना ते मूर्तिमंत दयाच झाले : त्यांना जे शरण गेले त्यांचा त्यानीं प्रेमळपणानें प्रतिपाळ केला देवांना साहाय्य करणें हेंच त्यांचें शील होय लोकांचें लालनपालनादि तोषण व पोषण हें भगवल्लीलेचें सौंदर्यच एक : शरणागताचें संरक्षण, सहज लीलेनें प्रतिपाळ करणें हा त्यांच्या हातचा जसा खेळच. त्यांच्या ठायीं धर्मकीर्ति ही पुण्यरूप कीर्तिच होय. अगाध दातृत्वाची कोटी भरून काढण्याकडे ज्यांनीं आपलें सर्व ईश्वरत्व लाविलें : अतुळ अशा बळाचें असूनहि भक्तीनें बांधले गेले व प्रेमाला भुलून बळीचे द्वारपाळ झाले. भक्तजनांना आईच्या प्रेमाचें पांघरूण घालून त्यांच्याशीं मोकळया अंतःकरणानें वागणारे, सत्यानें वागणाऱ्यांना सेतूप्रमाणें भवनदीपार नेणारे, सर्व कळाच (कुशल कळा) त्यांच्या ठिकाणी एकवटल्या आहेत असे ते वैकुंठींचे भगवान श्रीकृष्ण – निज-नारायणच ते – जीवितनाथच ते – तेच मुळीं ह्या प्रेमाबद्दलची कथा सांगत आहेत व सभाग्य असा अर्जुन ती ऐकत आहे. आतां यावर निरुपणास घेतलेलें तें ऐकण्याचें करावें असे संजय धृतराष्ट्रास म्हणाला ती रसाळ अशी अमृतवाणीची कथा मराठी भाषेनें ( तो मार्गच – प्रतिपंथ, परिपथ – पुन्हां पुन्हां शोधला असे करून ) सरळ मार्गावर आणून मी सांगण्याचें करतां ती ऐकावी. श्रीज्ञानदेव म्हणतात कीं, श्रीनिवृत्तिनाथांनीं मजला संतसेवा कशी करावी ते शिकविलें – श्रीनिवृत्तिनाथांकडून मी संतसेवा करण्याचें शिकलो.

———



**श्रीगणेशाय नमः । श्रीकृष्णविश्वंभरायनमः ॥**

**ॐ नमो भगवते नारायणाय । ॐ नमः परमात्मने ।**

**॥ श्रीवरज्ञानेशो भगवान् प्रसीदतु ॥**

**दिक्कालाद्यनवच्छिन्नानन्तचिन्मात्रमूर्तये ।**
**स्वानुभूत्येकमानाय नमः शान्ताय तेजसे ॥**

# श्रीज्ञानेश्वरी

## ( सुबोधिनी )

## अध्याय बारावा—भक्तियोग

**जय जय वो प्रबुद्धे । उदारे प्रसिद्धे ।**
**अनंतवृत आनंदे । निर्विषये ॥ १ ॥**

(१) प्रबुद्धे - शुद्धे प्रबुद्ध = जागृत, विकसित, शहाणा. शुद्ध = पवित्र, निर्मळ, केवळ. उदारे = उदार सद्‌गुरु माऊली प्रसिद्ध = विख्यात, भूषित अनंतवृत-अनवरत = निरंतर, सतत. निर्विषये - वर्षतिये. आनदे वर्षतिये = अन्‌अंत ज्याचा असे आकाशच सर्व प्रकाशले असा आनंद देणारे, आनंदाचा वर्षाव करणारे.

श्रीगणेशास वंदन करुन देवताकांडामधील हा भक्तियोग नांवाचा अध्याय मी लिहिण्यास घेतों व त्यांना विनवितों कीं, ह्या अध्यायाचे काम निर्विघ्नपणे पार पडो अशी आपली कृपा असावी. काम निर्विघ्नपणें सिद्धीस जावो अशी आपले चरणीं विनंति आहे.

श्रीकृष्ण विश्वंभर जे - जे या अध्यायाची विशिष्ट देवता आहेत - त्यांचे चरणीं माझे नमन आहे, त्यांना मी नमस्कार करतो.

जय जय अशा उच्चारांनीं नमस्कार करून मी म्हणतों कीं, अगे शुद्धे, ' शुद्धं बुद्धं तत्त्वमसि ' या महावाक्याची जी प्रमुख देवता हे ब्रम्हशक्ति, अगे प्रबुद्धे, हे ज्ञानवान् अशी सिद्ध योग्यांची ज्ञानशक्ति, व्रतभाराच्या आनंदाचा वर्षाव करणारी अशी जी श्रीगुरुकृपादृष्टी त्या तुमचा मी जयजयकार करतों. शुद्ध ब्रम्ह जें शांत असे त्याचा जयजयकार असो. निर्मळ अशा शुद्ध बुद्धीस ज्ञानमूर्तीस नमस्कार करून मी हें लिहिण्यास घेत आहे. तेथे आतां जय जय असेंच अभिवंदन होय. हे शुद्ध अशा चिदानंदतत्त्वमसि-स्वरूपिणी, अगे जागृत अशा ज्ञानस्वरूपिणी, मी तुझा जयजयकार करतों. जय हो, जय हो, असेंच तें

अभिवंदन शुद्ध ब्रम्ह जे, शांत ब्रम्ह जे त्याचा जयजयकार असो तेच प्रधान ब्रम्ह असेंहि म्हटले जात आहे. तेच मुळी ह्या विश्वरचनेस आधारभूत व भरणपोषणादि क्रिया करणारे आहे. तेच मुळीं पुरुषविशेष असे म्हटले आहे. ते पुरुषोत्तमच श्रीमान् असा होय अगे शुद्धे, ही चित्तशुद्धि हीच मुळीं साध्य होणारी श्रीमन्नारायणाच्या ध्यानाने. तेथे जरी जीव हा स्वतःसिद्ध ज्ञाता, तरी कर्में हीं चित्त-शुद्धीकरितां करावीं लागणारीं होत. ती शुद्धि ही ध्यानें श्रीनारायणाच्या आपल्या श्रेष्ठपणास घेऊन महत्त्वाची झाली आहे, व आतां तीच मुळीं स्तविली गेली व तिचा जयजयकार केला. म्हणून हे निर्मळ अशा श्रीगुरुकृपादृष्टे, तुमचा जयजयकार असो. गुरुकृपेवर माउलींच्या वात्सल्याचें रूपकच एक अशा हे श्रीगुरुकृपामूर्ति, तुम्ही उदार असे आहात. विख्यात, भषित नाममहिमेची कां प्रधानतेच्या ब्रम्हपणाची, प्रसिद्धपणाची सीमा घेऊन आहांत. म्हणून प्रसीद, प्रसीद' प्रसन्न हो, प्रसन्न व्हा! आपल्या प्रसन्नतेस या, प्रसन्नतेस यावे असे वरचेवर माझे तुम्हाला विनविणे आहे तेथे नहमीं आनंदाचा वर्षाव होणारा, निरंतरचा आनद हा तेथे वर्षाव्यास येणारा, निर्विषिय ज्ञान तेथे ज्ञानपणास आले, शुद्ध असे ते सिद्ध स्वरूपच एक आनंदास आले.

ही मनःसौंदर्यलतिका ही तर आपले सर्व प्रसन्नत्व पुढे करून आपल्या आगमनाकरितां 'जय हो! जय हो!' असे मंगल अभिनंदन करून 'यावे, यावे जी अहो! आगम्यताम! आगम्यताम्!' अशी ह्या मनाच्या प्रसादतेची एक वदनरम्य हास्यछटा घेऊन, स्वभाव उत्तमतेच्या परिक्रमास अभिनंदन देऊन, आपले स्वागत करीत आहे! तेथे प्रेमादराचा तो बाणा हा स्वभावरमणीयतेचे महिमान असे आपले अंतःकरणच तुम्हांस बिछाऊन आहे: व ह्या हृदयावरूनच आपण चालत असावे असा एक परम औदार्याचा जिव्हाळा – ह्या सर्वस्वभाव संदरतेचा परम आदर – हाच आपले स्वागत करून आहे: तेथे ह्या उत्कृष्टतेचा जो महिमा तो गुणगान करू पाहात आहे: महिमा हा गावाच! प्रतिष्ठा ही स्थिर होऊन असावी, दृढ अशीच ती औदार्यभूमिका रंगविली जावी: माझ्या मनाची चंद्रिका ही स्वभावाचे उत्तमत्व असे कुशल कुशल असे विचारीत आहे तेथे सर्व कौशल्याचे प्रस्थापनच एक ह्या वृत्तींना का कर्मांना निवृत्ततेचा सीमाच देऊन आहे: तेथे कर्म लोपले: गुणानीं आपले महत्त्व त्या श्रीमान् अशा गुणमयीस अर्पण केले व जिकडे तिकडे ह्या स्वभावाचे परम देदीप्यमान असे सर्वांग-संदरतेचे स्वभावशात लक्षण हे पुढे होऊन, त्याने आपले आगमनाने स्वर्गच एक पृथ्वीवर ह्या योगभूमिकेस पाहूं आणिला: सर्व योग हा त्या परम देवतेचे ऐश्वर्य घेऊन आल्याने, ती देवताच आतां आपण स्वतःच असल्याने, अहो येथे योगास उणे ते काहींच नाहीं: योग हाच दिव्यतेचा असा ज्ञान-देहच तो आपला सर्व भार उचलून आहे: सर्व सिद्धामध्ये ज्ञातेपणानें अति वृद्धपणाचा असा आदरणीय, रमणीय, परम प्रसन्नतेचा असा एक भारच्या भार होऊन आल्याने, जिकडे तिकडे काय अहो परम शात असे सिद्ध लक्षण सिद्ध होऊन आले: अहो, जेथें सर्व सिद्ध असे विस्तीर्णतेचे ते कर्माचें अंग तेच मुळीं आपले सिद्धपणाचें झाल्याने, तेथे कर्माचे मुळी नांवच नाहीं – कर्म काय कुणी आठवतच नाहीं-असे झाले: तेथे निष्पन्नांची सहज-योग-धारणा ही योगाचे दिव्य सर्वशात असे रूप घेऊन, तिने आपले स्वागत केव्हाहि करावेच करावे असा हा प्रसंग – वेळा – अति मधुर असा – सर्व योगच एक आपल्या अद्वितीयतेच्या उत्तमतेस आल्याने – आतां अहो! जय हो! जय हो! असे म्हणून आपले स्वागत करीत आहे. अहो, सर्व ज्ञानियांमध्ये परिपूर्णतेची जी परमसीमा ती जशी का ब्रम्हच मूर्तिमंत येथे पुढे होऊन आहे: प्रबुद्धतेची जी ज्ञानकळा ती येथे सर्व सौम्य अशी शात उदारपण पाहिले असतां अति तेजवान्, परम उग्र असे तेजस्वी दिसणारे – उग्र! पण काय तेथीलचें प्रेमलक्षण सांगावे कीं, मातृवत्सलतेच्याहि भारास आपल्या कुरवाळणाऱ्या हस्तानें जसा तो मनस्तापच कां स्वभावाचे बालिश-बाल्य ते काढून टाकून, तेथे परम आदराचें असे एक वीरभावाचें स्थापन करून, त्यानें त्या त्या

वृत्तींना आपले रमणीयतेचें पूज्यमान पूजनीय असे देवतातुल्यतेचें एक महिमान आणिले आहे वेळा ही अति उदात्त, अति गभीर अशी दिव्य होऊन तिने ह्या आपल्या आगमनास स्वागततेची दिव्यता दिली आहे. स्वभावाचें प्रवरपण हेच जसे उदासीनतेने झळकूं लागल्याने आता माझे मनास असा भारी उल्हास येऊन आहे कीं काय सांगावे ! येथे स्वागत - सर्व आदर - सर्व प्रेम - सर्व भीतियुक्त पण प्रेमच ते - हे ह्या वेळेस आपले गहनत्व - अफाटपण - देऊन असल्याने,येथे सर्व जगच जसे आपले नयनांना उत्सव देऊ करावा म्हणून नयनोत्सवाकरिता येऊन आहे : अहो सिद्ध, आपण प्रबद्धामध्ये, ज्ञानियांमध्ये सर्व ज्ञातत्व घेऊन असल्याने, आपल्यामध्ये महत कुटंबवत्सलतेचा महत् भार हा सर्व बाजूंनीं आपले रमणीयत्व देऊन आहे अहो, योगच तो मूर्तिमंत - येथे, जिकडेतिकडे, लहानथोराना, सर्व कांहींना - आपले स्वभावभाराचें कौशल्य देऊन आहे : असे आपलें प्रबुद्धतेचे अंग हे परम ब्रम्हच जसे आपले महिमान उचलीत असून, तेथे जय! जय! जय हो! जय हो! असेच आपले स्वागत करून, आपणापुढे नम्रतेने हातच जोडून आहे - नमन देऊन आहे : अहो, शुद्धतेचे महिमान हे जागेपणाचे दातृत्व ते आपल्या बुद्धिमंततेस आल्याने, तेथे बुद्धिमानानीहि आपला जयजयकार करावा हे काहीं नवल नाहीं तेथे ह्या ईशचरणींचा तो क्रमच जसा ह्या स्वभावास मोठेपण देऊन आहे ह्या उदारभावामुळे आपले प्रसिद्ध-पण हे चोहोकडे प्रसन्नता उत्पन्न करून असल्यानें, आता काय लहान, काय थोर, काय गरीब, काय श्रीमान, काय अज्ञान, काय सज्ञान ह्या सर्वांना तो ईशत्वाचा एक वेषच जसा ह्या स्वभावसौंदर्यास गहनीयता देत आहे तेथे जो तो हेच चाहणे करून आहे की, ह्या देहधारणेचें - ह्या मनुष्य-जन्माचे - जे शील ते ईशत्वावर उभे होणारे तेच आता जसे आपल्या सहजपणास यावे, व आतां सर्व काहीं आनंदच एक वर्षाव्याचा व्हावा आनंद खरा, पण काय त्या आनंदाचे वर्णन म्हणजे एक मूक प्रवरतेचो, उदासानदिव्यतेची छटा ह्या मुखावर पसरूं लागलेली : तेथे ते मुख म्हणजे आपल्या तेजा-मुळे, आदरणीयतेने ह्या मनासच मुळीं मौनाचा, स्तब्धतेचा, शांततेचा वळसा देऊन असल्याने, तेथे आनंद हा सर्व गंभीरपण घेऊन, स्थिर स्वभावाचा असा सिद्ध होऊन आहे : तेथे जय! जय! असाच भाव का उच्चार हा चोहोकडे परिणाम करून आहे - आपल्या वर्षाव्यास येत आहे : असा हा एक आनंदाचा उत्सव परम आदर घेऊन आहे, व आता सर्व स्वागत हे ह्या स्वभावास आपले महत्त्व पाहाण्यास लावीत असल्याने, ह्या अध्यात्मविद्येचे प्रसन्नत्व - उदार लक्षण - ह्या मनुष्यजन्माचे भाग्य घेऊन उदयास आले असेच आहे : येथे जय! जय! असाच घोष जिकडे तिकडे प्रेमोल्लास करीत राहिल्याने, आता ह्या भूमीस वदनच जसे झाले, का सर्व पृथ्वीच जणूं का विश्वच हे आपल्या महत्त्व-भाराचे होऊन, त्याने आपले सर्व प्रकाश होण्याचे जे क्षम्यपण तेच चोहोकडे पुरविते केलें. आतां देवतेचे रमणीयत्व हे जसे प्रत्यक्षत्वास आले, सिद्ध झाले, जाणिवेस आले, प्रवुद्ध असे झाले, रूपास आले, नाम गाऊं लागले : व नाविन्यतेची - नवीन नवीनतेची - एक जोपासना का तृप्तीच ह्या देहास देऊ केल्याने, देत राहिल्याने, तेथे स्वामीच जसा आपल्या प्रसन्नतेस आला - गोस्वामी जे तेच आता आनंदाच्या वर्षाव्यास आले सर्व भूमि ही - भूमिका ही - आपला भार आपले स्वागत करण्याकडे योजीत आहे : म्हणून येथे यावे ! यावे ! जी अहो ! सिद्ध स्वरूपिणी ! अहो शुद्ध योगरूपिणी ! अहो औदार्यवंततेची कमालाची जी प्रसिद्ध सीमा पाहाणारी अशी ती आनंददायिनी योगविख्यातता ! आपल्या दिव्यतेचा वर्षाव कराच करा कीं अहो ! अशीच विनवणी आहे !!

स्व-देहाचा केलेला जो अर्जुन !!! स्वदेह हाच कोणी एक शिष्य ! व आतां तेथील प्रज्ञा प्रज्ञतेप्रत आल्याने, तेथील कारण देह हाच मुळीं इतका काहीं उत्सुक झालेला कीं, त्यास ह्या दर्शना-शिवाय कांहीं सुचेना व तसे तें उत्सुकतेचें होणें हें सर्वथैव दर्शनच एक तऱ्हेचें आंचेस आलेलें ! इतके बलवत्तरतेचें होऊन आलेले जें त्याचें मन - त्या एका ज्ञानाशिवाय दुसरें कांहींच नको असें

म्हणणारें जे त्याचें मन – तें आतां तल्लीन, स्वरूपीं तल्लीन, विलीन झालेलें : भगवान् श्रीगोपालकृष्ण हेच कोणी एक महावाक्य – त्या महावाक्याचा उपदेशच जसा कांहीं "तेंच तूं आहेस" किंवा "तोच तूं आहेस" असे वरचेवर दाखविणारे – "पश्य पश्य" म्हणणारें – जे श्रीमुख तेच जणूं आतां अर्जुनास आपलेसे करीत आहे! तेथील बुद्धि, प्रज्ञा, धीमंतता ही त्या श्रीकृष्णविश्वंभराच्या विश्वरूपदर्शनानें शुद्धतेप्रत येऊन तिनें आपली सर्वच्या सर्व शुद्धि घेतलेली व बुद्धि ही बुद्धतेचे प्राविण्यास आलेली : तेथील मनाचे जे कण ते ज्ञानप्राप्तीच्या योग्यतेचे झाल्याने, तेथील अणुरेणु, कणकण हे जणूं उशा घेत असलेले – ते आतां त्या विश्वरूपदर्शनाने स्थिर झालेले! ज्ञानवेदन, संवेदन हे त्या अक्षराचें जे सूक्ष्मसूक्ष्मतर असे जे बीज, ते आरोगणच घेत राहून, अशा कांहीं महदानंदाचे झाले कीं, त्याने जय हो! जय हो! हे भगवान्! हे श्रीगुरो! असा शब्दध्वनी करून, महावाक्यरूपी कृष्णाचा जयजयकारच केला. तेथील प्रसाददृष्टि ही जणूं त्या अर्जुनास त्या श्रीकृष्णरूपी गीतामृत दोहनाचे दानच करीत आहे. तेथील निर्मळपणाची जी दृष्टि ही अनेक जन्माचे संसिद्ध गतितत्त्व तेथें स्थिर झालेली असून, कृपा, गुरुकृपा हीच कृपा प्रसवली! ती कृपेची झाली कृपा हीच मूर्त रूप घेऊन आली तेथें सर्वथैव प्रसन्नता प्राप्ततेची झाल्यानें, ती कृपा म्हणजेच काय सर्व समाधान तृप्तिच घेऊन आलेले! असे ते कृपेचे होणें! तेथे सर्व कृपा ही कर्मभारानें डोलत राहिलेलें जे ते एक श्रीरूपी देवपणच! तेथील भार हा रंगास आलेला असा जो पति तो श्रीरंग – योगच – गणपतिच आपल्या प्रसन्नतेस पाहू लागला. तेथील कृपा काय वर्णावी! जशी माता ही लहान बालकास जेऊं घालतांना जसे तेथील अवर्णनीय असे बोलणे, समजविणे, खेळविणे करून, स्वेच्छेनें जसे एक स्वच्छपणानें त्यास भरवीत असते, तसे येथे त्या बुद्धिरूपी अर्जुनास अनेक तऱ्हांनीं त्या श्रीकृष्णांनीं समजवून दिलेले तत्त्व हे जसे कांहीं वरील बालकाचे भरणेंच होय! आभरण केलेले होय! वस्त्रपरिधानासहित केलेले अलंकृतपणच! अलंकारच केलेला! तेथे त्या बुद्धीस जागे असण्याबद्दल वरचेवर "हुं" काराचे करणे – नुसता नव्हे, तर तेथे प्रीतिपात्ररूण रूपी नामच ऐकत आहेस कीं नाहींस असा पडताळा नामरूपाने घेत असणारे जे जिव्हाळयानें सागणें – त्या स्वरूपास ये, रूपास ये, रूपाचा हो, स्वरूपांत राहून रम असे वरचेवर सांगणारी जी त्या भगवंताची कृपा ही प्रसीदतेची झालेली! तेथे देहामधील यच्चयावत स्पंद हे त्या तेजात लयास आले : स्वप्नसृष्टीसहि ओलांडून टाकिलेले ते ज्ञान जागणेस आले : असे दिव्य देहाने असणें हे त्या मानवधर्मास उल्लंघन गेल्यामुळे, तेथील क्षुट् – तृषादि व्यापार हे मनुष्यदेहाचे जे संयुतीनें असणारे जीवधर्म हे आनंदाप्रत आले तेथे दिव्यानंदच! ज्ञानदिव्यच! असे श्रेष्ठत्व येऊन, "वर" "नाहो" "जानी" "कांत" "नाथ" ह्या वरभावाचे समीकरण तसेच एकीकरण झाल्याने, तेथील गुरुकृपेचे ऐश्वर्य म्हणजे श्रीगुरुच तेथे प्रसन्नतेचे झालेले असे "जयजय"त्व जयास आले! हे श्रीगुरो! तुमचा विजय असो! जय असो! जयजयकार असो! असे त्या शुद्धबुद्धीचें प्रसन्नपण हे त्या श्रीगुरुंना म्हणजेच श्रीकृष्णानाच जसे कांहीं आपले सर्वपण देऊन त्यांच्यांत समरसून गेलेले असे ते अर्जुनपण – वेल्हाळपण – इतके प्रसन्न झाले कीं, ते ह्या ज्ञानप्रशंसेची प्रतीतिंच प्रत्यक्षास येत राहिलेली, आनंदित झालेली, आतां आपल्या उदार भावास येत राहिल्याने, तेथील अद्वितीयता ही ह्या मनास अगदीं मोकळे करून महतीस पाहूं लागली! तेथील आनंदाचा पडदाच बाजूस केलेला! आनंदाचा पूरच आलेला असा जो अतिशयानंद – जेथे ते मुखावरील वस्त्र किंवा पट हे बाजूस घेण्याने किंवा पदर खालीं केल्यानें ते सुखस्वप्न हे सगुणरूपास पाहिल्यामुळे ते आतां स्वप्नवत् न राहतां आनंदच मूर्तीस आलेला – असे त्या भगवान् श्रीकृष्णाचें दर्शनच आनंदित होत्साते, "आनंद हा आनंदाचा जणूं नित्यत्वाचा असा होवो!" असा आशीर्वादच घेत आहे जेव्हां तेव्हांच! असा हा "अन्

अंतराच्या " समाधानाचा असलेला आनंद ! असा हा " भवामि न चिरात् " अभ्यास करावा किंवा अभ्यास हा आनंद बरोबरच घेऊन आलेले असे आतुरतेचे दिव्य लक्षणच !!! ह्या क्रिया ह्या निरनिराळया न राहतां जोडूनच असलेल्या अशा आनदाच्या झालेल्या ! तेथील चिदाकाशाच्या ज्या कांहीं निरनिराळया तऱ्हेच्या आवृत म्हणजे झांकलेल्या किंवा झाकून असणाऱ्या वृत्ति ह्या आपणास उघड करून आनंदास पाहा म्हणणाऱ्या !! असे हें आनंदास येणारे जे कृपेचें वर्षण ते अद्भुतच होय !! (१)

**विषयव्याळें मिठी । दिधलिया नुठी ताठी ।**
**ते तुझिये कृपादृष्टीं । निर्विष होये ॥ २ ॥**
**तरी कवणातें ताप पोळी । कैसेनि वो शोक जाळी ।**
**जरी प्रसादरसकल्लोळीं । पुरें येसी ॥ ३ ॥**

(२) व्याळ = हिंस्र पशु, दुष्ट, सर्प ताठी – ताटी = मूर्छना, ताटस्थ्य, उदासीनपणा. (३) ताप = त्रिविध ताप, ज्वर, खेद, दुःख ताप पोळी = त्रिविध तापामुळे भाजणे होणारे. प्रसादरसकल्लोळी = कल्याणरूपी प्रसन्नतेच्या आनंदाची लाट. प्रसादरूपी लाटांचे पूर पुरून उरणारी प्रसाददानी पुरें येसी = पुरते होणारे, प्रसादरसास पूरच आला असे.

अशी ही कृपादृष्टी पाहिली म्हणजे असे वाटते कीं, ती ह्या प्रारब्धाचे डोंगरच्या डोंगर पार फोडून जात आहे व ह्या जीविताचे जे कांहीं वासनेच्या संसारांत फसणे त्यास एक सुखविषयींचे जणूं बोलणे करीत आहे : हे मानवा ! तूं मोठयाहूनहि मोठा असणाऱ्या अशा ज्ञानमहतीचा असून अशा विषयांच्या निरर्थकतेच्या व्यापांत गुंतून पडूं नको ! असे कनवाळूपण दाखविणारी ती कृपादृष्टी ज्या मातेनें ह्या जीवदशेस जन्म दिला तिच्या प्रेमास येणारी असून त्याहिपलीकडे जाणारी–म्हणजे ज्ञान-दृष्टीचे महत्त्वाने त्या जीवास आपले हरवलेले ऐश्वर्य प्राप्त करून घे म्हणणारी होय !!! त्या दृष्टीचे वर्णन जेवढे करावे तेवढे थोडेच ! ती म्हणजे एक प्रेमच ! सर्व प्रेमच मुरलेले असे असून तिजबद्दल इतके कांहीं सहृदयतेचें होणे ह्या मनामध्ये केले जाते कीं, तेथे हा जीव सर्वस्वीं त्या चरणाचे ठिकाणीं रत होतो, नम्र होतो. तो आपला सर्व अहंभाव टाकून देऊन त्या चरणासच " आपले प्रेमाचें " असे म्हणूं लागतो अशी दृष्टी इतकी काहीं तप घेऊन आलेली – ते म्हणजे तपश्चर्याच साक्षात प्रायश्चित्त घेऊन आलेली–ती ह्या मनाचे मनपणास लागणारे जे भीष्मबल ते देणारी असून तेथे या जीवदशेस लागणारे जे कांहीं इच्छित वस्तूचें देणे तेच देऊन, ह्या जीवदशेच्या अति प्रेमास पाहणारी अशी होय : असे या जीवदशेचे होणे हे त्या चरणास केव्हांहि न विसरणारे होऊन, तेथे महदुपकाराचे साहित्यच जणु हस्तगत केलेले, व या जीवभावांना आपल्या ऐश्वर्याचे जे कर्तव्य तेथेच दृढ करणारी होय. म्हणून हा जीव आपल्या धारणेच्या कर्तव्यास जीव कीं प्राण समजतो. तेथेच लिगटून राहा म्हणणारी अशी दृष्टी ही निर्मळ प्रेमच ! ईश्वरत्वच ! ऐश्वर्याचे असे ते या मनुष्यदेहाचें मनुष्यत्वानें असणे तेच ती देणारी असून, तेथे मनुष्यपणाचे जे बल त्यासच पोसणारी होय अशी ती दृष्टी म्हणजे स्वतःचे देवत्वच जणुं पाहण्यास मिळालेले असे अति आनंदाचे एक होणेंच, तो आनंदच नेहमीं आपलासा करणे होय तेथील वृत्तिरम्यता हे रमणीयपणच ! तेथील मनःसौंदर्य हे जीवितनृष्णेचें एक कौतुकच असे करणारे ! म्हणून ती दृष्टी ही अनेक आधी, अनेक च्छेद, अनेकत्वच जे या जीवदशेस पार खिळखिळे करून टाकणारे असते, त्यास एकत्वांत स्थिर करून असण्यास लावणारी होय. तेथे केवढे तप, केवढे साहस, केवढे तरी प्राय-श्चित्ताचे ते भारचे भार असे उचललेले असून, एक क्षणभरहि त्या दृष्टीमध्ये असून न विसंबिले जाणारे ! तेथील जे अक्षर तेच या जीवनयात्रेचें रहस्य, व तेथेच ती मुरलेली ! अनेक जन्म तेथे आपलें विसरलेले

ऐश्वर्य देणारें असे त्या ईशप्रेमांतच राहणें हे एक निव्वळ ह्या मनुष्यलोकींचें देवत्वच! आनंद हा ज्याचा त्यासच! (सज्ञानतेचा एक ठेवाच! जाणतेपणाचे लाघवच!) तुमच्या आनंदाने कोठे मी सानद होईल? माझ्या आनदानें तुम्ही कोठे सुख मानाल? कोठे भाग्यवान म्हटले जाणार? ज्याचें काम त्यानेंच केले पाहिजे. काम, धाम, कर्तव्य तेथे आनंद हा असतोच व तेथे कामास लागणारे कर्तव्यतेचें होणें हें पाहिजेच. म्हणून काम म्हणजे या देहास ते काम करण्यास योग्यतेचें करणें होय. अनेक बाजू जरी या कामानें घेतल्या, तरी या देहयष्टीस पोषण देणारे जे बोलणे चालणें यानेच तो देह कर्तव्याचे योग्यतेस आणला जातो. म्हणून येथे आनंद हा – म्हणजे स्वतःचे जीवितच सूक्ष्म रूपाचे झालेलें ते – या व्यापार, क्रिया बोलणे चालणे इ नीं दुसऱ्या व्यक्तीशीं ऐक्यानें जेव्हा असेल, तेव्हा तेथे " यथाधर्म " असे पुरुषाचे स्थैर्यच असलेले पाहण्यास मिळतें. म्हणून येथे जो आनंद आहे किंवा असतो, तो लिहिलेले वाचून न सापडणारा असून, कागदावरचे जे ते ह्या देहभावाशीं ऐन भिडून गेलेले जेथे भेटेल तेथेच सापडतो. म्हणून तेथे काहीं एकांत, किंवा सवड, किंवा आड होणें, किंवा स्वतःस पाहण्याकरितां लागणारे जे या देहाचे जे जवळ असणें अथवा दूर होणें ते जशी वेळ तसें होत राहून त्या आनंदास पाहणे होते स्वतःचा आनद काहीं दाखविता येत नाहीं त्या आनंदाचा जरी आनंद मानला, तरी तो खर्च होणारा नसतो काय? हा खर्च पुन्हा भरून काढणे म्हणजे पुन्हा तसल्याच उपयोगी अशा मनुष्याची, प्रियेची, वृत्तीची ही भेट व्हावीच लागते अशा ह्या आनंदास जर तुम्ही माझें म्हणजे तुम्ही आपलेपणाचें महत्त्व हे देऊं लागला, तर तेथे माझे पाहण्याच्या साधनाचा उपयोग तुम्ही करितां व येथे मग मी म्हणजे कुठे असतो बरे? म्हणून येथे त्या आनंदांत रिझविणें एकाग्राचे करून, मग वाटेल तर तेथील पेस जोडून घ्यावी; परंतु आनद न देतांच आनंद घेणे म्हणजे जीवदशेसच (वांकड्या तिकड्या अशा घाताचे करणे होय) शून्य लक्ष्याचे तसेच वाच्याशाचे करून असणे म्हणजे काय? असा हा उदार भाव आहे होय? तर आनंद हा आनंदांत आणून तेथील आनद हा भोगणें होतें, म्हणून जेव्हां तेथे वृत्तिदाक्षिण्य, तेव्हाच तेथे आनद देणारी क्रियानिवृत्ति होय.

म्हणून सर्व भूतमात्रांचें हित अथवा पालन करणे, तसेच ह्या देहाभिमानाचे जे असणे अथवा देहाएवढेच असणे हे योगभावाचे करणे हे महत् कठिण असून ते ह्या संतसेवेनेच उरकणारे होय.

येथे अगोदर जाणणे जे आहे ते एकाद्या संसारिकाकडूनच हे उत्तम तऱ्हेने समजून घेतलें असतां बरे! परंतु ती अध्यात्मविद्या ही एक दिवसाच्या शिकण्याने येणारी नसून, तेथे तपाचीं तपे जेव्हा घालावीत-तीं म्हणजे सेवेनेंच फक्त! तरच ती आपली होऊन येथे आत्मभावन हे एक ह्या मनुष्यजन्माचे जसें कांही देवपणाचें लक्षण असून, ते ह्या विकारांच्या तडाख्यांतून सुटणारे नसल्याने व ह्या वासनाच्या पुटांनीं अगदीं जर्जर असे होणारे असल्यानें, तेथे सेवाविधान, तीर्थयात्रा, नियम, वारी इत्यादिनीच हे सहजच प्रेमाचें असे होणारे होय : येथे वाटवध हाच हरघडी, क्षणोक्षणीं व्यक्तिगणित उपयोजिला जाणारा असल्याने, तेथे हा जनमान अति घात करणारा असतो तेथे सर्वस्वीं जिव्हाळा असेल, प्रेम प्रेमास येईल, तरच प्रेम हे स्थिरतेस पाहातें. एरव्हीं स्थिर नसतां अद्वातद्वा व इकडे तिकडे होणारे ज लक्ष्य ते जर स्थिर होणारे नसेल, तर ते तसें स्थिर करणें म्हणजेच अभ्यास होय. करितां सर्व गोष्टी बाजूस ठेवून ह्या लक्ष्यादिना अगोदर आपलेसें केलें तरच ते ह्या संसारयात्रेच्या कसास उतरणारे होतें. नाहीं तर काय हें जे रानात हिंडणारे म्हणजे वृत्तिच मुळीं नसणारे जें जीवित ते काय माणसाचे? असें होत राहातें, म्हणून तेथे मनुष्यपणच अगोदर घे. मनुष्याचे जे स्वभावधर्मादि ह्यानाच अगोदर स्वभावास या म्हणावें, तरच ते पुढे कोणतेंहि कार्य करण्यास टिकाव धरूं शकतें.

म्हणून येथे संयम, मुद्रा, चामुंडा, 'क'कार, 'म'कार इत्यादिचें जे कांहीं स्वतः वागविणे हे अभ्यासासच आले पाहिजे, तरच ते बरोबर होय. पूर्वी कर्माकर्माच्या थपडा ज्या ह्या मनास मिळालेल्या असतात त्या मुळींच आठवणीस न घेतां, एक जे स्थिर असणे म्हणजेच संयम व ह्या जीव-प्रेमाचा जिव्हाळा किंवा ओलावा हाच तेथे स्थिर करून असावे, तरच एक तऱ्हेने ह्या प्राणास शांत करून असणे होय तेथील सेवा ही सेवेनेच सेवा संयमास येणारी असल्याने, तेथे रात्रंदिवस ह्या सेवेतच असणारे जे मन त्यासच हा संयम साध्य होतो. किंवा श्रीगुरुच्या कृपाचातुर्याने हे सहजच एक कृपेचे पोसणे असे होऊन, तेथेच ते आपले असे म्हटले जाते : व म्हणून ह्या अध्यात्म वद्येचे गहनत्व अति गभीर असून, ते काहीं सहजासहजीने आपल्या अंगवळणीं होणारे नसते. एक श्रीगुरूचे सामर्थ्यच या मायाबंधास दूर सारणारे, आपले सामर्थ्यसत्तेचे जे सगुण धारणेने चालणारे असे - ह्या वाचेचे गूढत्वच तेथे : म्हणून ह्या सगुणधर्माची जी अपारतेने असणारी योग्यता ती या देहधारणेसच आत्मबलाची एक जागा करून, तेथे देवत्व अथवा भावसामर्थ्य हे ह्या धर्मधारणेस येऊन, ह्या देहाचे अभ्यासाने असणे हेच एक अंतरंगाचे गुज असून, ते कसे बरे सेवेशिवाय देवतुल्य होणारे ? म्हणून येथे सतसेवा, सत्संग, सत्संग, सतसेवा, संतसेवा!!! असे मोठयाने ओरडून सांगणे होत असून त्याशिवाय येथे प्रवेश नच होणारा!!

तसेच या मुद्रेचें जे भरणं, आभरण, मूळबंधासच जसा कांहीं एकाद्या नागाचा फणा त्याचे शेपटावर उभे राहण्यानें फत्कारास येतो, तसे येथे ह्या अक्षराचे जे काहीं तल्लिनअवस्थेस येणे ते असून, तेथे ही सेवा हीच देवता होय संतसेवा हाच तेथील उबरा किंवा बंधारा असून, त्यानेच ह्या अध्यात्मविद्येच्या मंदिरात प्रवेश होणारा नुसते मनाने विचार करीत बसणे हे येथे कुचकामाचे असून ते सेवाविधान अंगोअंगीं मुरून गेलेले व्हावे तरच ते ह्या कामादि विकाराना चुकवून आपल्या योग्यतेस येते येथे मनुष्याची योग्यता हीच चोरली जाणारी – तेथे गुरुकृपेचे छत्र जर डोक्यावर नसेल, तर तेथे हे डोकेच नसणारे असे मठ्ठपण ह्या मनुष्यास काय उपयोगाचें ? म्हणून येथे ह्या विद्येचे अमोलिकत्व एक विचित्र रंग घेणारे असून, ते अंगवळणीं झालेच पाहिजे. ह्या मनुष्याने एकटे असणें म्हणजे वैराग्य, वृत्ति नसणे म्हणजे समाधि, देहधारण म्हणजे देवपण, वृत्तिशून्यत्व म्हणजे निर्वासन, बहिर्मुखत्व म्हणजे योग (कल्पतरु), मृगजळाची दृष्टी म्हणजेच गृह किंवा गंधर्व नगरीतील घर, जेवणारा नसणे म्हणजे लुचपणा किंवा ज्ञान दडविणे, असे हे अनेक विचित्र रंगाचे नटविलेले एक मनुष्यपणच काय! तेथे अंतर्मुखता ही सर्वथैव पुस्तकाच्या अभ्यासानेच पाहिलेली असून, त्यातील अतितर रहस्याचे जे अंग ते कशास म्हणतात कुणास ठाऊक ? असे हे मनुष्याचे जे विद्या-अविद्याचे रहस्य हे बहु विचित्र!!! तेथील निलाजरेपण हे मुळी मुंडकेच नसलेले होय किंवा बिनडोक्याच्या माणसाचे जीवितच! तेथे चाणाक्ष, हुशार, सपन्न, उडत्या पाखराचे पंख जाणणारा, चातुर्य, चतुर, आतल्या गांठीचा असे जे शब्द ते हरवलेले शब्द होत. म्हणून ज्या अर्थी हे शब्दच त्यांच्या कोशकिंड्यात न सांपडणारे असल्याने – ते म्हणजे भोळेपणाचे जे विद्याच नसणे – म्हणजे तेथील अपूर्वता हीच मुळीं दुसऱ्यांनीं आपल्या उपयोगास घतलेली होय. आता येथे काय प्रकार केला असता हे सर्व जीवन धारणायोग्यतेस येईल ते पाहाणे म्हणजे एकच गोष्ट तेथे ह्या अशा अनेक कपोलकल्पितांच्या जीवयात्रा ह्याना उपयोगीं असणारी व ज्यामुळे तेथे मनुष्यपणाचे वारे आत येईल असें करणारी म्हणजे एकच गोष्ट होय, ती म्हणजे सतसेवा. ही सेवाच आपले जीवनक्रमाची झाल्याने, तेथील वासनाचक्र हेच मुळीं मनुष्यातील हृदयाची जी देवता तीसच योग्यतेस आणणारे होते तेथे सर्वथैव तेच होणे म्हणजेच विद्या ही विद्येच्या अंतरंगाने विद्येसच विद्येचे करतें, तेव्हांच विद्या ही विद्येची सर्वथैव होणारी असून, तीच विद्यमानाचे विद्यत्त असून, तेच संवेदन असणारे : असे हे सेवाविधान आपले असे म्हणणे

म्हणजे तेथें आपलेपणा हाच अति उत्कृष्ट असा साज करून असलेला, तरच तो उत्तमत्वाच्या पुरुष ऐश्वर्याचें जे सदन त्यास येऊं लागतो हे केव्हाहि व कोणासहि पटणारे असेच नव्हे काय? म्हणून येथे अभ्यासाचे हिरवेपण (शितावरून भाताची परीक्षा) हे असत ते संततेस आणण्याचें केले, तरच तें देवत्वास शोभा देते येथे मुद्रा ही नामाने स्थिर केलेली पाहणें पाहिले जाऊन, तेच या योगनिद्रेचें एक तऱ्हेचे शिवत्वास येणे केलेले असे ते नामधारण ह्या देहधारणेसच सर्वस्वीं अलंकृत अशा भरणास पाहणारे असते!!!

ह्या मनपवनाचे जे खेळणें तेच कोणी एक मारुतीचे चेतन्य – शोभेसच शोभविणारे असें असते : ह्या ब्रह्मबीजासच पाहाणारे व तेथेच रत होणारे, तेथेच साउली करणारे असे ते असून, तेथेच त्याने ह्या मनुष्यजीवनयात्रेस पाधुरविलेले जीवित असें असून, तेच ह्या वाचाना झेपीत असणारे!! तेथे ही पश्यंती तसेच ती वैखरी व ती आंत असणारी मध्यमा व दूरवर विचार करणारी ती परा वाणी ह्यांनाच शोभविणारी जीवनयात्रा - ह्यांनाच आपल्या देहधारणेच्या योग्यतेस आणून देवत्वातच मुरलेली अशी वेढून असणारी जी – ती ह्या देहधारणेसच योग्यतेचा पोशाक करून असणारी होय. तेथे ह्या वाचेचें जे गर्जन, तसेंच ह्या मस्तकामधील ज्या कांहीं जागा, ह्या देहासच शोभविणारे असे मनुष्यप्राण्याच्या पुरुषप्रकृतीचें ऐक्य हे ऐक्यच खरे असे शोभवीत असणारी होय. तेथे हे जे जीर्ण वस्त्राचे बदलणे किंवा कायाकंथेचे जे त्याग अथवा अत्याग त्यासच ती पाहणारी असून, तेथेच ह्या वाचाऋणाचे जे मरूनहि उतराई न होणारे असे श्रीगुरूचे अलौकिक असे माहात्म्य स्थिरतेस आणणारी होय. तेथील प्रमा ही मस्तकच बोलणारें असे नामाचेच एक (वर डोके करणारे असें) नमनरूपी – खालीं पाहणारे – किंवा आंत पाहणारें – असे मस्तकच आटविणें जसे कांहीं, व तेच सर्व प्रकाशाचे असणें हेच तेथील विविध रंगाचे एक धनुष्यच जसे कांहीं ह्या भ्रुकुटीस महत्त्व देत. तेथे या कचभाराला किंवा कबरीभारातील फुलानाच जणुं अशी शोभा देऊन असणारे एक चक्रच त्या देवतेच्या रगास किंवा रंगदेवतेसच प्रसन्नतेच्या दीप्तीस आणून उद्दीप्त असे करत.

तेथेच ह्या प्राणशक्तीचें जे कांहीं संचरण हे अनेक योनींना – मनुष्ययोनी, देवयोनी, भूतयोनी, यक्षयोनी, गंधर्वयोनी, पिशाचयोनी इ ना – जे काहीं जीवित्वधारणेस – मनुष्यदेहधारणेस – योग्यता देणारे जे कांहीं अंतररंग – तेच व्यवस्थितपणाने देणारे असले पाहिजे. ते जर तसें नसेल, तर ह्या योगाचे जे दूरगमन तेथे त्यास फेकले जाऊन, पुन्हा आपले योग्य असे असणारे जे महत्त्व त्यासच ये म्हणणारे जे योनीकोटीमहत्त्व त्यासच शासन-शास्ता–हा आपापल्या योग्यतेने असा असे म्हणतो व त्या त्या जागीं त्यांची ती ती योजना करून, जी कांहीं ही मनुष्य-ज्ञान-जीवना-यात्रा हिसच महत्त्वाचें मापन देतो. तेथील कर्तव्य हे कर्तव्यासच आलेले असेच पाहिजे, तरच ते ह्या वासना-उपक्रमांना शांतरस देऊन, अमृततुल्य असे असणारे असे प्राणधारण देणारे होऊन, कर्तव्यद्वारां श्रीगुरूच्या प्रेमादरास पात्र होणारे होते : म्हणून येथें ह्या कर्तव्यास लागणारा जो प्रेमाचा रंग हा असलाच पाहिजे, तरच तो मान्यतेचा होऊन श्रीगुरूच्या गुरुत्वास राजविणारा, शोभविणारा – गुरुत्वच देणारा होय तेथे लघुलाघवीपण हेच नको असणारे असे असून, तेथे श्रीगुरु हेच अनेक गुरुपदाचें गुरुपण गुरुपणास आलेले असे केवळ ज्ञानमात्र असे ज्ञानच ज्ञानास आलेले कैवल्यच जसे!

तेथे व्यंजने जसे "का" "खा" किंवा "क" "ख" "ग" हींच त्या श्रीकराने घेतलेला एक पट असून, तेथेच त्यानीं स्वरास अनुसंधानानें पाहिलेले असें असेल, तरच ते आपल्या योग्य योगास आलेलें : तेथील ध्वनि हा "अनुहाताचा" जरी असला, तरी तो जर आपल्या जिव्हाळाच्या अंगसामर्थ्याने असणारा तो "रामनामाच्या" मुखाचा असेल तरच बरे!! तेथे नाम हेच सर्वथा रंगलेले असून, तें ह्या जीवन-यात्रेचा प्रसंग हा प्रसंगास आल्यानें दृढ होणारा असून, तेथे ह्या प्राणधारणेचे प्रिय होणें आपल्या

प्रियेस पाहाणारें असेल, तर तेंच सर्वथैव "नाम" समर्थनेचें समर्थ होणे हेच ते अंतर्मुखाचे शोभेस देणारे एक सौभाग्यव जसे कांहीं ह्या श्रीगुरुमुखासच कुंकू लावणारें असे स्वयंसमाधानाचे रहस्यच !!!

तेथें क्षरलेलें जीवन हे अक्षरास घेऊन ह्या जीवनलहरीस नामसूत्रानें ग्रथित करुन अक्षरभावास पाहाणारें असे ह्या ओंकाराच्या मात्राचे एकलयत्व एकलयासच पाहाणारें !! तेथील लय हा आटोपता घेऊन जें ह्या मनुष्यधारणेस देवत्वाची दीक्षा देणे म्हणजे नामसूत्ररहस्याचें आख्यान हे विलक्षणतेचे सर्वस्वीं !! आनंदाचें सर्वस्वीं !! प्रेमाचें ओथंबलेलें असेच सर्वस्वी !! जीवित हे नामसौंदर्यास जणूं जाणीतच नाहीं असे असलेलें. इच्छा ही किंवा वासना ही ह्या मनास जशी काहीं हळहळविणारी असून, ती ह्या देहासच अडवून धरिते सबधच्या सबंध देहच जणूं तिनें कर्षिला जाऊन तिची मिठी एकदां कां पडली, तर ती तेथील विषयाची आहुती घेतल्याशिवाय किंवा त्या वर्त्मा नांवाच्या अग्नीची उपशमा पाहिल्याशिवाय मुळीं सरळतेची होतच नाहीं. असें हे ह्या विषयांचे दारुणत्व इतकें कांहीं उच्चपद घेतें कीं, जसा कांहीं एकादा न्यायाधीशच ह्या विवाह अथवा ब्याह तत्त्वाची विचारपूस करीत असतो. तेथें ह्या मनुष्यप्राण्याचे जे – "महता पुण्यपण्येन क्रीतेयं कायनौस्त्वया" – जन्मास येणें हे काय केले असतां स्थिरतेचें होतें व तसें ते स्थिर होण्यास लागणारे जे मनुष्य-तत्त्व-पोषण हे वैवाहिकतेनें असणारी जी ह्या प्राणाची प्रिया तिजलाच मुळीं प्रसन्नत्व असल्याशिवाय शांततेस न येणारे असून. तेथील प्राण हाच न योजला गेलेला. म्हणून प्राण हाच वलास आला तरच तेथील विषयाचा बोजा हा डोक्यावर न बसतां तुम्ही जसे वळण द्याल तसा होणारा होऊन, ती वल्लभाच जशी ह्या विनयास येऊन तेथील "आज्ञा" ही पाहाणारी होते. "स्वामीची आज्ञा" हीच तिची आनंदाची भूमिका असून, तेथे रमविले जाणारे जे प्रसन्नत्व हे ह्या मनासच मोकळेपणानें मन पाहावयास लाविते. म्हणून तेथे अविकारत्वच अति उत्तमनेचें होऊन एक उदाहरण पाहाण्यास दिलेले असें वत्सल, भक्तवत्सलतेनें अतिमान्यतेचें झालेले जे कृपाळुपण हें कसलेहि त्रास मनावर घेत नाहीं. त्रास हे जर त्रासास आले नाहींत, तर त्यांच्या दुसऱ्या बाजूस असलेल्या ज्या यशादि साफल्याप्रत आलेल्या बाजू व तेथील प्रयत्न हे आपले महत्त्वास पाहातात. ह्या यशाचे बीज हें प्रयत्नांतच असते व ते ह्या मनानें घेणारे जे नेहमींचे आलस्यादि विकार ह्यांना नच पाहाणारें होतें म्हणून हे कृपे ! गुरुकृपे ! श्रीगुरुकृपारूपी वाक्यसमृद्धे ! श्रीगुरुंनींच आंत आपली दृष्टी जर केली, तर ती सर्वथा कल्याणाची होय ! ती प्रसन्नत्वच ! ती अमृतच प्रसवणारी असून त्या अमृततत्त्वास अति आवडीनें उचलणारी होते ती अमृताची होईल असेच नेहमीं चालणे होऊन ती श्रीचा सर्व प्रभावच !

म्हणून हे श्रीगुरो ! तुमची प्रसन्नताच येथे पुरेशी होते. ह्या तापानें जे पोळणें किंवा शोकरूपी वन्हीनें मनाचें जळजळणें त्यास तुमच्या कृपारूपी कल्लोळानें नाहींसेंच असे केले.

ह्या मनुष्यजन्माचा हेतु जो कांहीं आहे तो हा पुरुषार्थ हेतु किंवा पुरुषहेतु सिद्ध करण्याकरितां असून, तेथे बुद्धि हीच सर्वथा नीटशी जर स्थिर होऊन राहिली, तर तो अर्थ स्वभावास येऊं लागतो. ह्या इंद्रियांचे ओझे म्हणजे ह्या बुद्धीवर मोठेंच दडपण घातलेलें असल्यानें, तिला जो कांहीं त्रास होतो तो ह्या मनाचें आकर्षण झाल्यानें होतो. तेथे इच्छा किंवा वासना ही विषयांत फसल्यामुळें ह्या देहाचे अणुरेणुहि ताणले जातात. म्हणून ही बुद्धि स्थिर करण्याकरितां त्या महेशाची जी "इच्छाशक्ति" हीच त्या पुरुषार्थहेतूमध्ये स्थिर झाली, तर ह्या मनाचें जे कांहीं हिरमुसणें ते त्या हेतूसच पाहूं लागून, तेथे पुरुष हा स्वतःस आणला जातो – पुरुष हा आपलेपणाप्रत येतो.

ह्या पुरुषाचें जें अघटित घटणे म्हणजे घटनातत्त्व हे ह्या देहवैभवानें कसें पदार्थसंपन्नतेचें होते तें जर दिसूं लागेल, तर दृष्टी ही तत्त्वास फोडणारी होऊन स्वतःस कसें पाहावें हें तिला उमजूं लागेल.

आकाशास विरलतेस आणून तेथील उफराटे होणे जे ते तिला समजूं लागेल व ती स्पष्ट दर्शनाची होईल. झुरमुरलेल्या ज्या सुरकुत्या त्या जर मेधा नावाच्या पुरुषश्रद्धेने आपल्या पुरुष-अर्थ हेतूच्या केल्या, धारणाशक्तीच्या होण्यानें तर तेथे "त्रसणे" हेच प्रयत्न प्रत्ययास आल्याने मेधा ही आनंदाची होईल : येथे आनंद हा आपल्या प्रकारास येतो मूक आनंद, दिव्य आनंद, नित्य आनंद, सहज आनंद, तृप्त आनंद, देखणा आनंद, रस आनंद, दिव्य दृष्टि आनंद, दर्शन आनंद – तेथे दृष्टी ही मुखावर त्रासाची छटा न दाखवितां तेथील जो आनंद त्या वेळेसच योग्य असा असेल तोच घेऊन जर स्वतःस पाहण्याचे करील, तर " त्रासणे " हे विषयांचे न होता पुरुषहेतूचे होऊन, ते ह्या तापानें पोळणेच मुळीं देशोधडीचे करील. येथे या त्रासासच ताप म्हटले जाते. द्विजत्व, द्विषत्व, विद्विषत्व, इत्यादि ज्या " भव-द्वेषिणीने " घेतलेल्या विकारांना निर्विकारास आणणे तेच सुव्यवस्थिततेचे झाल्याने, तेथे तप्तताच नाहीं : तेथे तापच असे जे म्हटले जाणे ते ह्या पुरुषहेतूचे होऊन, ह्या प्रकृतीस प्रसन्नता देते. अक्षर हे – मूकशब्दच प्रेमसाहित्याचे – एक-रस-रंग-रसनेने घेतले जाऊन, तेथे प्रीतिच मुळीं प्रियतम अशी झाली. येथे ह्या ज्या दोन बाजू म्हणजे " त्रासणे " व त्याचा परिणाम जे " शोकणे " या परस्परावलंबी असल्याने, एक नाही तर दोन्ही नाही व एक निस्तरले तर दोन्हीहि सुखाचीं झालीं असे होऊन, ते अंतराने पाहाणें जे तेच देवतानंदास येऊं लागते; तेथील प्रेम हे श्रीगुरूस अति उल्हासाने आनंदाचे करते. मातापितराचे जे तृप्त होणे तेच येथे श्रीगुरूचेहि पण तृप्ततेस येणे हे परस्पर लिगटलेले असून, आनंद हा व्यापक होतो व तो ह्या जन्मास आल्याची किंवा ह्या मनुष्यजन्माची अपूर्वता पाहता जीव हा आनंदित असा होऊन कृतकृत्यतेचे आभरणच स्वतःस करून, महत उपकाराचे उतराई होणेचे बीज स्वतःत पेरून असलेला होतो. असा हा जीव परमोदार तत्त्वाचा झाल्याने, देवपणाचा किंवा पूज्यमान असा होऊन असतो

येथे संपन्नता ही पदार्थाच्या – आपञ्चीकृतानि पञ्चभूतानि – सुस्थितीची झाल्यानें तेथे गुण म्हणजे इंद्रियविषयादि पदार्थच भूतग्राम हाहि पण प्रकृतिपरतंत्र पदार्थसमुदायच. भूतभाव हाहि पदार्थच कर्म म्हणजे संयोगवियोगादि व्यापारवर्गाचे तत्त्व किंवा व्यापारविभागाचे तत्त्व, भूतयोनी ह्याहि सृष्टपदार्थच ! " अधिभूतं क्षरो भावः " म्हणजेहि नाशवंत कार्यरूप पदार्थ, भाव म्हणजेहि पण पदार्थभाव. भावभावना म्हणजेहि पदार्थभावना, अमलान लोकान् म्हणजे दिव्यलोक, जसे सत्यलोक, वैकुंठ, कैलास इ हे सत्त्वगुणाची वृद्धि झाली असताना दिसूं लागतात.

असे हे ह्या शब्दसृष्टीने आपलेसे केलेले मूर्तपण हेच तेथे उगवले जाते पञ्चीकृत पञ्चभूताचा हा पिंड कसा मूर्तपण घेतो किंवा कशा तऱ्हेच्या मूर्तपणाचा असतो, हे वरील तत्त्वाच्या निदर्शनाने स्पष्टपणास येते बुद्धीचे जे प्रावरण हे विकाररहित होते, दिव्यानंदास येते, ते देवत्वाचे जे विनय, सहज, आभरण इत्यादिनीं सुदृढतेच्या सुबुद्धिभवनास पाहू लागते, मूकानंदाचे होते हा मूक आनंदच सुयोजित अशा विभूतिलक्षणाचा होऊन, तेथील लोकांच्या दिव्य स्नेहांकिततेनें पुरुषलक्षणाचा भार उचलिला होतो व आपल्या योग्य योजनेच्या योगासच आलेला होतो (२-३)

**योगसुखाचे सोहळे । सेवकां तुझेनि स्नेहाळे ।**
**सोहंसिद्धीचे लळे । पाळिसी तूं ॥ ४ ॥**

**आधारशक्तियेच्या अंकीं । वाढविसी कौतुकीं ।**
**हृदयाकाशपल्लकीं । परिये दे निदे ॥ ५ ॥**
**प्रत्यक्ज्योतीची ओवाळणी । करिसी मनपवनाचीं खेळणीं ।**
**आत्मसुखाचीं बाळलेणीं । लेवविसी ॥ ६ ॥**

**सतरावियेचें स्तन्य देसी । अनुहाताचा हल्लरु गासी ।**
**समाधिबोधें निजविसी । बुझाऊनि ॥ ७ ॥**
**म्हणोनि साधका तूं माऊली । पिके सारस्वत तुझिया पाऊलीं ।**
**या कारणें साऊली । न संडीं तुझी ॥ ८ ॥**
**आवो सद्‌गुरुचिये कृपादृष्टी । तुझें कारुण्य जयातें अधिष्टी ।**
**तो सकळ विद्यचिये सृष्टी । धाता होये ॥ ९ ॥**
**म्हणोनि अंबे श्रीमंते । निजजनकल्पलते ।**
**आज्ञापीं मातें । ग्रंथनिरोपणीं ॥ १० ॥**

(४) स्नेहाळे=प्रेमभाव हाच आळविणारी अशी तं, हे जगदंबे सोहंसिद्धीचे लळे = परमात्माच मी अशा योग्यतेचे कौतुक. सोहंसिद्धी = तो परमात्मा मीच अशी बुद्धीची जी सिद्धी. (५) आधार-शक्तियेच्या अंकीं = मूळाधारचक्ररूपी शक्तीच्या मांडीवर. आधारशक्ति = मूळ माया, मूळ बंध अंकीं=मांडीवर. आधारशक्तियेच्या – आधारशक्तिचिया पल्लकीं – पालखीं - पल्लयंकीं=पाळण्यामध्ये परियें दे – पर्यंदे – परियंदे = अगाई गीते गात गात परोपरीचे झोके निदे - निजे = निजनारायण उपदेश, नित्यब्रह्म उपदेश. निदे = निजगुजाचें गाणें गात गात झोके देऊन निजवितेस (६) प्रत्यकज्योतीची ओवाळणी = अंतरज्ञानज्योतीने ओवाळणे. बाळलेणीं = बाळपणींच निश्चित केलेले लग्न, तेथें त्या निश्चिततेने बाळलेणे लेवविलेले – तेथें जसे त्या आत्मसुखाची सोयच करून ठेवली. (७) सतरावियेचे – सतरावीचें = सतराव्या जीवनकळेचे, अमृतकळेचे. स्तन्य = प्रेमरस सेवन. अनुहाताचा – अनाहाताचा = सकळ पिंडामध्ये वाहाणारा जो ध्वनि, हृदयामध्ये उमटणारा जो ध्वनि (अनेक ध्वनि) त्याचा. हल्लरु = गीत, गाणे बुझाऊनि = समजाऊन (८) सारस्वत = वाङ्मय, वक्तृत्व, विद्या तुझिया – तुझिये. या कारणे – या कारणे मी न संडी=सोडीत नाहीं. (९) आवो – अहो. अधिष्ठी = आश्रय देते. सृष्टी = उत्पत्ति. विद्येचिये – विद्याचिये धाता – धात्रा = ब्रह्मदेव, उत्पत्तिकर्ता विद्या=ज्ञान, तत्त्वज्ञान, मंत्र ( जसे, विद्याधर = एक देवयोनी, विद्याधारण-शक्ति, धारणा ) सकळ ‥ ‥ ‥ होय = सकळ विद्यांच्या उत्पत्तीचा ब्रह्मदेव (स्रष्टा) होतो.(१०) अंबे = आदिशक्ति, मूळमाया, गुणमयी, माऊली, श्रीगुरुमाय, शांतब्रह्म, महत, महत्तत्त्व. श्रीमते = षड्गुणैश्वर्यांनीं संपन्न निजजनकल्पलते = भक्तांच्या, आपल्याच्या सर्व इच्छा पुरविणारी देवतरुलता. आज्ञापी = आज्ञा, व्यवस्था, हुकुम करणें, आज्ञापन जप = विज्ञप्ति, विज्ञापना निरोपणीं – निरूपणीं.

तुझिया सेवकास योगसुखाचे सोहळेच तुमच्या स्नेहमार्दवाने दिलेले होत तेथे ‘ ते ब्रम्हच मी स्वयंसिद्ध ’ असे सोहंसिद्धीचे लळे तुम्ही पुरविणारे आहात. हे स्नेहाळे, अहो आई, तुमच्या सेवकास – बाळकास – योगसुखाचे सोहळेच चाखण्यास मिळतात तेथें ते स्वरूप – स्वतः ती सोहं अशी सिद्धीच एक – अशी भावनाच मुळीं तुम्ही पाळून असतां. स्नेहाचा लळा हा सेवकास पुरविलेला तेथे झाल्याने सोहंभाव हा सिद्धतेच्या रहस्याचा होऊन पोषण घेतो. मनोभाव हा पोशिला जातो व वयस्याच्या अंकिततेचा होतो तो मत्सरादि विकारांना मुळींच मनावर घेत नसल्याने, तेथें अद्वितीयता ही पुरेपणास येऊं लागते, आलेली अशी होते. म्हणून हीच अद्वितीयता ही आपले व्यापकत्व घेत व “ एकुलतं एक ” असे आनंदाचे स्थानच होऊन, एका प्रेमरसाचे एकत्वास आल्यानें ते देवतेचें दिव्यच !! ती देवताच ज्योतीची – जागत असलेल्या ज्योतीची ! – अशी होऊन असते, अशी असलेली असते, अशी असते !!

सस्नेह दृष्टीने पांघुरविलेले जे सेवकत्व तेथें लळा पुरविला जाणारा असा सोहंभाव हा त्या देहधारणेनें असलेला असा मी-भवन तो सेवकच ! ह्या देहासच सेवक संबोधिलेले ! हे स्नेहाळे !

गुरुकृपे दयाळे! तुझा हा देह सेवकच! पण योगभावच असा होऊन आहे तेथे स्नेह म्हणजे प्रेम कर्तव्यास पाहात असलेले असें पुरेपणास येऊन, त्याने तेथे जो भार योग्यतेस आणिला गेला तो बहुतांच्या प्रेमाचा होतो एका सोहळयाचें जें दिपविणे तेच तेथे येऊन, त्याचा असा हा लळाच जणं जेथे असावयास पाहिजे तेथे पुरता केला! असें हे सोहभावाने उपासनेप्रत घेतलेलें देवपणच! तेथे भक्तलळाच भाविकांना पाहण्यास दिलेला होता : एक तऱ्हेने देखण्यास दिलेले असे हे लोचनरम्यतेचे सुखाचें घरच होऊन, योगसिद्धि ही लोकांच्या पाहण्यांत आलेली. असे जे अनेक तऱ्हाचे लळणे किंवा सोहळयानीं योग हा योगास आणला जाणारा, ह्या अनेक प्रकारांनीं सुयोजित असे जे योगसेवन ते सोहळयांनीं पुरतें करून, तेथे सुख हेच महति घेऊं लागले. दृष्टिसुख तसेच देखण्यास मिळाल्यानें, मिळणारे असे समाधान जेणेकरून उगवेल असलेंच अनेक समारभाचे सोहंभावाचें उपासनच अनेक कार्यांमध्ये ते रत झाल्यानें, तेथे विविधत्व हे सोहळयाचें होऊन, तेथे हा कार्यालय म्हणजे लळा जसा कांहीं पुरविला गेलेला ह्या बोलणेंचालणे इत्यादिनीं तसेच विविध लोकानीं देखीस घेतलेला हा जो श्वसनभार याला ही अवस्था महत्त्वानें व्यवस्थिततेची करते. हा छंदच घेतलेले हे सोहंभावन हे अनेक तऱ्हांचे, वेळाचे, प्रकृतीचे असे जें तेथे भिनून असणे अथवा भिडून असणे हे ह्या योगसिद्धीसच जणं आव्हान देऊन आपल्या पुर्तेपणा . ये म्हणणारे होते. व ते पुरविणारे जे आपले स्नेहाळपण, स्नेहभ्रू, स्नेहवृष्टि ही ह्या भूतमात्रांचें पाळणच केलेले, व तेथे तत्त्वपोषणाने ती कृपा यथोपचारानें ते प्रेमांकुर उजवीतच जणं आहे असे एक अद्‌भूततेचे माऊलीपण शोभवीतच असलेली!!! (४)

मूळ मायेच्या मांडीवर तुम्ही त्या बालकाचे वयास येणे करून पोषण देणारे होतां. आधार-शक्तीने आपल्या मांडीवर घेऊन पोषण केलेल्या, वाढविलेल्या अशा ह्या बालकास हृदयाकाशरूपी पलंगावर परियंदे गाऊन – हृदयाकाशाच्या पाळण्यात निजगुह्याचा उपदेश करून - आत्मोपदेशाचे झोके देत देत विश्रांतीस आणता.

तेथील कृपा ही प्रसन्नगात्रतेची झाल्याने ती ह्या वरील विधानास प्रेमास येण्याकरितां गाण्यानेच – गीत गाऊन – जसे कांहीं तेथील मनास झुमकुळयात बसवून पात्रा वाजवीत गातच आहे तेथील मंजुळ स्वर हा कानावरून झुळझुळ वाहणाऱ्या वायूने जसा कांहीं मंदमुगंध असा मनोरम्यतेचा होऊन, हे वरील जे योगसाध्य सिद्धतेस येणें हे कौतुकाचें करून, तेच अभ्यासाचे योग्यतेस यावें असेंच पाहाणें दिलेले. अंतःकरणाच्या ठिकाणीं उगवणारी जी प्रेमवल्ली ही जशी कांहीं पालवी - प्रस्थरव – पलाख - पेलणारी अशी थाटानें घेतलेली – तेथे ह्या योगद्रुमाच्या योग्यतेस येण्याकरिता जणं "जो जो जो जो बाळा" ने गाणे गाऊन, तेथे निजगुह्याचा उपदेश करून, झोके देत व गाणे गात तृं निजवितेस तेथे तत्त्वपाळण हाच "पाळणा". अशा तऱ्हेने आधारभूत असलेली जी शक्ति तिनेच जसे ह्या दृष्टीला आपल्या मांडीवर घेऊन कौतुकाचे केले जाणे असे हे उत्साहास देणारे असे तुझे, हे माते, कृपाळुपण होय. तेथे योगसुखच सुखाचे व्हावे असे कौतुकाचे महत्त्व हे दिलेले व ते महत्त्वच घेत राहिलेली अशी जी कृपादृष्टि तिचा जयजयकार असो!!! असे हे आधारशक्तीने वाढविलेले व हृदयाकाशाच्या ठिकाणीं स्वस्थ असलेले असे हे तुमचे करणे हे, श्रीगुरो, अगाधपणाचे आहे!! अनिर्वचनीय आहे!!! (५)

तुम्ही आत्मज्योतीची ओवाळणी करतां – आत्मज्योतिच मुळीं ओवाळून असतां मनरूपी पव-नाचीं खेळणींच करून तुम्ही ह्या आत्मसुखाचीं बाळलेणीं लेववितां. बाहेरच पाहाणारीं हीं इंद्रिये त्यांची ती दृष्टी हीच मुळीं तुम्हांवरून ओवाळून घेते. अहो! ह्या मनाचे कां पवनाचें जे कांहीं अनावरपण तेच मुळीं सहजच आवरिलें जाणारें असे होऊन येते, व आत्मसुख जे त्याचीं जशीं

बाळलेणींच लेववििलीं गेलीं. ह्या आत्मसुखाचे तर सर्व बाळसेच – लेणेच – एक करून, ते लेवविण्याचे केले – असे, अहो हे श्रीगुरुकृपादृष्टी, तुम्ही आहांत.

तेथें आत्मभावना ही मूर्ततेची होऊन, ह्या वरील योगसामर्थ्यास जणूं कांहीं ओवाळीतच आहे. आत्मज्योत ही अनेकत्वांत समरसून गेल्यामुळे तेथे ती जणूं कांहीं ह्या योगभावाची दृष्टच काढीत आहे असें तुमचें करणे होय. हे जे मनपवन हे योगच घेत असलेले असे जे परस्पर व्यवहारणे हे सहजसुखाचें झालेले होऊन, तेथे " योग-रम्य " असा हा सुदिन सुयोगाचा झालेला होय. तेथे समारंभाने असणे हे एक बाळलेणेच लेवविले गेलेले आत्मसुख असून, तेंच वरचेवर आपल्या अवस्थेस पाहो असेच जेणेकरून होईल, व तेच स्मरणरूपी करून, ह्या बुद्धीस थाटाची करावी व हे जे नामाचे बाळलेणे तेंच वरचेवर आपलेसे व्हावें असाच ध्यास लावलेला ! हेंच लेणे लेवविलेले ! बुद्धीने घेतलेले जे रम्य स्थळ तेंच ह्या देहभवनास थाटाचे करते ज्ञानगम्य होणारीं जीं हीं मनपवनाचीं ग्वेळणीं, नामरहस्य, सुखसोय ह्यांसच ज्योतीरूपाने असणारे जे " आम्ही-तुम्ही " मनुष्यपण त्यानेच जसे कांहीं ओवाळिलेले ! हीं बाळलेणींच ह्या बुद्धीला दिलेली. तीं लेणीं म्हणजे अलंकार होत ! व ह्याच अलकाराचे चीज करून घेणे हेच योगभावाचे एक सहजसिद्धतेस येणे ! (६)

सतरावी जी जीवनकळा तिचे दुग्धच पाजण्याचे केले स्तन्य जे परम दीप्ततेचें तेंच तुम्हीं दिलेत, व अनुहताचा हल्लरु गाऊन समाधीबोधच दिला, तेथे आता तो बोधच मुळीं बुझविला गेला, समजविला गेला. समाधीबोधाने समजविणे केले, बुझविणे दिले व निदविणेच जसे त्या बोधामध्ये असे शांतपणाचे ते.

आत्मसुखच येथे अभ्यासास येत असलेले ते योग्यतेस येऊं देणें हेच महत्त्व असून, तेथे उत्साह हाच एक साहित्याचा भर असलेला. सहज परिणाम होणारे असे जे ज्ञानकळेचे आपल्या स्वतःप्रत येणे, बुद्धीने बोधच होणे, ह्या मनास प्रिय वाटणारे जे प्रेम – दृश्य – अक्षर हेच रमविले जाणे तेथे आकर्षण करणारे जे हृदय हे सहजसमाधीस आलेले सजीवन ह्या जीवदशेस उल्लंघन बोधातच स्थिर होणारे ! तेथे प्रेम हेंच समजस आलेले असे समाधींतच निजणारे निज हे त्या अनुहत ध्वनीस कल्लोळाचे करून शांततेस आणते तेथे हल्लरू हा मनबुद्धी इत्यादिना केलेला जो अनेकानीं झेपलेला कल्लोळ तो ह्या बुद्धीस बोधच देऊन, तेथे " नामसमाधीच " जशी दिलेली असे गायनच ! बुद्धीने उचललेला बोध हा " रामनामाचा " होऊन, तेथे नुसते श्रृंगाराचें बोलणे नव्हे तर प्रत्यक – प्रत्यक्ष – बोधच बोधास आला. हिंपुटीपण काढून टाकणारे हेच ' स्तन्य " असे नामधारण होय – सहजतेचे होय. हेच वरचेवर अभ्यासास यावे असाच योग योगास आलेला ! ज्ञानकळेचे दूध पाजून नामध्वनीने कल्लोळास येणे हेच नामसमाधीने बोधास आणिले गेले, व तेथेच स्थिर असणे हेच निजविणे होय तेथेच निववीसी कौतुके म्हणजे तेथेच स्थिर व शांत अशा रसाने स्थित असणे होय. ( निज – वन जसे का फुलांचे ताटवेच जणूं हा निद्रिस्त असलेला मनुष्य पाहात आहे. तेथे सर्व अंगच जागेपणाचे असे अवधाणच - वनदेवतेने घेतलेले एक निजाचे असेच महत्त्व : निज, निद, निदिध्यासच जसे सारस पक्ष्याचे जसे कांहीं एक उपमा-उपयोजनेचें रहस्य. " काडेसर "च जसा एक तेथील रहस्यास उचलील असे एक सर - सार एक कांडच जसे वाजते असे ह्या ध्वनीने घेतलेले ह्या नळीचे किंवा बंसरीचें वाजणेच - मुरलिकेचें एक मंजुळ असे अनेक वेधांचे प्रकरणे - प्रकारच – जसे !) (७)

अशा तऱ्हेने या साधकदशेसच जसे कांहीं माऊलीपण देऊन असणे - माऊलीचे करणेच असे जे वरील करणे - त्यामुळे तर हे वक्तृत्व हे नामाचे पिकणें हींच तुमचीं पाऊले होत : म्हणून तुमची जी मजवर साऊली आहे, कृपा आहे, ती केव्हांहि मी सोडणार नाहीं ! तुमच्या पाऊलाचें येणे हेच नामाचे

(सारस्वताचें) पिकणें असून मला तेथेंच करमतें! तेथेंच राहाणें मजला आवडतें! तेंच स्थळ मजला रम्य वाटतें : म्हणून तुमच्या पाऊलांची होणारी जी कृपादृष्टी ती मजला अत्यंत प्रिय अशी असल्यामुळे तेथील साऊली, हे गुरुकृपा माऊलिये, मी कधींहि सोडणार नाहीं – तेथील साऊली ही मी केव्हाहि सोडणार नाही.

म्हणून, आवो श्रीगुरुकृपादृष्टी, तुम्ही ह्या साधकाची माऊलीच होत. ही सर्व ब्रम्हविद्या तुमचिया येण्याने पिकते आणि म्हणून तुमची साऊली नच सोडावी असो माझी मनोदेवता मला सांगत आहे. एवढया कारणास्तव तुमची कृपाछत्ररूपी साऊली मी सोडणार नाहीं. (८)

अहो, सद्गुरूंच्या कृपादृष्टीमुळे तुमचें कारुण्य ज्याजवर होतें, प्रसन्नपणास येतें, तो सकळ विद्यांच्या सृष्टीमध्ये ब्रम्हदेवच एक जसा असा होऊन जातो शुद्ध जीवदशेचें अल्पज्ञान आणि परमात्मदशेचें अपरोक्षत्व हीं दोन्हीं सोडून अखंड एकरस आत्मत्वाची जाणीव असणें हा 'तत्त्वमसि'चा अर्थ होय.

ही कृपादृष्टि, हा सद्गुरुकृपा हीच कोणी एक करुणरसाची वृष्टि झालेली व त्या करुणरसाचा परिणाम झालेला अशा रसाचा ज्यास प्रसाद पावलेला होतो तेथें सर्व विद्या ह्याच जन्म घेणाऱ्या अशा होतात. सर्व विद्यांना जन्म देणारी अशी ती गुरुकृपादृष्टी असून तो एक विद्येचा जनिताच होऊन जातो - तो जनकच होतो जसे अनेक जन्मांचा संस्कार घेऊन ब्रम्हकर्म केलेले तें जसे एक ब्रम्हदेवाचें असे म्हटले जातें, (ब्रम्हाच तो), तसे ह्या गुरुकृपादृष्टीनें जें पिकविलें जाणें ह्या विद्येचें ते म्हणजे नामरहस्य नाममाहात्म्यच घेऊन आलेलें असे सकलविद्याकुशल असणारें कौशल्यच असे श्रीसद्गुरूचें देणें हे करुणारसच ओतलेलें असें मूर्तिमत श्रीगुरुच!! (९)

म्हणून अहो अंबे, अहो श्रीमते, आपल्या म्हणविल्ल्यांना जशी ती स्वर्गांतील कल्पलता असेच आपण होऊन आहात : आणि म्हणून म्हणतो की, मजला ग्रंथनिरूपण करण्यास आज्ञा करावी – आज्ञापी होई गा, अहो, असे. म्हणोनि हे अंबे, हे श्रीमते, आपल्या स्वभावाचें जे नित्यत्व जननत्व हेच तुमचें कल्पतरूप्रमाणेंच देणें असून, तेथें मजला समरसणे व्हावे अशी आज्ञा व्हावी! ग्रंथ निरोपणे करावें असा आपला मनोरथ हा मजला आज्ञा करो की या ग्रंथाचें यथास्थिततेने वर्णन करावे!! (१०)

**नवरसें भरवी सागर । करवी उपनिषदांचें आगर ।**
**भावार्थाचे गिरिवर । निफजवी माये ॥ ११ ॥**
**साहित्यसोनियाच्या खाणी । उघडवी देसीचिया आक्षोणी ।**
**विवेकवल्लीची लावणी । होऊं दे सैंघ ॥ १२ ॥**
**संवादफळनिधानें । प्रमेयाचीं उद्यानें ।**
**लावी म्हणे गहनें । निरंतर ॥ १३ ॥**
**पाषांडाचें दरकुटें । मोडी वाग्वादाचीं आव्हांटें ।**
**कुतर्काचीं दुष्टें । सावजें फेडी ॥ १४ ॥**
**श्रीकृष्णगुणीं मातें । सर्वत्र करी सरतें ।**
**राणिवे बैसवी श्रोते । श्रवणाचिये ॥ १५ ॥**
**मऱ्हाठियेचे नगरीं । ब्रम्हविद्येचा सुकाळ करी ।**
**घेणें देणें सुखचिवरी । हो देई जगा ॥ १६ ॥**
**तूं आपुलेनि स्नेहपल्लवें । मातें पांघुरविशील सदैवें ।**
**तरी आतांचि हें आघवें । निर्मीन माये ॥ १७ ॥**

**इयें विनवणियेसाठीं । अवलोकिलें श्रीगुरुकृपादृष्टी ।**
**म्हणे गीतार्थेंसी उठीं । न बोलें बहु ॥ १८ ॥**
**तेथ जी जी महाप्रसादु । म्हणोनि साविया जाला स्वानंदु ।**
**आतां निरोपीन प्रबंधु । अवधान दीजे ॥ १९ ॥**

(११) नवरस = स्वेद, कंप, इ. जे किंवा शांत, अद्भूत, इ. जे रस ते. सागर = साहित्यसागर. उपनिषदाचें - उचित रत्नाचें = उत्तम रत्नाचें आगर - आकर = स्थान, समूह, खाण, श्रेष्ठत्व, समुदाय. भावार्थ = तत्त्व, सार भावार्थाचे गिरिवर = श्रेष्ठपणानें भाव हे अर्थास येऊन, किंवा अर्थ हे भावास येऊन भारास आले. तेथें ती वाणीच - सरस्वती - कीर्तीची झाली माये = अगे, वा : ईश्वराची अघटित घटना करण्याची जी शक्ति, प्रभाव का कौशल्य (१२) साहित्य = काव्यालकाररूपी सोनियाच्या - सोनियाचिया = सुवर्णाच्या उघडवी = उघडया कर. देसीचिया - देशियेचिया = देशी भाषेच्या. आक्षोणीं - क्षोणी = जमिनीत, देशीच्या मराठीभाषारूप भूमीत विवेकवल्ली = आत्मानात्मविचार लावणी = लागवड. होऊं दे - होऊ देईं = (पेरणी) होऊं देत. सैंघ = जिकडेतिकडे,सर्वत्र, दाटपणानें, पुष्कळ. (१३) संवादफळनिधानें = संवाद किंवा संभाषणरूपी फळांचा ठेवा प्रमेयाचीं = सिद्धांताची (१४) पाषाडाचें - पाखाडाचें = नास्तिकवादाचें दरकुटें = गुहा, दरडी, दडण्याच्या जागा वाग्वाद = वितंडवाद आव्हाटे = आडवाटा दुष्टें - दुष्टें सावजें फेडी = क्रूर श्वापदें पळवून लाव, नाहीशी कर (१५) करी सरतें-करो वा सरतें = मला परिपूर्ण कर, श्रेष्ठपणास पोहोचीव, सर्वमान्य कर गणिवे बैसवी = अधिकारपदावर, योग्यतेवर विराजणारें कर श्रोते श्रोतयांतें (१६) मऱ्हाठियेचें-ये मऱ्हाठियेचिय = देशी भाषेच्या ब्रह्मविद्येचा सुकाळ करी = ब्रह्मविद्या स्वस्त कर, ब्रह्मज्ञानाची वाढी कर, ब्रह्मज्ञान सवंग कर. सुखचिवरी - सुखाचिवरी = सुखानेंच केवळ घेणें देणें सुखचिवरी = ब्रह्मानंदाच्या सुखाकरिता, ब्रह्मानंद होईपर्यंत, ब्रह्मविद्येचीं घेणींदेणीं, देवघेव, होऊ दे, चालूं दे (१७) स्नेहपल्लवें = कृपारूपी पदरानें, कृपादृष्टीरूप पदरानें निर्मीन-निर्मीन = उत्पन्न करीन, रचनेस आणीन, प्रमाणभूत करीन. (१८) साठीं = बरोबर विनवणियेसाठीं-विनवणीचेसाठीं = विनंति ऐकल्याबरोबर. अवलोकिलें = पाहिलें. श्रीगुरुकृपादृष्टी = श्रीगुरूनी आपल्या कृपादृष्टीनें उठी = भगवद्गीतेची मराठी टीका सांगण्यास सुरुवात कर. (१९) तेथ - तेथें महाप्रसादु = महा प्रसादरूपी कृपेचा वर्षाव झाला साविया = तात्काळ, सहजतेनेच स्वानंदु = आनंद. निरोपीन प्रबंधु = पूर्वापार रचनेसहित ग्रंथ रचनेस आणतो, सांगतो.

नवरसांचे सागर भरून येऊं देत. उचित रत्नदीप्ति ज्या त्याचे आगरच येथें करावेत, व भावार्थाचे डोंगरचे डोंगर येथे उत्पन्न करावेतच करावे

अशी आपली आज्ञा होणें म्हणजेच तेथें रसभार हा नवरसांनाहि उल्लंघून जाईल-नवरस हे उचंबळून येवोत! तेथें सागराचें अगाधत्व! इतके अगाधपण खोलीचें असें होवो! उपनिषदर्थाचें ज कौशल्य हे गूढच करून असो! मजमध्ये उपनिषदाचें जे कलाकुशल असणें हे गूढच पाहो! ह्या भावबुद्धीचे आपल्या अर्थानें विलसणें हे महोत्सवाचें होवो! महत प्रेमाचें होवो! भावार्थाचें डोंगरच्या डोंगर हे आपलेपणास अलंकृत करोत! भावार्थ हा अनेकत्वभेद करून आपल्या भावास येवो! हे माये! गुरुमाऊलिये! सद्गुरुमाये! "अध्यात्म" आत्माध्याय जसा काहीं वाचला जाणारा-असें जें ते पोथीचें वाचन तें त्या मनाचें पढियंतें असें-जीव कीं प्राण होऊन असणारें-तेथेंच मन रमूं लागून विद्या ही विद्यमानाची सर्वकाळ अशी होऊन असो! तेथ जग हे आनंदभरित होतसाते डुलूं लागेल तेथील रस हा इतर अनेक रसांना उल्लघून गेल्यामुळे जें हे प्रेमरसमूळ तेंच सापडल्यामुळें, ह्या मनुष्यदेहाचें चीजच-

चोजच-झाल्यासारखे कृतकृत्य वाटणारें असे जे आनंदाचे होणें तें जगास आनंद देईल ह्याच आनंदाकरितां जे ह्या जगाचें सारखे धडपडणे-तें दुसरीकडे कोठेहि न सापडणारें असे-तें आतां आपलेपणास आल्यानें, ह्या अशा कल्याणाचें होणें ह्याची जग हें पायधरणी करीत असणारें-तें आतां पदरांत पडण्याची आशा लागल्यामुळे-आनंदित होईल!! हे माये! माऊलिये! तुझी कृपा ही स्नेहाची होवो! तेथें स्नेहाचा पदरच सापडल्यामुळे व तो ह्या स्नेहांकितांना पांघुरविण्याचा करशील तर, हे माये, सदैवता ही सारस्वतास पाहूं लागेल. तेथे रसाना जागा मिळाल्यामुळें तेथे निर्माण होणारें जे नवीनपण हे नाविन्यच घेऊन तेथे निर्माणकळा ही आपले अपूर्वपण घेऊन येईल! पूर्वी कधींहि न ऐकिलेलें किंवा पाहिलेलें असें एका एका नव्या जगाचे निर्माण होणें हे रसदिव्य घेईल. आनंदाचा ओतप्रोत असा वाग्विलास हा सरस्वतीच जगी वोळंगिली सारखा हा अतिरम्यतेस येऊन जगास आनंदाचें करील. तो मोहभग्ति होऊन तेथें रसरम्यतेच्या विविधतेनें हे भावरहस्य आपल्या रसांच्या योग्यतेंत विलसत राहील असेंच साहित्य, हे माये, हे माऊलिये, हे सद्गुरुमाये, उत्पन्न करा! निफजवा! तेथें मन हें अति रममाण होऊन ह्या रसांना जो कांहीं प्रेमा ह्या उपनिषन्रूपी गाईच्या दोहण्यानें येणारा तो ह्या अर्थसिद्धतेच्या भावाचा होऊन तेथें मन हे रममाण होवो (११)

ह्या देशी भाषेच्या जमिनींत साहित्यरूपी सोन्याच्या खाणी उघडया ठेवा - उघडवा - भूमी - भूमिका उघडया करा व विवेकरूपी स्वर्गवल्लीची लावणी ही दाटपणानें होऊ द्यात. संस्कृत भाषेतील वाङ्मय मराठींत अवतरवा.

येथे साहित्य हेच सुवर्णमय असो व देशी भाषेच्या जमिनींत विवेकरूपी वेलींची लागण केलेली होवो! ह्या देशी भाषेच्या जमिनींत जशा कांहीं सोन्याच्या खाणीच सांपडल्या असे साहित्य पुरतेपणास येवो! तसेच विवेक हाच कोणी एक अमृतवल्ली हिची चोहोंबाजूंनीं लागवडच झालेली असें होवो! देशी भाषेच्या खाणी ह्या अलंकारमय होवोत व दाट अशी पेरणी ह्या विवेकाची होऊ देत! विवेक असा हा जागा असो! ह्या विकारानीं आपलेपणास चढ न घेतां ह्या विवेकास पाहून तेथे दाट - उद्भट - विचार योग्यतेस येवो! देशी भाषेच्या जमिनींत ह्या साहित्यरूपी सोन्याच्या खाणीच - अलंकारच जसे कांहीं - ते उघडीव! अलंकारच घडलेले असें विवेकाचे मधुरस्मितस्नेह रस! तेथें जागतेपण हे अमृतवल्लीच आलेली असें जें बोलणे तें सुहासरसाचें विवेक निखळ असे जेथे तेथे उगवो! जेथे तेथे देशी भाषेच्या जमिनींत हे लावणी केलेले साहित्य हे भरपूर होऊन ते एक खाणच सोनियाची उघडली असे होऊन, तेथें विवेकरूपी शांत स्नेह हाच उपक्रमांत असो! तसेंच ह्या साहित्यानें घडविलेले जे भाव ( देहदिवसाचे ) ते चोहोंबाजूंनीं हास्यविनोदरसाचे प्रसन्नपणाचे शांत असे मित्रभावाचे होवोत - प्रसन्नतेचे असोत विवेक हा जसा वृद्धाप्याला शोभा देत असलेला - तेथे विवेकाचे शांतस्नेहतत्त्व हेच बुद्धीचें एक महत् दिव्य असलेले असे स्थान - तेच स्थान जे विवेकाचें - ते ही बुद्धि घेऊन असो! विवेक हा मनास प्रसन्न करणारा असो! ह्या मनास आपल्या मोठेपणाच्या संपत्तीचे आश्रयस्थानच असे जें बोलणें ते विवेकास पाहो! तेथें विवेक हा जेव्हां तेव्हां जेथे तेथे उत्तमतेचा होऊन असो! हा विवेक हा एक तऱ्हेची अमृताची वल्लीच दाटपणे लावणी केलेली अशी ह्या बुद्धीनें स्वरस्यासघेतलेली असे होवो! (१२)

संवादफळाचीं भाडारें, कोठारे, खजिने व सिद्धांताचीं उद्यानें, अनुमानानें सिद्ध करावयाचीं जीं उद्यानें तीं लावा - गहन अशीं तीं निरंतर लावणीचीं होऊं द्यात. तेथे संवाद हा निधानच सांपडल्यासारखे असे फळच श्रीचरणीं समर्पण केलेले असे होवो. तेथे शिष्टाचार हा मनास प्रसन्नपण देणारें असें फुलझाडाचें फुलांनीं तरारलेले उद्यानच असे असो! ह्या शिष्टाचाराचें गहनत्व - उभरून असणें - हें नैरंतर्य - सद्धर्मचारुता - पाहो! तें वडीलपणानें उपचारात्मक झालेलें असें असो! (१३)

पाषांडाच्या गुहा – दरकुटे – व वितंडवादाच्या आडवाटा मोडून टाका. कुतर्कांचीं दुष्ट श्वापदें पळवून लावा. तेथे पाषाणासारखे जे मनाचे स्तब्धत्व व तेथील दरडीमध्ये दडणें ते मोडून टाका! पाखंडाचे जसें कांहीं गुहेमध्ये दडणे ते मोडून टाका! हे कृपादृष्टे! असे जे हे – पाखंडपणाचें येणारे जे – तोंड वाजविणारे जे – आकाशगुहाचे असणे (आकाशात उमटलेलीं इकडचीं तिकडचीं अशीं गंधर्वनगरे) ते मोडून टाका! तेथे कुतर्क नको! वितंडवाद नको! व पाखंड हे तर नकोच नको! तेथे अज्ञानास भुललेलीं सावजे ( हिरवींगार अशीं चित्तरंजन लपविणारीं ) हीं ज्ञानदिवसास येवोत. श्रीकृष्ण परमात्म्याचे गुणच मीं वर्णन करावे अशा योग्यतेत मला बसवा तेथेच मजला पुरतेपणास येऊं द्यात!! राणिवसाच ( शोभा, योग्यता ) घेतला आहे असे जे घेणें देणे ते ह्या श्रवणसुखाचें जे रहस्य तेथील गोडीमध्ये श्रोतेजन हे बुडून जावोत तेथे हा जो अनुहात ध्वनिनाद हा प्रत्येक प्राणिमात्रामध्ये असलेला तो आता " मुखीं रामनाम " असा होऊं दे! जरी हे ध्वनीचे गाजणे व्यक्ती-व्यक्तीमध्ये असते, तरी दुसरीकडून ते उजविलें गेल्याशिवाय ते आपल्या नाममाहात्म्यास नच येणारे असल्याने, हे जे श्रवणसुख हे अभ्यासास येऊं दे! ते अभ्यस्त असे होऊं देत! म्हणजेच ते त्या अमृताच्या गोडीस येऊं लागेल! व श्रीकृष्णगुणाचे गाणे हे इतके मधुरतेचे होईल कीं त्यापुढे स्वर्गसुखाची तुच्छता वाटेल! ते गुणच नेहमीं वर्णन करीत असावे असाच छंद ह्या प्रकृतीने घेतला तर मोक्षसुखाचे आयतेपणच, बरोबरीच! संसार हा मोक्षच असा होऊन राहील

श्रीकृष्णगुण गाण्यामध्ये मला तरबेजतेने श्रेष्ठ असे करा. सर्वत्र ते पुरते होऊन यावे असे करा श्रोत्यांना महत्त्वच एक ते ह्या सगुणरसगोडीचें ते द्या श्रोत्याना श्रवणाच्या अधिकारपदावर बसवा

माझिये हृदयी बुंथी। ते डोळया सगुण प्रीती। वाचे नामसंपत्ती ऐसेंचि असो॥ म्हणोनि तुझे नाम आवडे हेंचि प्रेम न विसबे वर्म निजध्यास रया॥१॥ श्रवण नाम गोडी श्रवण नाम गोडी। हीच आवडी देईं मना॥२॥ ज्ञा गा॥

श्रीकृष्ण, हे श्रीगुरो! तुमची सगुण मूर्ति नित्य माझ्या अंतःकरणांत असावी त्या सगुण मूर्ती-विषयीं डोळयात प्रेम असावे वाणीमध्ये नामोच्चाराची संपत्ति असावी, अशी माझी फार इच्छा असल्यामुळे, मला तुमचे नाम फार आवडत व्हावे. याच नामाच्या प्रेमाने मनाला निदिध्यास लागून तुमचा कधींहि विसर होऊ नये – न होवो कानानींहि नेहमीं तुमच्या नामाचे श्रवण करण्याची गोडी धरावी अशी आवड माझ्या मनामध्ये उत्पन्न करा स्वकीय आत्मरूपाच्या निदिध्यासाने तुमच्या सगुण मूर्तीचा वास हृदयामध्ये नित्य असावा ( १४-१५ )

ह्या मराठी – देशी भाषेच्या – नगरामध्ये ब्रम्हविद्येचा सुकाळ करा इच्छा असेल त्यास सहज ती विद्या मिळावी अशी ती सवंग करा. ह्या जगाकडून केवळ सुखाची देवघेव होऊं द्या ह्या नामसुखाने देवच देवपणाचे झाले असें जे ह्या ब्रम्हविद्येचे घटितव्य ते आतां ह्या मराठी भाषेच्या रूपाने ब्रम्हविद्येसच पाहो! निव्वळ ब्रम्हच असे जे विद्येचे होणे ते विद्यमान असे होऊन असो! सर्व विद्यांचा राजा जी ब्रम्हविद्या ही ज्यास पाहिजे त्यास सहजपणे मिळणारी होवो व तेथे या विश्वानें येणेजाणे कां देणेघेणे हे विश्वांतच होत राहून परम सौजन्यसुख हेच तेथे उगवो – जगाकडून अभ्यासले जावो. (१६)

तुम्ही आपल्या स्नेहरूपी पदराने – दैविकी कृपारूपी पदरानें – मजवर पांघर घालाल, कृपारूपी पदर मला पांघरवाल, तर मी हे सर्व आतांच आतां निर्माण करतों, पाहा तर बरं! हे श्रीमाये, तूं आपल्या कृपादृष्टीचे अथवा स्नेहरूपी पदराचें मला सदैवतेचे पांघरूण जर घालशील – तुझे दर्शन हें सौष्ठवाप्रत येईल – तर मी सदैवाचा होईन व तुरंततेनेंच हे सर्व मी निर्माण करीन. (१७)

अशी ही विनवणी ऐकल्याबरोबर श्रीगुरूंनीं आपल्या कृपामृतदृष्टीनें मजला अवलोकिले व म्हणूं केलें कीं, आतां बहु नच बोलतां गीतार्थ सांगण्यास सुरुवात करावी. बहुत तें काय बोलण्याचें तें नको. आपल्या कामास लाग – बोलण्यामध्ये विनाकारण वेळ दवडूं नको. अशी ही विनवणी ऐकल्यामुळे श्रीगुरूंनीं कृपेची दृष्टी करून पाहिले व म्हणूं लागले कीं, आतां अधिक कांहीं एक स्तुतीचें न करतां ह्या मात्रार्थाप्रत यावें व हा जो बहुतेपणाचा संतस्तुतीचा आनंद हा आनंदांत रमूं लागो ! (१८)

तेथे आहो, अहो, महाप्रसादच एक वांटून आला, म्हणून तात्काळ असा, त्वरित असा, आनंदच एक झाला – तात्काळ आनंद उभरून आला. आतां गीताबंध हा प्रबंधरूपानें सांगतो तो ऐकण्यास अवधान द्यावें. अशा तऱ्हेनें श्रीगुरूचे येणे हे महाप्रसादाचे झालेले पाहून वक्त्यास बहु आनंद झाला. आतां त्या स्वानंदाचे आम्हांस ते वांटेकरी करतील जेथे ह्या गीताव्याख्यानाचे प्रबंध पाठ ऐकण्यास मिळतील – व ते आनंदाचें वर्षण प्राशन करण्याकरितां श्रोतेजन हे अवधान देऊन असतील. हे श्रोतेजन हो, आतां आपण अवधानाचे व्हा ! अवधान द्यावे ! (१९)

**तरी सकळवीराधिराज । जो सोमवंशीं विजयध्वज ।**
**तो बोलता जाला आत्मज । पांडुनृपाचा ॥ २० ॥**
**श्रीकृष्णातें म्हणे अवधारिलें । आपणचि विश्वरूप मज दाविलें ।**
**तें नवल म्हणोनि बिहालें । चित्त माझें ॥ २१ ॥**
**आणि इये कृष्णमूर्तीची सवे । यालागीं सोय धरिली जीवें ।**
**तंव नको म्हणोनि देवें । वारिलें मातें ॥ २२ ॥**
**तरी व्यक्त आणि अव्यक्त । हें तूंचि येक निभ्रांत ।**
**भक्तीं पाविजे व्यक्त । अव्यक्त योगें ॥ २३ ॥**
**यया दोन्ही जी वाटा । तूंतें पावावया श्रीवैकुंठा ।**
**व्यक्ताव्यक्त दारवंटा । रिघेजे जेथें ॥ २४ ॥**
**पैं जे वानी श्यातुका । तेचि वेगळिया वाला येका ।**
**म्हणोनि एकदेशी या व्यापका । सरिसा पाडु ॥ २५ ॥**
**अमृताचे सागरीं । जे लाभे सामर्थ्याची थोरी ।**
**तेचि दे अमृतलहरी । चुळीं घेतलिया ॥ २६ ॥**
**हे कीर माझ्या चित्तीं । प्रतिती आथी जी निरुती ।**
**परी पुसणें योगपती । तें याचिलागीं ॥ २७ ॥**

(२०) सकळवीराधिराज = सर्व वीरांमध्ये श्रेष्ठ. सोमवंशीं विजयध्वज = सोमवंशाचा जयशाली कुलदीपक (२१) श्रीकृष्णाते म्हणे – मग म्हणे कृष्णातें. अवधारिलें = निश्चयानें समजले, ऐकले. या ईशदर्शनाविषयीं बुद्धीस एका निश्चयास आणणें ते मीं जाणले. नवल = नवें, अद्भुत. बिहाले = भ्यालें. (२२) सवे = चाल, संवय, बरोबरीनें असणे. सोय = मार्ग, व्यवस्था. नको = सोय धरूं नको. वारिलें = निवारिले, निवारण केले, निषेध केला. (२३) व्यक्त = साकार, सगुण. अव्यक्त = निराकार, निर्गुण. निभ्रांत = निःसंशय, निःशंकपणें. भक्तीं पाविजे व्यक्त = भक्तीने सगुणप्राप्ति. अव्यक्त योगें = योगानें, हठानें निर्गुणप्राप्ति. (२४) वाटा = रस्ते, मार्ग, शोध, मार्गशीर्ष. व्यक्ताव्यक्त – व्यक्ताव्यक्ताचा = साकार निराकारतेचा. दारवंटा = दरवाजा, उंबरा, उबरठा. रिघिजे – रिगिजे = प्रवेश करावा लागतो, जावें लागतें, जाण्याचें होते. जेथें – जेथ·

(२५) वानी = कस, योग्यता. श्यातुका = (श्या=शंभर, तुक=वजन). जे वानी……… वाला येका = जो कस शंभर भाराला, शंभर वालांना, तोच कस त्यांतील वालभर सोन्यास, एका वालाच्या वजनास. वेगळिया – वेगळिये. एकदेशी या – एकदेशीया. सरिसा पाडु = एकसारखीच योग्यता, पिकलेंपण. एकदेशी व्यापका – आतां व्यापक कीं एकदेशी। ऊहापोही जे ऐसी। ते करावे ठेली आपैसी। दुजेनविण ॥ ६-७९ ॥ परिछिन्न का व्यापक तेथें ब्रह्म जे आहे तं सारख्याच योग्यतेचे असणार. (२६) अमृताचे – अमृताचिया. लहरी = लाट, तरंग, सामर्थ्याच्या थोरीचा तरंग. (२७) प्रतिती = अनुभव. निरुती = खरी. योगपति = योगीराज, योगाधिराज भगवान श्रीकृष्ण. ते याचिलागीं – तयाचिलागीं.

सकळ वीरांमध्ये श्रेष्ठ व सोमवंशाचा विजयध्वज म्हणजे कुलदीपक असा तो पांडुनृपाचा आत्मज आतां म्हणाला कीं, हे भगवान् श्रीगोपालकृष्णा, आपण मला जे विश्वरूप दाखविलें ते बहु नवलाचें असल्यामुळे मला भीति वाटली. माझे चित्त हे भीति घेऊनच बसले. अहो श्री देवा, आपण जे विश्वरूप मला दाखविले ते माझ्या लक्षात आलें – ते मीं अवधारिले, त्याचे अद्‌भुतपण पाहून माझे चित्त भ्यालें. म्हणून आपल्या ह्या चतुर्भुजरूपाची सोय द्यावी अशी मी विनंति केली. त्या विश्वरूपांतच सारखे असण्याची – ते महान् प्रखर असे रूप पाहून – मला भीति वाटली (२०, २१)

मजला तर ह्या कृष्णमूर्तीची म्हणजे सगुण मूर्तीची नेहमींची संवय असल्याने, तेथेच मी आपला जीव लावून आहे परंतु आपण, देवा, सगुण मूर्तीवर प्रेम ठेवूं नकोस म्हणून मजला निवारिले. माझ्या मनाला तिचाच आश्रय करावेसे वाटले तेव्हां तुम्ही म्हणाला कीं, सगुण मूर्तीवर प्रेम ठेवूं नकोस.

मूर्तिः—दगडाची मूर्ति. देहधारी प्राणी, संख्यावाचकानें दर्शविलेली, जसे पांच माणसे, पांच जण, पंचकडा – तसे येथे मूर्ति हा शब्द देहधारी किंवा दगडाची घडलेली मूर्ति होय देवताविशेषानाहि हा शब्द लावतात. देहद्वय समजल्याबरोबर मुक्त झालों म्हणशील, पण बाबा ही देहबुद्धि ही पाहातां पाहता तुजप्रत येऊन तुला गांठील. तेथे मग भूक असूनसुद्धा माझे पोट भरले असे म्हणण्यानें उपाशीच राहण्याची पाळी येणारी. अल्पसंतुष्टता ही संसारांत शोभते. परंतु परम अर्थ जो तेथें ती अभ्यासाचे दृष्टीने पाहिलें असतां पुरेशी पडत नाहीं. असे म्हटले आहे कीं, मोराचे एकच पीस जसे व त्यावरच स्वतःचें मयूरपण उभारणें ते शोभणारे नाहीं. म्हणून ध्यान, समाधि, इ संयमांनीं ज्ञानाची परिपक्वता प्राप्त करून घ्यावी म्हणजे बरे. अहो, ब्रम्हपदावर बसून, राजपदावर बसून, भिक्षा मागणे बरे असें कोणी म्हणेल कां? करितां, शमदमादि संपदा साधून मोक्षसपदा ही परिपूर्णतेने आपलीशी करावी – भोगावी – तेथे पदच एक तें जसें मोक्षश्रीनें शोभविले असें होते.

कारण बाकीच्या ज्या सूक्ष्मासूक्ष्म बाजू ह्या देहादेहांनीं उचलून धरलेल्या – त्याच उपयोगाच्या अंगानें उचलून धरलेल्या असल्यानें – तेथें वागणारे किंवा तेथें असणारें जे कांहीं नामव्यक्तित्व, सगुणप्रामाण्य हे नामधारक होऊनच झेपले जाणारे असत. विश्वरूपामध्ये सतत राहणें हें केव्हांहि ( जर तेथे सगुण नामधारण नाहीं ) भीतिप्रदच असते, कारण तेथील प्रकृति ही सखिसंज्ञेनें व्यवस्थितपणाची न झालेली असल्यानें, अगोदर हें दर्शन, चतुर्भजत्व, नामधारण किंवा नामकरण, व तेथील व्यक्तिवादनानें स्थिर झालेलें असें जें भगवदनुग्रहाने नित्य दर्शन, त्यानें असणे तेच बरें ! व तेंच शांत स्वरूप असून, तेथेच ह्या अर्जुनास हलके हलके स्थिर करण्याचें केलें तर बरें असेंच भगवान गोपालकृष्णांनीं समजून त्यास ह्या चतुर्भुजरूपाची नामदीक्षा देऊन त्यांत स्थिर केलें. ह्या दीक्षेशिवाय ती लिंगदेह भग्न करणारी वैदेहिक अवस्था ही एकदमच कशी बरें स्थिर होणारी ? तेथे त्याचा ( स्वदेहाचा – अर्जुनाचा ) निभाव लागणें मुष्किलीचें होऊन, त्यास जें कांहीं उमजणें – उपदेशानें गुणव्याप्ति, निष्ठा-

महति, श्रद्धाख्याति, भक्तिमहिमा, क्षेत्रप्रतिष्ठा, इत्यादिचें जे दर्शन – ते झालेच पाहिजे, तेथे त्यास संथ हे केलेच पाहिजे. म्हणून त्यानीं त्याचे ठिकाणीं एकदमच लिंगदेहाचें भग्न करणारे जे विश्वरूपदर्शन ते सौम्यतेस आणून, चतुर्भुजत्वामध्येच म्हणजे नामधारकाचे महत्त्वात त्यास स्थिर केले. त्या श्रीकृष्ण-मूर्तीची म्हणजेच कर्म निष्कर्म किंवा सकर्म शुद्धतेचें केलेले असावे एवढीच तेथे सोय केलेली व जीवदशा ही पण तेथेच रमणारी, परंतु एवढयाने हे जीवित कसे असते व त्याची व्याप्ति केवढी व कशी हे सार्थततेने जाणले जात नाहीं, म्हणून त्यानीं तेवढयाच मोजक्या ब्रम्हाचे त्यास न करतां, तेथेच त्यास न ठेवून, त्यास महत् अशा ब्रम्हाची जी व्याप्ति तिच्या ठिकाणीं स्थिर करावेच असे समजून, त्यास त्यांनीं पुढे उपदेशाचे प्रवचनास आणण्याचे केले तेवढयातच राहाणे नको, तर हे जे क्षेत्र – तेथील महति – ही इत्थंभूततेने जाणली जावी म्हणून त्यास तेवढया मोजक्या ब्रम्हाने विश्वरूपातच स्थिर केले. तेथे लागणारे जे अनेक बुद्धिप्रसंग ते अज्ञानतेस पाहूं लागल्याने, ह्या लिंगदेहाचे जे प्रतिष्ठापन हे देवतेच्या दिव्य देवपणाने घडविले गेले तरच बरे असे समजून, त्यानीं त्यास आतां पुढील बुद्धि चित्त शुद्धीचे प्रामाण्य हेच कसे अनेकत्वानें एकत्वास आणले जाते ते सांगण्यास सुरवात केली येथे संवाद हा प्रश्नोत्तर रूपाने असलेला : तेथे त्या अर्जुनाची प्रश्न करण्याची हातोटी व श्रीकृष्णाची ते प्रश्न उत्तरांनी सोडविण्याची कुशलता ही अतिविनोदाची असून, ते जसे कांही देवपणच दोन ठिकाणी वांटले गेलेले असे एकत्वच ! कारण तेथे गुणाचे जे भाजन ते हा केलेला किंवा नच केलेला असा निर्गुणाचा जर झाला, तर ते केव्हांहि बरेच नव्हे असे होणार ! म्हणन मौन, चित्तस्थैर्य, एकांत, आत्मभाव इत्यादिनीं जसे ते कांहीं निर्गुण ब्रम्हच सगुणतेने झेपले जाणारे असे करण्याचे करावे म्हणून पुढेहि त्याच्या प्रश्नाचीं उत्तरे देण्यास व त्यास परोपरीने समजाविण्याचे करून ह्या बुद्धि-व्याप्तीची चित्तशुद्धिच आपलीशी करून घेतली (२२)

सगुण-निर्गुण हीं दोन्ही तुमचींच रूपे आहेत ना ? मग व्यक्त आणि अव्यक्त किंवा सगुण व निर्गुण, हीं दोन्हींहि निम्रातपणे पाहाता तुम्हींच तीं (स्वरूपे) होत. भक्तीने व्यक्त (सगुण) हे पावणारे होत, व निर्गुण जे ते – अव्यक्त जे ते – योगाने साध्य होते योगाने – हठ योगाने – निर्गुण प्राप्त होते.

अव्यक्त – व्यापक : व्यक्त – स्पष्ट. “ अव्यक्तं व्यक्तिमापन्नं मन्यन्ते मामबुद्धयः । परं भावमजानन्तो ममाव्ययमनुत्तमम् ॥ ” गी. ७-२४॥ माझा अव्यय असा अनुत्तम भाव न जाणता, अव्यक्त जे परमेश्वराचे रूप ते व्यक्तीस आले असे जे अबुद्ध म्हणजे (जागे) शहाणे नाहीत ते म्हणतात म्हणून अव्यक्त जे – जशी का छायाच ती त्या आत्मस्वरूपाची तीच जशी गाढतेची, ती व्यक्तीस आली, मूर्तीची झाली, नांवानें नामव्यक्तीची झाली का नांवास आली, असे म्हणणे ते ह्या देहाच्या संसारास पुरतें होत नाहीं : म्हणून त्या तसल्या रूपाकरितां का मूर्तीकरिता, कां नावावरच आपली सोय ठेविली असें करूं नको यालागीं सुभद्रापति । हे भाव माझिया विभूति । आणि यांचिया व्याप्ति । व्यापले जग ॥ १०-१०५ ॥ मी माझिया विभूति । विभूति अधिष्ठिलिया व्यक्ति हे अवघे योगप्रतीति । एकचि मानूनि असे ॥ १०-१०८ ॥ म्हणोनि निःशंक महायोगें । मज मीनले मनाचेनि अंगें । येथे संशय करणे न लगे । तोचि शुद्ध जाला ॥ १०-१०९ ॥ हा भाव (माझ्या विभूति व विभूति अधीष्ठिलिया व्यक्ति ) व्यक्तीस आलेला योगप्रतीतीने एकच होय. म्हणून येथे महायोगावर आरूढ होऊन, मनाच्या अंगाने मजप्रत मिळून जाणें होतें. सर्व जे आहे तेथील प्रभाव मीच होय. मजपासून सर्व प्रवृत्ति प्रवर्तूं लागते असे जाणून शहाणे लोक मजला भावसमन्वित असेच भजतात. (गीता १०-८)

त्यावर त्या अर्जुनाचे म्हणणे कीं, हे भगवन्, व्यक्त व अव्यक्त ही दोन्हीहि तुम्हीच आहांत भक्तीमुळे व्यक्तता येते, स्पष्टपणाचें होतें, स्पष्ट मनुष्यजन्माचे रहस्यच : तेथे प्रेमच काय ते एकटे

ह्या भक्तिबीजास पाहाणारें असें असते : ते निर्विकार असें असून तें स्पष्ट अशा नामरूपदर्शनाचें होय, तेथे नाम हे स्थिर असें असलेलें होय ! आतां अव्यक्त जें आहे तें व्यापकत्वाचे असून, जेवढी म्हणून व्यापकता किंवा अवकाशास आकळून आपल्या व्यापकतेचे करणे ते योगानें केले जाते – येथें अव्यक्त ह्या शब्दाचें जसे काहीं योजन असेल, त्या प्रमाणानें त्याचा अर्थ हा बदलत राहणारा असल्याने, त्यास एवढ्या तेवढ्या शब्दांनी सांगण्यांत घेता येत नाहीं अव्यक्त म्हणजे न दिसणारे असे, मूर्तत्वाचे नसलेले असे, म्हणून त्यास व्यक्तत्वानें आकळिले असता ते महत व्यापकतेचे होऊं शकणारे, होणारे असे होते, व तेथें तो जो व्यक्तपणा हा अव्यक्तानेच उचलिला जाऊन, तेथें व्यक्त म्हणजे कांहीं तरी निरुपयोगाचे असे असलेलें होते म्हणून हे जे व्यक्ताव्यक्त हे अभ्यासास घेतले, तरच त्यांचे महत्त्व कसे आहे ते उमजूं लागणारें होते. (२३)

हे वैकुंठपति, या दोन्ही वाटा तुमचीच प्राप्ति करून देतात. तुम्हांसच पोहोचण्याकरितां आहेत. म्हणून किंवा अर्थात, या दोहोंची योग्यता सारखीच आहे. व्यक्त (सगुण) का अव्यक्त (निर्गुण) हे उंबरे होत, हे उंबरे ओलाडून जाऊन मला मिळावें, मला पाहावें, मला भेटावें असे आपले म्हणणे आहे ह्याच दोन वाटा, हे श्रीवैकुंठपीठा, तुजला पोहोचण्याचे मार्ग असून व्यक्त व अव्यक्त या दोन उबऱ्याना कसे वापरावें – ओलाडावें – तेथें आत जाणे किंवा बाहेर येणे हे कसे करावे हच जाणण्याचे असून ते जर साधेल तर, हे भगवन, आम्ही आपला रिघाव आपले स्वरूपाचे ठिकाणीं स्थिर करूं शकूं असेच आपले म्हणणे आहे. हे भगवन आपण महत् व्यापकतेनें असणारे – तेथें आम्ही व्यक्त अशा आधारानें गेलो असता आपली महत व्यापकता ही पण जाणूं शकतो तेथें व्यक्त असणारी – ही देह धारण करणारी – देहधारणेने असणारी – स्वरूपे हींच आपली सहजसिद्धतेप्रत आलेली शक्ति असून, तेथेंच जे काहीं अभ्यासणे ते करावे लागत असते व ह्या अशा सिद्ध स्वरूपामधूनच जाणें जेव्हां करावें, तेव्हाच तेथे त्या अव्यक्ततेनें असणारे जे पदार्थ ते या आत्मबळाचे तेव्हाच होतता, जेव्हा ते ह्या व्यक्तदर्शनानें उपयोगास घेतले जातात म्हणून एकदेशी म्हणजे एका देहामध्ये असणारे जे तत्त्व ते उपयोगास घेतले व त्यास कस लाविला, तर ते नामसूत्रानें असणारे महत् व्यापकतेचे जे नामसूत्र तेथेंच असते. ह्या नामसूत्रानें झेपले जाणारे जे दर्शन ते ह्या व्यक्त असणाऱ्यानेच झेपले जाणारे असून, ते ह्या महत व्यापकापेक्षाहि जास्त सिद्धतेचे असे असते. (२४)

जसे का जी कांहीं योग्यता सोन्याच्या एका वालास किंवा एक वालभर सोन्यास, तीच सोन्याच्या मोठ्या लगडीसहि म्हणून एकदेशी का व्यापक या दोहींना सारखीच योग्यता होय गटांतील शंभर भाराला जो कस व जे तुक म्हणजे वजन, तोच कस व तेच वजन एक वालभर सोन्यासहि. तेथें योग्यता दोहींनाहि सारखीच

जसें सोने हे सर्व सोनेच. ते आपला गुण म्हणजे कांति, कनकत्व व कठिणता ह्यांमध्येच स्थिर असलेले व हा जो सर्वसाधारण त्याचा गुण तो त्या लगडीमधील एका वालभरास लाविला तर तो काय निराळे गुण प्रदर्शनास आणील ? नाही, तर तेच गुण दर्शवील परंतु ह्या वालभराचे जे काहीं महत्त्वाचे होणे ते जास्त उपयोगीं असे होते – कारण ते योजनेस आणले गेले. आता जे नुसतेच पडून राहिले आहे ते आहेच आहे, परंतु जे उपयोगास आणिले गेले तेच महत्त्वाचे असे मानले जाणारे होय. आतां हे जे " एका वालाचे " तुकणे हे जसे मोठ्या लगडीच्या बरोबरीनें साम्य अशा कसाचे ठरते तसेच ह्या एका देहामध्ये असणारे जे चिदाकाश ते महदाकाशाचे व्यापकत्वानें तोलले असतां सारखेच असते. एकदेशी म्हणजे एका देहामध्ये असणारे जे व्यापकत्व ते अनेक देहांनीं केलेले जे व्यापकत्व त्यासारखेच असते ते महत् व्यापकतेने असलेले जरी, तरी त्या एका देहानें व्यापलेले जे आकाश तें बरोबरीचे अंशानेच असतें. तेथें सिद्धांत सिद्ध असे होऊन येतात. (२५)

अमृताच्या सागरामध्ये गेले असतां जी कांहीं समर्थतेची थोरी (बुडणें असें न घेतां मनःसामर्थ्यावर जें उभे होणें) तीच ही पण एक चूळभर अमृत घेतलें असतां अमृताची लहरी देणारी होते.

अमृताचा सागर हा समर्थतेनें अमतो जरी तरी, त्याची चुळी जेव्हां घेण्यास येईल – तेथील चुळी घेण्यास आली तरच – ती अमृताची होऊन तेथील समर्थतेचें प्रमाण जे अमृतत्व देणें ते असणारच! तेथील अमृतपणास बाध हा केव्हांहि नच येणारा! अमृत हें आपल्या अमृतत्वाचा लाभ हा देणारच! म्हणून ह्या विकाराना आकलन करण्याचें किंवा ह्या इंद्रियांचा विषयांशीं संबंध जो येतो तो ह्या नामसूत्रानेंच आपलासा केला असेल, तरच ते आज्ञावशतेचे होऊन, तेथे धाक हा वासनांचें निपटून जाणें करतो व हा देह हाच मुळीं सुस्थित अशा शांतपणाचा होऊन, तेथे सर्व विश्रांति ही सगुणधारणेचें जे ऐश्वर्य – धर्मधारणारूपी – निःश्वसन, शब्दसामर्थ्य हें नामानेंच उचलिलें होऊन, तेथें जी एक न्यायसनाथता ही पुरतेपणास येते. म्हणून जो कांहीं हा "जाणण्याचा जेथे अंतच लागत नाहीं" असा सागर हा एका ह्या नामसूत्रानेंच "शितावरून भाताची परीक्षा" सारखें आपल्या योग्यतेनें असतो. (२६)

ही गोष्ट माझ्या मनामध्ये आली. परंतु प्रतिती एकदेशीय अशी स्पष्ट म्हणून किंवा एवढ्याच-करितां मी ते आपणांस, हे योगपति, विचारण्याचें करीत आहे. हे कितीहि बोलिले तरी ते आपलेपणास येण्याकरितां बोलणें हेच अनेक सहस्राच्या बुद्धिसाहजाचें झाल्यामुळे ते तेथेच लिगटून ठेविले, तर हे नाम हें – जर जिव्हाच शांत होईना किंवा हें तोंड उघडणें हेच जर बंद होईना तर – कुठे भेटेल बरे? असेच ह्या प्रकृतीचें अंगभूत असलेलें तत्त्व वरचेवर प्रश्न करून नेहमीं मार्गप्रतीक्षाच! म्हणून ही प्रतिती आलेली जी तीच आपल्या योग्य अशा सुस्थितीची व स्थिर अशी केव्हां व कशानें होईल तेंच, हे योगपति श्रीकृष्णा, तुम्हांस विचारावें असें माझ्या मनात आहे. (२७)

**एवं सततयुक्ता ये भक्तास्त्वां पर्युपासते।**
**ये चाप्यक्षरमव्यक्तं तेषां के योगवित्तमाः॥ १॥**

सततयुक्ताः = नित्य, निरंतर ब्रह्मयुक्त, योगयुक्त विश्वरूपदर्शनानें सतत त्यांना योगयुक्त असे पद मिळालेले – जेथें नामयोग हा सततचा असा. पर्युपासते = उपासनेची परी; फिरफिरून तेच उपासनेस घेतात, सेवेचें करतात. अक्षरम् अव्यक्तम् = अव्यक्त असें जे अक्षर, बोटानें दाखविता न येणारे असे नामनिर्देशरहित. तेषाम् = भक्त व योगी यांमध्ये. योगवित्तमाः = योग जाणणाऱ्यांमध्ये श्रेष्ठ असे.

एवम् सततयुक्ताः ये भक्ताः त्वाम् पर्युपासते, अपि च ये अव्यक्तम् अक्षरम् (पर्युपासते) तेषाम् योगवित्तमाः के।

याप्रमाणे निरंतर भजनध्यानांत रत होऊन, निरतर योगयुक्त होऊन, जे भक्त तुमचें – सगुणब्रह्माचे – भजन करितात, आणि जे अव्यक्त अक्षराची – निर्गुण ब्रह्माची – उपासना करितात, यामध्यें अति उत्तम असे योगवेत्ते कोणते?

**जे देवा तुम्हीं नावेक। अंगिकारिलें व्यापक।**
**तें सांचचि कीं कौतुक। जाणावया॥ २८॥**
**तरी तुजलागीं कर्म। तूंचि जयांचें परम।**
**भक्तीसी मनोधर्म। विकून घातले॥ २९॥**

**इत्यादि सर्वापरी । जे भक्त तूतें श्रीहरी ।**
**बांधोनियां जिव्हारीं । उपासिती ॥ ३० ॥**
**आणि जें प्रणवापैलीकडे । वैखरियेसी जें कानडें ।**
**काईसयाहि सांगडें । नव्हे जे वस्तु ॥ ३१ ॥**
**तें अक्षर जी अव्यक्त । निर्दोष देशरहित ।**
**सोहंभावें उपासित । ज्ञानिये जे ॥ ३२ ॥**
**तयां आणि जी भक्तां । या येरयेरांमाजीं श्रीअनंता ।**
**कवणें योगु तत्त्वतां । जाणितला सांग ॥ ३३ ॥**
**यया किरीटीचिया बोला । तो जगद्बंधु संतोषला ।**
**म्हणे होय प्रश्न भला । जाणसी करूं ॥ ३४ ॥**

(२८) नावेक = क्षणभर. व्यापक = विश्वरूप, विराट. कौतुक = केवळ लीलाच एक, चमत्कारच एक, जाणण्याचे नुसते एक कौतुकच असे. (२९) तुजलागीं कर्म = वडीलपणाचा आधार घेऊन केलेले कर्म. तूंच जयांचें परम = मनोधर्माचें परम दिव्य घेऊन असलेले तुम्ही, जेथे भवितच एक, आवडच एक, सर्वस्वच एक व त्या सर्वस्वास ते मनोधर्म विकले गेले. ते कर्म आचरण्याचे योग्यतेस आणले विकूनि घातले – विकोनि घातला (३०) सर्वोपरी-सर्वीपरी-सर्वापरी = सर्वतोपरीने. जिव्हारीं = अंतःकरणांत, अंतरामध्ये, हृदयाचे ठायीं. (३१) कानडें = अवघड, अपरिचित. काईसयाहि सांगडें = भक्तीची व नामाची सांगड जशी, तशी तेथे त्या वस्तूस कशाचीहि जोडी नसलेली. सांगडें = सारखे, बरोबरीचें (३२) अक्षर = नाशरहित वस्तु. जी = अहो. निर्दोष देशरहित–निर्दोष दोषरहित–निर्देश देशरहित = देश वा प्रांत अथवा दोषरहित असे, नाव कां ठिकाण सांगताच येत नाहीं असे, नामस्थलविरहित. सोहंभावें = मी परमात्मा या भावाने. (३३) भक्त = सगुण उपासक. कवणें ······ जाणितला = कोणीं खरोखर तो योग जाणला ? सांग – सांगा. (३४) जगद्बंधु = श्रीकृष्ण, जगन्मित्र, जगदात्मा. होय–हो–प्रश्न भला जाणसी करूं = तुझे प्रश्न करणे बरोबर आहे.

जे कांहीं तुम्ही, अहो देवा, सहज व्यापकपण अंगिकारलेलें ते खरेपणाचे असेच, कां तेथील कौतुकच एक जाणावे, का कौतुकाचे ते व्हावे, असेच घेऊन आहांत ? क्षणभर धरिलेल्या व्यापक अशा विश्वस्वरूपाची कां विश्वरूपाची जी विशेष शिफारस केली, ती खरोखर मनापासून केली कां उगीच गंमत म्हणून, कां उगीच कौतुकाचे कसे ते पाहावे म्हणून ?

" व्यापक " तें साचचि कि कौतुक । जाणावया ॥

आकाशासारखे, गगनाप्रमाणें व्यापक जे आपण स्वरूप दाखविले ते – एकदेशीय जसें वालभर सोनें, किंवा जीवदशेचें जे वालभ – प्रेम, व लगडीचें जे बहुत असें व्यापक – तेथे सारखी योग्यता ही ज्यामुळे स्पष्ट होते, ते म्हणजे ब्रम्हावरच एका विवर्तरूपाने होणारे ते ब्रम्ह अधिष्ठान हे व्यवित-मात्राच्या ठायींचें व एका ब्रम्हसाक्षात्कार झालेल्या योग्याचें ते सारख्या योग्यतेचें म्हणतां येईल काय ? परंतु जीवपणे जीवाचा प्राण होऊन आहे – तेथें सर्व जीव हे आपापल्या अधिष्ठानावर जरी उभे, तरी ते पर म्हणजे श्रेष्ठ अशा ह्या मूळ ब्रम्हाच्या स्थितीस आले – ब्रम्हाच्या प्रतिष्ठेचे झाले – त्याच्या अंगभूतच असूं शकतात. तेथे मनुष्यप्राण्याचा ह्या नरदेहास आल्याचा भाव हा प्रेमच ते एक, तेथे धर्मधारणा ही आस्तिक्यावर उभी झालेली असते. त्यास परमात्मा दूर नाहीं, किंबहुना तो तोच होऊन आहे. ह्या मनुष्यप्रेमावर उभी होण्यानें एक कर्मानुबंधिनी अशी ती सूत्रदोरी ह्या मनुष्यप्राण्यातच उठाव घेऊन त्या ब्रम्हश्रेष्ठ अशास सर्व भावानें आश्रयाचें असें करते. मनुष्यानें आपल्या कर्माकरितां

इतर योनींस जबाबदार धरिलें नाहीं : तो कर्मबंध त्या योनींस धरून फिरविला असे केव्हांहि नाहीं इतर योनी ह्या भोगयोनी होत व ही मनुष्ययोनी ही योगयोनी होय असेच येथें म्हणणें होते. कोणी जर इतर योनींवर टेकून आपल्या कर्मास बंध पाहूं देण्याचे करील, तर ते त्यास केव्हांहि उपयोगीं होणारें नव्हेच. येथें तें जे व्यापक ब्रम्ह ते ह्या नरदेहाच्या उचिततेस म्हणजे योग्यतेस आल्याने, देव-योग्यतेस आल्यानें, तेथें ती जी प्रकृति हीच मुळीं लय घेऊन तेथें अधिकारपदाचे असेच एक व्यापक स्वरूप ते ब्रम्हच जसे – स्वर्गामधील देवयोनीचें जे – ते भक्तीनें, कां प्रेमाने, का योगाने साध्य होणारे होते शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वरप्रणिधानादि क्रियानीं ह्या मनुष्यदेहाचे योगऐश्वरम् पाहाण्यास येणारे होते, पाहातेच जसे. पण येथे भक्तिच श्रेष्ठ होय कारण ती प्रेमावर उभी होणारी असल्याने येथे सहज व्यापकत्व – योगच जसा आपल्या साक्षाततेस आला – योगरूपच झाला असे होय

अव्यक्त-व्यापक : छाया-ऊर्मि : योग-हठ-अनल : परं भाव-विश्वः—अव्यक्त छाया जशी ती व्यक्तीस आली असे होत नाहीं व मग तेथे व्यापकत्वाचा आरोप करणे हेहि पण व्यर्थच होय : कारण देहबुद्धीने देहबुद्धि वळली व ती आता नाव देऊन व्यापकत्वाची झाली असे केव्हाहि नाही. अव्यक्त हे योगक्रियेने शौच-संतोष-तप-स्वाध्याय ईश्वरप्रणिधानादिनीं उपासिले जाते तेथे हितच एक या विश्वाचे–जगताचे–साधनाचे इच्छिलेले तें – तेथें या जीवदशेच्या देहरूपी साधनास ह्या योगावर – हठावर – उभे करून सर्व जगाचे प्रेमास हात घालणे हे होतच नाहीं तेथे सर्व जगास ह्या योगाने हित दिलें, त्यास प्रतिष्ठित केले, पण ते जग हे कांही ते कल्याण जाणणारे होतच नाहीं, जोपर्यंत तेथें प्रेमाचा साधा कां भक्तीचा वळसा – सांधा – जोडला जात नाहीं प्रेमाने, भक्तीने ह्या जीवदशेची – जीवचैतन्याची - आवड किंवा गोडी ही सापडणारी होते एरवीं ह्या योगाने जसे का त्या षडर्मी-बरोबरच हा देहच लढविला गेल्याने, तेथे फक्त ऊर्मि ती मात्र आवरिली जाईल. तेथें षड्रिपूंनीं जसे एक महत्त्वास येऊं केले, परंतु प्रेम हे मात्र जर तेथे येईना, स्थैर्य हे भक्तिबीजाने गृहाचे होईना, ह्या विश्वास सर्व प्रेमाचे केले असे जर होईना, तर तेथें परस्पर जिव्हाळा कां मैत्री ही कसची? म्हणून येथे ह्या जीवदेशेचे जे शिवस्वरूपाशीं ऐक्य – तेथें प्रेमपिंडच एक ह्या शिवाचा – तोच भजला गेला व मग तेथे सहजच ह्या जीवशिवाचे ऐक्याने ते प्रेम हे व्यक्तीस आले. भावसौंदर्याने विभूतीचे होऊन येण्याने तेथे सर्व योगप्रतीति ही स्पष्टपणे प्रतीतीची झाली असे होय

तेथें तो नीलबिंदु हाच योगदर्शनाचा झाला, पण ते जसे उदारपणाने जगामध्येच वाटून टाकले असे असल्यानें, तेथें जे – युगाचीं युगे गेलीं तरी ब्रम्हच ते असे – ते ह्या भक्तिबीजास जर जाणील, तरच मग ती प्रीति का मैत्री ही मित्रपणाची होय. एरव्ही, ते म्हणजे सर्वसाधारण असे एक योगांग होय त्यास निर्गुण ब्रम्ह असेहि म्हटले जाते तेथे शब्दाने जर ते पाहूं केले, तर ईश्वराचे सगुण हे तेथे हरविले जाते – म्हणून या शब्दाने, भावाने, उच्चाराने एक तेच आश्रावे म्हणजे बरे

करिता, हे देवा, तुम्ही हे जे बुद्धीचे व्यापकपण अंगीकारलेले आहे ते खरेच शांतपणास येण्या-करिता आहे, कां असल्या कौतुकातच नेहमीं असावें असल्याच वृत्ति – ज्या वृत्ति ह्या बुद्धीचे काढनच – हेच जाणण्याकरिता आहांत बरे! हे व्यापकत्व खरेखुरेपणाचे जर असेल, तर तेथील योगाचें जे आधि-पत्य हे सर्वथैव आपल्या हातचे जणूं असेच असले पाहिजे. करितां, हे योगनाथा श्रीकृष्णा, हे व्यापक पण मजला नामधारणेने समर्थतेचे करील, तरच ते दोन्हांहि गोष्टीना म्हणजे खरेपणास तसेच कौतुकास्पदतेस येईल ह्या देहाचे वैभव हे विभवाचें खरे, पण तेथील विभवत्व जाणणेस आणण्या-करिता जागेपणाच्या स्थिरस्थायिक भावानीं दिव्य घेतलेले जे ते – तेथील जे मूळ "आब्रम्हपरमात्मा"च्या ठिकाणीं आपल्या निर्गुणतेच्या दिव्यतेनें जे असणें ते – तेथे स्थिर असे होणारे म्हणून आपल्या ठिकाणीं जी उत्सुकता ही व्यवस्थामापनाने असणारी आहे कां नुसतेच एक कौतुकाचे जे दर्शनास येणें किंवा ते

जाणणें एवढ्याचकरितां आहे तें मजला नीटसें समजावून द्यावें एवढी विनंति आपले चरणीं आहे. म्हणून हे विश्वरूपाचे जे दर्शन ते केवळ लीला म्हणून मजला दाखविण्याचें, कां तेथे माझे खरोखरी-पणानेंच स्थिरत्वाचें होणें होईल – तेथे मजला लागणाऱ्या ज्या दुसऱ्या बाजू ज्या योगांगानें पाहिल्या जाणाऱ्या त्या तेथे उगवतील किंवा कसें – खरोखरानें पाहिलें असतां त्या तेथें उगवाव्यात असाच आपला आशय असला पाहिजे; परंतु मजला हे योग-अगाचें होणे ज्यायोगें होईल तेच जर होत राहील, तर मात्र तेथील आपली कळकळ ही खरीच खरी होय. (२८)

अर्जुन म्हणालाः— करिता हे योगपति, हे योगनाथा श्रीकृष्णा, हे मजला नीट समजेल असें करावें अशी आपणांस विनंति आहे. असा प्रश्न अर्जुनानें केला तेथे त्यानें देवांना असें विचारिलें कीं, जे ह्या विश्वरूपदर्शनानें सहज योगयुक्त झालेले व अशा युक्तांनीं जी उपासना केलेली – व जे अव्यक्त अक्षरालाच नुसते झोंबत राहिलेले व जेथे ते त्यांचें झोंबत असणे हेहि पण "परि-उपासनच" जे आपण म्हटले आहे - अशा ह्या दोहींच्या ठिकाणीं जे कांहीं उपासनेनें असणे ते - अशा या दोघांमध्ये " योग-विदांना " आपल्या योगयोग्यतेनें असण्यास लावणारें जे ज्ञान ते ज्ञान कोणास झाले बरे ? योगरहस्य उत्तम तऱ्हेने जाणलें जाणे ते ह्या दोघामध्ये कोणीं केले ? कोणीं तेथील रहस्यास जाणणे केले बरे ? दोन्हीहि उपासनेने असणारे, परंतु एक जो भक्त तो " त्वा " म्हणजे तुमची उपासना करण्यांत गुंग असतो व दुसरा जो आहे तो - त्याचा देव म्हणजे अक्षर हेच होय व तेहि पण अव्यक्त असे असलेले. तेव्हा ह्या अशा दोघांमध्ये कोणीं योगास जाणले बरे ते मजला सांगावें अशी विनंति आहे तेथे बरे श्रेष्ठपण कोणाकडे येते ?

याप्रमाणे ज्याचा मोह नाहीसा झालेला आहे व ज्याच्यावर आपला अनुग्रह झालेला आहे व हे कमलदलाप्रमाणे नेत्र आहेत ज्याचे अशा श्रीकृष्णा, आपल्या मुखांतून ईश्वरी सामर्थ्याचे माहात्म्य ज्यांनीं ऐकले आहे, ज्यानीं तेथील गुह्य जाणले आहे व असे असून जे कर्मयोगामध्येच असून भक्तियुक्त झालेले असे जे तुमची उपासना करितात ते श्रेष्ठ कर्मयोगी होत, कां जे अव्यक्त तत्त्वाची(ब्रम्ह)उपासना करतात ते श्रेष्ठ होत–ह्या दोहोमध्ये कर्मयोग श्रेष्ठत्वानें बरा कुणास साधलेला ?

असे जे तुम्हांकरितांच कर्म करणारे, नामस्थैर्यानें तुम्हीच ज्यांना विषय झालेले आहांत व ज्यांचे मनाचे सर्व धर्म हे तुम्हांसच दिलेले असे जे सर्वतोपरी भक्तकोटीसच शोभवीत असलेले जे भक्त त्यांचा जिव्हाळा हा सर्वथा तुम्हांकरितांच असा झालेला, तुमच्याशिवाय ज्यांचें पाऊलच उचलले जात नाहीं असे, ज्यांनीं स्वतःस कर्मयोगासच बांधून घेतलेले असे हे केव्हांहि तुमचेच असल्याने श्रेष्ठ हे असणारच ! (२९, ३०)

आणि जे प्रणवापलीकडे आहे, जे या वैखरीस मुळींच कानडें म्हणजे अपरिचित असे – जें स्वतःची योग्यता ही बरोबरीची केली असें कशानेंहि न होणारें (अशी जी वस्तु) ते अक्षर निर्दोष व देश-रहित असें – जे ज्ञानी सोहंभावानें – तो परमात्मा मीच या भावनेनें – उपासितात, त्यांमध्ये व भक्तांमध्ये, अशा या दोघांमध्ये, हे श्रीअनंता, कोणीं बरे तो योग तो कसा असे बरोबर रीतीनें जाणले तें सांगा. ज्ञानयोगी आणि भक्तिमार्गी या दोहोत योगाचे खरोखरीचें ज्ञान कोणास असतें ?

परंतु याहिपलीकडे पाहिलें असतां जें ओंकारासहि ओलांडून गेलेले, जे प्रणवालाहि न सांपडणारें व जे या वैखरीस नच थांग देणारे, समजण्यास कठिण असे असणारे, जें कानडें म्हणून म्हटलें जाते, व जे कशाच्याहि जोडीनें नसणारें, जे कुणावरहि अवलंबून नसणारें, संवगडीपण हेहि पण कशानेंहि पुरते-पणास नच येणारे, मनास कडु वाटणारे असें जे वस्तुतत्त्व " अक्षर " व अशा ह्या अक्षराची – अव्य-क्ताची – तेंच मी आहे अशा भावनेनें जे (ज्ञानी) उपासना करितात, अशा ह्या ज्ञानीजनांनीं किं भक्तांनीं

योग जाणिला बरें ? व तो जो योग जाणिला गेला, तो " कवण " म्हणजे कोणता योग बरें ? त्या योगास कवण योग, कसला योग किंवा कोणता योग म्हणावें बरे ? हे श्रीअनंता कृष्णा, अशा ह्या दोन्ही लक्षणांचे जे जन त्यांच्यामध्ये योगाचें पिकलेपण असणारे जे ते कोणांमध्ये पाहण्यास मिळेल बरें ! निर्दोष असणारें जे ब्रम्ह, जे अव्यक्त म्हणजे दिसणारे नाहीं, परंतु अक्षरानें स्थिर आहे असें जे अक्षर व तेथेच ज्यांनीं " अहं सोऽहं " अशीं भावना करून उपासना केलेली व ज्यांना ज्ञानी अशी पदवी प्राप्त झालेली – असे जे " ज्ञानी " व वर सांगितलेले जे " भक्त " यांपैकीं कोणीं कोणता योग जाणला बरें ! ते देवांनीं कृपा करून सांगावे अशी विनंति आहे (३१, ३२, ३३)

या किरीटीच्या प्रश्नानें ते जगद्बंधु संतुष्ट झाले व त्यानीं म्हटलें कीं, हो, खरेच, भलाच असा हा प्रश्न तूं विचारलास कीं : प्रश्न कसे ते करणे हें तुला जाणितलेस.

या वरील प्रश्नानें देवांना अतिसमाधान झाले अर्जुनाची भूमिका कोणती आहे, त्याच्यामधील जी भक्त-सख्य देवता ही भक्त-कोटीस ( देवापासून विभक्त नव्हे अशी कोटी किंवा ऐक्य पावून असणारी ) पाहाते व ज्ञानी असें म्हणविले जाणारे जे समर्थन त्यास सुशोभित करते असे त्यांनीं अंतरसाक्षित्वानें जाणून, त्याच्या ह्या प्रश्नाचें कौतुक केलें. व म्हणाले कीं, हो, हा प्रश्न मात्र अति गहनतेचा असून, किंल्लक्षणांनीं वरील दोन्ही जन युक्त असतात, कोणत्या लक्षणांनीं किंवा चिन्हांनीं वरील जन ओळखले जातात ते सांगावे असेच तुझे म्हणणे आहे. तेथील सुबंधत्व ( प्राणबधच एक ) हें योगमयच ते कसें जाणावे बरें ? तेथील योग हा अंगीं मुरलेला असा जेव्हां होतो, तेव्हां तो पुरुष-लक्षणाचा असा " योग " ह्या व्यवस्थितीस येतो तेथें अर्थ हाच स्थिर झालेला जो ह्या पुरुषाचा हेतु होय व तोच ह्या मनुष्यजन्माचे साफल्य सिद्धतेचें झालेलें : अशा ह्या प्रश्नाने ते जगल्लोकनायक जे भगवान् गोपालकृष्ण हे अति प्रसन्नतेस आले व त्यानीं ह्या अर्जुनाच्या प्रश्नाचें भलेपण तसेच गंभीरत्व जाणून ते बोलले : : (३४)

**श्रीभगवानुवाच—**

**मय्यावेश्य मनो ये मां नित्ययुक्ता उपासते ।**
**श्रद्धया परयोपेतास्ते मे युक्ततमा मताः ॥ २ ॥**

नित्ययुक्ताः = अहोरात्र नित्य जे ब्रह्म त्याशीं युक्त – क्रियायोगयुक्त (तप वागविणें जे) होऊन. श्रद्धया उपेताः = श्रद्धेनें संपन्न होऊन, पुरुष होऊन, सर्व श्रद्धा पुरुषभारास आली. युक्ततमाः = सगुण उपासक अति उत्तम योगी ( भक्त ) होत. अंतःकरणानें एकजीव होणे – योगच प्रत्यक्ष – असें श्रेष्ठत्व. मे मताः = माझ्या मतें, मला वाटतें.

ये मयि मनः आवेश्य नित्ययुक्ताः परया श्रद्धया उपेताः माम उपासते ते युक्ततमाः मे मताः ।

मन म्हणजे लक्ष माझ्याठायीं लावून नित्ययुक्त ( चित्त नित्य ब्रम्हाच्या ठिकाणीं व क्रियायुक्त ) होत्साते, परम श्रद्धेनें सपन्न असे होऊन, माझी उपासना करितात, ते उत्तम योगी होत. त्यांनींच उत्तम योग साध्य केला असें माझे मत आहे.

**तरी अस्तुगिरीच्या उपकंठीं । रिघालेया रविबिंबापाठीं ।**
**रश्मी जैसे किरीटी । संचरती ॥ ३५ ॥**
**कां वर्षाकाळीं सरिता । जैसी चढो लागे पांडुसुता ।**
**तैसें नीच नवें भजतां । श्रद्धा दिसे ॥ ३६ ॥**

**परी ठाकलियाहि सागरु । जैसा मागीलहि यावा अनिवारु ।**
**तिये गंगेचिया ऐसा पडिभारु । प्रेमभावा ॥ ३७ ॥**
**तैसें सर्वेंद्रियांसाहत । मजमाजीं सूनि चित्त ।**
**जे रात्री दिवस न म्हणत । उपासिती ॥ ३८ ॥**
**ययापरी जे भक्त । आपणपें मज देत ।**
**तेचि मी योगयुक्त । परम मानीं ॥ ३९ ॥**

(३५) अस्तुगिरीच्या – अस्तगिरीचिया. उपकंठीं = समीप, आजूबाजूच्या प्रदेशांत. रिघालेया – रिगालिया. संचरती – संचरती गा. (३६) वर्षाकाळीं = पावसाळयात, ज्येष्ठ-आषाढांत. चढो लागे = वाढते, भरतीस येते. नीच नवें – नीच नवी – दुणेहि वरी. भजतां = भजले असतां, सेविले असतां. श्रद्धा दिसे = भक्ति दिसूं लागते, विश्वासास पात्र होते. (३७) ठाकलियाहि = मिळाल्यावर, मिळाला असतांहि मागीलहि यावा अनिवारु = मागच्या प्रवाहाचा अनिवार लोट यावा. पडिभारु – पडिभरु = अधिकपण, उल्हास, उचंबळणे, आनंद, प्रकाश, शोभा, आदर. (३८) सूनि चित्त – सुनिश्चित = निर्धाराने चित्त ठेवून. रात्री दिवस – रात्रंदिवो. (३९) आपणपें = आपलें सर्वस्व, आत्मार्पण. योगयुक्त = खरा योगी परम = श्रेष्ठ.

रविबिंबापाठीं गेले असता ज्याप्रमाणे अस्तुगिरी जो त्याच्याजवळच सर्व सूर्यरश्मी संचरून असतात : सूर्य अस्तास गेल्यावर त्याचीं किरणें हीं त्याच्या मागोमाग जातात : किवा वर्षाकाळीं नदी व तिचा वाहाण्याचा जोर हा – ता समुद्रास मिळाली असली तरी – लोढयाचा जसा असा असतो.

अति सौम्य, तेजोमय, प्रसन्नत्व देणारे हे मुख, हा देह जसा कांहीं मदनाचें मुखच असलेला, अति सुंदरता ही सर्व सौंदर्यास पाहणारी, एक तऱ्हेचे " साजणें " च सौंदर्यास ओलांडून गेलेलें, हया देहामधील रेणुरेणु हे जीवित्वास आले, सर्व ज्ञानजीवन हेच तेथे आपल्या कळेस आले, लोकोत्तरता ही संपन्नतेची झालेली असे सुहास्यच जणुं मुखाचें, रमणीयता ही रमणीयत्वच मूर्त झाले, असे जे हया देहाचें होणे ते म्हणजे हया श्रीमुखासच जणुं " तथास्तु " म्हणून हया श्रीसूर्यनारायणाने हया लोकदिशेस जसे ज्ञानोदयानें नेहमीं असा असा आशीर्वादच दिलेला होय आपले सर्व तेज व तेथील लावण्यच जणूं सौम्याचे करून हया मनुष्यप्राण्यास दिलेले असे जे देवपणच, तेथे असणारे जे रविकिरण-हस्त हे चोहोंकडे पसरलेल्या अशा दिव्यतेचे असून, ते हया श्रीसूर्यबिंबाने दिलेले आपले महातेज हे त्या निशापतीची जी दिशा तेथील जो क्षितिज किंवा उपकंठ म्हटला जाणारा व एक गिरिच किंवा पर्वततुल्यतेने असणारा असा जो भार – माहात्म्यभार – त्यासच शोभविणारे असते. तसे हे पुरुषलक्षणाचें असणें जे तें असून तेथे योगमय असें जे भवन तेच असते. योगच तशा लक्षणाचा दिसतो. जसा कांहीं योग व पुरुष यांचा योगच झालेला !!! अशा तऱ्हेचा हा मनुष्यजन्म व तेथे असलेला अर्थ हा जेव्हां " तोंडीं राम नाहीं कैसा तरे " ने – हया सकळ पिंडामध्ये वाहाणारा जो अनुहातध्वनि त्यानें – जरी असला, तरी वरील जे रामनामाचें होणें तेच सर्वार्थाचे होय. (३५)

भक्तानें येथें जसें कां हया देहास एक विटंबणेंच दिले, कां हया मनास उपदेश केला, कीं अरे मना, हें तुझें जे कांहीं जगणें तें प्रेमाचे नच असें, तेथे ना प्रेम, ना देवाच्या पायावर चित्त, ना हया जन्माचें कांहीं साफल्य पुढे घेतलेलें ! जेथे हा जन्म हा नित्य नव्याच गोडीनें नटविला – शोभविला गेला—असें तें देव – विठ्ठल – सखयावांचून जगणें तें काय कांहींच उपयोगाचें नाहीं : म्हणून कांहीं तरी हया पुरुषार्थास अर्थाचें – पुरुषाचें – करून असत जा तरच बरें !

म्हणून म्हटलें कीं, तशी ती श्रद्धा जेव्हां आपल्या योग्यतेस येते, तेव्हां तेथे नवेनवेंपणाचें असें – नव्यापणाचा उत्साह हुरुपास आला – असे होणारे होते

नवा वर्षाव, नवें भरणें, पुन्हां नव्यानें वर्षणे व पुन्हां भरणें हे जसें नदीला सौभाग्यच आल्यासारखे असते, किंवा म्हातारपण हे नव्या तरुणांनीं जसें कांहीं तारुण्याचा वेष देऊन तरुणपणाचें जे अभिनद नीय असे आयुष्य जसे – तेथे नवा उल्हास, नवा आनद, नवा उत्कर्ष, नवा उत्साह घेऊन जागा घेत असते, तसे येथे ह्या पुरुषाचें होय. हा पुरुष म्हणजे श्रद्धा, व ह्यास त्याच्या लक्षणांनीं नटविणे म्हणजे पुरुष स्वतः होणे, पुरुषाचे स्वतः असणे हें जेव्हां देहामध्ये समरसून जाते, तेव्हां तेथे श्रद्धेचे नवे सखीपण, नवे रसाळपण, नवे अलंकार, नवें पूजन, नवे पाठ घेऊनच होणे असून, त्यासच पुरुषलक्षणाचें करणे म्हणतात. येथे जेव्हां अभ्यास हा स्वतःत भिनून एकमय होतो, नित्यत्वाने असणारा असाच आनंद, भर, योग, समाधानादि क्रियाशक्तीचें समरसणे होऊन जेव्हा असतें, तेव्हां त्यासच असाध्यतेने दुर्मिळ ठरलेले जें ते साध्यनेप्रत येऊन सिद्ध असें झालेले असते.

आम्ही अभ्यास अभ्यासच करीत बसतों परंतु तो अभ्यास हा जर नच ठकविला गेला, तरच तो फलरूप झाल्याने अतिसुखाचा असा होतो. म्हणून ज्याने जो अभ्यास घ्यावा, त्यांत इतके समरस लक्षणाचें व्हावें की एक पुरुषच त्या लक्षणाचा होऊन जेथे जाईल तेथे त्यास " पूज्यमान " अशीच (सिद्धभोजन जेवण्याने जे समाधान) अपूर्वता – योग्यता – आलेली होते !

म्हणून श्रद्धा लक्षणाचे होणे म्हणजे " स्वत चें " मी तसे वागविणें होय. अभ्यास हा लक्षणाचा होऊन जसा का संतसेवा, साधुसेवा, उत्कर्ष किंवा उत्सव रहस्यास आला असे होते, व सर्व देहच अभ्यासाची पूर्ती पावलेला असा होऊन जातो. (३६)

नदीचे होणे हे उत्साहाचे अतिहून अतीचें झाले तर ते म्हणजे सागरास जाऊन मिळणे होय – म्हणजे सागरासारखे अपरंपार अशा खोलीचे होऊन महत् महत्त्वास येणे होय ह्या सागरालाहि पण ही नदी आपले सर्व महत्त्व अर्पण करून स्वतः तेथे लय घेते. हे जे त्या गंगेचे होणें ते कांहीं तेवढयानेहि कृतकृत्य होऊन तिने आपलेपण – " गंगापण " – थोडेच सोडून दिलेले असते ? तिला पुन्हा मागाहून येणारा प्रवाह हा आपली स्वतःची आठवण देऊन ते जे तिचें गगापणाने असणे त्यास प्रेमाचे करून पुन्हा प्रवाह, पुन्हां सागराएवढे होणे, पुन्हा अलोट प्रेमप्रवाह व पुन्हां मिळणे हे होतच असते तेथे त्या गंगेच्या पावनत्वास सागरतुल्यतेच्या अगाधतेचे करून तेथील जी पावनशक्ति ही पावकनादाने स्थिर केली जाऊन, तेथे त्या पावन उपायास पूर आलेली अशी होते, व ह्या मनुष्यलोकास आपले महत्त्व दर्शित करून, बहुप्रेमाच्या भावाने सर्वत्र व सर्वकाल पूज्यता घेऊन असते. जसे वीज ही मेघासच माळ घालणारी व तेणेंकरून त्या मेघास अनंत शक्ति देऊन त्याचे मेघराजा असे महत्त्व पोहोंचते करते. तेथे तिनें जर एकदां चमकून त्यांत सर्व कांहीं आले असे म्हटले, तर ते कसे त्या मेघराजाच्या औदार्यास पुरें पडणार ? म्हणून तेथील औदार्यच जणूं वागविण्यास दिलेले अशी ती वीज पुन्हां चमकणे व पुन्हा मेघमाळा ही सारखी करीत राहणारच तसा हा पुरुषलक्षणाचा प्रेमभाव जो तो अवर्णनीय असून तो केव्हांहि आपल्या कार्यी रत असल्यानें तेथील महत्त्व हे महोदधीसहि ओलांडून जाते.

जरी नदी सागरास मिळाली तरी तिच्या प्रवाहांतील पाण्याच्या लोटाचा जोर हा वाढता होऊन असतो, तसा त्या गंगेच्याप्रमाणें उल्हास व उचंबळणें प्रेमभावास येऊन असलेले. (३७)

त्याप्रमाणें सर्व इंद्रियांसहित ते मजमध्ये चित्त घालून रात्र कां दिवस न म्हणतां उपासना करतात, पूजा करतात, सेवा करतात. अहो, तत्त्व जें आहे तेथील सौरस जर पाहिला, तर तेथील रात्र ती कसची

व दिवस तरी कसला ? तेथे त्या मनाचें जे कांहीं एक - सेवा न करतां, उपासना भक्ति न करतां, पूजा-अर्चा न करतां - आल्हादतेने असणे, तेथे ह्या मनासच जणूं मनोदेव कल्पून, त्या मनाने त्यासच सागितले कीं, हे मना, तूं अगोदर या भावावर बैस, तूं भावाचा हो, व मगच तुला ती ब्रम्हपदाची बैसका आनदाची व प्रसादाची होऊन येणारी होईल व मग तेथे ह्या अज्ञानाचें रडगाणे नाहीं.

असा हा योगलक्षणाचा उपक्रम तो केव्हांहि अविरत युक्ततेचा असणारच ! तसें ह्या देहधारणेंने जे म्हणून आहेत, आपले चित्त हे सर्वेंद्रियासकट भगवत्स्वरूपीं लीन करून जे उपासन करतात, त्यांचें वर्णन हे अवर्णनीयच होय. तेथे रात्रीचा दिवस व दिवसाची रात्र किंवा रात्रंदिवस स्वरुपीं स्थिर झालेले होणें हे ते करीत राहिल्यानें, त्यांचे त्या अर्थाचे ठिकाणीं एक सर्व शोभनीय अशा लक्षणाने दिव्यच घेतलेले जसे कांहीं असे होऊन असतं अशा तऱ्हेचें हे भक्ताचें लक्षण तुजला सार्थततेने सागितलें. ह्या भक्तांनीं आपले सर्वस्व ह्या भगवच्चरणीं अर्पण केल्याने त्यांचें जे काहीं अनेक चित्ताचें होणें ते अंतर्मुख झाल्याने, सर्व कांहीं त्या भगवच्चरणाचें असे होऊन जाते. (३८)

याप्रमाणे जे भक्त आपलें चित्तसर्वस्व देऊन आपलें आत्मार्पण करतात गुणमयीचे शांतब्रम्ह जे तेच होऊन जे असतात, असे जे भक्त त्यानाच मी बहुततेने श्रेष्ठ असे परम भक्त मानतो. तेच भक्त मजला अति योगयुक्त असे झालेले असे श्रेष्ठ पदवीचे होत असे वाटते नुसतं वाटतंच नव्हे तर त्यांना मी परम मान्य असे योगयुक्त लक्षणाचे झालेले समजतो व तेच मजला प्रिय असे असतात चित्तच मुळीं ह्या अंतःकरणचतुष्टयाचें - मन, बुद्धि, चित्त, अहंकार - मध्य असल्याने व ह्या चित्तानेच ह्या इंद्रियाचें अवाढव्यपण किंवा बेतालपण पाहिलेले असल्याने ( चतुरंग सैन्य निवटिले संकल्पाचें ) हे मूळचे चित्तच जेव्हां कर्षले जाते, तेव्हा ते आपले सर्वच्या सर्व अंतःकरणाच्या मदतीचे जे लक्षण ते घेऊन त्या पुरुषाचे चरणीं लीन झालेले असतं. असे ज्यांचे चित्त झालेले असतं, त्यांच्यामध्ये व त्या पुरुषामध्ये फरक पाहावा तो मुळींच नसून, श्रद्धा, पुरुष व तो योगी हे एकच होऊन जातात. श्रेष्ठ अशा श्रद्धेचे जवळ येऊन तो पुरुष, ती श्रद्धा व श्रेष्ठत्व एकजीव होऊन गेलेले असते. (३९)

**ये त्वक्षरमनिर्देश्यमव्यक्तं पर्युपासते ।**
**सर्वत्रगमचिन्त्यं च कूटस्थमचलं ध्रुवम् ॥ ३ ॥**

अक्षरम् = निर्गुण ब्रम्ह, अक्षर ब्रम्ह अनिर्देश्यम् = जे कोणत्याहि लक्षणांनीं दाखविता येत नाहीं असे अव्यक्तम् = अस्पष्ट, सूक्ष्म. कोणत्याहि प्रमाणांनीं स्पष्ट होत नाहीं, म्हणजे मनाला, वाणीला कां इंद्रियांना अगोचर जे अक्षर स्वरूप. सर्वत्रगम् = सर्वत्र जाणणेस जाणणारे; ज्ञानगम्य, चोहोकडचे ज्ञान घेणारे; सर्वत्र व्यापून उरणारे. अचिन्त्यम् = चिंतिता नच येणारे; चिंतनाने हातास लागणारे व न लागणारे. कूटस्थम् = निर्विकार, अक्षर, अंतर्बुद्धीचे अधिष्ठान. अचलम् = स्थिर, कधींहि भंग न पावणारे. ध्रुवम् = आपल्या स्थानापासून नच ढळणारें.

ये तु अनिर्देश्यम् , अव्यक्तम् , सर्वत्रगम् , अचिन्त्यम् , कूटस्थम् , अचलम् , ध्रुवम् च अक्षरम् पर्युपासते ।

पण जे कोणत्याहि लक्षणांनीं नच दाखवितां येणारें असें, अस्पष्ट, सूक्ष्म, अव्यक्त असें सर्वव्यापी ( सर्वत्र जाणारे ) असें, चिंतितां नच येणारे असें, निर्विकार असे, स्थिर असे व अढळ असें अक्षर ( निर्गुण ) सेवितात.

**आणि यर तेहि पांडवा । जे आरूढोनि सोहंभावा ।**
**झोंबती निरवयवा । अक्षरासी ॥ ४० ॥**
**मनाची नखी न लगे । तेथ बुद्धीची दृष्टी न रिगे ।**
**इंद्रियां कीर जोगें । काइ होईल ॥ ४१ ॥**
**परी ध्यानाहि कुवाडें । म्हणोनि एके ठायीं न संपडे ।**
**व्यक्तीसी माजिवडें । कवणाहि नव्हे ॥ ४२ ॥**
**जया सर्वत्र सर्वपणें । सर्वांहि काळीं असणें ।**
**जें पावूनि चिंतवणें । हिंपुटी जालें ॥ ४३ ॥**
**जें होय ना नोहे । जें नाहीं ना आहे ।**
**ऐसें म्हणोनि उपाये । उपजतीच ना ॥ ४४ ॥**
**जें चळे ना ढळे । सरे ना मैळे ।**
**तें आपुलेनि बळें । आंगविलें जिहीं ॥ ४५ ॥**

(४०) येर = दुसरे निर्गुण उपासक आरूढोनि सोहंभावा = आपण ते ब्रह्म आहोंत अशा भावनेवर स्वार होऊन निरवयवा अक्षरासी = अवयवरहित अशा निर्गुण, नाशरहित वस्तूस, अविनाश पदास. (४१) मनाची – जेथ मनाची तेथ – जेथ मनाची नखी न लगे = मनाचा स्पर्श होत नाहीं, मनाचा प्रवेश होत नाहीं. बुद्धीची दृष्टी न रिगे = बुद्धीच्या डोळयास दिसत नाहीं, बुद्धीस जे अगम्य असें. इंद्रिया कीर जोगें = खरोखर तें इंद्रियांना समजेल काय ? इंद्रियांना आवडेल काय ? (४२) कुवाडें-कुहाडे = गूढ, अपरिमित, कठिण व्यक्तीसी = आकारास माजिवडे = मध्यें नव्हे - नोहे. व्यक्तीसी माजिवडे कवणाहि नव्हे = कोणत्याहि आकारांत जे सांपडत नाहीं. (४३) चितवणे = चिंतन. हिंपुटी = कष्टी. जेथें चिंतनच थाबतें. (४४) उपाये उपजतीचि ना = जेथे उपायच (उपासादि साधन) सापडतच नाहींत. (४५) मैळे = मळत नाहीं आपुलेनि – आपुलेनीचि आगविलें = आपलेसे केले, स्वाधीन केले, आंगचे केले, उपायाचे केले, अवयवाचे केले.

आणि जे सोहंभावावर म्हणजे आपणच तें ब्रम्ह आहों अशा भावनेवर आरूढ होऊन त्या निरवयव अशा अक्षरास झोंबतात :

इंद्रियांमध्यें महाचपळ असें जे मन त्याचेहि नख जेथें स्पर्श करूं शकत नाहीं, ज्या ठिकाणीं बुद्धीची दृष्टी रिघूं शकत नाहीं, असे तें जे मनाला अचिंत्य व इंद्रियांना अगम्य असे, जे न ढळणारे, न चळणारे, मनाच्या हातावर तुरी देऊन जाणारे, जेथील बुद्धी ही दृष्टच लावून (ठेविलेली) घेतलेली असें, जे इंद्रियांचे ग्रामीं नसणारे ते इंद्रियाना समजण्यासारखें होईल काय ? (४०, ४१)

या भक्तांहूनहि जे दुसरे ते, हे पाण्डवा, भावसामर्थ्याची जी समृद्धि तेथे अभ्यासारूढ झाल्यानें "सोऽहं" हीच उपासना त्यांनीं घेतलेली असते. त्यांचे ते करणें म्हणजे "सोऽहं स्वाहा इति निवेदयामि" असेच असते. तेथे "हंसः सोहं" ते निर्मळ असणें जे तें शुचिर्भूततेस येणें होय : "हंस होऊनि क्षीर घेई" चे जे तत्त्व त्यानें ज्यांनीं स्वतःस शोभविलें, त्यांना शुचिर्भूतता ही माळ घालीत असलेली होय. जेथे अवयव नसूनहि सर्वावयवपरिपूर्ण असे असणारे जे अक्षर तेथें ह्या अक्षरावरच त्यांनीं आपले आसन चढविलें, व "तोच मी शुद्धबुद्धतेचा असा आहे" अशा आशयानें स्वतःस त्या भावारूढाचें केले. त्यांनीं ह्या अक्षरासच आपल्या आंगचें असें करून ठेविलें, व ह्या अक्षरास आपल्या बळानेंच आपल्या संवयीचें केले.

सर्व चराचर हें जे क्षरलेलें आहे तेथीलचा जो कधींहि नाश न पावणारा असा जो भाव तेथेंच जे स्वतःस स्थिर करितात, जो अक्षरभाव हा बोटाने न दाखविला जाणारा असा असतो व तसा असूनहि तो व्यक्तित्वास न पाहिलेला असा असल्यामुळे, त्याचा अभ्यास हा महत्प्रयासानेच साध्य होणारा असतो – कष्टसाध्य असतो – असे तें सर्वत्र व्यापून असणारे अक्षर, चिंतनानें हातास न येणारे असें असून, तें अंतर्बुद्धीच्या महत्त्वाने असते. ते मुळींच न चळणारे असे असून, सर्वदा सर्वावयव परिपूर्ण असे असतें (अव्यय). सर्व इंद्रियाना नियमित करून जे समबुद्धीनें वागणारे असतात – त्यांच्या त्या सर्व भूतमात्राच्या हिताकरितांच झटणे अशा उदार भावानें – त्याना ते परमात्म – महान्आत्म – पद प्राप्त होते.

बुद्धीमध्ये बिंबित झालेला जो चिदाभास ( चिद्रवी ) तो अमुक पदार्थ असें भासवितो – चिदाभास व बुद्धि ही दंपती पदार्थास व्यापून अमुक असे ज्ञान होते. पदार्थाला व्यापून बुद्धि त्या पदार्थाविषयींचें अज्ञान काढून टाकते. अशी ही प्रत्यक वस्तूचें ज्ञान व्हावयास कृति व्हावी लागते. अन्य पदार्थाप्रमाणे बुद्धि आत्म्यालाहि – जरी आत्म्याला स्वप्रकाश आहे तरी – व्यापते. ' मतिव्याप्ति' बद्दल शास्त्र प्रमाण आहे, ते 'मनसैवेदं' हे होय. हा चिदाभास आत्म्याला व्यापतो, पण त्याच्या प्रकाशाचा ब्रह्मतेजामध्ये लोप होतो. अंधारातील वस्तु पाहाण्यास डोळा पाहिजे, त्याचप्रमाणे हातीं दिवाहि पाहिजे, तसे येथे ब्रह्मज्ञान होण्यास हातीं ज्ञानदिवा असला, म्हणजे नुसत्या डोळयांनीं काम भागतें. मग चिदाभास हा व्यर्थ होय

महावाक्याने प्रत्यक्ष ज्ञान झाले, तरी श्रवण-मनन-निदिध्यासन केलेच पाहिजे. ब्रह्माचें चिंतन-कथन-परस्परास बोध असा जो क्रम त्यास ब्रह्माभ्यास म्हणतात. ज्ञान झाले पाहिजे असे खरेंच जर, तर ते ते पथ्य करीत अस – त्या त्या पथ्याने असत जा. कर्मेच सर्वथैव सोडावींत असे म्हटले, तर ती एक फसवणूक होय अभ्यासाच्या आड जे येईल त्याची बुद्धि तत्क्षणीं सोडून दे. संसार करशील तर त्याच्या नादीं फारसा लागूं नको, तरच तुला तो बाधा करणारा होणार नाहीं. ज्या उपाधीमुळे चित्त हे स्थूल होऊन ज्ञानास प्रतिकूल होईल, ती उपाधीच मुळीं निर्मूल कर. वाणिज्यादिची खटपट सोड. ज्ञानार्कावर ढगच आलेले असे ते व्याकरण, तर्क, इ ते शुष्क पाला होत. अशा प्रकारे बुद्धीचा निश्चय ठाम करून आपलें काम – आपला अभ्यास – साधून घे.

विषयांचे सेवन निर्वाहापुरतेंच फक्त केले असता त्यांची बाधा होत नाहीं. विषय हे कालत्रयीं दुःखदायकच आहेत, म्हणून विषयसुखाच्या मागे लागूं नये. जगाचे मिथ्यात्व ठरविणे हे ज्ञानाचे काम आहे, व बोध झाला म्हणजे ते मिथ्यात्व ठरतें. प्रारब्धाचे काम ह्या जीवाकडून सुखदुःख भोग-विण्याचे आहे, म्हणून प्रारब्धाप्रमाणे भोग होतात.

द्वैत भावानें उपरोध करणे ते काय कामाचे? म्हणून विस्मृतीची आसक्ति बरी नाहीं साक्षि-त्वाचा अभ्यास – दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीकडे लक्ष न देतां – एकचित्ताने करावा. आत्म्याचे जे प्रत्यक्ष किंवा साक्षात् ज्ञान तीच अपरोक्ष विद्या होय. येथे द्वैत विस्मृतीची गरज नाहीं. आत्मज्ञान व विस्मृति – येथे अर्ध विद्या पाषाणींच झाली जशी. मशकाचाहि नादध्वनी साहत नाहीं असा ज्ञानियाचा समाधी होय. पाषाणाचा तसा नाहीं. म्हणून अहं ब्रम्ह व जग मिथ्या असाच बोध होय.

चिदाभासास ताप नाही, तर साक्षीस कसा बरे ताप होईल ? निःसंगतेनें स्थैर्य साधते; मन हें चंचल होत नाहीं. मी-माझे करून दुसऱ्याचे ओझे घेणे नको. मी मी करीत बसण्यानें लिंगदेहास षड्रिपूंचा दाह लागला तर वायांच कुंथणें होते. कारण देहांत तर अज्ञान घर करून असते. तेथे स्मरणच नाहीं, व मरण तरी याहून बरें असें वाटते. या विस्मृतीचें अज्ञान हें तर नकोच. ज्ञानाने मुक्त अवस्था ही सर्व दुःखांना झांकून टाकते.

जेथे मुळीं कांहीं गुणच नाही असे ते निर्गुण निराकार अक्षर तें गुणमयीच्या आश्रयानें राहाणारे – तेथें जो दिवा त्यांत भक्तिरूपी तूप जर घातले, तर तेथे चित्तरूपी आरसाच मुळीं उजळ होऊन ते सगुण स्वरूप हातीं येईल हया चित्तामध्ये उठणाऱ्या दीप्ति किंवा वृत्ति तेथे सामान्यचैतन्य, कां ब्रम्हचैतन्य, कां जीवचैतन्य हयामधील मध्य संधि व तेथीलचे भेद जाणणारे ते दैवाचे होत. हीच मुळीं मुख्यत्वें-करून संध्या म्हटली जाते. हयावांचून बाकीच्या इतर सर्व क्रिया फोल ठरतात.

येथें आपलें असणें – नसणें ते वृत्तीनें पाहाशील, तर मग ती वृत्ति नुसती वृत्ति न राहातां, तेथें ब्रम्हच होणें होईल. अशी ही तुझेआत व विश्वांत होणारी गोष्ट – तेथें चैतन्यद्वय हेच तुझे अनुभवास येईल. ज्याच्यामुळें ही स्वरूपाची ज्ञातता समजली ते ब्रम्हच पाहा व तो चिदाभास हा घटमात्र जाण आतमध्यें प्रणवउच्चार तो अवाङ्मय सोऽहं कसा ते पाहा विश्वासानें अभ्यास कर व मग रोकडी मुक्ति तुला माळ घालील. तेथें सद्गुरुवचनावर विश्वास ठेवून अभ्यासिले असतां ते सिद्धतेप्रत येणारे हया ज्ञानसूर्याचे (चंद्रसूर्य हेच एकत्रित होऊन त्याचें) जे प्रकाशित होणे – तेथे हा प्राण – श्वासभार - हाच मुळीं आंत दीपच लागलेला असा : अगाधतेचे प्रमाण हें प्राणभारास उचलीत असलेलें : तेथे अनलरूपी दीपच !

परंतु ध्यानासहि गूढ असे तें असल्याने एकाच ठिकाणीं ते सांपडत नाहीं आकारामध्ये सर्व माजण घेऊन असेल असे कांहींच नाहीं : एका व्यक्तीमध्येच ते माजिवडे होऊन असेल असे नाहीं. तसेच कशाहि तऱ्हेनें ते नसे होणें नाहीं ध्यानास सांपडण्यास कठिण असे असल्यामुळे ते एके ठायीं न सांपडणारें असते. व्यक्तीसच सर्व माजणें दिलेले, व्यक्तित्वांतच सर्व सौंदर्याचा माज जणं आलेला असे असणारें, तें सर्वत्र सर्व काळीं सर्व ठिकाणीं असते. जेथे चिंतनानें आपले हातपाय आटोपते घेतले, चिंतावें तें अचिंत्य असे पाहून चिंतवणें हे हिंपुटी झाले, चिंतन जे त्यानें आतां ते ब्रम्ह सर्वत्र, सर्वपणें, सर्वकाळीं आहेच असे पाहिलें, व त्यामुळे ते स्तब्धच होऊन आहे, कष्टीच झाले असे आहे.

जे होय असे कां नोहे असे नाहीं, जे नाहीं असें नाहीं व आहे असेहि नाहीं असे ते असल्या-कारणाने, तेथे उपायच मुळीं उपजते होईनात. उपाय हेच तेथें स्वभावास येईनात. स्वाभाविकपणें सिद्ध असे होऊन येईनात. जे आहे असेहि म्हणता येत नाही व नाहीं असेहि म्हणता येत नाहीं, व असे असल्याने जेथे उपायाचे अवलंबणेच नाहीं अमका उपाय किंवा तमका उपाय असे जे उपायाने आपलासा करण्याचा प्रयत्न हा जेथे उपजतच मुळीं नाहीं. (४२, ४३, ४४)

जे चळत नाहीं ना हालत नाहीं, जे सरत नाही व जे मळत नाहीं ते आपल्याच बळानें त्यांनीं आपल्या आंगचे आपल्या स्वाधीन करून ठेविले आहे – वैराग्यरूपी महत अशा अग्नीनें तापून किंवा शुद्ध वैराग्यरूपी पावकाचें साहाय्य घेऊन त्यानीं विषयाचीं कटके तावविलीं व अशी तीं तंवकास चढलेलीं इंद्रिये त्यांनीं धर्यानें आंवरून धरिलीं.

जे कधींहि न चळणारे, नच ढळणारें, कधींहि न संपणारे व कधींहि न मळणारें असें जें "ब्रम्ह" ज्यांनीं भावारूढ होऊन "सोऽहं" तत्त्वानें हया अक्षरास आपल्या बळानें आपल्या आंगवस्त्राचें करून वरील सर्वच्या सर्व "नाहीं नाहीं" चें ते "आहे आहे" चें ज्यांनीं केलें असे, ज्यांनीं "सोऽहं" भावानें स्वतःस आसनस्थ केलें तेहि मलाच मिळतात त्यांच्या स्वतःच्या अंगचेच असें वस्त्रच त्या अक्षरास देऊन अक्षरास भावाचें करून. तेथे "तोच मी" असें बळ अंगीं दृढ करून ठेविलें नामधारण हें सामर्थ्यवान असें झालें. तेथे ती जी प्रिया वाणी ही आंगच्या प्रावर्ण प्रेमाची झाल्यानें, तें प्रेमच जणूं बोलत आहे असें बळाचें ते हया अनुहात ध्वनीस "सोऽहं" रूपी – म्हणजे "परमात्मा मी" – अक्षराचा वेषच देऊन तेथे ते रमूं लागले. (४५)

**संनियम्येन्द्रियग्रामं सर्वत्र समबुद्धयः ।**
**ते प्राप्नुवन्ति मामेव सर्वभूतहिते रताः ॥ ४ ॥**

संनियम्य इंद्रियग्रामम् = आपल्या इंद्रियांचें – ज्ञानकर्मेंद्रियांचें – संयमन करून, त्यांना विषयांपासून परावृत करून. सर्वत्र समबुद्धयः = सतत सर्वांठायीं समबुद्धि असतात. सर्वभूतहिते रताः = सर्व प्राण्याचें कल्याण करण्यासाठीं निमग्न (निर्गुण ब्रम्हाचे उपासक).

(ये) इन्द्रियग्रामम् संनियम्य सर्वत्र समबुद्धयः सर्वभूतहिते रताः ते माम् एव प्राप्नुवन्ति ।

( पण जे ) इद्रियाचे सयमन करून, सर्वत्र समबुद्धि ठेवून, सर्व प्राणीमात्रांचे हित करण्याविषयीं तत्पर होऊन ( अक्षर सेविनात ), तेहि मलाच प्राप्त होतात.

इद्रिये हीं नियमित केलीं – तेथे सिद्ध भावच पुढे येऊन आहे असें – सर्व समानतेची बुद्धि हीच परिणमून आहे – असे ते सर्व भूतमात्रांच्या हिताकरिता झटणारे, तेथे तत्पर होऊन असणारे, ते मजलाच येऊन मिळतात – ते माझ्याच पदाचे होतात.

**पैं वैराग्यमहापावकें । जाळूनि विषयांचीं कटकें ।**
**अधपलीं तंवकें । इंद्रियें धरिलीं ॥ ४६ ॥**
**मग संयमाची धाटी । सूनि मुरडिलीं उफराटीं ।**
**इंद्रियें कोंडिलीं कपाटीं । हृदयाचिया ॥ ४७ ॥**
**अपानाचिया कवाडा । लावूनि आसनमुद्रा सुहाडा ।**
**मूळबंधाचा हुडा । पन्नासिला ॥ ४८ ॥**
**आशेचे लाग तोडिले । अधैर्याचे कडे झाडिले ।**
**निद्रेचें शोधिलें । काळवखें ॥ ४९ ॥**
**वज्राग्नीचिया ज्वाळीं । करूनि सप्तधातूंची होळी ।**
**व्याधींच्या सिसाळीं । पूजिलीं यंत्रें ॥ ५० ॥**
**मग कुंडलिनियेचा टेंभा । आधारीं केला उभा ।**
**तया चोजवलें प्रभा । निमथावरी ॥ ५१ ॥**
**नवद्वाराच्या चौचकीं । बाणूनि संयतीची आडवंकी ।**
**उघडिली खिडकी । ककारांतीची ॥ ५२ ॥**

(४६) वैराग्यमहापावके = वैराग्यरूपी मोठया अग्नीनें. कटके = सैन्ये. अधपलीं = होरपळलेलीं, तप्त झालेलीं. तंवके = धैर्यानें, आवेशानें. (४७) धाटी – थाटी = पाश, फांस, व्यवस्था, स्थिति. सूनि – न सूनि = घालून, योग्यतेचे होऊन. कपाटीं = गुहेत. (४८) कवाडा – तोंडा, सुहाडा = दृढ, बळकट. हुडा = बुरुज पन्नासिला = श्रृंगारिला, उभा केला, तयार केला. (४९) लाग = संबंध, सोयरेपण, बाध. अधैर्याचे – अध्येयाचे. कडे = आडकाठी, डगरी, अवघड वाटा. झाडिले – साडिले. काळवखे = अंधारे, निद्रारूप अंधार, अज्ञानांधकार, आळसरूप अंधार, झोंपाळुपण. (५०) वज्राग्निचिया ज्वाळीं = मूळ बंधापासून उत्पन्न झालेल्या ज्वाळाग्नीनें. सिसाळीं = मस्तकांनीं, शिरांनीं. व्याधींच्या ... यंत्रें = व्याधींचा नाश केला हा भाव. (५१) टेंभा = पलिता, मशाल. चोजवले प्रभा निमथावरी = मस्तकापर्यंत प्रभा दिसूं लागली, कौतुकास आली. (५२) चौचकीं = दारांत, चौकांत. बाणूनि संयतीची

आडवंकी=इंद्रियनिग्रहाची खीळ किंवा अडसर घालून. ककारांतींची खिडकी=सुषुम्नानाडीचा मार्ग, दशमद्वार. उघडली खिडकी ककारांतींची=मस्तकातील सुषुम्नेचा मार्ग मोकळा केला

तेथील योगाची जी क्रिया अभ्यासिली गेली, त्याबाबत थोडेसे विवेचन कसें ते पाहूं. हा योग्यांचा मार्गच अतिबिकटतेचा असल्याने ज्यांनीं म्हणून तेथील पाठच धरिली, त्यांच्याच पदरांत तेथील देखणेंपण हे योगस्थितीचें होऊं शकते. एरव्हीं हा अभ्यास हा पूर्व रंगांत जो भक्ति – उल्हास सांगितला त्यासारखाच जरी असला, तरा तेथे अव्यक्तामध्ये गति ही कदाचितच होऊं शकते. तेथील अभ्यास हा दीर्घकालचा असतो सर्व देह अभ्यासमय होणे हे जरी योगाच्या त्वरित अशा आक्रमणाने असलेले, तरी तेथे प्रारब्ध-संचित-कर्म इत्यादिनीं ही व्यवस्था दूर दूर अशी ढकलली जाते. जेवढे त्यांत निकराने बसले त्यांनाच ते तत्त्व माळ घालीत असणारे असे असते. म्हणून वैराग्यवृत्ति ही पावकनादास म्हणजे अग्नीचे महानादाने ह्या पावकाचे पावनत्वास छंदबळाने जेव्हा आपलेसे करिते, तेव्हां तेथे ह्या विषयांची धांदल होते व हीं इंद्रिये त्यामुळे तापलीं जातात. (४६)

संयमरूपी पाश घालून इंद्रियांचे न होतां, इंद्रियाचे थाटाचे कां घाटाचे कां डौलाचें न होता, आपला संयमाचा डौलदार हातच वर चढविला व संयमरूपी घाटी, पद्धत ही पुढे घेऊन इंद्रिये नेमून, तीं उफराटीं करून, अंतःरणाच्या कपाटामध्ये किंवा हृदयरूप गुहेमध्ये कोंडून धरिलीं अशा त्या तापलेल्या इंद्रियांना आंवरून धरून जे असणे त्यास संयम असे म्हणतात. हा संयमघाटी अभ्यासणे म्हणजे इंद्रियाना उलटवून व मुरडून हृदयहेम्नरूपी कपाटांतच कोंडून टाकणे होय.

ह्या विषयांनीं जशी कांहीं टक लाविलेली अशीं हीं इंद्रिये हीं जेव्हां ह्या कटकांनीं अलंकारिली जातात, तेव्हां तेथे ह्या कर्मकटकटीचें जें कांहीं प्रखरपण हे आपल्या अवस्थेनेच असते. तेथे जरी कटकट असें म्हटले जाते, तरी तेथे लागणारी जी व्यवस्थितता ती येण्याकरितां दुसऱ्या बाजूंनीं जेथे हेमरूप उपमासाहित्य सुवर्णाचे केलेले जेव्हां होते, तेव्हां तेथे ही जी हेमरूपी प्रतिबुद्धि ही बुद्धीच्या योग्यतेची होते. तेथे शुद्धतेची जी दिशा ती सुवर्णानें अथवा माती ही जाबूनदाने जशी सुवर्णाची निखळ अशी केली जावे. तेथे कर्मकपाटाचें म्हणण्याऐवजीं हृदयरूपी जे कपाट तेथे हीं इंद्रिये कोंडलीं जाऊन संयमास जन्म दिल्यामुळे, तेथे वैराग्यरूपी अग्नीचे जे पावनत्व त्याने हा वरील कटकट योजनेचा होऊन सुयोगाची केली जाते. हेम म्हणजे सुवर्ण खरे, परंतु त्या हेमाची योजना ही इंद्रियांनाच दूरचें दिसणारी दृष्टी ही पोहोचती करणारी असल्यामुळे, तेथे ह्या इंद्रियाना आपली ऊर्ध्व रेखा ही दिसूं लागून, ती काही एक विचित्र लीलाच नुसती योगागास परम सीमा देण्याकडे केलेली होते. येथे जे तप ते लोकलालनाकडेसच घेतले जाणारे. तपोभूमि म्हणजे हा देहच ! किंवा तेथील शक्तिबंध हाच ताणला गेल्यामुळे तेथे जे वैराग्याचें अंग ते लोकनटणेंच जसे काहीं ! तेथे जर ह्या देहास योग्य असा विराग दिला गेला, तर हें जे लोकाचे " पात " सांपडल्यामुळे स्वत्व – महत्त्व हे कदाचित बाधाचे होईल असा ध्यासच ! असा अद्याप ह्या अहंमन्यतेस अजूनहि थोडासा धीर दिला जाऊन, ह्या " पाता "चें मात्र जे अंतर तें वाढविलेच जाते. जर हा देह – जेथील " पात " हा सुयोजित केलेला – असा वागविला गेला, तर तो आपल्या योगयोग्यतेचा होऊन स्वतःचा हरविलेला जो आत्मभाव तेथे तो स्थिर होऊं लागतो : अशा ह्या त्याच्या स्थिर होण्यानें जे कांहीं देवकर्तव्य ते योग्यतेचे होते : परंतु हे जे देवकर्तव्याचें होणें व तेथील पैस हीच जेणेंकरून आपला ठावच पाहील असेच लोकवैचित्र्य असल्याने, महत्त्व हे भलताच फेरा घेऊन ह्या वरील लोकलीलेचे महत्त्वास येते. व येथील मूळचे जे शक्तिपाताचे धारण (देह) हेच जेव्हां तेव्हां व जेथे तेथे नडविले जाऊन, तेथील देहधर्मरूपी आचार कर्तव्यादि रूपरेखा हीच मुळीं दडविलेली होते. तेथील दृष्टी किंवा सगुण मुखाचें होणे हेच लपविल्यामुळे आपलेंच मुख हे त्या विशेष

प्रकृतीनें दडपिलेलें होतें. हा जो मळचा देह त्यास तर अभावाचा कळसच झालेला – तो कळसच आतां पडतो कीं काय असा बोजा ह्या देहघडीनें घातला जाऊन हा वरती पाहणारा शून्यत्वाचा झालेला जो तेथील आरसा तोच मुळीं हरवतो. व यामुळें ती शक्ति जी नटूं लागते व तेथील जें गौप्यगुजराण हेच मुळीं तिसऱ्याचें ऐश्वर्य ! हेंच ऐश्वर्य त्या योगनाथानें आपले म्हणविलें नाहीं, तर ह्या मूळच्या " पाताची " भलतीच त्रेधा !! परंतु ह्या धर्माध्यक्षानें हे जर कर्मवैचित्र्याचें गबाळे देह तापविण्यानें किंवा परम सीमेनें आतां आपल्या बळास आले पाहिजे असे केले, तर तेथील महत्त्वाचा झालेला जो देवनटनाच (दिव्य कर्माचें नैष्कर्मास जे येणें तें) हा सुधर्मधारणेस देऊन, तो त्या देहीं वावरीं कदाचित् कळवळा घेतो. व जर असा कळवळा आला, तर तेच ते श्रीगुरूचें औदार्य होय. तेथें श्रीगुरुच सर्वथैव ह्या अशा यथोचित क्रमास – योग्यतेस – आणून ह्या अशा " पाता "च्या त्रस्ततेस ह्या लोककचकचींतून सोडवून त्या आत्म्यास आपले हरविलेले जे बल ते देऊन त्यास उद्धरणच दिले असे करितात. येथे वैराग्य हे परम सीमेचें असें होते, विरागाचा सुदृढ असा बांधा देहधारणेचा असलेला जसा काहीं असा होतो, अध्येय हे आपलें जीर्णत्व विसरून तारुण्याचें ताजेतवानें असें होते. निद्रेचें जे महत्त्व, जेथें ही निद्रा ह्या स्वतःचें हरविणेंच जसे कांहीं – ते " मी कोठें होतो व जे काय हरविलों " असे विचित्रच माप पदरांत टाकते. ही निद्रा ही डोक्यानेच जशी चालणारी ती ह्या जेवणखाणे इत्यादि व्यापारांना पार दूरचें करते व येथें काळवखेच -- अज्ञानाचे होणे, जेथें स्पंदच नाहीं, वेदन म्हणजे काय, संवेदन कशास म्हणतात, प्राण म्हणजे तरी काय, मी देहधारी तरी आहे किंवा नाहीं कुणास ठाऊक, असे गडद ह्या बुद्धिबोधावर पडून तेथील अक्षरच मुळीं हरविले, तेथे धर्मधारणच मुळीं कोठें गेले कोण जाणे ! असे विचित्र असे अज्ञानाचें पाकळणे म्हणजे काय रोदनच करणारे असे दुसऱ्यास म्हणणारे कीं, " मी हरवलों " व मी जेथे असावयास पाहिजे तेथें कांहीं नाहीं असे ह्या मनाचे अनेक तरंग रंग ह्या बुद्धीची पार दाणादाण करून सोडतात. असे हे अज्ञानाचे घेतलेले जे रंग ते अतिविचित्र असून, तेथील धर्मग्राह्य ज्या देहधर्माच्या व्यवस्था ह्या मुळीं नामशेष झाल्यासारख्या होऊन, तेथें वैराग्य म्हणजे काय व ते कसलें असते याची विचारपूसच नाहीं. तेथे हा देह हा आहे कि नाहीं इतके शैथिल्य ह्या मनानें घेतलेले असें जे ओक्सा-बोक्सीचे जसे काहीं होणें हे कांहीं एक विचारच मुळीं पुढे येऊं देत नाहीं. स्वतःचें निमणें हेच ह्या निद्रारूपी काळोखानें पार लाबविलेले होऊन, ह्या देहधारणेचें जे शून्यत्व तेथेच जणूं तेच जसे कांहीं घेतले गेले असे ह्या शून्याचें आलिंगनच फार विचित्रतेची कहाणी सांगते. ह्या जीवसखीचे जे अक्षरानें असणें तेच हरवते. तेथें तेच पुन्हां स्थिर करावे म्हणजेच पुन्हा जे हरवलेले ते सांपडले होऊन, हा जीव हा प्रसन्नतेची मुद्रा पुन्हां धारण करतो व पुन्हा काळ क्रमीत असतो. असें हें संसारवैराग्याचें जे ईश्वरत्व तेच जर अनुवृत्तीने, अनुशीलाने स्थिर केले, तर तेथे दोन्ही बाजू तोलल्या जातात, समतोल अशा होऊन जातात येथे हे जे एक बाजू पार तळास जाणें व दुसरी बाजू वर येणे हें हरघडी होणारे असून, येथे ती ईश्वरत्वाची – स्वभावस्थैर्याची – बाजूच जरा महत्त्वानें घ्यावी, तेथेच जरा जास्त आपलेपणा देऊन राहावे तेंच ह्या जीवित्वास सांभाळते. येथे श्रीगुरुकृपा ही महामान्यतेची असून, तिचे माहात्म्य जेवढें वर्णावें तेवढे थोडेच – तेथेच शरण, तोच आश्रय, तीच संपदा, तीच ब्रह्मरुपो संपदा, तेच वैराग्य, तेच पद, तेच सर्व कांहीं असें जे मनाचें श्रीगुरुचरणीं लीन होणें, तेंच सर्व सौख्ये पदरांत टाकून, ह्या मनुष्याचें देवत्व हे श्रीगुरूंचें सर्वथैव सर्वैश्वर्य होय असेच पटविते. विश्वासास दाढर्यता येऊन त्रैलोक्याचें रक्षण पाळतें. (४७)

अपानवायूच्या तोंडास वळकट अशी, दृढ व चांगली अशी आसनमुद्रा लावून, मूळबंध हाच कोणी एक बुरुज तोच शृंगारिला, त्यासच शृंगार केला. पंढरीचा हुडा हाच ज्यांनीं नेमित केला, तेथे ' काया ही पंढरी । आत्मा हा विठ्ठल ॥ ' असेंच म्हटलें.

आशेचे संबंध तोडिले, अधैर्याच्या डगरी सोडून दिल्या, अध्येयाच्या कठिण जागा मागे टाकल्या, निद्रारूप अंधारच त्यानीं शोधून शुद्ध केला, अंधार नाहींसा केला : तें कसे अडविले जातें ते जाणून घेऊन, आपलें ध्येय ठरवून व त्यानीं तेथीलचे अध्येयाचे होणे हे शोधून धैर्याचें ते असेच सर्वथैव झाले. निद्रेचें जे वैचित्र्य व तेथीलच्या अज्ञानाच्या वाटा ह्या शोधिल्या.

श्रीगुरुसान्निध्य, संतसेवा यानींच हे कष्टतर असे जे सहज-योगसहज-प्रसंगानें आपलेसे केलेलें दिनक्रमण-अभ्यास-दिनचर्येचें ज आचारविहारादि व्यवहारणे अथवा व्यापार हे आपोआपच आपल्या मुळास पाहातसे असे होतात येथे तें मुळच आपल्या योग्यतेस येण्याकरितां वेळांनीं सुयोजित असे होऊन तें नेहमीं त्याच अभ्यासाचा अवलंबच करतं. ध्यानस्थैर्य हेच त्या आसनानें सुव्यवस्थित असे करून – तेथे आसन हं जणूं वज्रभिंठीच पडलेली असे हे या देहाचे – यष्टीचें – बांधून टाकणे होते. हठयोगाने ह्या मनाचें आकलन करणे तें आसन घालूनच होते कसलेहि ह्या इंद्रियांचे त्या विषयांशीं एकजीव होणे झालेले असले, तरी त्या वासनेवर शून्य घालूनच, ह्या देहाला जसें कांहीं वज्रासनानें जखडलेले असे करून, तेथे त्या तापामुळे – ह्या इंद्रियाचे व त्या वासनांचे हरघडीं होणारे जे द्वंद्व – जेथे हे चंद्रसूर्यरूपी श्वसनच पार घेरले जाणारे व त्या विषयांनीं आपलीच सरशी जेव्हा तेव्हां करून ह्या जीवात्म्याचें सर्वस्व त्या विकाराचें केलेले जें, तें आता सर्वच्या सर्व आकर्षिले गेल्यामुळे, त्या विषयांच्या वासनांचें व ह्या इंद्रियाचे जे चुळबुळणे हेच मुळीं आसनाचा दाब पडल्यामुळे नाहींसे होतं. (४८, ४९)

वज्रासनाने उत्पन्न झालेला वज्राग्नि किंवा वज्रयोगक्रमानें उत्पन्न झालेला जो प्राणाग्नि तेथीलच्या ज्वाळानीं सप्तधातूची त्यानें होळीच केली सप्तधातु हे अग्निच झाले, अग्निच प्रसवूं लागले. देहामधील जीं यंत्रें – अवयव - इंद्रियगोलक - तीच ह्या व्याधीच्या मस्तकानीं पूजिलीं. तेथीलचीं गोलकें हींच त्यांनीं त्या देहामधील यंत्राच्या उपयोगाचीं केलीं शरीरामधील देवदेवता, यंत्रतंत्रदेवता, षट्चक्रें उपयोगाचीं करून व्याधींना बळी घेतले, व्याधींचा नाश केला सिसाळीं यंत्रें पूजिलीं म्हणजे व्याधींच्या मस्तकपंक्तींनीं देहामधील यंत्रे पूजिली गेलीं.

तेथे संयमाग्निरूपी ज्वाळाच उदयास आली-तेथे ही ज्वाळा इतक्या प्रखरतेची झाली कीं, तिनें ह्या श्वसननलिकेमधून वाहणारें जे धारण त्यास योगस्थितीस आणलें तेथे चित्त जे अनेकधा झालेले-विदीर्ण झालेले-तें आतां आपल्या मुखकांतीचें झाल्याने, इतर ज्या अनेक धाटी म्हणजे चित्ताने घेतलेले जे प्रकार-अथवा चित्त हे जे अनेकविधतेचें झालेले तें मुळीं एकवटल्यामुळे – तेथे योगज्वाळाच असे ते मुखास आले अनेक जीं मुखें-जीं विदीर्ण, भ्रांत, उत्साहशून्य, बीभत्स अशी तीं सगळींच्या सगळीं मुखेच जणूं आंत जन्मलेल्या योगाग्नीने पावनत्व घेऊन, एक श्रीमुखच पाहणारीं अशीं होतात. अनेक लोकांचें व्यावसायिक चित्त हें बहुविधतेच्या रंगानें असलेले व विषयानीं जर्जर झाल्यामुळे, ह्या वासनानीं आपलीशीं केलेलीं जीं रूक्ष अशीं होणारीं मंडळे मुखे तींच त्या योगाग्नीने जणूं आंत रोखून ठेविल्यामुळे, ह्या विषयांचे जे नाहींसे होणें, निमणे, हं जसे कांहीं तेथील बधाचें एक फुटणेच होय. ते ते विषयबंध, वासनाकल्लोळ, जसे कांहीं बुडबुड्याचे असे असणारे, व ज्यामुळे हा मनुष्यप्राणी अति गलितगात्र होऊन महत् बंधच असे त्यास महत्वाचें करून स्वतःच त्यांत फसवून घेत असतो. असे ते वासनाबंध, विषयदृष्ट, असे ते आता फटाफट् फुटूं लागून त्या मनुष्यास आपल्या सगुणसतेजतेच्या उत्तमत्वास आणून सोडतात. त्या बुडबड्याच्या फुटण्यानें तेथे वरील बीभत्स अशीं जीं मुखे-जी एक महत् व्याधीच अशी झालेली-तीं आता तेथील कोंदाटलेले श्वसनच संथ धारेने वाहू लागल्यामुळे, तेथील द्वंद्वच नाहीसे होऊन, तें त्या तेजोमय अशाच श्रीमुखाचे झाले. आतां देह हा जसा कांहीं एक यंत्रभारच सुस्थिर्तास आणला गेला.

तेथे वरील आसनमिठीनें त्या देहास सुनियंत्रितपण असे दिलेलें होऊन, तेथील मुखे हीं मुतेजाचीं झालीं तेथे व्यापार, व्यवहार, इत्यादि क्रिया ह्या सुरळीत होऊ लागून, तेथे ह्या देहरुपी यंत्राचे एक तऱ्हेचे पूजन भोगविलासांनीं होऊन, ह्या देहास जणूं जाणीवच होत असलेली कीं, हे जे मनुष्यदेहधारण हे अतररचनेने सुयोजित केलेले असून, सुनियंत्रितपण हें तेथे ज्या धर्मधारणेने होत असते तेथील जाणीव ही योग्यतेनें असते. हीं इंद्रियरुपी यत्रे हींच आपला यथायोग्य बांधा घेऊन किवा आपला जो " चारु " बाधा हाच त्या तेथील धर्मधारण करणाऱ्या पुरुषास देऊन, तेथे त्या पुरुषाचें ह्या देहामध्ये जे वावरणें त्याचेच अनुरोधानें वर्तणारीं अशीं होऊन असतात. (५०)

मग कुंडलिनीरूप पलिता आधारीं उभा केला. त्याची ती तेथीलची प्रभा मस्तकापर्यंत चोज करू लागली – प्रकाशाची झाली – चोज घेऊन आली; व त्या प्रभेमुळे मस्तकापर्यंत चीजच होऊन आले – वस्तुच जशी दिसूं लागली अशा चोजाचे उत्तमत्व – चीजच एक संग्रहास योग्य अशी : योगरूप पर्वताचा माथाचा गांठला – आपलासा केला. योगरूप पर्वताचा माथा प्राप्त करून घेतला. (सोपाना म्हणजे प्रवृत्तिकर्म पथाला सोडले नाहीं )

अशा तऱ्हेने त्या श्वासरूपी क्रियेचे जे अंगभूत ' चंद्रसूर्य ' त्यांनींच ह्या ' दुक्कुलास ' आपलेसे करून ( किंवा ह्या ' वासासि जीर्णानि'चा त्याग करून तेथील नवजीवनास येण्याने असणे) म्हणजे ते त्या क्रियेस पाहण्यास लावून, तेथे त्या आधारचक्रीं असणारे जे आपलेसे करणारे जे पारुसणे तेच उप योगास आणीत राहिले ह्या ज्वाळेनें त्या विकाराना जसे काहीं प्रेमच दिले असे होऊन, ह्या देहधारण करणाऱ्या व्यक्तित्वास पीततेजाचे अक्षरास आणून, तेथे एक तऱ्हेचे माणसाळणेच केले. विकारांचें फुगणें हे वळवून त्या टेंभारूपी ज्वाळेने जे पवित्र असे चैतन्यच शोभायमान झालेले – तेथील पूजन भोग देऊन किवा घेऊन होणारे असे विकारणेच वाळवितें : वाळविते नव्हे, नर ते विकारांना आपल्या आगठ्या खालचे करून, आपल्या ताब्यात राहणारे असे करुन, हे मस्तकच जसे काहीं उपकार स्मरणारे असे विचित्रतेचें करतं. तेथे ह्या देहधारणेस जे कांहीं जेवणें, खाणे, पिणे हेच एक तऱ्हेचे भोगवैभवच. परंतु ते योग्य असें योगधारणेचें – सुयोजितेचे – अक्षरअगाचें करणे म्हणजेच ते योगयोग्यतेचे असे करणे होय.

असे झाल्याने तेथील जे योग्य असे धारण ते योगयोग्यतेचे झाल्यानें, धर्मधारणरूपी जे कांहीं वात्सल्य ते पाळण घेवो अशा आत्मभावनेनें होऊन, तेथे ते योगधारणेचे अक्षर किवा प्रणवधारणेचे जे नाम तें स्थिर होऊं लागून, आपल्या विद्यमान अशा असलेल्या आहेपणाचें जे धर्मधारण त्याप्रत येतें. तेथे अंजनच जसे कांही डोळ्यांत घातले असे सूक्ष्म मुखाचे जे अव्यक्त ते ' रामनामच ' जसे कांहीं त्यास येणें करून, तेथे संयमच संयत असा होतो – त्या सूक्ष्मतर अशा ' राम ' अशा मुखाचा होतो. तेथे स्वर हा पाहावा तों त्याने सर्वच्या सर्व व्यंजनेच ओलांडून त्या एका नाममुखातच स्वतःस बसविणे केले तेथे ह्या देहास येणारे जे पुत्रवात्सल्य, नामप्रेम, धर्मधारणा हे येऊन तेथे जे लागणारे असे लक्ष्य द्विजत्व-वाच्य हे येऊन, प्राणशक्तीचे जे अभेद्य प्रखरत्व, सूक्ष्मतम अव्यक्त, सर्वग कुटस्थ असे जे बुद्धीचें संभाव्य त्याप्रत येऊन, तेथे हे अंजनच डोळ्यांत घातल्यासारखे असे दृष्टिवेधन होऊन असलेलें. (५१)

नवद्वाराच्या दारांत इंद्रियनिग्रहाची खीळ घालून मस्तकांतील ककारांतींची म्हणजे सहस्रदलांतील दशमद्वाराची खिडकी उघडली ह्या नऊ द्वारें असलेल्या ह्या देहासच जणूं चित्तच सर्व असें करून, ह्या इंद्रियांना आकळून धरून, ह्या सूक्ष्म अशा बोलण्याचे जें रहस्य – जणू काहीं ह्या ब्रम्हरंध्रामधील खिडकीच उघडून तेथील शक्तीचें झेंपलें जाणारे असें आपलें बोलणें करून ठेवले. (५२)

प्राणशक्ति चामुंडे । प्रहारूनि संकल्पाचे मेंढे ।
मनोमहिषाचेनि मुंडें । दिधलीं बळी ॥ ५३ ॥
चंद्रसूर्या बुझावणी । करूनि अनुहाताची सुडावणी ।
सतरावियेचें पाणी । जिंकिलें वेगीं ॥ ५४ ॥
मग मध्यमा मध्यविवरें । तेणें कोरिवें दादरें ।
ठाकिलें चवरें । ब्रह्मरंध्र ॥ ५५ ॥
वरी मकारान्त सोपान । तें सांडोनियां गहन ।
कांखे सूनि गगन । भरलें ब्रह्मीं ॥ ५६ ॥
ऐसेनि जे समबुद्धि । मिळावया सोहंसिद्धि ।
आंगविताती निरवधि । योगदुर्गें ॥ ५७ ॥
आपुलिया सांटोवाटीं । शून्य घेती उठाउठी ।
तेहि मातें किरीटी । पावती गा ॥ ५८ ॥
वांचूनि योगाचेनि बळें । अधिक कांहीं मिळे ।
ऐसें नाहीं आगळे । कष्टचि तयां ॥ ५९ ॥

(५२) प्राणशक्ति चामुंडे........=प्राणशक्तिरूप चामुंडा देवीस संकल्परूपी मेंढे मारून मनरूपी रेडे-टोणगे-त्याचीं मस्तकें जणों बळी दिलींच (५४) चंद्रसूर्या बुझावणी=इडा व पिंगला नाड्याचें ऐक्य अनुहाताची-अनाहताची सुडावणी=अनुहातध्वनीरूपी गजर. सतरावी=अमृतकळा. जिंकिले-जिंकिले. (५५) मध्यमा=सुषुम्नानाडी मध्यमा मध्यविवरें=मध्यमा जी श्रुतिगोचर तिच्या विवरें म्हणजे मार्गानें. कोरिवें दादरें=कोरीव अशा जिन्यानें ठाकिलें=गाठलें चवरें=शेवटचें, ध्यानाच्या शेवटचें, माथ्यावरचें (५६) मकारान्त सोपान=तुर्यावस्थेचा जिना, मकाराचा अंतच पाहिला असा तो मार्ग मागे टाकून देऊन सर्व गगनच बगलेत मारून ब्रम्हीं म्हणजे ब्रम्ह जे त्याचे झाले - तेथेंच पुरून उरले. कांखे सूनि - काख सूनि - गगन=गगन (माया) कांखेस मारून (५७) मिळावया - मिळावया=आपलीशी करण्यास आंगविताती=आपलीशी करून घेतात निरवधि=सहजतेनें. आंगविताती निरवधि योगदुर्गें=योगाचे बिकट माग स्वाधीन करतात; योगशक्ति आपलीशी करतात; योगशक्तीस तात्काळतेने आपल्या स्वाधीन करून घेतात (५८) सांटोवाटीं=मोबदल्यांत, देवघेवीनें शून्य घेती उठाउठी=अव्यक्ताचे होऊन असतात (५९) वांचनि योगाचेनि बळें=योगसामर्थ्यच फक्त. अधिक कांहीं मिळे=जास्त कांहीं लाभतें असे नाहीं आगळे=विशेष. कष्टचि=नुसते श्रमच.

संकल्परूपी मेंढे मारून मनरूपी महिषाचीं मस्तके प्राणशक्तिरूप चामुंडेस बळी दिलीं. अशा तऱ्हेनें सर्वस्वीं त्या महत् शक्तीनेंच हा देह नियमनास घेण्याचा अभ्यास केल्यानें, तेथे ह्या वासनांचा पार प्रकारच बंद केला गेला. मनाचे आकलन आपल्या हातचे असे करून ठेवले.

तेथें बोलणारा जो प्राण तो सर्वतोपरी आपल्याच सत्तेचा असा केल्यामुळे, ह्या मनाचें संकल्पास येणें हेच नाहींसे केलें. तेथें संकल्प करणारीं जीं मुंडकीं तीं जणुं कांहीं एक ढेरच्या ढेरच पाठीस लागलेले असे - अनेकत्व ह्या वासनाचें म्हणा किंवा ह्या विषयाचें म्हणा - ते जसे कांहीं एक ढेरच जणुं त्या गंधर्व नगरास टेकलेलें असे कदाचिततेचे, कदाचित आहेपणाचें होय. परंतु तेथें हा जिव्हाळाच पाठ करणारा झाल्यामुळे, हें म्हणजे एक व्यर्थतेच्या आशेनें असणे जे - ते म्हणजे एक मृगजळासच जणूं मुद्राप्रकार समजून त्यांत फसत असणारें असें हे द्विजदिव्य महदाश्चर्याचें असते.

असें तें मनाचें – मनोरथाचें – राज्यणें हे किती तरी विचित्र असें आहे. म्हणून ह्या मनाचें मुंडणे हे अगोदर करून, तेथे ह्या नाममाहात्म्याची करावयास लागणारी जी ही देहरूपी कुळवाडी – तेथे एक तऱ्हेचे त्या कुळीं असणाऱ्या देवतेशीं संलग्न होऊन करावयास लागणारें जे मनाचें आकलन – मनाचे स्वाधीनपण – मनाचें जिकणे – मनास वश करणे – हेच त्या ब्रम्ह धुंडण्यास लागणारे तपस्तेजास तप्ततेस आणतें. तेथे बुद्धीचे जे काहीं सहस्रतुल्यतेचे होणे – ते म्हणजे स्वतःचे सहस्रधा असें फाटणे ह्या चित्ताचें जे – ते ह्या संकल्पांनीं करून व विकल्पानीं तेथें बागुलाचा मारा देऊन व आतच पाय करावयास लावून, नेहमीं मागेच पाय – पुढे जाण्याचा हिय्याच नाही – हिमतच नाहीं असे केले. परतु ह्या सईने आपले संघपणच सैंघ म्हणजे दाट असे करून ह्या संकल्पासच जेत दिली. तेथे संकल्प हे जिरले जाऊन ह्या विकल्पानींच ह्या विषयाची पाठच जणूं थोपटली. असें हे वैचित्र्य जिव्हाळयाची आठवण करते व देववैभवच मोठे असे बुद्धीच्या आवारात फसून असते. यासच आश्चर्य असे म्हणतात, यांतच विस्मय बसतो. आणि एवढेच होऊन असणें म्हणजे कांहींच प्राप्ती झाली नाहीं असे झाल्यामुळे, पुढील पायरीकरितां महत् धडपडणे हे होत राहाते. परंतु हे वरील जे आश्चर्य तें आश्चर्यच असे करून राहिल्यामुळे, तेथे मुळातच तितकी उत्सुकता! इतर सर्व कांहीं बाजूस करून, जरा निर्जन प्रदेशाकडून – दुसऱ्या एकाद्या गावाकडून – झेपण्यास घ्यावें लागणारे असे हे कार्यवैचित्र्य तेव्हाच भेद घेते व नंतरच नैष्कर्म हे उगवले असेच होत असल्याने, तेथील भार हा हलकाच जेणे करून होईल असेच चालणे केले तरच बरे. नुसती बडबड, नुसतें बडबडणे, भलतीच फडफड करण्यानें जसे कांहीं तें फासांतच – वागुरांतच – नितबिनीतच स्वतःचे फसणे केलेले : अज्ञाने होणारे जे देहलिंग उखाळणे हे महत् संकटच! असे हे संकल्पाचे मेढे व त्यांचे चारित्र्यवर्णन हे असून तें कसे बरे दुरुस्तीस येईल? तेथे त्या प्राणशक्तीसच शरण जाणे करून चालले, तरच ती जिव्हाळयाचे प्रेमास येते व कदाचित् रद-बदलीने अथवा सर्व संभार घेऊन, अथवा आपणच तेथील विश्वास घेऊन, अथवा कर्तव्यमाहात्म्य पुढे करून, अथवा वैचित्र्यतेचे अंग उभारून, त्या प्राण्यास वरील ठिकाणीं " त्या जागीं हाच " असा जो कांहीं " शेरा येणे " त्यांतून काढतं. त्या " प्राणक्रिया चामुंडेचे " गायित्री स्मरणानेच पूजन करून असावें, तेव्हा तेथे शांतपण हे सुगम्य तें ह्या वासनांना येऊन मन हे स्थिर होते म्हणून ह्या योनीमुद्रेचें झांकाळणें का बरे होऊं द्यावें! तेथील क्रियाकलाप हा अभ्यासिलेलाच अभ्यासावा! पाहिलाच पाहावा! केलेलाच करावा! तेथेच रमून असावें! तो म्हणजे दिवसांतून एकदा तरी देवपूजन हे करावेच! व तें सकाळीं, नाहीं तर दुपारीं, नाहीं तर जेवणाचे वेळीं तरी, पण देवास फुले पाणी इत्यादिनीं पूजन हे द्यावेच, तरच तें बरे होय. तरच तें ब्राम्हण्यास जागणे होय. असे असणे तरच तें ह्या संकल्पांना हार देऊन खऱ्या कळकळीची जी जोपासना तेथे येऊन, ह्या मनायाचे धारण हे व्यवस्थित असे करून असते. तेथे असलेले जे ह्या पुरुषाचे आपल्या योग्यतेस येण्याकरिता लागणारे जे नामस्मरण, क्रियाकरण, गुरुविधान, सेवागहनत्व, धर्मधारण हेच एक आपला परममित्र असून, तो सवगडीच – तो हितगुजाची गोष्ट करणारा असून, त्याजशीं कधीं रुसूं नये! त्याशीं कधीहि मांडू नये! त्याचीच गोष्ट नेहमीं आपलीशी करून, त्याकडे लक्ष पुरविणे करावे, म्हणजे कसल्याहि प्रसंगांतून तो आपला बचाव करूं शकतो – बचाव करूं शकेल. हे एक ह्या जीवदशेचें मोठे गुज असून, तें कधींहि दृष्टीआड होऊं देऊं नये. येथेच दृढतेनें असणें म्हणजेच श्रीगुरुसेवनच केल्यासारखे आहे. (५३)

ते म्हणजेच – ह्या चंद्रसूर्यांचे आपल्या जाणिवेस आणण्याचें करणें होय – ते आपल्या समजुतींत आणल्यासारखे होय. तेथील द्वंद्व काढून ते अक्षररूपी पांघरुण घेणे असते. स्वतःस अक्षराने आत्मबलास पाहाणें होते : प्राणरूपी शद्वाचें मिळवणे हे प्राणांत केल्यासारखे होतें. तेथील बोधरूपी बुद्धीस वेदन, संवेदन, प्राणस्थैर्यास आणून असणें होतें. आतां पिंडामध्ये वाहणारा

जो ध्वनि, ज्यास "अनहात" असें म्हटले जातें, त्याची ह्या अनेक व्याप किंवा व्यवसाया-मधून सोडवणूक होऊन, तो "मुखीं राम असणे" असा केला जातो. ह्या जीवदशेस एवढे उपकारभाराचें केलेलें होऊन, ती प्रेमशरणरूपी श्रीगुरूचा जसा कांहीं आनंद त्याप्रत येते – श्रीगुरुकृपा-रूपी आनंदच प्राप्त झाल्यासारखा. येथे सहज उपचार हे होत असून, तेथे जे भाव – विभूति – ज्यानीं ह्या आत्म्यास त्याचें हरवलेले सामर्थ्य दिलेलें तें एक तऱ्हेनें दिव्यच देणारे असून – ते एव्हां श्रीगुरूची जागा पटकावितात – जागी मानिले जातात. त्यानीं स्वभावाचे अतिरम्यतेस पाहिल्याने तेथील धन्यवाद हा आपले आगचें प्रेम त्या भावास देऊन, तेथें जी योग्यता ती "श्रीगुरु" च जसे कांहीं !! इतके ह्या मनानें दिलेले असे आत्मबल त्या त्या विभूतींना महान् उपयोगाचें असे करून असते. अशा अनेक विभूती आपआपले महत्त्व ह्या मनुष्यप्राण्यास देऊन – तेथील स्वभावस्थैर्य, आत्मभावन ह्यातच स्वतःस बसवितात प्रेम हे परस्पर विनियोगाने अतिरम्य, अतिप्रबल, अतिउत्सवाचे, ऐनप्रसगीं धीर देणारे, भिऊं नको म्हणणारे असे महत दिव्यच जणं – साक्षात देवत्वच – देवच 'साक्षित्वाचा' – तेथे अनुसरले, व्यवहारास आले असे दिसं लागतं ह्या एकंदर विस्तारास पाहिले असतां तेथे अति आनंद हा विस्तीर्णतेचा होऊन प्रेमांतच मुरून असतो चराचराच्या ठिकाणीं अशा तऱ्हेने दैवतच जणं आपले देवपण हें कर्मभारानें उचलून धरीत असलेले असे असून, तेथें प्रसन्नपणच! परंतु हे ओलांडून पुढील पायरी पाहावी रस्ता आकळावा इथवरच असे असं नये पुढे चालं लागून आपल्या क्रमाचें जे आक्रमणे ते सिद्धतेप्रत आणण्याचें जे काहीं आचरण अथवा अभ्यस्त असणे तेंच करावे तेथेच रमावे अशा तऱ्हेचें हे जे ह्या जीवदशेंने उपकार स्मरणे हे तेथील जीवनकलेसच पार विरघळणे करतं करिता तेथें रक्षण देणारे जे द्रव्यबल – म्हणजे जे ह्या मनुष्यदेहाचें जन्मास येणे व तेथें लागणारे जे साहित्य – सामुग्री – तेथें ह्या मनुष्यास रक्षण देणें करावे लागते. तें रक्षण म्हणजे एक तऱ्हेचें नेट देणे होय टका होय मित्र करणे होय सखीसवा करणे होय तेथें ह्या मनुष्यजीवितास तें माणुसकीचें बल हे द्रव्यद्वारा, मनुष्यद्वारा, सखीद्वारा, गृहद्वारा, भाव जोडून घेऊन, साकारसगुण संभावनद्वारा मैत्रीने करावें लागत असतें. तेथें ह्या मनुष्यास आपलें आश्रयाचे असे करून ठेविलेले जर, तरच तें उपकार यथावलाचें किंवा बलसंवर्धनाचे होतात ह्या मनाच्या वृत्तीवर एक तऱ्हेचे जीवन-उपक्रमाचे पूट दिल्यासारखे होते तेथें जर कां हे उपकार करून तेथील सर्वच्या सर्व बाजूंना (देह, उदर, भाव) आपल्याच भरणाच्या उपयोगीं असे केलें, तर तेथें त्या उपकाराचे काय बरे महत्त्व? येथे हा जो उपकाराखालीं दडपून गेलेला मनुष्य जर त्याच्या माणुसकीनें संगोपिला गेला, तर मनुष्याचे जे एक स्वाभिकाम हे नटविले जाऊन, तेथील देवतेचे अंग हे जणं स्वर्गीय दैवच अनामत असें ठेविलेले होऊन, ते जे दैविकेचे औदार्य त्यास उचलं शकतें म्हणून हे जे माणसाने मानिलेले गुरुपण ते ह्या अनेक पदार्थ विभूति (उदाहरणार्थ, कुमारीच्या हातांमधील शंखवलये-तेथे ती कुमारी हा जगी काहीं श्रीगुरूचें माहात्म्य वागवीत असलेली) व तेथे असलेलें वृत्ती-औदार्य हे ह्या मनुष्याच्या मनास सुप्रसन्नतेनें तेथील व्यवहार हा सुमित्राचा जणं करून, ह्या मनोबलास एका प्रेमाचे असे वळण देऊन, तेथें लागणारे जे तपोतेज तें पुरविते : तेथें तेज हे पुरविलेच पाहिजे. मित्रत्वाने असणें हें पुरेपणास आले पाहिजे आत्मत्वाचें जे विश्वासउपक्रमण हे ह्या जीवनयात्रेचें एक रम्य असे स्थळ असून, तें ह्या पदार्थमात्रांना व प्राणिमात्राना जसें कांहीं आपलेपण देऊन स्वभावभावाला स्वाभिमानाचे करून असते म्हणून ह्या जीवनकलेचें जे उदारपण अथवा ज्ञानदिव्य ते ह्या स्वभावाने उत्तमतेच्या अशा रसाचे होऊन, तेथें तेजासच तमाचें होणें होतें, अथवा तम म्हणजेच तेज होय. हें तेज हेच सुतेजतेचे मनसामर्थ्य असून तें ह्या मनास मनुष्यास लागणारे वृत्तिदाक्षिण्य पुरवून असतें. तेथें ईश्वरभाव हा मुखाचा झालेला होतो. आपले सुखदुःख सांगून केलेलें तें

सहानुभूतीचें होते व समब्रम्हास लागणारा अर्थ पुरविलेला होतो. ह्या वागीश्वरीसच जसे कांहीं अलंकृतपणच !

अशा तऱ्हेनें ती जी ज्ञानकळा, जीवनकळा, अथवा सुवेगाचें जे पार्ण.दारपण हे जिकिले जाते, ते म्हणजेच ह्या बोलीचे जे नीटनेटकेपण अथवा रम्य भासणारे असे मनःप्रसन्नत्व त्यास देणारे असते. तेथे ह्या जीवदशेनें घेतलेलें जे शिवविलीनत्व त्यांतच तें तरणं करून, ह्या ससारसागरांतून तरणोपायाचे असून, तें म्हणजेच ह्या नामसूत्रानें रंगविलेले असें श्रीमुखच – सुतेज, सुबल, सुयंत्रित असें ह्या देहास करून असणे होय व तेंच ह्या जीविताचे प्रेमनिष्कर्षानें असणारे असे स्वानंदाचे असते. तेच जे काहीं योग्य अशा ज्ञानबीजाचा जो विस्तार व व्यवहार त्याने करून असले, तर तें एक दिव्यच पदरांत पडलेले असे होते. म्हणून ह्या मुद्रेचें जे काहीं आपल्या योग्यतेस आणून योजनेस घेण्याचें करणे म्हणजेच देवपणाचें जसे काहीं अंगास जाणले जाणे असते. (५४)

असे ह्या मुद्रेने घेतलेले जे नामसाहित्य ते वरील अमृत सरोवराचे जसे काहीं केलेले असून, माथ्यावर असणारे जे ब्रम्हरंध्र तेथेच परिणाम करणारे होते : तेथें जी "सुषुम्ना" नाडी तिचा मार्ग सापडल्यामुळे तेथे हा एक नवीनच जिना सांपडल्यासारखा असतां तेथे ह्या कारण देहानं वागविलें जाणारे जे आठवण, स्मरण, इत्यादिचे जसे काहीं नेहमीच ताजेतवानं असणे, ते ह्या शब्द-ब्रम्हास अंतररंगाचें साहित्य पुरते करते: तेथेच आनदाचे एक जणं गृहच हे जे शब्दाचें नामसाहित्याचे गृह म्हणजे अति रम्य असे असून, तेथे अनेक अशा ज्ञानबीजांचा विस्तार हा जसा कांहीं ठेवाच महद्‌भाग्याचा असा असतो तेथे धर्मबीजच ह्या प्रणवास झेपून असते ;असे ते जे मुद्रेचें माहात्म्य हे जणं ब्रम्हासच पैज देणारे असून, ह्या जमुना-यमुनेनें जैत दिलेले असे होय. म्हणून ह्या द्विजत्वानें घेतलेला संसार हा किती विलक्षण अशा प्रयोगाचा विस्तार असून, तो काहीं लेखणीच्या आटोक्यांत नच येणारा. आणि म्हणूनच तेथे अभ्यासानं अनुभवास येणेचे करावे तरच ते तेथील महत्त्व दोन्हीं बाजूनीं झेपले जाते - ते, त्या विद्येसच विद्यमानास आणणारे असे पूजनच !!!

म्हणून ह्या द्विजत्वाचें असे काहीं चुळबुळणे ते महान् अशा अर्थास पाहाणारे असून, तेथे जिव्हाळाच उपयोगीं असा असतो. खरे प्रेम, खरा जीवजिव्हाळा, सर्वस्व, प्राणापेक्षाहि जास्त असे जे तेथे संभाळणें तेच येथे उपयोगी असे होय. तेच एक जर पोसले, पाळिले, तर ते आमचें यथाबल, यथाक्रम, यथावेला, यथोचित, यथाप्रामाण्य, यथाओखद, वक्तपणाचें वक्तशीर किंवा वेळ हीच मुळीं देवतेचे ऐश्वर्यच नटण्यास आलेली अशी होऊन, तेथे सुफलताच उगवलेली होते. तेथे ह्या अक्षराचे अगाधत्वाचे आश्चर्यांत न फसतां तेथील आकाशच आपलेसें करून, तेथील गगनींचा चंद्र हा अर्धतेचा नच होऊं देतां, त्या चंद्रबलाचे जे नागतत्त्व त्यासच आपलेसे करून, त्या अक्षरास जिंकणारे असें व्हावे – व तेंच मुळीं ब्रम्हमुद्रेचे असे झाल्यानें, तेथील ऐश्वर्य हे असलेले ते त्या विद्वज्जनाच्या आपल्या प्रचुरतेच्या चातुर्यानें असं शकते अथवा असते. तेथेच ते त्याचे भाषण अथवा वक्तृत्व याने जशीं कांहीं कसोटीस लाविलेली अशी ही वाणी त्यासहि पुरून उरते. (५५)

तेथील शद्वासच जणूं ब्रम्हाचा वेष दिलेला असें तें त्यांचे ह्या देहधारणेचें महत्त्व ते तेथेच स्थिर असें होते "म"कारान्त हाच जो ह्या अक्षराचा अगाध समुद्राचा केलेला असा खोल अर्थाचा असून, तेथे त्यांनीं जेवढे व जसें पाहिजे तेवढे व तसलेच अक्षर घेऊन, त्यासच जणं ब्रम्हाचा पोशाक दिलेला : तेवढेच घेऊन ह्या देहासच जणूं आकळलेलें असे अक्षरमहत्त्व अथवा शद्वसोपानगहनत्व होय. ओठ भिटलेलेच असे हे मुख त्या "ओम्" चा जणूं तळच पाहात असणारे असे असते तेथील गहनत्व हें कांहीं सहजासहजीं हातीं लागणारें नसून, तेथील श्रम हे महान् कष्टाचे असतात, जसें कांहीं डोक्यांत

तारेच चमकणारे. तेथील अर्थ हा बुद्धीच्या आटोक्यांत नच येणारा असून, ते एका योगबलानेंच आपल्या योजनेस येणारें असे असतें. तेथें जी संपत्ति ही नुसती बुद्धीची असून, ते जे ज्ञानदिव्य हे तेथे महदंतरानें असल्याकारणानें, तेथील वाकसृष्टीचें जे गुह्यगंभीर ते बोलण्यास येणें म्हणजे ह्या अर्थाचें आपल्या अनेकविधतेचे जे ध्वनन किंवा स्वन तेथेच स्वतःस शोभा देत राहून, हे जे मनुष्य-मात्राचें " बहुस्याम् " मध्येच पुरविलेले होय. ते जर हुडकण्याचे करण्याचें मनावर घेतले, तर हा एक बिनभरपाईचा जोजार होऊन, ह्या मनुष्यजन्मास येण्याचे जे कांहीं पुण्य ते इकडे तिकडे विखुरले करणे म्हणजे काय त्यास तान म्हणता येईल ? म्हणून ह्या अशा बिकट अशा निरर्थकतेचे जे विचार – त्यास आपण घटकाभर दुष्ट सत्व असे म्हणूं – त्यास आपलेसे करणें म्हणजे एकसुद्धा मी आपला कष्टाचा पैसा न मिळवतां जें कांहीं मजजवळ होते नव्हते तेच हरवणे करणे म्हणजे तेथील अर्थच न सांपडणे होय. करितां हे जे ज्ञानधन ते आपल्या योग्यतेसच जेव्हां येते, तेव्हांच कांहीं तरी प्राप्तीचा पुरवठा हा आपल्या देहयष्टीस जोमाची करावी असा अर्थ पाहून, तेथेच रमणीयत्व जर घेईल तरच बरे ! तरच तेथे हे जे वर दिलेले "पंचत्व" तत्व ते ह्या मनुष्याचे जसे काहीं एक परंपरेने आलेले असे कुला-चार महत्त्व असून, तेंच व्यवस्थिततेच्या अंगाने करून असणे व त्यास लागणारी जी दुसऱ्याची, अनेकाची, व बहुतांची सहानुभूति पुरती करणे असून, तेथील देवतेस आपले अवयव देणे होय कांहीं खर्च न होतां जसे देवत्व देवत्वच उरते. तसे येथे अवयवाचे देणे करून अव्ययत्व अव्ययतत्त्वास आणणे होय. म्हण-नच ह्या समब्रह्मबुद्धीचें जे गहन असें विवरणे ते अतिजीवित्वकाजाचे असून - जीवनहेतूचे असून – ते ह्या संतांनीं आपलेसें केलेले तेथेच नेटानें राहाणें करावे. तेथील सेवाविधानादिनीं व वर्तनद्वारां ह्या देहास उत्तम तऱ्हेच्या नेटाने वागविणे करावे हच एक मुख्य कर्तव्य ह्या मनुष्यदेहास दिलेले असे आहे. असे जे तेथे असणे ते आपल्या अंगच्या प्रेमानेच जर उचलिले, तरच ते अंगवळणी होऊन, एक तऱ्हेचा स्वभावच साहित्यास आला असे होते योगभावाचें आपल्या अंगवळणी होणे म्हणजे ते जीवनधारण अथवा प्राणधारण अथवा जीवदशेचे एक भावंडच असून, ते जसें काहीं त्या देहा-बरोबरच जन्मास आलेले इतके तेथे समरहस्य असलेले !!! म्हणून तेच आपल्या अंगवळणी करावे तरच हे जीवित, मनुष्यपण, मनुष्यबुद्धिसामर्थ्य, हे जसे काहीं पेटींत बसणारें असें होते. ज्या दुसऱ्या अनेक बाजू उघड्या वाघड्याच पडलेल्या – किंवा जेथील सरक्षण हेच बुद्धिसौरस्य न सांपड-ल्यामुळे बाहेरच पाहणारे – ते आतां आपल्या योग्यतेस आल्याने, योग्य अशा मानवंताचे होते, व ह्या मनुष्याचे जे देवबल त्यास उचलून स्वसंरक्षणाचे जेवढे म्हणून नीतिवादन तेच पुढे करते म्हणून ह्या योगमायेस आपल्या आंगची व्हावीस असे, हे माये ! तुजला कसे विनवूं ! विनवणे हे नुसतेच नसून, तेथे ते आपल्या स्वभावास येऊन असो ! असे जे योगमाये ! दुर्गे ! " दुदुर्गे दुरितं हर " !!! सारखे जे परिपूरिततेने आपल्या योगभावाने स्वतःस भरविणे असून, ते आपल्या योग्यतेस येवो ! ते योग्य होवो !! ( ५६–५७ )

परंतु येथे योगप्रभाव जो व हठयोगी जे – जे आपल्या मोबदल्यांत शून्यासच झोंबून असतात – तेहि, हे किरीटी, मजलाच येऊन मिळतात, मीच ते होतात, मलाच ते पावतात, पोहोंच तात. योगसामर्थ्याशिवाय त्यांना दुसरे आणिक काहीं मिळते असे नाहीं : एवढेच नाहीं तर त्याना विशेष असे कष्टच भोगावे लागतात. निर्गुण उपासक जे आहेत ते मी ब्रम्ह आहे ही भावना दृढ करून, अवयवरहित व अविनाशी अशा ब्रम्हाला धरावयाला पाहातात, पण जेथे मनाचा सुद्धा प्रवेश होत नाहीं, व बुद्धीला जे अगम्य, ते इद्रियांना गोचर कसे होणार ? जे सर्व ठिकाणीं सर्व काळ असते, ध्यानाला अत्यंत कठीण, नाहीं असें नाहीं, आहे असेहि नाहीं, त्यामुळे ज्याच्या प्राप्तीला कांहींच उपाय दिसत नाहीं – असें जे ब्रम्ह ते सुद्धां वैराग्याचे बळावर जे कोणी प्राप्त करून घेतात,

तेहि मलाच येऊन मिळतात. योग-आचरणानें त्यांस जास्त कांहीं लाभ होतो असें नाहीं. जास्त कष्ट, जास्त श्रम मात्र त्यांच्या पदरांत पडतात. ( भावार्थ - या देहानेंच विश्वरूप दर्शनानें असणें म्हणजे साक्षात्कारानें असणे व पुनः या सौम्य अशा या मनुष्यदेहानेंच – चतुर्भुजनामानें – विलसत असणें हा भावार्थ होय. ) तेथे हे जे घडोघडीं शून्यात फेकून देणारें व त्या शून्यासच जणूं आपल्या वाटयास हेच आलें असे समजून त्यासच पोटीं बाधून वागविणारे असे जे तेही पण मजलाच, हे अर्जुना ! पोटीं घेतात. अशा ह्या शून्यास घेणाऱ्या व्यक्तीच्या वाटयाला दुःख व कष्ट याशिवाय कांहींच येत नाही. फक्त तेथे ते योगबलच सर्वस्वीं ह्या देहधारणेचें जे आपल्या अवस्थेनें असणें, आपल्या सामर्थ्यानें असणे, योगाचें जे एक " सोहंभावांग " त्यासच ते समरसण्याचें – समरहस्याचें – करीत असल्याने, ती सोहंभावसिद्धि ही त्यांना आपल्या सिद्धतेप्रत येण्यास जे कांहीं अंगवळणीं करण्याचे त करीत असतच ! यथे त्यानीं त्या योगातच सर्वस्वी राहिले पाहिजे इतके असे कांहीं कचाटणें असलेले ते – त्या आपल्या योगगांडीसच योगअभ्यासासच घेत राहिले तरच – तो योग त्याना साध्य असा होतो : येथे एक विचित्र अंग नजरेस येते, ते म्हणजे जसे अर्थाशिवाय पोथी वाचणे हे जर केले, तर ते लक्ष्य शून्याचे होते, किंवा कुकवास ठाव नसल्याने (कुमारीच्या विषयज्ञानाने) जसे अहेवपण शोभा पावत नाहीं, किंवा " द्वैताची झाडणी गुरुविणे ज्ञान, त्या कैंचे कीर्तन घडे नामीं " असें जे नामरहस्याचे बीज ते ह्या योगक्रियस मुळींच जाणत नाहीं. तेथे सोऽहं हीच उपासना असून, तेथील महत्त्व हे जसे काहीं एक ब्रम्हांडच अंतराळीं असलेले असे असल्याने, तेथे आधार हाच तुटलेला झाल्याने, पाय टेकण्यास मुळी जागाच नाहीं असे आधीमधीच फिरल्यासारखे होय : म्हणून ह्या योगबलास महत् कष्टच पाहावे लागतात, व तेथे जे काहीं समबुद्धिभवनाने असलेले जे तत्र अथवा तत्त्व ते तरंगतच जणूं असलेले असे असते ( ५८-५९ )

**क्लेशोऽधिकतरस्तेषामव्यक्तासक्तचेतसाम् ।**
**अव्यक्ता हि गतिर्दुःखं देहवद्भिरवाप्यते ॥ ५ ॥**

क्लेशः = मनाचे श्रामकत्व, भानावर नसणे असे दुःख. क्लेशः अधिकतरः = सगुण उपासकांपेक्षां फारच अधिक कष्ट पडतात. देहवद्भिः = देहाभिमान, देहोपाधि असणाऱ्या प्राण्याना; देहाएवढे असणाऱ्याप्रमाणें, स्थूळासच पाहाणाऱ्याप्रमाणें. अव्यक्तासक्तचेतसाम् = अव्यक्त उपासनेमध्ये निमग्न झाले आहे – आसक्त झाले आहे – चित्त ज्यांचें अव्यक्ता गतिः = निर्गुण स्वरुपाची प्राप्ति. दुःखम् अवाप्यते = मोठया कष्टाने साध्य होते.

तेषाम् अव्यक्तासक्तचेतसाम् क्लेशः अधिकतरः हि देहवद्भिः अव्यक्ता गतिः दुःखम् अवाप्यते ।

हे निर्गुण अव्यक्त उपासक मला जरी येऊन मिळतात, तरी पण त्याचे मन अस्पष्ट सूक्ष्म अव्यक्ताच्या ठिकाणीं आसक्त ( निमग्न ) झाल्यामुळे, त्याना सगुण उपासकापेक्षा साधनांत अधिक क्लेश होतात; कारण देहात्मबुद्धीच्या पुरुषाना अव्यक्ताची गति ( निष्ठा किंवा उपासना ) फार कष्टानें प्राप्त होते.

**जिहीं सकळ भूतांच्या अहितीं । निरालंबीं अव्यक्तीं ।**
**पसरलिया आसक्ती । भक्तीविण ॥ ६० ॥**
**तया महेंद्रादि पदें । करिताती वाटवधें ।**
**आणि ऋद्धिसिद्धीचीं द्वंद्वें । पडोनि ठाती ॥ ६१ ॥**

**कामक्रोधाचे विलग । उठावती अनेग ।**
**आणि शून्येसी अंग । झुंझवावें की ॥ ६२ ॥**
**तहानें तहानची पियावी । भुकेलिया भूकचि खावी ।**
**अहोरात्र वावीं । मवावा वारा ॥ ६३ ॥**
**ऊनिदेहाचें पहुडणें । निरोधाचें वेल्हावणें ।**
**झाडासी साजणें । चाळावें गा ॥ ६४ ॥**
**शीत वेढावें । उष्ण पांघरावें ।**
**दृष्टियेच्या असावें । घराआंतु ॥ ६५ ॥**
**किंबहुना पांडवा । हा अग्निप्रवेशु नित्य नवा ।**
**भातारेंविण करावा । तो हा योगु ॥ ६६ ॥**
**येथ स्वामीचें काज । ना बापिकेचें व्याज ।**
**परी मरणेंसी झुंझ । निज नवें ॥ ६७ ॥**

(६०) अहितीं – हितीं = भूतमात्राचे हित, प्रिय, किंवा कल्याण करणारे. निरालंब = निर्गुण ब्रह्म. (६१) वाटवधें = वाटमारीपणा. ठाती = आडवितात, आड पडून राहतात (६२) विलग = उपद्रव, कामक्रोधाच्या संयुक्ततेमुळे होणारे उपद्रव शून्येसीं आंग झुंजवावें = अव्यक्तावरोबर आंग लढवावें लागतें. (६३) मवावा = मोजावा, अहोरात्ररूपी पैस ह्रीच का हाताच्या वावाची करून वारा मोजावा. (६४) ऊनिदेहाचें – उनिदियाचें = जागृतीचें, जागें असणें म्हणजेच पहुडणें, क्रीडा करणें म्हणजेच निरोध करणें. उनिदिया – उन्निद्र = जागृत. (६५) वेढावें = नेसावें. दृष्टियेच्या – वृष्टियेच्या = दृष्टीच्याहि दृष्टीच्या घरचे होऊन असावें. (६६) नीच – नित्य मरणें हें रोज नवा दम घेऊन येणारें, येथें योग्याच्या कालच्या मरण्यानें काहीं आज नवीनपणहि पण नच दिलें, व नेहमीं नवें असें ते एक धाकाचें रोजचें मरणाचें करणें तें. व असें असूनहि तें मरणें हें केलेंच पाहिजे, इतक्या कसोटीचें तेथें जसें कांहीं पतीशिवाय अग्निप्रवेश करणें होय आतां येथें पति हा स्त्रीला आधार, परंतु योग्याला कसलाहि आधार नसतो (निरालंब). (६७) स्वामीचें काज = स्वामीसेवा संबंधाचें कारण किंवा कुळाचरणाचें निमित्त नाहीं (व्याज) मरणेंसी झुंज = मरणाबरोबर देहानें लढत देणें होय निज – नित्य.

ज्यांनीं सकळभूतांच्या हिताहितीं – कल्याणाकरितां – अनाश्रित अशा भूतमात्राचें हित करणारें निरालब निर्गुण अशा ब्रम्हामध्ये – अक्षरामध्ये – भक्तीशिवायच आसक्ति घेतली आहे – ज्यांची ती आसक्ति पसरत आहे – प्रसर घेऊन आहे - अशाना महेंद्रादि पदें वाटमारेपण करितात, आणि ऋद्धिसिद्धीचीं द्वंद्वें आड पडून राहातात, म्हणजे ऋद्धिसिद्धीपासून प्राप्त होणारी सुखदुःखे त्यांच्या ब्रम्हप्राप्तीच्या आड येतात. समृद्धीचीं आगें, तसेच संसिद्धयोग्यतेचीं द्वंद्वें चढास लागलेलीं व कामक्रोधादि उपद्रव अनेक असे उठाव घेऊन येतात : असें तें ब्रम्ह भक्तीवांचून साध्य करूं पाहाणारांना इंद्रपद प्राप्त करून घेण्याचा लोभ सुटतो व तेथें कामक्रोधाच्या उपद्रवाशीं शरीर लढवावे व शून्याबरोबरहि त्याना आपले अंग झुंजवावें लागते कीं अहो!

सम + आहितः = समबुद्धीचें. अंतःकरण ताब्यांत ठेवलें आहे – ज्यांनीं आपलें अंतःकरण जिकलें आहे – अशांच्या ज्ञानांत परमात्मा उच्च प्रकारें स्थित असतो. त्यांच्या जाणिवेंत परमात्म्याशिवाय दुसरें काहींच असत नाहीं. तो साक्षात् परमात्म्याहून अभिन्नतेच्या भावनेनें – भावानें – असतो. कल्याण हेंच तेथें परमात्मरूपानें असणारें. असा तो शीतउष्ण, सुख-दुःख, मान-अपमान सारखे मानणारा, ज्ञान-विज्ञा-

नानें तृप्त, निर्विकार असा आत्मजित् पुरुष – ज्याने आपलीं इंद्रियें जिंकलीं आहेत असा योगी – निरिच्छ असा, दगड, माती, सोने सारखींच मानणारा जेव्हां होतो, तेव्हां त्यास युक्त ( सुहृत, मित्र, उदासीन, मध्यस्थ, द्वेष्य, बंधु, साधु आणि पापी याच्या ठिकाणीं समबुद्धि ठेवतो तो अत्यंत श्रेष्ठ होय. ) असें म्हटले जातें असा समाहित परमात्मभावच एक घेऊन असलेला असा तो सर्व भूतमात्राच्या हिताकरितां झटणारा असतो. निरालंब अव्यक्त असे जे तत्त्व तेथें त्याने आपली सर्व आसक्ति लावलेली असते. असाहि जरी तरी पण तेथें जर श्रद्धा, भक्ति, बुद्धिबोध नाहीं, भक्ति नाहीं, तर तेथें त्याच्या वांट्यास सतत क्लेशच येतात.

ज्यांनीं म्हणून सर्व भूतमात्राच्या ठिकाणीं असलेले जे चित्त, जे जसे काहीं अग्निच ! ते आपलेसे करण्याचा विचार बांधला, (जे चित्त अग्निसेवन – किंवा अग्निच जसा कांहीं आपल्या बांधणीस येणारा असे असून) त्यानीं ह्या भूतहिताचे व्रत म्हणजे काय अव्यक्तच – अवकाशच – आकाशच – व तेंहि पण निरालंबी असणारे, जसे काहीं बांधण्याचा उद्योग करण्यासारखे होय. ज्यास कोठेंहि ठेवण्यास आधार नाहीं असे पोकळींत तरंगणारे जे जीवित व त्यासच आकलन करण्याचा उद्योग म्हणजे काय ! तेथें जर भाव नाहीं तर, तथें हा मी जन्मलो आहे कशास कुणास ठाऊक ? असे हे अर्थाशिवाय जन्मणे ज तेथीलच तेढ घेऊन जो उद्योग करणे – तोच हा वरील उद्योग हा जर अर्थ नाहीं तर काय उपयोगाचा ! तेथें हेतुच नाहीं, व हेतु हाच मुळीं दडपलेला जर असला, तर तेथें भावभवन मुळीं नसलेले ! असे हे नसल्या योगाचे जे चालणे ते कस बरे अग्निहोत्र्याची योग्यता पावेल !! हे चित्तच जे 'मदनरम्य' व जे ह्या मनापेक्षाहि अति विस्तारलेले असे आहे व ते अनेक गुणांना खेळवीत असते, तेथील जे तत्त्व सगुणधारण हे भावाशिवाय अभ्यासणें म्हणजे ते काय उपयोगाचे ! मनुष्याचे स्वतःवरील प्रेम हे जर मार्दव न पाहील, जर स्वतःमधील जीवनसौंदर्य हे सुंदर असे, त्रैलोक्यांत एकमेव असे, नच केले जाईल, स्वत.मध्ये असणारे जे प्राणधारण हे जर प्रेम पाहात नाहीं, स्वतःचा स्वभाव हा जर भाव जाणत नाहीं, स्वतः मी जो कोणी आहे त्यास माझे आपलेपण कुठे आहे ते जर समजत नाहीं, तर ते प्रेम म्हणजे काय असें विचारूं लागेल : तर ते काहीं ह्या अंतर हृदयाची जी कांहीं कळकळ तीस नच पाहाणारे असल्याने, तेथील स्वभावभाव, स्वतःचे स्वत्व, सगुणधारण, मुद्रा ही जर तेथें नसेल, तर ते भाव म्हणजे काय व अभाव म्हणजे तरी काय असेच विचारूं लागेल. म्हणून जर ह्या जन्माचा हेतु सांपडला तर अर्थ सापडतो, अर्थ सांपडला तर तो भावाचा होऊ शकतो. व भाव हा अवलंबन मैत्री किंवा मनुष्यपण हे पाहू शकतो. व नंतरच म्हणजे परस्पर असे जे वहिवाटणे त्यात परस्पर प्रेम हे एकवटल्यानें ते अविभक्तपणाचे जे दुसरेपण ते स्वतःस येऊन, तेथें ते स्वतःस जाणण्याचे करते. व स्वतःचे जे "स्व" पण ते आपणच होऊन आपलेपणास आल्याने, आपलेपण – आपण – हे पुरुषाने कसे सुशोभित असे असते ते लक्षात येते, तेथें मनुष्य आपले बल स्थिर करून त्यांतच राहातो असे त्याने आपले चित्त हेच त्या पुरुषाचे करून त्यात जर आपलें प्रेमबीज म्हणजेच भक्तिबीज घातले, तरच ते स्थिरतेस पाहूं शकते व स्वतःचें जे भवन त्याचे ओळखीस येते. एरव्हीं ह्या भक्तीशिवाय जर का असले, तर तेथें घराचा मनुष्य किंवा चालक नसल्यामुळे – स्थिरतेचा नसल्यामुळे – ( नाम नसल्याने ) ते गृह म्हणजे मनुष्यपण हे प्रेमाच्या याचनेस आणावे तरच बरे : तरच त्यास पाय येऊन उभे राहाण्यास जागा मिळेल : व ती जागा ह्या नामधारणेची होय, सतवाक्याची होय किंवा गुरुकृपेची होय असेच म्हटलें असतां ते पाहणारे होतें : करितां ही भक्तिच अगोदर कशाची केलेली आहे ती पाहावी व तेथेंच राहावें तरच बरे ; नाहींतर हे वैराग्य म्हणजे एक विचित्रतेच्या गोडीचें होऊन ते ह्या विषयांनींच आपलेसे केले जाऊन, तेथें प्रबलतर अशी ह्या मनाची त्रेधा करण्यास हे विषय जन कमी करीत नाहींत. हे जे चित्त लोहासारखेच

त्याचें अग्नींत तापविणें होऊन जेव्हां तें परिसासीं संपर्क जसें कांहीं करणारें होतें, तेव्हां तें चित्त मुळीं चैतन्यच सर्वस्वीं असें झाल्याने, ते वरील भक्तिजिव्हाळयाचे होऊन, कशासहि हार न जातां श्रीगुरूचे चरणीं सर्वथा पूर्णपणें लीन झालेले असें होतें.

म्हणून हे जे निरालंबी असणे-तसेच व्यक्तिवाचे नामरूपाने नसणे-म्हणजे ते केव्हांहि ह्या महेंद्रादि पदांना हारच जाणारे असे होतें. तेथें बहु सन्मानाचा एक मोठाच धक्का पुढे येऊन त्यांतच फसणें होतें : येथे ते म्हणजे एक तऱ्हेचें वाटसराने आडविलेले जंबुजचे घर्डाने असलेलें हें जीवित हार घेते : तसेच ह्या ऋद्धिसिद्धीची जी एक महती ती पुढे येऊन, तेथपर्यंतच मजल होते : परतु ते जे ब्रम्हपद तेथें प्रवेश हा होतो न होतो, तोंच वरील ज्या काहीं उलट सुलट करणाऱ्या शक्ति त्या पुढे येऊन तेथील पद आडवून धरितात.

तसेच ह्या विकारांनीं विलग्न होणारे असे हे अव्यक्ताचें झेपणे न झाल्यामुळे, तेथें या काम-क्रोधादि विकारानीं ह्या कामनानाच उराशीं बाधून टाकिल्यामुळे, तेथें शून्यत्वासच घडोघडा आलिंगन देणें जणूं असें होतें तेथील चैतन्याने घेतलेला जो देह तोंच विगलित होऊन गेल्यामुळे, तेथें पुन्हां अभ्यास व पुन्हां योग असें हे द्वंद्वयुद्ध जोराने सुरू होऊन, पुन्हां जय व पुन्हा हार असा हा तेथील अति आश्चर्यकारक असा नेहमीं ह्या झुंजेतच फसविणारा योग म्हणजे अति कठिणतर होयः तो युक्त होणे किंवा त्यांतून पार पडणे हे मुष्किलीचे असे कठिणतर असतें

वाटवधः—वाटवध कां चिरीनिरी कां देव्यदाक्षिण्य का पैसाच एक मधींच सांडावा लागणारा तो – काय रागाकरितां कां कशाकरिता बरे !

ताडाकडे पाहाण्याची संवय वाइट असते. कारण तोड हे तर प्रकृतिप्रकारावर उभे झालेलें असल्यानें, डोळयाचा म्हणा का देहवंताचा म्हणा जो मदनभार - हाच डोळयाचा केलेला - तोच मुळीं लपविला जातो ह्या शक्तीने - ह्या विशेषा प्रकृतीने : तेथ शक्तीचा मुळीं एक हस्त तो हनुजभार घेऊन तेथीलच्या तपश्चर्येत बसलेला होतो तेथे जे ह्या द्विजदताचे पोकळपण तेच पणास लावले गेले जसे का - तेथें उपासनापद्धति ही सर्वथैव उपासाचीच होय : येथें जो प्राणभार त्याने ह्या अन्नद्वेषामुळे प्रकृतीसच मुळीं हादरविले – ती आधारशक्ति हीच मुळीं थरारूं लागून सर्व देह हा म्हणजे एक पाचोळयासारखा किंवा अगदीं कागदाच्या चिठोऱ्याच्या किमतीचा होऊन सर्वथैव त्या प्रभूची -- अहो कसली प्रभूची – आठवण वगैरे कुठली बरे ? परंतु जो या देहाचा नियता तोच मुळीं या प्रकृतीस एक अनुभवाचा वाटा दाखविणारा झाल्याने, तेथें पायाळीचें सर्वथैव ते अन्नप्राण – अन्नजीवन असे ते ह्या व्रताची किंमत कशी व केवढी – हे आतांच मुळीं समजेस येऊं लागलें असें.

अहो, हा पेसा तोच मुळीं बोल बोलणारा – बोलविणारा – व ह्याचवर मुळीं हें जीवदशेचें रेखाटणें जगत असलेले – महत्त्व पाहून असलेले होय. येथे व्रताचा अवलंब हा वरील विधान खोटे म्हणण्यापर्यंत पाळी जाते. येथे या पैशानेंच मुळीं दाखविलेला असा तो अन्नप्राणभार हा पोटच आपले त्या अन्नप्राणास खर्ची घालतो. परंतु येथें जर पैसा हाच नीटसा ह्या वरीलच्या देवघेवीच्या ठेवणीचा झाला, तर मात्र तो ह्या द्विजहिताचें ठाणें व्यवस्थितपणाचे करून, ह्या मनुष्यप्राण्याचें त्याचें ते ऐश्वर्य पोहोंचविणारा होतो.

परंतु येथे बरेचसे अडविणारे प्राणी गोळा झालेले त्यांनींच मुळीं जर तो भार-प्राणभार उचलला गेला ( उपासव्रताचें जे अधिकरण ), तर मात्र येथे जसें एकाच घरचें कुटुंबवत्सलतेचें अंग पाहविलें गेलें असे होते. परंतु ह्या पैशाची जी एक मेहेरनजर किंवा करडी नजर तीच मुळीं ह्या घरोब्यावरच डोळे वटारीत असलेली असल्यानें, तेथें येथील कांहींच तारतम्य पदरांत पडत नाहीं : म्हणून येथे कदा-

चित् असेहि होणे शक्य आहे कीं, ह्या पैशानेच मुळीं ती घडी मुलटी केली. परंतु हे म्हणणें म्हणजे जसे त्या प्रभूच्या दर्शनास जावयाचे तर त्या पुजाऱ्याची मुळीं अगोदर सोय करून ठेवावी लागणारी – येथे तर ती पूजासामग्री, उपचार, दान, दक्षिणा इ. नीं तो पूजाप्रकार उचलावा लागणारा होय

एक मात्र येथे जरूरी नमूद करणें – ती म्हणजे ज्या आधीवर हे पूजनसाहित्य उभे होणारे, तेथेच मुळीं एक क्षणभर थोपविले जाणे होऊन, ते आधीभाराचे गाठोडे तसेच शिल्लक राहाते; व उपचार हे ती व्याधी मिटविण्यास केले नाहींत, तर ती व्याधी ही तर अनेक पटींनीं आपली क्षोभता सरसावून असणारी होते : म्हणून येथे तो प्रकार जर प्रस्थापिततेचा करून त्या व्याधीसच जर तनु टाकण्यास लाविले, तर मात्र आरोग्य हे आपली सरशी करून असूं शकते

परंतु हे जे आडवाट साधणारे किंवा वाटमार करणारे त्यांना तर येथे एक पैशाचे लांबलचक असे धोरण दिसूं लागून, तेच मुळीं त्यावर टपलेले किंवा त्याचेच ते सर्वथैव असलेले असे असतात : त्या प्रकृतीचे पूजन हेच मुळीं ह्या योगविधीविधानानी जर दुरुस्तीस घेतले, तर तेथे सहज योग्यता ही योग्यतेस येऊन, त्या देवतेचे ऐश्वर्य हे झळकूं लागणारे होतेच होते.

परंतु असे होते कसे - अहो, येथे तर हा असा जो द्विजदत्ताचा सर्वथैव असाच तो प्रळय नव्हे तर प्रमेहभार हाच मुळीं देहादेहामधून आपले ऐश्वर्य करून घेतो, व पिंडच एक प्रस्थापित करणे ते ह्याच मुळीं प्रमेहव्याधीवर येऊन पडते : आणि येथेच तर तो उपासना (उपास) भार – हाच एक खात्रीचा असाच उपाय – तो मात्र ह्या वर दिलेल्या देवीउपासकानी सर्वस्वीं आपलासा करून ठेविल्याने, तेथे कशाचीहि मातब्बरी चालत नाहीं येथे पैजाच लागून राहिलेल्या ह्या पणास जिंकण्याकरितां व तेथे महत् असे एक नवलच सर्व जगास थक्क करून सोडणारे असे

येथे स्वामीसेवा जर साध्य झाली असेल, तर मात्र हे असले बोलणे ते पुरत नाहीं · परंतु तसे होतच नाहीं, कारण अनेक कारणावर हे उभे झाल्याने, तेथे कारणाकारणाच्या भिस्ती ह्या टाकल्या गेल्या-तेच विचित्र असे : म्हणून मुळातच ते व्यवस्थिततेचे केले नाही, तर हा प्राण भलतेच ठिकाणीं स्थळ घेऊन राहातो

नुसतेच व्यवस्थित चालणें केले, तर ह्या असल्या बाजू मग कोणीं उचलाव्यात असा प्रश्न पुढे होतो – तेथे तर मग आडविले जाणेंच नेहमीं असे होऊन येते म्हणून येथे तर तो क्रमयोगाचा अवलंब हा अनेक बाजूंना महती पोहोंचविणारा झाल्याने, तेथे मुळांतील महत्त्व हेच ठरवावे लागते : ते जर नच केलें, तर दोषच पदरांत येणार ! म्हणून येथे तपश्चर्या आडविणारा असा एक महत् उपद्व्यापकत्वाचा घोटाळा मात्र आपली मान सरळ ताठ करून असतो, व तो केव्हाहि कोणासहि हार जात नाहीं. हा प्रश्न जर सुटला, तर ते हाताचे महत् भाराचे होणें हे बाकीचा व्यवहार तरी निदान सरळ करू शकेल : मग त्या आधीच्या नादात फसलेल्याची कींव ती कशीबशी तरी तापसांचा भार पाहण्याने निमणारी होते – शांततेस येतें. (६०, ६१, ६२)

तेथे ह्या चित्ताचे अनेक वासनांशीं ऐक्य झाल्यामुळे तेथील ज्ञानदेहाचें किंवा जीवचैतन्याचे नेहमींच हरवणे व पुन्हां जिंकणे असे युद्ध सुरू असलेले : तेथे तहानेने तहानच प्याल्यासारखे किंवा भुकेनें भूकच खाल्ल्यासारखे असते : ह्या इंद्रियांच्या तापण्याने जे लटिकेपण तेथे येते, ती तहान खरी नसून खरी भासणारी अशी असते, तसेंच भूकहि एरव्हीं ती तहान तशीच तापविली तर त्या इंद्रियांचें जे तापणें ते ह्या चित्ताने आपलेसें केलेले जेव्हां होते, तेव्हां ती तहानहि पण स्वाभाविकतेच्या शमाप्रत येऊन चित्तच स्थिर होतें – चित्त आपल्या जागेवर येतें. एरव्हीं ह्या चित्ताचे जे अनेक जगांशीं (पदार्थ) ऐक्यच केलेले असल्यामुळे, तें मुळीं स्वतःसच सांपडत नाहीं : ते जेव्हां ह्या विकारांनींच

स्वतःच संपुष्टांत यावे, तेव्हांच स्थिर होणारे असून, ते तेव्हा चित्ताचे असें होते. भकेचें तसेंच ह्या वायूचें – म्हणजे हें जें बोलणे तें – जर अभावाचें अनेक चित्ताचें असेल, तर तेथे वाऱ्याशिवाय दुसरे काहींच थाऱ्याचें होत नाहीं असे हे रात्रंदिवस चालणारे कष्टच ह्या देहधारणेस दिले जाऊन, तेथ अनेक तऱ्हांनीं – अनेक तऱ्हेच्या तपानीं ह्या देहाभिमानास स्वरूपीं स्थिर करण्यास लागणारे अभ्यासच ! (६३)

जागे असणें म्हणजे पहुडणें, क्रीडा करणें म्हणजे निरोधणें : झाडाझुडपांबरोबरच सख्य करावें, त्याना आपल्या सोबतीचें करावे, त्याशीं मित्रभावानें बोलावें स्नेहभावानें खळावें असे ते अभ्यास : तेथे दिवसाचे असणे म्हणजेच पहुडणे : देह हा - दिवसच जसा उगवला असा – प्रकाशभाराचा करून असणे .म्हणजेच पहुडणे. तेथे उन्हाचा जो व्याप तोहि आपलासा करून स्वरूपीं स्थिर होण्याचा अभ्यास हा होत राहातो प्राणवायचें निरोधणें हें जसे कांहीं ह्या वृक्षयानींचें एक तऱ्हेचे सांजवळेच्या संध्यारागास आणणे करून, तेथेच बोलणे हे अभ्यासिलेले : तो जो संध्यासमय हा एक तऱ्हेच्या उदयधर्माचा पडताळा घेणारा असा असून, तेथे हे जे स्वप्नसृष्टीचें खरेपणानें असणे तेच साजणे म्हणजे अक्षरानीं ध्वनीस पाहाणे होय. तेथे उचलिलेले जे गतिमापन ते जोडण्यास घेऊन तेथे ते प्रणवमुद्रेचे बाधणे अथवा त्या प्रणवाचें करणे त्यातच अभ्यासानें दृढता करून घ्यावी लागणारी ! (६४)

शीत वेढावें – नेसावे, उष्ण पांघरावें, वृष्टीच्याहि वृष्टीच्या घरचे होऊन असावे, वृष्टीच्या घरामध्ये जसे असावें, जेथनच मुळी ही वृष्टी होणारी तेथेच जसे असावे : तेथील थंडी हीच सर्व बाजूंनीं ह्या देहास वेष्टित अशी करणारी – तेथे उष्णता हाच पांघरण्याचें करून सर्वच्या सर्व देहबुद्धीचे न होणें हे अंतर्मुखतेनें अभ्यासाप्रत आणावे लागणारे असे असते (६५)

किंबहुना – खरोखर – बहुतांशी – हा म्हणजे एक पतीशिवायच पतीबरोबर सती जाणे असा हा योग होय : अग्निप्रवेशच - आगींतच उडी घालणे जसे – नित्य नवीन असा, दुणेहिवरी नवीन असा – जसा कां भ्रताराशिवायच अग्निप्रवेश करावा लागणारा असा हा योग होय थोडक्यात सांगावयाचे म्हणजे योगाचरण हे पतीवाचून नित्य सहगमन होय ह्या योगाचरणात पतीचें कार्य नाहीं, कुळाचरणाचें निमित्त नाहीं, पण मरणाशी मात्र नित्य झगडा आहे. येथे स्वामीचे काम तरी काय ? किंवा कुलपरंपरागत धर्माचे म्हणजे कुलाचे का धर्माचें तरी निमित्त कसचे ? परंतु हे म्हणजे मरणाबरोबर एक झुंजणे – जसे ते मरण हे नेहमीं नवा दम घेऊन येणारे असे – नवा दम घेऊन असलेले असे.

अशीं हीं अनेक तऱ्हांचीं तपें म्हणजे काय या मनोवृत्तीस इतके कांहीं दमविलेले कीं, या देहाएवढेपणास जिकणारे असे हें तप जसे कांहीं अग्नीमध्येच प्रवेश करणें असे होय तेथे पतीशिवायच जसे कांहीं ह्या अग्नींत सती जा म्हणणारे असे, हे अर्जुना, ते महत् कठीण तप असते. तेथे हे असे तप करणें म्हणजे स्वामीस प्रसन्न करणें किंवा कुलधर्माप्रमाणें आचरण करणे असेहि नव्हे, तर हे एक मरणाबरोबर झुंज करणारे हे योगतप असून, तेथे नवेंपण हे नित्यच्या नित्यच होत राहणारे : रात्रंदिवस वाराच घेणारे हे असे – जणूं वाऱ्याचे मोजमापच घ्यावे लागत असणारे असे – अंगांत शिरणारे वारे त्यांसच जिंकण्याचें करण्यास लागणारे जे तप ते महत् कष्टतर असे होय. तेथे स्वामीनें घालून दिलेला धडा हा अभ्यासास घ्यावा लागणारा असेहि नाहीं : किंवा कुळधर्मानें बाधून वाडवडिलांनीं ठेविलेली विहीर (वराहमिहिर) असून तेथील पाणी हे उपसण्याचें करून स्वतःचे उपयोगास आणणें असेंहि नव्हे : तर तेथे जे ज्या वेळेस योग्य अथवा तपःसामर्थ्यास येण्यानें असावयास पाहिजे तेंच पुढें केलें जाऊन, तेथे कसलेहि निमित्त हें नसतेच : ते एक स्वभावासच स्वभावास आणण्याकरितां ह्या देहयष्टीवर परिणाम केलें जाणारे असें हे सहजसिद्धतेस ये म्हणणारे असे कर्मदिव्य असून, तें तपच

पाहा असें म्हणणारें होय : तेथील दृष्टीचें गुज हे कांहीं लिहून भागणारें नव्हे. त्या योग्याची दृष्टी ही दृष्टीसच पाहाणारी – दृष्टी ही साधनाची केलेली – दृष्टी ही ज्या साधनाची झालेली – त्या साधनामध्ये सतत राहिल्यामुळें तेथील "सा" जो आहे त्यामध्येंच अविरत राहून, तेथील जे श्वासोच्छ्वसन सूक्ष्मसूक्ष्मतर असें असणारे – त्यासच ही दृष्टी देऊन किंवा ह्या सर्व दृष्टीस तोच आधार घेऊन ह्या जीविताचा भार उचलण्यास लागणारा! तेथील दृष्टी म्हणजे काय सांगावी!! ती ह्या मनाचे मनपण त्यामध्येंहि मुरून गेलेली असून, ह्या जीविताचा संसारसंभार हा सर्वचा सर्व जोपासनेस घेतलेला!! (६६-६७)

**ऐसें मृत्युहूनि तिख । कां घोटे कढत विख ।**
**डोंगर गिळितां मुख । न फाटे काई ॥ ६८ ॥**
**म्हणउनि योगाचिया वाटा । जे निगाले गा सुभटा ।**
**तयां दुःखाचाचि सेलवांटा । भागा आला ॥ ६९ ॥**
**पाहे पां लोहाचे चणे । जैं बोचरियां पडती खाणें ।**
**तैं पोट भरणें की मरणें । शुद्धि नेणें ॥ ७० ॥**
**म्हणोनि समुद्र बाहीं । तरणें आथी केंहि ।**
**कां गगनामाजीं पायीं । खांचिजतसे ॥ ७१ ॥**
**वळघलेया रणाची थाटी । आंगीं न लगतां काठी ।**
**सूर्याची पाऊटी । कें होय गा ॥ ७२ ॥**
**यालागीं पांगुळा हेवा । नव्हे वायूसी पांडवा ।**
**तेवीं देहवंता जीवा । अव्यक्तीं गती ॥ ७३ ॥**
**ऐसाहि जरी धिंवसा । बांधोनिया आकाशा ।**
**झोंबती तरी क्लेशा । पात्र होती ॥ ७४ ॥**
**म्हणोनि येर ते पार्था । नेणतीचि हे व्यथा ।**
**जे कां भक्तिपंथा । वोटंगले ॥ ७५ ॥**

(६८) तिख = तीक्ष्ण, प्रखर, तीव्र. घोटे कढत विख = इंद्रियांचे विषय इंद्रियांना न देतां तेथे जसे का पोट हेच मुळीं त्या प्रसरण पावलेल्या अभावात्मक इंद्रियाचे, तेथे अग्निच पोटात भरला. (७१) बाहीं = बाहुबळानें केहि = कोठेहि तरणें आथि केहि = कसचं ते हातांनीं समुद्र तरून जाणें ? खांचिजतसे – खोलिजतसे = गगनावर पायानीं चालणें शक्य नाहीं. जसे, दोरीच्या आधारानें पर्वतावर चढणे म्हणजे आपले पायच तोडून तुडवून घेण्यासारखे होय. तेथेच आपल्याच पायांनीं आपले पुढे चालणें होते (७२) वळघलिया रणाची थाटी = रणांगणावर गेल्यावर अंगावर एकहि वार न लागता येणे, तेथे मग शूर पुरुषांत ( सूर्यलोकांत ) गणना ती कसची ? रणमैदानाच्या गर्दीत अंगावर आलेले वार निवारण करूनच शौर्याचा प्रभाव हाच गाजणारा, प्रकाशणारा होतो तेथे तेजस्विता हीच यशस्विनी होणारी होते. (७३) पांगुळा हेवा = यालागीं वायूसी हेवा न होये, तेथे पांगुळेच होऊन जाणे होते – पांगुळपण पदरांत येते. (७४) बांधोनिया धिंवसा = धैर्यानें, धिटाईनें : बुद्धिवंत बुद्धीच्या धैर्यानें आकाशाला झोंबणें करतात; कवर बांधून (बुद्धिवंत) धीट झाले व आकाशाला झोंबले ( लिगटले, चिकटले), तरी क्लेशासच पात्र होतात, त्यांना क्लेशच होतात. (७५) म्हणून दुसरे जे भक्तिपंथास लिगटून आहेत, ते हे कष्ट जाणत नाहींत, त्यांना कष्ट (योगाचे दुःख) भोगावे लागत नाहींत.

असें हे तिख – म्हणजे चित्तच जेथे अग्नीच्या उपमेनें व्यापलेलें तें जसजसें ह्या मायेनें आपलेसें करावें कां तीव्र व्रतावर उभें होऊन तें आपलेसें केले जावे – असें तिखच तें स्वभावास उचलणारे

होतें. देहाचें वैभव - मदन कां अग्निच जसा कां – ह्या देहवैभवसाधनानें अथवा देहसाधनवैभवानें योगाग्नीचें केलें, तेथें मृत्युपेक्षाहि अनेकपटींनीं जास्त वेदना सहन करून असणे ते – तेथें व्रत हेच तीव्रतेस आलें – दृढ झालें. प्रखरपणाने असणारें त्या व्रताचे महत्त्वमहिमान – सर्वांना मानाच खालीं करण्यास लावणारें कां सर्वादरानें पाहाण्यास लावणारे असें तें उग्र गात – एक अतिदीर्घ अशा वयोमानाचें, सर्व वयोमान एकत्वास आलेले, असे दृढ व्रतच एक अंगिकारिलेलें असे त्या योगांगाचें अंग (विषयवासना × संकल्प) होय. तेथें विषयांनी आक्रमिलेले एकदम (डोळे झांकून) घोटच घ्यावा लागणारा असे तें कढत का तीक्ष्ण विष – विखच होय तेथें तिख ( तिखं – खंतिं – अक्षर – ओठावर नुकतीच फुटणारी मिसं – तारुण्याची कळा तेथीलची लव ती यथें जसें का बुद्धीस अकुर येऊन समजुतीस येणारी अशी अक्षर अंगाचो होणारी :: येथें स्त्रीजातीचे जे वैभव तें देह-समर्थनानें शोभिवत असे एका कदाचित मातृकादर्शनाचें योग्यपण पदरात टाकील असे अभिवचन देणारे ते) हेच चित्तास उपमिलेले ते विषयविख आवरतांना कां पितांना – योगाच्या आपल्या आंगचें करतांना – जसा कां पापाचा एक डोंगरच गिळिला होणारा : आतां येथें हे जे मुख तें काय अनावर असे होऊन फाटणारे होणारे नव्हे काय – बोलणे हे अनावरपणास पाहाणारे नच होईल काय ? येथें मुख हे तें स्वमहत्त्व टाकून देणारे होतें यांत नवल नाही; पण योग हाच आपल्या महत्त्वावर उभा झाल्याने, तो तें चित्त आपलेसें करितोच : असे तें तीव्रतेचें व्रत उत्तीर्णतेच्या रहस्याचें बीजच ! तेथें – ' सुख पाहातां जवापाडे । दुःख पर्वताएवढे ॥ ' दुःखाचे डोंगरच्या डोंगर सहन करून असणें जे – तेथें मुख हे आपले सौंदर्य टाकून विकाराचा – उद्विग्नतेचा – अवलंब करणारे होणारे नव्हे काय – होत नाहीं काय ? (६८)

म्हणून योग योग जो आहे त्याचा अवलंब ज्यांनी केला, योगमार्ग ज्यांनीं पत्करिला, त्यांच्या वांटयास हे सुभटा अर्जुना ! तर शेलका असा दुःखाचा वाटाच एक - ती योगाची योग्यतायोग्य का समर्थतेची अशी वांटणीच होय ती ते योगाचें काम का मार्ग उचलणाऱ्याना देणारी का येणारी होते – असते. (शेल वाटा भागा आला) येथें आता योगमार्गानें माझी प्राप्ती होईल अशी आशा बाळगून जे त्या योगमार्गास आपलेसे करू पाहातात, त्यांच्या वांटणीला तर अगदीं शेलका असा दुःखाचा भागच येतो – आणि ते म्हणजे योग्यता कां समर्थनच ते योगाचें असे होय ! योग योग जो तोच त्यांनीं सामर्थ्यवंत असा करून ठेविला (६९)

प्राणाचें प्राणपणानें असणे : चित्ताचें चिंतनानें असणें का चित्तपणास येणें : बोचरा म्हणजे ज्याच्या मुखांत मुळीं दांतच नाहींत अशी म्हातारपणाची एक सीमाच जेथें : आजपर्यंत ह्या जगात वाढलेल्या आयुष्यानें तें जगणे कसें केलेलें : तेथें आता ह्या वयोमानाने जाणतेपणास येणे कां जाणते-पणान असणे : तेथें ब्रम्ह ते काय – जगणे ते कसें – मरण हें केव्हा कसास पाहाणारें म्हटलेले : तेथें शुद्धी ह्या बुद्धीची ती बुद्धीस शुद्धीवर आहेस कीं नाहींस असे म्हणणारी : ह्या बुद्धीचे रम्य ते गुणानी कसे आवरिलेले : तेथें जेवण जेवणें हें पोट भरणे का शुद्धीवरच नसणें : प्राणाचो शुद्धि ती कशी :: अशा ह्या जीविताच्या बाजू उलगडणे म्हणजे लोखंडाचे चणेच खाणे नव्हे काय ? अहो ! तोंडांत दांतच नाहींत तेथें ह्या जीविताचा अंतच जसा आपले महत्त्व (ब्रम्हत्व) पाहून आहे; तेथें काहीं कल्याणाच्या साधनानें ही देह – जीवित – गाडी ही सापडली असेल का साधलेली असेल, तरच ती वर येऊं लागून तें पद पाहाणारी होते : एरव्हीचे नुसतें जगणें तेथें ती जीवितशुद्धिच मुळीं नाहीं अशा होय : " जै बोचरिया पाहे लोहाचे चणे खाणे पडती पां । तै प्राणें शुद्धि म्हणो कीं पोट भरणे म्हणो ॥ " दृष्टांतास घेतलेले असे लोहाचे चणे भक्षणे – ' चणे खावे लोखंडाचे । तेव्हां ब्रम्हपदीं नाचे ' – म्हणजे तेथ ल महत्त्व हे परम सीमाच ह्या जीवन जगण्याची कां ते सर्वोत्तमतेचें करण्याची ! (७०)

म्हणून हा संसारसमुद्र तरून जाणे – तेथे योग्यतासीमा तो तरून जाण्याची ! जसे कां गगनामध्ये – आकाशामध्ये – पायीं चालणे तेथें पायच मुळीं उकलिलेले असे कां अशा मार्गाचे ! नावाड्याशिवाय कां सांगडीशिवाय नुसत्या हातानींच हा संसारसमुद्र तरून जाणे हे कसें शक्य आहे ? तेथे ह्या हातांना कां बाहूंना ती योग्यता असल्याशिवाय ते तरणे होणारें नाहीं, म्हणून हातांना ती समर्थता देणें व्हावें तें कसे शक्य तरी ? अहो ! ह्या गगनामध्ये पायांनीं चालणे हे केव्हांहि शक्य नाहीं – गगन हे पायांनीं खोलिजले, ते पायाखालीं अंथरले व त्यावरून आतां चालता येऊं लागलें असे कसे ते व्हावे ? तेथे अत्यंत खोलीचीं अशीं खोल बोलणीं का बोल हे बोल खोलणे करून ते चिद्गगनाचे केले : : तेथें जीव हा घोडाच एक जसा का आनंदाने नाचूं लागला ! ! ! (७१)

पाऊटी म्हणजे बरोबरीने त्या सूर्य लोकाच्या पायरीचें होणे असे ते सर्वत्र प्रकाशमान – सर्वत्रांना प्रकाश देणारे सूर्यच – जेथें बुद्धिदिव्यच जे ह्या जगताचे किंवा देहसाधनाचे आपलेसे केले गेले तेथे जसा का एकादा शूर योद्धा रणामध्ये विजय मिळवून आला, त्यास तर स्वर्गामध्ये सर्वांनीं एकमान्यतेने बहु सन्मान्यतेचे केले जाणारे : तथे कीर्ति हीच त्यास पाहाणारी होते जरी, तरी येथे सूर्याची कां सूर्य लोकाची बरोबरी ही – अनेक जीं द्वंद्वे तीं निरसून, वा आपदा बाजूस करून, अंगावर घावडाव – हात न येऊं देतां – होणारी होते रणांत गेलेला जो त्याजवर एकादी काठी पडणारच, पण तीहि त्याने निवारण करून जिंकलेपणानें जयच साधला : तेथें ते कसे ते बोलणे केवढ्यातरी महत्त्वाचे असे – कशी बरे ती सूर्याच्या योग्यतेची पायरी येणारी ? तेथे रात्रंदिवस तेवढ्या एका मानास मुळीं रात्रंदिवस म्हणण्याची सीमा आल्याने, तेथे ते अंगावर घाव येणे व त्याचें निवारण करणे होणें हेच मुळीं जयच पाहविणारें झाले – तेथें जय हीच श्री विराजमान झाली : तेथें सूर्यलोकच तो शोभविला असे केव्हांहि. (७२)

अहो ! वायूबरोबर धावणे व्हावे असा हेवा पायाने पांगुळा जो आहे त्याने करणे शक्य नाहीं – देहबुद्धि नाहींशी झाली तरच भक्तीचे पाय तेथें येऊ शकतील व मग ते म्हणजे ईशकृपेनेच 'गिरि उल्लंघणे' एक जसे : ' पांगुळा वायूसि हेवा नव्हेचि ! ' पांगुळला आहे प्राण जो त्या प्राणास प्राणपणाचे होणे झाल्याशिवाय – तेथे प्राण असमर्थतेचा झालेला तेथें त्या पांगुळल्या प्राणाने हेवा करणें हे नव्हेच ! हेवा करून कां कोठे प्राणसमर्थनाची योग्यता येईल ? हे जितके खरे तितकेच खरे ह्या देहदशेने असणाऱ्या जीवानीं – देहवंत अशा जीवानीं – ह्या अव्यक्तामध्ये गति का प्रवेश होणे ते अव्यक्त हे दोन तऱ्हांचें. एक जे ते गुणमयीचे व दुसरे ते सनातन ब्रम्हाचे. पहिल्यामध्ये त्रिगुण साम्य समतोलपणानें असणारे – ती दैवी मायाच म्हटली गेलेली. तेथें ही सृष्टीच जशी अथरलेली – ( सृष्टिपणास आलेली) : तेथें गुणच सर्व महत्त्व घेऊन असलेले होत. आतां त्या गुणाना अतीत होऊन जे अव्यक्त गतीचे महत्त्वास येणे हे अति दुस्तर असे होय : व त्याहिपलीकडे असणारे जे दुसरे परमश्रेष्ठ सनातन अव्यक्त तेथें गति ही तर अति दुरापास्त – ते परम पद : अविनाश तत्त्व, अक्षर असे – प्राप्त करून घेणें हे अशक्य होय – ती ज्ञानोत्तर भक्तिच म्हटली. (७३)

इतकें कठिण असल्यामुळे जरी बुद्धीला सर्व धैर्याचें केले – धैर्य हे बांध्याचें, सांचेपणाचें करून अथवा आकाशास बांधून घेऊन तेथें झोंबणें केले – तरी क्लेशच होतात, क्लेश भोगावे लागतात : अहो ! जेथे ह्या प्राण्याचें सर्व अंगच मुळीं क्लेशांत बुडाले आहे, अशा त्या क्लेशामधून बाहेर निघणेच होत नाहीं.

क्लेश कमी होण्याकरितां व समाधि सिद्ध करण्याकरितां करावे लागणारे उपायः—१ तप ( कायिक, वाचिक, मानसिक ), २ स्वाध्याय (अभ्यास), ३ ईश्वरप्रणिधान ( कर्मफल ईश्वरास अर्पण करणें ह्यास ' क्रियायोग ' म्हणतात ). पंचक्लेशाः = अविद्या, अस्मिता, राग, द्वेष, अभिनिवेश. १ अविद्या म्हणजे नित्य शुद्ध व सुखमय असा आत्मा सोडून, अनित्य, अशुद्ध व दुःखमय अशा अनात्म

वस्तूचें ग्रहण करणें ते अज्ञान २ अस्मिता – द्रष्टा (आत्मा – नित्य, शुद्ध, अनंत व नित्य) व दर्शन-साधन (ज्याच्याद्वारे तो हे जग पाहूं शकतो ते – चित्त, बुद्धि, मन आणि ज्ञान इंद्रिये ) यांची एकात्मता हाच अहंकार होय ३ आपले मन कोठेहि बाधलें जाणे याचे नाव आसक्ति (किंवा राग). ४ दुःख-दायक वस्तूचा विचार – अथवा ज्यापासून सुख होते ती वस्तु प्राप्त नच झाली तरी दुःखास कारण होते – अशा वस्तूचें चिंतन आपल्या मनास अस्थैर्य देतें व नावडच एक कां द्वेष मनास द्वद्वाचें करतो. स्वभावतः असणारी देहधारणेची आवड – हा विकारच एक – विद्वानांच्याहि चित्तास चिकटून असणारी अशी – तो अभिनिवेश होय सूक्ष्म, सुखद असे सुहृदतेचे ते रूप स्थूलापासून आरंभ करून प्रतितरंगांनीं जिंकण्याचे ते सूक्ष्म संस्कार आहेत ध्यानाच्या योगाने वृत्तीचा उपशम करता येतो. वृत्तीचे नियमन आपोआप होऊं लागते व मग स्वाभाविकपणेच सत्कर्मे हातून घडूं लागतील. तीं वाईट संस्कारांचे निर्मूलन करतील संस्कारांच्या समवायी रूपापासून क्लेशमूलक कर्माशय उत्पन्न होतो कर्माशय म्हणजे सर्व प्रकारच्या कर्मांची उत्पत्ति – जेथे अनेक प्रकारचे संस्कार समवायीरूपाने राहातात, ते बीजरूप संस्कार वाढीस लागले म्हणजे त्यापासून कर्मवृक्ष निर्माण होतो. झाडे नष्ट झालीं तरी पुढच्या झाडासाठीं बीजे शिल्लक ठेवून तीं नष्ट होतात. कर्म बरे वाईट असेल त्याप्रमाणे त्याचे फळ सुखदायक अगर दुःखदायक असणार ! विवेकी पुरुषाला, सर्व संस्कार दुःखदायक वाटतात जे दुःख अद्याप प्राप्त झाले नसेल ते टाळावे. ज्याचा त्याग करावयाचा ते कारण द्रष्टा आणि दृश्य याच्या संयोगामध्ये आहे : विश्व हे त्रिगुण आणि इंद्रिये याच्यापासून उत्पन्न झाले आहे प्रकाश, क्रिया व स्थिति असा त्याचा त्रिविध स्वभाव आहे अनुभव आणि मुक्ति याची प्राप्ति पुरुषाला व्हावी हा त्याचा हेतु आहे. विशेष ( स्थूलतत्त्व ), अविशेष ( सूक्ष्म किंवा तन्मात्ररूप ), लिंगमात्र ( बुद्धि ) व अलिंग ( आत्मा स्वय प्रकाश असून बुद्धि हे त्याच्या प्रकाशाचे परावर्तन आहे ) असे चार प्रकार गुणांत आहेत द्रष्टा ( आत्मा पुरुष ) केवळ ज्ञानमय आहे आणि स्वतः शुद्ध असूनहि बुद्धींत प्रतिबिंबित होऊन तिच्याद्वारे अवलोकन करितो पुरुष हा स्वतंत्र मुक्त असून ज्ञानमय आहे व हेच ज्ञान बुद्धिद्वारां व्यक्त होऊं लागले म्हणजे तो परतंत्र होऊं लागतो – असा त्याचा निश्चय होतो. 'तदर्थ एव दृश्यस्यात्मा' – त्याच्यामुळेच दृश्यास दृश्यत्व येतें. प्रकृति ( दृश्य ) स्वयंप्रकाश नाहीं. पुरुषाच्या अस्तित्वामुळे तिचे अस्तित्व आहे. पुरुषाच्या प्रकाशामुळे ती प्रकाशमय दिसते. तो तिचा प्रकाश दुसऱ्यापासून उसना घेतलेला आहे जगात जे अनंत पदार्थ उत्पन्न झाले आहेत, ते प्रकृतीचें कार्य असून, ही विविधता पुरुषास मुक्त करण्याकरिता आहे असा तिचा हेतु आहे – असें योगी म्हणतात. जो कृतार्थ – मुक्त – झाला आहे, त्याचें दृश्य त्याजपुरतें नाहींसें झालें असले, तरी ते इतरात असल्यामुळे नष्ट होत नाहीं दृश्य (जग – प्रकृति) आणि द्रष्टा ( आत्मा ) ह्यांच्या संयोगामुळेच दोघाच्या शक्ति प्रत्ययास येतात अज्ञान हें त्याचे कारण आहे अज्ञानाचा अभाव झाला म्हणजे संयोगाचाहि अभाव होतो. संयोग हाच त्याज्य आहे त्याचा त्याग हाच मोक्ष अथवा कैवल्य होय. नित्यानित्यविवेक अविरतपणे करणे हाच अज्ञाननाशनाचा मार्ग आहे विवेकप्राप्त योग्याची बुद्धि सात प्रकारच्या अत्युत्कृष्ट अवस्थांनीं युक्त असतेः— १ 'जे काहीं जाणण्यास योग्य ते जाणणें' ही पहिली पायरी. २ 'दुःखाचा परिहार' ही दुसरी पायरी. ३ 'सर्व ज्ञानाची प्राप्ति' ही तिसरी पायरी. ४ 'सर्व कर्तव्य समाप्ति' ही चवथी पायरी. ५ 'चित्त विमुक्ति'. ६ 'चित्ताचा लय' व ७ गुणसंबंधरहित आत्मा प्रकाशूं लागणे ही सातवी पायरी होय. योगाच्या निरनिराळया अंगाच्या अभ्यासाने अशुद्धीचा क्षय होतो, व विवेक उत्पन्न होण्याइतके ज्ञान प्रज्वलित होतें. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रम्हचर्य आणि अपरिग्रह यांना 'यम' म्हणतात. अंतर्बाह्य शुचिता ( शौच ), संतोष, तप, अभ्यास आणि परमेशपूजन ह्याना 'नियम' म्हणतात. अंतर्बाह्य

शुचिता उत्तम प्रकारें होऊं लागली म्हणजे देहबुद्धीचे जाडय किंवा शरीरावरील लक्ष्य – स्थूलदेहासंबंधीं विचार – हळूं हळूं कमी होऊं लागते - चेहऱ्यावर सद्विचाराचें प्रतिबिंब येऊं लागतें व त्यामुळे सात्विक आनंद, एकाग्रता, इंद्रियजय आणि आत्मदर्शनाची योग्यता हीं उत्पन्न होतात संतुष्ट वृत्तीमुळे उत्तम सुखाचा लाभ होतो. तपाचरणानें शरीराच्या इंद्रियाना शक्ति प्राप्त होतात आणि अशुद्धीचा क्षय होतो. 'स्वाध्याय' म्हणजे मंत्रजपामुळे इष्ट देवता प्रसन्न होते : ईश्वराचे ठायीं सर्वार्पण (ईश्वरप्रणिधान) करण्याने समाधि प्राप्त होते – समाधि ही पूर्णत्वास येऊं लागते स्थिर व सुखावह तें 'आसन'. थोडयाशा प्रयत्नाने आणि अनंताचें ध्यान केल्याने आसन स्थिर आणि सुखावह होते चित्ताचा भंग करणाऱ्या द्वंद्वाचा विक्षेप नाहींसा होतो. बाहय आणि अंतर (स्तंभवृत्ति) असे प्राणायाम प्रकार असून देश, काल, दीर्घत्व अथवा सूक्ष्मत्व यामुळे त्यात आणखी प्रकार उत्पन्न होतात आतील अथवा बाहेरील पदार्थावर प्राणशक्तीची प्रेरणा करणे हा चवथ्या प्रकारचा प्राणायाम आहे त्यामुळे चित्ताच्या प्रकाशावरील आवरण दूर होते इंद्रियाना त्या त्या विषयांतून परतवून चित्तरुपांत त्याची स्थापना करणे त्यास 'प्रत्याहार' म्हणतात. त्यानें इंद्रियांवर पूर्ण जय प्राप्त होतो. एकाच विषयावर मन स्थिर करून ठेवणे यास धारणा म्हणतात. विशेष विषयाशीं एकाग्रता अखंड राहिली म्हणजे त्यास '**ध्यान**' म्हणतात. जेव्हां ध्येयाचे बाहय स्वरुप सोडून अंतःस्वरुपात मात्र मन तद्‌कार होऊन राहाते, तेव्हां त्या स्थितीस '**समाधि**' म्हणतात एकाच विषयावर 'धारणा, ध्यान व समाधि' ह्या तिहींचा अभ्यास करणे यास '**संयम**' हे नांव आहे संयम करितां आला म्हणजे ज्ञानाचा प्रकाश प्राप्त होतो. संयमाचा अभ्यास पायरीपायरीनें करावा लागतो मनाची अस्थिरावस्था नाहीशी होऊन नियमनानें त्यास स्थिरावस्था प्राप्त झाली म्हणजे त्याला निरोधक सामर्थ्य येते व निरोधावस्था प्राप्त होते तेथील प्रवाह संस्कारानें स्थिर होतो सर्व विषयाचे ग्रहण करण्याच्या शक्तीचा क्षय आणि एकाग्रतेच्या शक्तीचा उदय झाला म्हणजे चित्ताला **समाधीची** अवस्था प्राप्त होते. ज्यावेळी भूत आणि वर्तमान याचा तुल्य प्रत्यय येईल, त्यावेळीं मनाची **एकाग्रता** झाली असे समजावे स्थूल आणि सूक्ष्म स्वरुपात आणि इंद्रियांत मनाच्या ज्या तीन अवस्था सांगितल्या आहेत, त्या म्हणजे आकार, काळ व स्थिति यासंबंधीं होत : (मन वृत्याकार होणे ही आकाराची अवस्था केवळ वर्तमान काळात त्या वृत्तीला धरून ठेवणे ही कालासंबंधीं अवस्था आणि तेंच मन भूतकाळांत नेऊन वर्तमान काळाचा विचार सर्वस्वी सोडून देणें ही स्थितीची अवस्था आहे जे अनेक अभ्यास आहेत त्यांमुळे योग्याच्या मनाला ह्या तीन अवस्थावर ताबा चालविता येतो असा ताबा चालविता आला तरच त्यास संयमाची प्राप्ती करून घेता येईल.) भूत, वर्तमान अथवा भविष्य याचा परिणाम ज्यावर होतो त्यास '**सगुण**' म्हणतात ज्या पदार्थावर काळाचा आणि संस्काराचा परिणाम होतो आणि ज्यात वारंवार बदल होऊन ज्याचे रूप नेहमीं दृश्यास येते त्यास '**सगुण**' म्हणजे गुण आणि धर्म यानीं युक्त असे म्हणतात [योगसूत्रावरून] (७४)

योगमार्गाचा अवलंब करणारे धिंवसा बांधून आकाशास झोंबतात, पण त्यांना क्लेशच होतात आणि म्हणून दुसरे जे भक्तयोगी – भक्ति अंगास चिकटलेले असे (योगी) भक्त, ते ही क्लेशाची अवस्था भोगणारे होत नाहींत. (७५)

**ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।**
**अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ॥ ६ ॥**

ये = सगुण उपासक. मयि सर्वाणि कर्माणि सन्यस्य = सर्व कर्मे फलासहित मला समर्पण करून. मत्पराः = माझी प्राप्ती हेंच ध्येय ठेवून. अनन्येन एव योगेन = अनन्यभक्तीच्या योगेकरून मला

विश्वात्मक देवाला सोडून अन्यत्र ज्यांचे मन जात नाहीं. माम् ध्यायन्तः उपासते = ध्याननिष्ठ होऊन माझी उपासना करतात; नेहमींची श्रवणगोडी ही ध्यानानें स्थिर केलेली.

ये तु मयि सर्वाणि कर्माणि संन्यस्य मत्पराः अनन्येन एव योगेन माम् ध्यायन्तः उपासते

परंतु जे सगुण उपासक मला ( परमेश्वराला ) सर्व कर्मे फळासह अर्पण करून, माझी प्राप्ति हेंच ध्येय ठेवून, मला विश्वात्मक देवाला अनन्य भक्तियोगाने ध्यानाचे करून समाधिगम्य करून उपासतात, सेवितात.

**कर्मेंद्रियें सुखें । करिती कर्में अशेषें ।**
**जियें कां वर्णविशेषें । भागा आलीं ॥ ७६ ॥**
**विधितें पाळित । निषेधातें गाळित ।**
**मज देऊनि जाळित । कर्मफळें ॥ ७७ ॥**
**ययापरी पाहीं । अर्जुना माझ्या ठायीं ।**
**संन्यासूनि नाहीं । करिती कर्में ॥ ७८ ॥**
**आणिकही जे जे सर्व । कायिक वाचिक मानसिक भाव ।**
**तया मोवांचूनि धांव । आनौती नाहीं ॥ ७९ ॥**
**ऐसे जे मत्पर । उपासिती निरंतर ।**
**ध्यानमिसें घर । माझें झालें ॥ ८० ॥**
**जयांचिये आवडी । केली मजसी कुळवाडी ।**
**भोग मोक्ष बापुडीं । त्यजिलीं कुळें ॥ ८१ ॥**
**ऐसें अनन्ययोगें । विकिले जीवें मनें आंगें ।**
**तयांचें काई एक सांगे । जें सर्व मी करी ॥ ८२ ॥**

( ७८ ) नाहीं करिती = नाहींशी करतात ( ७९ ) आनौती – आतौती = त्यांच्या भावाच्या धावांना मीच ठाव होऊन असतो. ( ८१ ) कुळवाडी = व्यवहार. कुळें = साधनाची घराणीं. ( ८२ ) अनन्ययोगें = एकनिष्ठतेने, पूर्णपणे. विकले = परमेश्वराधीन झाले, माझ्या प्रेमामुळें विषयभोग कां मोक्षपद हे सोडून दिले, व जीवानें, मनानें व अंगानें मजला विकले गेले, अशांचें सर्व कांहीं मला करावें लागते, मी करतों

कर्मेन्द्रियांनीं सहजपणे सुखरूप होऊन सर्व कांहीं कर्में – जीं काहीं वर्णविशेषेकरून भागास म्हणजे वाट्यास आलेलीं – भक्तिमार्गी पुरुष आनंदानें करतात. (७६)

शास्त्रविधीचें योग्य पाळण करून निषिद्ध जे ते टाकून देऊन व मजलाच तीं कर्मफळे देऊन त्यांनीं तीं कर्मफळे नाहींशीं केलीं – ते नाहींसे करतात – शास्त्राज्ञा पाळतात, निषिद्ध कर्में करीत नाहींत. सर्व कर्मे मला अर्पण केल्यानें त्या कर्मांचा नाश होतो. (७७)

याप्रमाणें, हे अर्जुना, जाण कीं, त्यानीं तीं कर्में मजमध्येच संन्यासून, तीं नाहींशीं केलीं : त्यांनीं आतां कर्मेंच मुळीं केलीं नाहींत असे होते. (७८)

आणिकहि जे जे कांहीं कायिक व मानसिक कां वाचिक भाव तेहि पण त्यांनीं मजमध्ये स्थिर केलेले. त्यांचें धांवणें हे मजमध्येच होत असणारे. त्यांची धांव मजमध्यें होणारी. मजशिवाय दुसरीकडे त्यांची धांव अन्य ठिकाणीं पाहातच नाहीं, वाहातच नाहीं, जातच नाहीं : त्यांनीं काया, वाचा व मन हीं सारीं मजकडेच लाविलेलीं असतात. (७९)

असे जे मत्परायण – माझेच म्हणविणारे – मजला आपले म्हणविणारे त्यांनीं निरंतरच्या उपासनेनें मजला घरच केले. ध्यानाच्या योगेंकरून ते माझेच घर होऊन जातात ध्यानमुद्राच ती जशी–ते माझेच घर होऊन बसले – घर होऊन आहेत ते सदोदित माझीच उपासना, माझच ध्यान करीत असल्यानें, ते माझे निवासस्थान होतात (८०)

त्याच्या आवडीने मजशीं उदीमच केला ! भोगच एक आवडतो ज्याना, का मोक्षच एक जिवावर उदार होऊन आपला म्हणविला, अशीं तीं कुळेच ( कुटुंबभाराचीं, संसारछंदाची ) त्यानीं सोडून भोगमोक्ष बापुडीं लाजविलीं. (८१)

माझ्या प्रेमामुळे ज्यानीं विषयभोग व मोक्षपद सुद्धा सोडून दिले व अशा प्रकारे जे सर्वस्वी मला विकले गेले, त्याचें सर्व कांही मला करावे लागते असे अनन्ययोगेंकरून मुद्राच ती मजला दिली–माझे घरच ती मुद्रा झाली, मुद्राच ती ते स्वत. झाले. असे जे अनन्ययोगाने योगरूप झालेले ते जीवे, मनें, आंगे माझ्या योगातच बसविले गेले, माझ्या भक्तीस लागले, माझेच घर झाले ! त्याचे साग बरे, काहींहि एक जरी, तरी मी करणार नाहीं ? मी त्याचे सर्व काहीं करतो. मी त्याना सर्व काही पुरवून असतो मी त्यांचे एकाद काम करीत नाहीं असे नसून, त्याचे सर्व कांहीं मी करतो. त्याचे काय काय बरे मी करीत नाहीं ! (८२)

**तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।**
**भवामि न चिरात् पार्थ मय्यावेशितचेतसाम् ॥ ७ ॥**

मयि आवेशितचेतसाम् = माझ्या ठिकाणीं ज्यांनीं चित्त स्थिर केले आहे अशा निष्काम अनन्य भक्तांचा. मृत्युसंसारसागरात = मृत्युरूपी संसारसागरापासून न चिरात् = अगदीं लवकर, तेव्हाच. समुद्धर्ता भवामि = उद्धार करणारा होतो

मयि आवेशितचेतसाम् तेषाम् पार्थ मृत्युसंसारसागरात् अहम न चिरात् समुद्धर्ता भवामि ॥

माझ्या ठिकाणीं ( विश्वरूपामध्ये ) ज्यानीं आपले चित्त स्थिर केले आहे अशा निष्काम अनन्यभक्ताचा, हे अर्जुना, मी मृत्युरूपससारसागरापासून अगदीं लवकरच उद्धार करतों ( उद्धार करणारा होतो ). त्या मच्चित्त झालेल्या भक्ताचा मी या जन्ममरणरूप भवसागरांतून त्वरित उद्धार करतो.

**किंबहुना धनुर्धरा । जो मातेचिया पां ये उदरा ।**
**तो मातेचा सोयरा । केतुला पां ॥ ८३ ॥**
**तैंवि मी तयां । जैसे असती तैसियां ।**
**कळिकाळ नौकोनिया । घेतला पाटा ॥ ८४ ॥**
**येऱ्हवीं तरी माझिया भक्ता । आणि संसाराची चिंता ।**
**काय समर्थाची कांता । कोरान्न मागे ॥ ८५ ॥**
**तैसें तें माझें । कलत्र हें जाणिजे ।**
**काईसेनिहि मी न लाजे । तयाचेनि ॥ ८६ ॥**
**जन्ममृत्यूंच्या लाटीं । झळंबती ह्या सृष्टी ।**
**ते देखोनिया पोटीं । ऐसें जाहलें ॥ ८७ ॥**

**भवसिंधूचेनि माजें । कवणासी धाक नुपजे ।**
**येथ जरी कीं माझे । बिहिता हन ॥ ८८ ॥**
**म्हणोनि गा पांडवा । मूर्तीचा मेळावा ।**
**करूनि त्यांचिया गांवा । धांवत आलों ॥ ८९ ॥**

(८३) पोटीं आलेले पोर हे आईला प्रेमाचा विषय असतें, सोयरेपणाचा विषय नसते (८४) कळिकाळ नोकूनियां घेतला पाटा = कळिकाळांना पराभवून त्यांचे पालनपोषण करतो – त्यांचें बोलणे, चालणे इ. व्यवहार आपणाकडेस घेऊन तेथे एक खूणगांठच बांधली असे करतो, मुहूर्तच जसा असे करतो त्यांना मी आपल्या आश्रयाखालीं, वस्त्राखालीं घेतो. (८५) कोरान्न माग – भुकेंत शोची. कोरान्न = कोरडी भिक्षा, नच प्रेमाची भिक्षा. (८६) लाटीं = लाटांनीं झळंबती = बुडतात. पोटीं ऐसे जाले = पोटीं प्रेम आले. (८९) मूर्तीचा मेळावा = सगुण रूपे. त्यांच्या गावा = त्यांच्या देहांत.

अहो, काय बरे सांगावे कीं, येथे! हे पार्था, जो कोणी मातेच्या उदरीं येऊन जन्मतो तो मातेच्या सोयरेसंबंधाचा कितपत असेल बरें ? पोटच्या पोरावर आईचे जसे प्रेम असतें, तसे माझे भक्तावर प्रेम असतें. पोटीं आलेले पोर ते आईला प्रेमाचा विषय असते, सोयरेपणाचे नसते. (८३)

त्याप्रमाणें मी त्यांना, जसे असतील तशांना – कळिकाळ निवारून – सांभाळण्याचे जसे का अधिकारपत्रच घेतले आहे. त्यांना जसे कांहीं आपल्या कमरेस खोविले, कमरेस लाविले, त्यांना आधार दिला, उन्हांत पाय पोळत असतांना कडेवरच जसे मूल घेतले जातें तसे. त्यांचे बोलणे हे सर्व मी आपल्या अधिकारात घेतले. तेथे काय तोंडाचा पट्टा सुटला आहे पाहा असे ते तोंडाचे वाजणे मीं आपल्यावर घेतले. जेथे ध्यान नाहीं का उपासना नाहीं असे जे तोंडच सर्वथैव वाजविणारें त्यास ध्यानाची का उपासनेची दृष्टि देऊन त्यांचे तोंड वाजणेंच बंद केले अशांना मी तर त्या कळिकाळासच पराभवून आपल्या छायेखालीं घेतले. अंगाचा पाळणाचा – रक्षणाचा – अधिकारच मीं आपल्याकडे घेतला : त्याचा पतकरच जसा कांहीं मीं घेतला असे आहे. कळिकाळांना वारून मी त्याचें पालन करतो व मग त्यांना संसाराची चिंता कसली ? त्यांचे कांहीं अधिकउणें झाले तर त्याची लाज मला असते जसे ते असतील तशांना मी सोयरेधायरेपणाचें नच होणारें असे जे तेथे जसे का एक लग्नच (पाटाचें) लावून त्याना आपलेसे करतों. (८४)

हा देहरूपी - देहबुद्धिरूपी – संसारच पाठीस लागलेला, तेथे समर्थ जे त्यांनीं तर ह्या देहबुद्धीस झुगारून देऊन योगबुद्धीच एक तेथे स्थिर केली. अहो, अशी ती योगसमृद्धि ही तर सगुण अशीच केव्हाहि. त्वरिततेच्या अंगानें योगच जोगविला, अशी ती काय भूक लागली म्हणून खिन्न होत्साती असेल ? तेथे तिला भूक लागणें व ती भूक त्वरिततेनें शमणे हे होणारच – होतच असते केव्हाहि : ती काय कोरडी भिक्षा मागत बसेल ? अहो, जेथे नुसते अघळपघळ असे कोरडेच बोलणें, तेथे ओलावाच नाहीं भक्तीचा, कां ध्यानाचा, कां योगाचा, कां उपासनेचा, कां माणुसकीचा, का आर्जवाचा, म्हणून जेथे भक्तबाणा, तेथे चिंतामणीच प्रसन्न झाला असेंच होऊन असते. (८५)

तसें ते माझे कुटुंबच एक जाण. आपलींच माणसें – एकाच कुटुंबापैकीं माणसें – तशीं तीं जाण. त्यांच्याकरितां कसलेंहि काम मला करावे लागलें तरी मी लाजत नाहीं. असे तें माझे कलत्र जाणावे. तेथे त्यांचे जे कांहीं एक जसे असणें, त्यानें मी लज्जास्पद होत नाहीं मी तेथे लाजतच मुळीं नाहीं कैसेहि प्रकाराने त्यांचे ते असणे – कशाहि प्रकारानें त्यांचे ते कलत्रानें असणें हें मला लाजवीत नाहीं – सलज्ज असा मी तेथे होत नाहीं. मला तेथे लाज आडवीत नाहीं. कीं राम आठविला, कीं लाजच पुढे झाली असें तेथे होत नाहीं. मी लाज सोडून रामच पुढे घेऊन असतों. (८६)

जन्मणें व मरणेंरूपी लाटांनीं – जन्ममरणाच्या लाटांमध्ये – ह्या सृष्टीच्या सृष्टी बुडतात व तें पाहून पोटामध्ये 'अहो हें असें कसें' असेंच मला वाटते. ह्या भव म्हणजे संसाररूपी सिंधूच्या माजानें – भरतीनें – कोणास बरें धाक उपजत नाहीं ? आणि येथे जर माझे म्हणविले जाणारे – माझे असे जे ते – ते जर भिऊं लागले, असे ते कदाचित् जरी माझे तरी भिऊं लागतील म्हणून तर, हे अर्जुना, देहधारींचा समुदाय एकत्र करून त्याच्या गांवाला धावत आलो गुणांमधील जे उत्तमत्व तें मूर्तिच झालें – सगुणत्वास आले – अशा अनेक गुणांचें जे सगुणत्व तेथील सर्वोत्कृष्टत्व एकत्रित झाले, असें जे एक प्रेमलक्षण तें देवत्वावर उभे होणारें. तेथे मग त्याचा तो देह म्हणजेच त्याचें ते गांव सर्व प्रेमाचें असे ते होय. अथवा असेंहि म्हणणे होते कीं, सगुण रूपे धारण करून मला त्याच्यासाठीं अवतरणच एक बुद्धीचें करावें लागते, किंवा रामकृष्णादि अवतार घ्यावे लागलेले – झालेले.

सगुण रूपाची चटकच लागली आहे, संवयच ती होऊन आहे, म्हणून तसलीच सोय हा जीव पाहातोः तसलाच मार्ग ह्या जीवदशेस आवडतो. परंतु ह्या चतुर्भुज मूर्तीवर – सगुण रूपावरच – सर्वथैव प्रेम ठेवूं नये. चतुर्भुज मूर्तिच सर्वथैव प्रेमाची करून, त्याशिवाय दुसरे तिसरे कशाची – सख्यसुखापुरतीच ती वागवावी लागणारी फक्त – काहीं आवड नच असणे हे नको. जेथें स्थूल भोग हाच एक महत्त्व दिला जाणारा व त्याशिवाय दुसरीं तिसरीं कोणतींहि सर्व अशीं तीं व्रतेंच मुळीं मागें पडलीं व हा एकटाच भोग ज्यायोगें पुढे होऊन असेल असे करूं नये. येथे तें अनेकत्वानें एकत्वास आलेले ब्रह्मच व्हावें, होऊन असावें. अशा अनन्यभक्तास देव केव्हांहि साहाय्यच असतो. तेथे नामरूप मूर्ति नकोच नको – तेथें तीच एक पुढे घेऊन असणें हे बरें नव्हे. " अस्ति भाति प्रियं रूपं नाम चेत्यंशपंचमम् । आद्यत्रयं ब्रह्मरूपं जगद्रूपं ततो द्वयम् ॥ " (८७, ८८ ८९)

**नामाचे सहस्रवरी । नौका इया अवधारी ।**
**सजूनियां संसारीं । तारू जाहलों ॥ ९० ॥**
**सडे जे देखिले । ते ध्यानकासें लाविले ।**
**परिग्रहा घातले । तरियावरी ॥ ९१ ॥**
**प्रेमाची पेटी । बांधिली येकाचे पोटीं ।**
**मग मिनले तटीं । सायुज्याचिया ॥ ९२ ॥**
**परी भक्तांचेनि नांवें । चतुष्पादादि आघवे ।**
**वैकुंठीचिया राणिवे । योग्य केले ॥ ९३ ॥**
**म्हणौनि गा भक्ता । नाहीं येकहि चिंता ।**
**तयातें समुद्धरिता । आथी मी सदा ॥ ९४ ॥**
**आणि जेव्हांचि कां भक्ति । दिधली आपली चित्तवृत्ति ।**
**तेव्हांचि मज सुति । तयांची नाटी ॥ ९५ ॥**
**यया कारणें गा भक्तराया । हा मंत्र तुवां धनंजया ।**
**शिकिजे जे यया । मार्गा भजिजे ॥ ९६ ॥**

(९०) नामाचे = ईश्वरनामाच्या. सजूनियां = सिद्ध करून. तारू = नावहाक्या, नावाडी, संसारनदींतून उतरून नेणारा. (९१) सडे = एकटे, सडेसोट. ध्यानकासे लाविले = ध्यान करावयास लाविले. कास = आवड, गोडी, आधार. परिग्रही = कुटुंबवत्सल, उपाधियुक्त. (९२) पेटी = भक्ति व नामरूपी सांगड. (९३) राणिवे = राज्याला. (९४) समुद्धरिता = उद्धरणारा. आथी = असतो. (९५) सुति = घालतात, संबंधाचे करतात. नाटीं = छंदांत, व्यवहारांत. (९६) मंत्र = थोडया शद्बांत मार्मिक उपदेश. शिकिजे = शिकावा.

सहस्र नामांमधील एकादे नाम जरी साधलें, तरी तें नौकाच एक होय. त्याप्रमाणें ह्या नामाखालीं भगवन्नामानें चालणाऱ्या हजारों नांवा त्याच जशा ह्या संसारामध्यें सजविल्या गेल्या. तारक तत्त्वच मी तेथे होऊन असलेलों – मी तारक झालों – तारक होणारा – तारक असतोच असतों. ह्या संसारसागरांतून तरून जाण्यास नांव हांकणारा मी नावाडी (तारू) त्यांना संसारसागरातून तारून नेतो. माझीं नांवे हीं त्यांच्या नावाच जशा. (९०)

एकटे जे होते त्यांना ध्यानधारणादि अभ्यासाचा टेका दिला. त्यांना तसले ते अभ्यास दिले – त्यांना अभ्यासाचे केले – त्या तसल्या अभ्यासास त्यांना लाविले. कुटुंबवत्सल जे त्यांना नावेचा आश्रय झाला. घेणे देणें हें जेथे परस्पर प्रेमधागाच वाढवीत असलेले – जेथे कुटुंबवत्सलताच एक व ती नावच जशी ह्या संसारसागरांतून तरून जाण्यास. जे भक्त सडेतोड होते त्यांना ध्यानास लाविलें – त्यांना ध्यानाच्या आवड गोडींत बसविले – ध्यानाच्या प्रेमपान्हाच्या वेधात ठेविले. कुटुंबवत्सल जे त्याना नामाचा जप करण्यास सांगितले (९१)

प्रेमाची जोड – सांगड एकाच्या पोटीं बांधिली व त्यांना सायुज्यसिद्धीच्या किवा मुक्तीच्या किनारीं आणिले – तटींच बसविले. वर भक्त अशी जी कोटी ती पुढे घेतली तर तेथे भक्तबाणा हाच पुढे झाला, व त्यानें तर चतुष्पाद हेहि आघवे गजेंद्रादि जसे हे वैकुंठींच्या राज्यासहि शोभवं केले. वैकुंठामधील जे 'ना विष्णुः पृथिवीपतिः' त्यांच्या राज्याला शोभायमान असे – योग्य असे – केले. कांहींच्या पोटाखालीं प्रेमाची पाटी बांधली म्हणजे त्यांना प्रेम दिले. अशा रीतीने सर्व भक्तांना मोक्षाच्या तीरावर आणून सोडले. भक्ति करणारे चतुष्पादसुद्धां तरून गेले. (९२, ९३)

आणि एवढयासाठीच, हे पार्था, या भक्ताना एकहि चिता असत नाहीं कारण त्यांना मी नेहमींच्या नेहमींच उद्धरून असतो. भक्तांचा उद्धार करणारा असाच मी असतो – असाच मी आहे (९४)

आणि जेव्हापासून म्हणून त्यानें आपल्या चित्तवृत्तीने भक्तीसच आपले म्हटले, चित्तानें भक्तच झाला, सर्व वृत्तींनीं भक्तीस लागला, तेव्हांच, हे पाहा, मजला त्याच्या व्यवहारांत घालतात. त्याचाच छंद मला लागून राहातो. त्याचे अज्ञान हें जसें स्तुति करणारें, मजला जागा हो म्हणणारे, त्याची झोप कां अज्ञानरात्र ही मजला म्हणणे करून, मजला आळवून, जागविते – जोगविते. अज्ञान – अंधारे ही तुमचीं स्तुति करणारीं – तुम्हांस आळविणारीं अशीं – तेथे आप्तसंबंध हा कौतुकाचा कां खेळाचा एक जसा. (९५)

येथे, हे भक्तराया अर्जुना, हा मंत्र – चित्तवृत्ति भक्ति दिधली – तुवां शिकावा. तेथे देहबुद्धीचीं अंधारे हीं तुम्हांस महत्त्व देऊन – तुमची स्तुति करून – तुम्हावर सर्व भार टाकून जागी होणारी अशी अर्धगामी वृत्ति व्हावी. तेथे प्रेमच बोलतें–चालतें–डोलतें असे ! देहबुद्धिच नाहींशी करून योगभावास महत्त्व जेथे पोंचतें तें ! हा मंत्र तुवां, हे धनंजया, शिकावाच शिकावा, जर कां तुजला या मार्गास भजणे आहे. म्हणून, हे अर्जुना, तूं हा भक्तिमार्ग धर. (९६)

**मय्येव मन आधत्स्व मयि बुद्धिं निवेशय ।**
**निवसिष्यसि मय्येव अत ऊर्ध्वं न संशयः ॥ ८ ॥**

मयि एव मनः आधत्स्व = मजमध्येच मन (लक्ष) लाव, माझ्या ठायींच मन ठेव, माझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं मन स्थिर कर. मयि बुद्धि निवेशय = माझ्या ठिकाणीं तुझ्या निश्चयशील बुद्धीला प्रस्थापित कर – प्रविष्ट कर व बुद्धि अक्षरांत स्थिर कर. अतः ऊर्ध्वम् = त्यानंतर. मय्येव निवसिष्यसि = माझ्याच ठिकाणीं तूं राहशील, मग माझाच तुला आश्रय, निवास. न संशयः = यामध्ये

तिळप्राय शंका नाहीं. अतः ऊर्ध्वम् न संशय : = तर मग सहजच एक ऊर्ध्वगामी, स्वर्गीचें जसें असेंच तें स्वभावलक्षण ; शद्बोच्चार धारणास्थिरतेचें - मनःस्थैर्य स्थिरबिंदूचें - असें तें निःसंशय होते.

मयि एव मनः आधत्स्व, मयि बुद्धिम् निवेशय, अतः ऊर्ध्वम् मयि एव निवसिष्यसि न संशयः ।

मजमध्येंच मन ( अग्निहोत्र-सगुणरूप-सस्काराचे-व्रतनदारीचें ) स्वभाव-अध्यायाचे कर-स्वभावाच्या अभ्यासांतच जसें स्थिर केले असें कर : बुद्धि ही व्यासगाची, एकनिष्ठ कर- मजमध्येच तुझ्या त्या बुद्धीला बुद्धीयोगाच्या अक्षराचे कर : याप्रमाणे मजमध्येच जर बसणे झाले-बुद्धि निवासाची केली- माझ्या आधाराची केली, तर सहजपणेच मग सात्विकतेचे ऊर्ध्व-गामी होणें होतें : मग ब्रम्हचर्यच आचरिले-तेथे स्वर्गच एक भेटतो-असें निःसशय होय : म्हणून तू माझ्याच ठिकाणीं मन ठेव, माझ्याच ठायी बुद्धि स्थिर कर, म्हणजे देहपातानंतर तू मत्स्वरूपीं निरतर वास करशील यांत सशय नाहीं.

**अगा मानस हें येक । माझ्या स्वरूपीं वृत्तिक ।**
**करूनि घाली निष्टंक । बुद्धिनिश्चयेसीं ॥ ९७ ॥**
**इये दोन्हीं सरिसीं । मजमाजीं प्रेमेसीं ।**
**रिगाली तरी पावसी । मातें तूं गा ॥ ९८ ॥**
**जें मन बुद्धि इहीं । घर केलें माझे ठायीं ।**
**तरी सांग जें काई । मी तूं ऐसें उरे ॥ ९९ ॥**
**म्हणोनि दीप दीपें पालवे । सवेंचि तेज मालवें ।**
**कां रविबिंबासवें । प्रकाश जाये ॥ १०० ॥**
**उचलिलिया प्राणासरिसीं । इंद्रियेंहि निघती जैसीं ।**
**तैसा मनबुद्धिपासीं । अहंकारु ये ॥ १०१ ॥**
**म्हणोनि माझिया स्वरुपीं । मन बुद्धि इये निक्षेपी ।**
**येतुलेनि सर्वव्यापी । मीचि होसी ॥ १०२ ॥**
**यया बोला कांहीं । अनारिसें नाहीं ।**
**आपुली आण पाही । वाहात असे गा ॥ १०३ ॥**

( ९७ ) वृत्तिक - सवृत्तिक=वृत्तीसह. निष्टंक=अव्याहत, निश्चयाच्या बळावर, सिद्धांतपूर्वक. ( ९८ ) सरिसीं=सारखीं, बरोबर. ( १०० ) पालवे=पदरानें मालवला असतां. ( १०१ ) उचलिलिया - उचललेल्या. प्राणासरिसी=प्राण चालल्याबरोबर. ( १०२ ) निक्षेपी=गुंतवून ठेव. ( १०३ ) अनारिसें= अन्य, वेगळे.

येथें जसें मन तें शरण म्हणणारें - तेथें उपदेशाच एक पुढें होऊन यावा - असे ते मन प्रार्थना करीत असलेलें - तेथे आश्रय, गृह, शरण, शिष्यत्व व उपदेश, कां आश्रय देणें शरण आलेल्यास हेच होत असलेलें होय. कीं अहो, निश्चयाच्या बळासह - निष्ठेच्या बळानें - बुद्धि ही निश्चयाची कर व मानस जे तें स्वरूपीं लाव मानस जसे रूपाचें झाले, वृत्तिसहित वृत्तिकरूपाचें असे ते मानस झालें - तेथे तें सर्व रूपच हया निश्चयाच्या बळानें वृत्तींना आले - वृत्ति रूपाच्या झाल्या - बुद्धि निष्ठेची झाली व ती निश्चयावर उभी राहिली. अंतःकरणाच्या व्यापारस्वभावाचें पाणिग्रहण बुद्धि करूं लागली - निष्ठाच जशी मांडीवर बसली - निष्ठेसच जसे मांडीवर घेतलें - तिला बसण्यास मांडीच दिली - बुद्धि हीच निश्चय झाली. (९७)

बुद्धि, मन व प्रेम यांनीं जर बरोबर माझ्यामध्यें प्रवेश केला, तर तुला माझी प्राप्ति होईल. मानस हें – मनरूपी प्रेमसरोवर हें – व बुद्धि अशीं हीं दोन्हीं सारखीं करून किंवा सरिसेपणानें वेगवान् अशीं करून, आवेशाचीं अशीं करून, शांतस्वभावाचीं अशीं करून, मजमध्ये प्रेमानें रिघालीं – दिवसेंदिवस शुक्ल पक्षांतील चंद्राची कला जशी वाढती होते, तसे तूं ह्या प्रेमास जर आपला प्रयत्न आणशील, तरीसुद्धां तूं मला पोहोंचशीलच. (९८)

मन व बुद्धि यांनीं माझ्या ठायीं जर घर केले, तर सांग बरें कीं तेथें काय मी एक निराळा व तूं एक कोणी तरी दुसरा असें उरेल ? तेथे मी तोच तूं व तूं तोच मी असे होऊन असणार हे केव्हांहि ( एकत्वाची धारणा बिंबून असणारी हें केव्हांहि ). असेच तें प्रेमाचें लक्षण असल्यानें तेथे मग मी आणि तूं हें द्वैत कोठून उरेल बरे ? (९९)

असे आहे म्हणून जर दिवा हा पालविला – स्वागताचा केला – पदरानें मालविला – तर दिव्याबरोबरच जी सर्व प्रकाशाची व्याप्ति असणारी, तेथें सर्व तेज हें मालवे म्हणजे ज्योतीच्या पाठोपाठ जातं, तें जसे का त्या पदरासच आकळून आहे. तें त्या पदराबरोबरच वावरणारे होतं – जसें कां रविबिंबाबरोबरच तेजाच्या सर्व रश्मि संचरून असतात. (१००)

प्राणच उचलून धरिला – दीपच पदराने मालविला – उचलून धरलेल्या प्राणाबरोबरच इंद्रिये हीं मार्ग क्रमूं लागतात – चालूं लागतात, त्याप्रमाणें मन व बुद्धि ह्या दोन्हींजवळच देहभाव किंवा अहंकर्तृत्व हेंहि पण येतेच येतें. अहंभाव हा या मनबुद्धीच्या जवळच असा आहे; म्हणून त्यांबरोबरच चालू लागतो, त्यांजवळचा होतो. ज्याप्रमाणें प्राणाबरोबर इंद्रियें जातात, त्याप्रमाणे जिकडे मन व बुद्धि हीं जातात, तिकडे त्यांच्याबरोबर देहाभिमान जातो : येथे प्राणाची उपमा ही मन व बुद्धीस पाहूं करते, तसें इंद्रियांची उपमा ही देहाभिमानास पाहाते. (१०१)

आणि एवढयाचकरितां माझ्या स्वरूपाच्या ठायीं – माझ्या रूपामध्यें – माझ्या सगुण स्वरूपाकडे – हीं मन व बुद्धि गुंतून ठेव. मन व बुद्धि हीं दोन्हीं माझ्या स्वरूपीं ठेव, म्हणजे सर्वव्यापी असा जो मी तो तुला लाभेल. मनबुद्धीस इतरत्र जाऊं देऊं नको. तेवढयानेंच सर्वत्र भरून राहिलेला जो परमात्माच एक असा तूं होशील निक्षेपणें, ठेवणें, घालणें मजमध्येच ह्या बुद्धीस ती जसी एकत्र केली असें कर. खुणेची कर. आणि एवढयानेंच मग सर्वव्यापी असा मीच होऊन जाशील. (१०२)

या बोलण्यामध्ये कांहीं दुसरें नाहीं – निराळे – अन्य प्रकार होणे, घडणें असे नाहींच. असें मी आपली आणच वाहून सांगतों. याशिवाय दुसरे-तिसरे कांहीं होतें म्हणजे प्रकारास येते असे नाहीं. वर सांगितल्याप्रमाणेंच ते घडते. हें तुला अनुभवानें समजूं लागेल, व ते खरेंच खरे आहे असेच झाल्यानें, तेथे मग माझी आणच एक वाहिली गेली असें होतं. प्रतिज्ञेवरच हे बोलणें करतों कीं, हे जसें बोलिले गेलें अगदीं तसेच हें खरेपणानें अनुभवास येतं. तसेच हें होते, तसेच हे आहे. झाडाला फळे फुलें येतात व तीं गळतात – देहीं व्याधी होतात व जातात – त्याप्रमाणे अहंकारगत – देहाभिमानगत इच्छा उठतात व मावळतात : त्यापासून मजला हानी ती कसली ! तेथे हाय मुळींच नाहीं ! चिराकाशांत मायारूप मेघजाळ आलें त्यापासून जे पर्जन्याचें पाणी वर्षले त्यानें चिराकाश लेशमात्रहि ओलें झालें नाहीं : चिद्रूपा मजला द्वैताचे घाव लागतील कसे ? मी मुळापासून अनादिसिद्ध असाच आहे. स्थूल, सूक्ष्म, कारण हे तिन्ही देह निमित्त मात्र (मिथ्या) होत : मी चिन्मय आत्मा, मला भय तें काय ? सर्व अभय असेंच ! (१०३)

णोनिदिपपालवे॥ संयेचितेजमालवे॥ कारविबिंबासवे॥ प्रकाशजा
ये॥१००॥ उचलिलीयां प्राणासरिसी॥ इंद्रियेंहि निघतिजैसी॥ तैसामनबु
द्धिपासि॥ आहंकारुये॥१॥ ह्मणोनिमासास्वरुंपी॥ मनबुद्धियें निक्षेपि॥
यतुलेनि सर्वव्यापि॥ मिचिहोसि॥२॥ ययाबोलाकांहि॥ अनारिसेनाहि॥
आपुलिआणपाहि॥ वाहातआसेगा॥३॥ श्लोक॥ ॥अथचित्तंसमाधा
तुनशक्नोषिमयिस्थिरं॥ अभ्यासयोगेनततोमामिच्छाप्तुंधनंजय॥९॥
आथवाहें चित्त॥ मनोबुद्धिसहित॥ मासाहातिअचुंबित॥ नशाकसिदेवें॥४॥
तरिगाऐसेंकरी॥ ययाआठाप्रहरामाझारी॥ मोटकेनिमिषभरी॥ देतुजा
ये॥५॥ मगजेजेंकानिमिष॥ देखैलमाझेसुख॥ तेतुलेंअरोचकाविष
पर्यिंदेईल॥६॥ जैसाथरदकाळुरिगे॥ आणिसरितावोहटोंलागे॥ तैसेंचि
ताकाढलवेगें॥ प्रपंचोनि॥७॥ किंपुनिवहूनिजैसी॥ शशिबिंबदिवसे
दिवसीं॥ हारपतआंवसे॥ नाहिंचिहोये॥८॥ तैसेंभोगाआतुनिनिगतां॥
चित्तमजमाजिरिगतां॥ हळुहळुपांडुसुता॥ मिचिहोईल॥९॥ आगा
आभ्यासयोगह्मणिजे॥ तोहाचिकुजाणिजे॥ येणेंकांहिननिपजे॥ ऐसेंना॥

लेखकाजवळ असलेल्या हस्तलिखित पोथीचा १२ व्या अध्यायातील अक्षराचा नमुना

**अथ चित्तं समाधातुं न शक्नोषि मयि स्थिरम्**
**अभ्यासयोगेन ततो मामिच्छाप्तुं धनञ्जय ॥ ९ ॥**

अथ चित्तम् समाधातुम् न शक्नोषि=चित्त समाधात, समधिगम्य, समसाम्य करण्यास जर शकला नाहींस, स्थिर चित्ताचें होणें हें सांपडत नसेल, अशक्य वाटत असेल, तर आसन, स्वस्थ असणे, उपोषण, आचारव्यवहार, प्रायश्चित, इ. चें वागविणें हें व्यवहारास घ्यावे, उपयोगांत आणावें हा अभ्यासाचा वेळ हा केव्हांहि आहेच, तेथे अमुक वेळ आहे व अमुक वेळ नाहीं असे नाहीं, नेहमींच अभ्यासांत असणे याला अभ्यास म्हणतात. हा अभ्यास व्यवहारानें तेव्हांच अंगवळणी होतो व तेथें एकांत हाहि सांपडूं शकतो. अभ्यासयोगेन=तेच ते पुन्हां पुन्हां करून अभ्यासाचा होण्यानें. इच्छाप्तुम्=प्राप्त करून घेण्याची इच्छा ठेव.

धनञ्जय, अथ मयि चित्तम् स्थिरम् समाधातुम् न शक्नोषि ततः अभ्यासयोगेन माम् आप्तुम् इच्छ।

चित्त समाधात, शात, समधिगम्य असे – साम्यच त्या सप्तधातूंनीं पाहिले असे – जर मजमध्यें स्थिर करता आले नाहीं, तुला तें शक्य झाले नाहीं, तर ते पुन्हा पुन्हा स्थिर करण्याचा अभ्यास कर. अशा अभ्यासाने मला प्राप्त करून घेण्याची इच्छा कर. भगवताचें नाम, रूप, गुण, लीला इ. चे अखड चिंतन करून अथवा प्राणायामादि अभ्यास करून तसेंच योग म्हणजे क्रियारूप होऊन माझ्या प्राप्तीची चाड धर.

**अथवा हें चित्त। मनबुद्धिसहित।**
**माझिया ठायीं अचुंबित। न शकसी देवो ॥ १०४ ॥**
**तरी गा ऐसें करीं। यया आठां प्रहरांमाझारीं।**
**मोटकें निमिषभरीं। देतु जाये ॥ १०५ ॥**
**मग जें जें कां निमिष। देखेल माझें सुख।**
**तेतुलालें अरोचक। विषयीं घेईल ॥ १०६ ॥**
**जे शरद्‌काळु रिगे। आणि सरिता ओहोटो लागे।**
**तैसें चित्त काढेल वेगें। प्रपंचौनि ॥ १०७ ॥**
**कीं पुनिवेहूनि जैसें। शशिबिंब दिवसेंदिवसें।**
**हारपत आंवसे। नाहींचि होये ॥ १०८ ॥**
**तैसें भोगाआंतुनि निगतां। चित्त मजमाजीं रिगतां।**
**हळु हळु पाण्डुसुता। मीचि होईल ॥ १०९ ॥**
**अगा अभ्यासयोग म्हणिजे। तो हा येकु जाणिजे।**
**येणें कांहीं न निफजे। ऐसें नाहीं ॥ ११० ॥**
**पैं अभ्यासाचेनि बळें। येका गति अंतराळें।**
**व्याघ्र सर्प प्रांजळे। केले येकीं ॥ १११ ॥**
**विष कीं आहारीं पडे। समुद्रीं पायवाट जोडे।**
**येकां वाग्‌ब्रह्म थोकडें। अभ्यासें केलें ॥ ११२ ॥**
**म्हणौनि अभ्यासासि कांहीं। सर्वथा दुष्कर नाहीं।**
**यालागीं माझिया ठायीं। अभ्यासें मिळ ॥ ११३ ॥**

(१०४) अचुंबित = समग्रपणें, शुद्ध, अस्पर्शित. (१०५) प्रहरां – पाहारांमाझारीं = प्रहरांमध्यें. मोटके = नेमकें, अल्प निमिषभरी = क्षणभर. आठ प्रहरांमध्ये एक क्षणभर तरी माझ्या स्वरुपीं लाव. (१०६) निमिष – निमिख. अरोचक = अनावड, अरुचि. (१०७) शरत्काळ = आश्विन-कार्तिक. ओहोटो लागे = आटूं लागते. प्रपंचौनि = प्रपंचांतून. (१०८) दिवसेंदिवसें – दिसेंदिसें = दिवसें-दिवस. आंवसे = अमावास्येस. (१०९) मीचि होईल – मीचि होसील – मीचि होई. (११०) अभ्यास = नियमितपणें एका विषयावर श्रम करणे. अभ्यासयोग तो हाच. (१११) अंतराळें = अंतरिक्षांत. प्राजळे = निर्वैर असे सरळ, निरुपद्रवी. (११२) वाग्ब्रम्ह = शद्बज्ञान, वेद, शद्बब्रम्ह, भाषाज्ञान. थोकडे = स्वल्प, लहानसें, हस्तगत. (११३) दुष्कर = कठिण, अप्राप्य. मिळ – मिळे.

किंवा जर हें चित्त मनबुद्धिसहित माझ्या हातीं पूर्णपणें, बिनचूकपणें, समग्रपणें मजला देऊं शकत नाहींस, शकणार नाहींस, जसा मी म्हणजे एक साक्षीच तेथें तुझी प्रत्येक हालचाल पाहाणारा, कर्मक्रिया पाहाणारा, जसें का अनुमोदन घेऊन, परवानगी घेऊन, तुझी प्रत्येक हालचाल व्हावी असेच मानलेले ज्यानें, असा एक साक्षीच ठेविला आहे, असे आपल्या वृत्तीस आश्रयाचें शरणगृह करणें म्हणजेच माझ्या हातीं चित्त (स्वजीवितप्रेम–हंसरें प्रेम) समग्रपणें देणे होय; व असे का जर नच करता आलें, तर ज्या चित्ताच्या मुखास वासनादिकांचा स्पर्श नाहीं असे तें माझ्या स्वाधीन कर. (१०४)

असे करणें किंवा हेंहि तुला नच साधलें तर दिवसाच्या आठ प्रहरापैकीं निदान एक क्षणमात्र तरी, अल्प क्षणभर तरी आपलें चित्त मनोबुद्धि यांसह मला अर्पण कर : असे तरी निदान कर कीं, तें चित्त या आठा पाहारांमध्ये थोडेसें कां होईना पण एक निमिषभर तरी माझ्या हातीं ते पाहातां पाहातां, प्रत्यक्ष, साक्षात् असे देत जा. (१०५)

मग किंवा तेव्हां ते जे कांहीं एक अल्प क्षणभर माझे सुख पाहील, देखेल, तेवढे तेवढे नावड-णेंच एक कां अरुचि ती या विषयांमध्ये घेईल. म्हणजे तेवढा वेळ तरी तुला त्या विषयाची अरुचि वाटेल, म्हणजे तुझे चित्त प्रपंचांतून बाहेर पडेल-निघेल–आणि माझ्या स्वरूपांत शिरून ते हळू हळू मद्रूप होईल. (१०६)

हा शरत्काल (म्हणजे आश्विन व कार्तिक हे दोन महिने वर्षाऋतूनंतरचे) जेव्हां सुरू होतो, आणि नद्यानाले हे आटूं लागतात, ओहोटूं लागतात, त्याप्रमाणें चित्त हे वेग घेऊन या प्रपंचामधून स्वतःस बाजूस करील. शरदृऋतूमधील चंद्रबिंब हे मुखच जसे सत्वप्रधान, चारुचारु असें मंदस्मितच एक या मनास प्रफुल्लित करणारे ते, चित्तास समाधान पोहोंचविणारे तें, तेथे चित्त हे वेगास आल्यानें – गतिमंततेचें झाल्यानें – विषयांविषयीं अरुचि घेऊन स्वरूपीं स्थिर होईल. (१०७)

अहो, पूर्णिमेनंतर ज्याप्रमाणे चंद्रबिंब हे दिवसेंदिवस वाढत वाढत (कमी कमी होत), एक एक कला पूर्ण होत होत, जसें तें अवसेस पूर्णपणें नाहींच असें होते, तेथे संपूर्ण कला ह्या प्रकाशित होऊन असलेल्या त्याप्रमाणें भोगामधून – भोग भोगणे जें त्यामधून – चित्त हे निघून मजमध्ये रिघाव करील, तर ते हळू हळू मीच होईल ते चित्त, हे पांडुसुता, हळू हळू मीच होते. (१०८–१०९)

हे अर्जुना, असा जो साधनक्रियारूप तो अभ्यासच झाला – अभ्यासयोगच म्हटलेला जो तोच हा एक जाण व तत्स्वरूप, तन्निष्ठ होण्यानें – म्हणजेच या अभ्यासयोगानें – कांहीं का निष्पन्न होणारे नाहीं असे नाहीं. यालाच अभ्यासयोग म्हणतात. सर्व कांहीं ह्या अभ्यासयोगानें – तप, कां स्वाध्याय, कां ईश्वरप्रणिधान – क्रियारूप झाल्यानें सर्व कांहीं निपजूं शकतें, सर्व कांहीं अभ्यासानें साधतें. नियमितपणें नित्य एकाद्या विषयावर श्रम करणें – अभ्यासयोग हाच तो – ह्यानें सर्व काहीं निष्पन्न होते. (११०)

अहो, या अभ्यासानें तर – अभ्यासरूप होण्यानें तर – एकांनीं आपली गतिच ( गमनसामर्थ्य ) अंतरिक्षांत करून घेतली, अंतराळीं करून घेतली. कांहीं दुसऱ्या एकांनीं तर व्याघ्रसर्पासारख्यानासुद्धां गरीबसे असे निरुपद्रवी आप्त करून ठेविले : आकाशांतून चालणें, वाघ व साप यांच्यासारख्या क्रूर पशूंना माणसाळविणे ह्या गोष्टी अभ्यासानं साध्य करून घेता येतात. (१११)

अहो, विष जे तेच जसें एकांनीं आहाराचें केलें, कांहींनीं तर समुद्रावरहि कीं अहो पायवाट करून ठेविली – ठेवितात. एकांनीं तर हे शद्बब्रम्हरूपी भाषाज्ञान – वाग्ब्रम्ह – शद्बशास्त्रहि – हस्तगत म्हणजे अगदीं सोपे असे, स्वल्प असे, लहानगेंच जसे असे करून ठेविले – ठेवितात. (११२)

आणि एवढयाचकरितां असें जाण कीं, तेच होऊन असण्यानें ह्या अभ्यासास कांहींच, केव्हांहि, सर्वप्रकारेकरून, सर्वथा दुष्कर नाहीं आणि म्हणून असे कर कीं, अभ्यासाने म्हणजे तन्मय होण्याने मजमध्ये मिळून जा, मजमध्ये मिळ, मजमध्ये मिळून ऐस. अभ्यासाने प्राप्त होणार नाहीं अशी गोष्ट – वस्तु – या जगात नाहीं – म्हणून अभ्यासयोगाने तूं मद्रूप हो. (११३)

**अभ्यासेऽप्यसमर्थोऽसि मत्कर्मपरमो भव ।**
**मदर्थमपि कर्माणि कुर्वन्सिद्धिमवाप्स्यसि ।। १० ।।**

अभ्यासे अपि = अभ्यास करण्यामध्येहि जरी. असमर्थः असि = योग्य नाहींस, महत्त्वाचा होत नाहींस, महत्त्व सांपडत नाहीं मत्कर्मपरमः भव = मजकरितां कर्में करणारा हो, कर्मच महत्त्वाचे करून अस; कुलाचार, विधिनिषेध, जाति हीं सर्व पुढे घेऊन ऐस, तेथें धर्मच एक महत्त्व दिला गेला. मानसपूजेचे विधानानें कर्मास त्या देवतेशीं आपले ऐक्य करून तेथे परम म्हणजे श्रेष्ठ असे जे त्या मनाने अर्पण करणे – जसे नैवेद्य हा ईश्वरार्पण होतो व स्वतःच्या पोषणाकरिताहि काहीं अन्न स्वतःला अर्पण करायचे असे असतं तसे मदर्थम् = मीच अर्थाचा करून तूं आपलीं सर्व कर्में मत्प्रीत्यर्थ केल्यामुळे चित्तशुद्धि होऊन मोक्षसिद्धी मिळविशील. मदर्थमपि = ईश्वराप्रीत्यर्थ, ईश्वराकरितां. तेथे तीं कर्मे मी करीत आहे असा भाव ठेवूं नकोस – पुरुषार्थाच्या हेतूने जरी असले तरी. सिद्धी = धर्मसिद्धी. अवाप्स्यसि = मिळविणारा होशील. असा अभ्यास करण्यासहि तूं असमर्थ असशील, तर सर्व कर्में मदर्थ (मत्प्रीत्यर्थ) कर. मदर्थ कर्में केल्यानेंहि तूं (मत्प्राप्तिरूप) सिद्धि पावशील.

अभ्यासे अपि असमर्थः असि मत्कर्मपरमः भव मदर्थम् कर्माणि कुर्वन् अपि सिद्धिम् अवाप्स्यसि ।

अभ्यासरूप होण्याची योग्यता जर तुला भेटत नाहीं, ती योग्यता जर अंगी येत नाहीं, तेथील महत्त्व जर सांपडत नाहीं, तर मज (धर्मा) करिता सर्व कर्में कर. म्हणजे ( जातीचा अभिमान सोडूं नको, कुळधर्माप्रमाणे आचरण कर, विधिनिषेध पाळ ) तेथे सर्व मोकळीकच आहे असें करीत राहिलास तरी सुद्धा, अशा रीतीनं कर्में करीत राहिलास तरी मत्प्राप्तिरूप सिद्धी मिळविशील.

**कां अभ्यासाहिलागीं । कसु नाहीं तुझिया आंगीं ।**
**तरी आहासि जैसिया भागीं । तसाचि असे ।। ११४ ।।**
**इंद्रिये न कोंडी । भोगातें न सोडी ।**
**अभिमान न सांडी । स्वजातीचा ।। ११५ ।।**
**कुळधर्मु चाळी । विधिनिषेध पाळी ।**
**मग सुखें तुज सरळी । दिधली आहे ।। ११६ ।।**

परी मन वाचा देहें । जैसा जो व्यापारु होये ।
तो मी करितु आहे । ऐसें न म्हणे ॥ ११७ ॥
करणें कां न करणें । हें अघवें तोचि जाणे ।
विश्व चळतसे जेणें । परमात्मेनि ॥ ११८ ॥
उणेयापुरेयाचें कांहीं । उरो नेदी आपुलिया ठाईं ।
स्वजातचि करूनि घेईं । जीवित हें ॥ ११९ ॥
माळियें जेऊतें नेलें । तेऊतें निवांतचि गेलें ।
तया पाणियाऐसें केलें । होआवें गा ॥ १२० ॥
येऱ्हवी तरी सुभटा । उजू कां अव्हांटा ।
रथु काई खटपटा । करितु आहे ॥ १२१ ॥
म्हणोनि प्रवृत्ति आणि निवृत्ति । इयें वोझीं नेघे मती ।
अखंड चित्तवृत्ति । आठऊं मातें ॥ १२२ ॥
आणि जें जें कर्म निफजे । तें थोडें बहु न म्हणिजे ।
निवांतचि अर्पिजे । माझियां ठाईं ॥ १२३ ॥

(११४) कसु = बळ. मार्गी – भंगीं. (११६) सरळी = मोकळीक. (११७) मी – आपण. (११८) विश्व..........परमात्मेनि = परमात्मा विश्वचालक आहे (११९) स्वजातचि – सजातचि. परमात्म्याशीं जीव स्वजातीय आहे, एकरूप आहे असें समज. ( सजातीय-प्रवाहश्च विजातीय तिरस्कृतिः – अपरोक्षानुभूति ) (१२१) उजू = सरळ. अव्हांटा = वांकडी. (१२२)प्रवृत्ति = प्रपंच – चांगलें कर्म करणें. निवृत्ति = परमार्थ – वाईट कर्मापासून परावृत्त होणें. वोझी नेघे मति = बुद्धीवर दडपण पडूं देऊं नकोस.

किंवा अभ्यासाकरितांहि तुझ्या अंगांत बळ नसेल, कस नसेल, अभ्यासाकडे तुझें लक्ष लागत नसेल, तर ज्या कांहीं भागामध्ये ( जैसिया भार्गी ) तूं आहेस तसाच अस. जे जें कांहीं एकठाण किंवा भाग घेऊन असशील, तेथेंच अस. जें कांहीं ह्या विश्वरचनेचें काम म्हणजेच कर्म संभावनेचें अनुष्ठान तुजकडे आले असेल, तें करीत अस. ( भाग – भंग = वारस, वतनदार, वांटा, अंश, दैव, प्रदेश, वृत्ति, अनुष्ठान, भंग, ठाण, आकार, भंगलोट, कोटिक्रम, रचना, पायरी. ) (११४)

इंद्रिये कोंडूं नको – इंद्रियांना कोंडणें नच कर – भोगविलासांना सोडून द्यावें असेहि येथे केलें नाहीं तरी हरकत नाहीं – स्वजात जी तीबद्दलचा अभिमानहि येथें सांडण्याचें कारण नाहीं, स्वजात जीवर तूं चालत आहेस ती जात सोडण्याचें कारण नाहीं, कारण ती जात प्रेमाची, कां शूरत्वाची, कां विलासाची, कां कशीहि असली तरी, तेथे सर्वजात म्हणून जी आहे त्या जातीचें प्रेमच होऊं केले तर, तेथे बाध तो कसलाहि येणेंच नाहीं. (११५)

कुळधर्माचरण कर, शास्त्रविहित कर्में तेवढीं कर, निषिद्ध कर्में मात्र करूं नको. तेथील फिरफिरून दुरुस्त करणें हें होऊं देत गेलास तरी हरकत नाहीं. विधिनिषेध, योगायोग्य असें जे शास्त्रदृष्टीचें तेंहि पाळीत गेलास, उजवीत असलास, तरी हरकत नाहीं, व याजवर मग तुजला सरळ अशी एक वाट दिलेली असते : तेथें अनेक अंगें हीं आपलीशीं करून असणें हेंहि तेथें होतच असतें : यावर एकच तुजला महत्त्व पाहावें लागणार, तें तुझी वाट ( मोकळीक, सरळी ) मुळींच आडविणार नाहीं असें तें म्हणजे :— (११६)

कायावाचामनानें जीं कर्में करशील तीं मीं केलीं आहे असें म्हणूं नकोस. मनानें, कां वाचेनें किंवा या देहानें जो जसा कांहीं व्यापार - हालचाल, चलनमात्र - होत असेल, तो मी आपण करीत आहे असें केव्हाहि न म्हण, म्हणूं नको. मी करीत आहे असे म्हटलेच म्हणावे असें करू नको (११७)

कारण जी कांहीं हालचालमात्र - व्यापार - करणे कां न करणे ते सर्व विश्व ज्या परमात्म्याच्या सत्तेनें वर्तते - चालतं, ते सर्व तो जाणतोच. (११८)

कारण कर्ता-करविता सगळा तो विश्वचालक परमात्मा आहे. आपल्या जातीची जाती असे जीवित येथे उणें पडलें कां पुरेंसे झालें असे आपल्या ठिकाणीं कांहींच उरू देऊं नको. असें कर कीं, स्वजात ( स्व = आत्मविद ) असेंच हे जीवित करून घे. स्वतःबद्दलचें प्रेमच एक - स्वजीवित हें सर्व प्रेमच एक - प्रेमाची जातच एक - होऊन आलें असें कर : जातीचे जे प्रेम तेच होऊन अस. स्वप्रेमजात असे हें जीवित करून घे. स ईश्वरोऽनिर्वचनीयप्रेमस्वरूपः तसा सजातीय - प्रेमाच्या जातीचा - हा जीव मान. विजातीय असा मानं नको. म्हणजेच परमात्मा व जीव एकरूपच आहेत, भिन्न नाहींत, असेंच मान. कर्म पुरे झालें की कांहीं उणे पडलें त्याची खंती न बाळगतां आपला आयुष्य-क्रम आपल्या जातीला योग्य अशीं कर्में करण्यांत घालीव : पण कर्तृत्वाचा अभिमान टाकून दे म्हणजे झालें. (११९)

माळयाने जिकडे पाणी न्यावे तिकडे ते पाणी निवांतपणें जाते, तसें त्या पाण्याप्रमाणें या प्रेमाची वाहाणी ( वृत्ति ) असूं दे. 'सजातीयप्रवाहश्च विजातीयतिरस्कृतिः'। अपरोक्षानुभूति. (१२०)

एरव्हीं पाहिले तर सरळ वाट आहे का आडवाट आहे याबाबत रथ जो आहे त्यानें कधी का विचार करणेच नाहीं काय ह्या वाटेबद्दल रथ कांहीं खटपट करून असतो ? चालविला जाणारा जो रथ तो ती वाट सरळ आहे का आडवाट आहे याबद्दल कांहींच खटपट करीत नाहीं. (१२१)

करिता प्रवृत्ति का निवृत्ति अशीं हीं ओझीं या बुद्धीला वाहाण्यास देऊं नकोस. ती सर्वारंभ-कामसंकल्पवर्जित अशीच असूं दे. चित्तवृत्ति ही अखंडतेने माझे ठिकाणीं लाव - चित्तवृत्तीमध्यें माझा आठव अखंड असूं देत जा. (१२२)

तसें, जे जे कांहीं कर्म निपजते - निपजेल - ते थोडें कां फार असे नच म्हणतां, निवांतपणेच - स्वस्थचित्तानें - शांतपणेच - गाजावाजा न करितां - बरळणे न करिता - ते माझ्या ठायीं अर्पण करावे. (१२३)

**अथैतदप्यशक्तोऽसि कर्तुं मद्योगमाश्रितः ।**
**सर्वकर्मफलत्यागं ततः कुरु यतात्मवान् ॥ ११ ॥**

मद्योगमाश्रितः = क्रियायोगाचा आश्रित होऊन, आकारसंभावनेनें सगुणयुक्त सर्वकर्मफलत्याग, सर्वकर्मब्रम्हार्पण करण्यानेंहि. अशक्तः = मेहनती होत नाहींस, तुजकडून होत नाहीं, करण्यास अशक्त - असमर्थ आहेस. यतात्मवान् = आत्मसंयमी, विरक्ति, योग, अहिंसा, सत्यभाषण इ. नित्यकर्मांनीं आत्मा आवरून धरला, आत्मसात् केला व असे होऊन कर्म करणें ते. सर्वकर्मफलत्यागम् = सर्व कर्मांच्या फलांचा आश्रित न होणें, कर्म कामनेचें करूं नकोस (भोगेच्छेचा हेतु धरून).

अथ एतद् अपि कर्तुम् अशक्तः असि, ततः मद्योगम् आश्रितः यतात्मवान् सर्वकर्मफलत्यागम् कुरु ।

हेहि तुझ्या हातून न झालें, तर माझ्या योगाचा आश्रय कर. काम्य कर्म करू नको, सर्व कर्माच्या फलाचा त्याग कर व आत्मवान् असा सयमी ( होऊन ऐस ) हो.

हेंहि ( मत्प्रीत्यर्थ कर्म ) तुझ्या हातून होत नसेल, तर माझ्या योगाचा आश्रय करून ( अनन्य भावें शरण येऊन ) व मनाचा संयम करून सर्व कर्मांच्या फलाचा त्याग कर.

**ऐसिया मद्भावना । तनुत्यागीं अर्जुना ।**
**तूं सायुज्यसदना । माझिया येसी ॥ १२४ ॥**
**नातरी हेंहि तुज । नेदवे कर्म मज ।**
**तरी मातें तूं भज । पांडुकुमरा ॥ १२५ ॥**
**बुद्धीचिये पाठीपोटीं । कर्माआदीं कां शेवटीं ।**
**मातें बांधणें किरीटी । दुवाड जरी ॥ १२६ ॥**
**तरी हेंहि असो । सांडी माझा अतिसो ।**
**परी संयतीसी वसो । बुद्धि तुझी ॥ १२७ ॥**
**आणि जे जे वेळे । कर्में घडती सकळें ।**
**तयांचीं तीं फळें । त्यजितु जाये ॥ १२८ ॥**
**वृक्ष कां वेली । लोटती फळें आलीं ।**
**तैसीं सांडी निफजलीं । कर्में सिद्धें ॥ १२९ ॥**
**परी मातें मनीं धरावें । कां मजउद्देशें करावें ।**
**हें कांहीं नको आघवें । जाऊं दे शून्य ॥ १३० ॥**
**खडकीं जैसें वर्षलें । कां अग्निमाजीं पेरिलें ।**
**कर्म मानी देखिलें । स्वप्न जैसें ॥ १३१ ॥**

(१२५) तरी मातें तूं भज – तरी गा तूं भज – तरी ते तूं बुज. (१२६) बांधणें = संबंध जोडणें. दुवाड = अवघड, कठीण. (१२७) अतिसो = मदर्पण कर्म करण्याचा हव्यास, मोठेपणा. परी संयतीसी – तरी संयतीं = इंद्रियनिग्रहांत. (१२९) लोटती = त्यजितात, लोटून देतात, त्याग करतात. (१३०) मजउद्देशें = माझ्या प्रीत्यर्थ. शून्य – शून्यीं = अव्यक्तांत.

कर्म शांतपणानें मजला अर्पण केलेस – भक्तबाणाच एक वागविला – तेथें भक्तिप्रेम तर आहेच, पण सायुज्यतेची गोष्ट पुढें घेतली असतां मरणोत्तर तुला मोक्षपद मिळेल. अशा तऱ्हेच्या माझ्या आश्रयानें केलेल्या भावनांनीं – योगरूपच होऊन असणाऱ्या भावनानीं – देहप्रयाणाच्या वेळीं माझ्या सायुज्यतेप्रत येऊन मिळशील. सायुज्यता तुला प्राप्त होईल. माझे ऐक्यरूपी सदनाचा तूं होशील. मीच तुझे गृह होऊन असेन. (१२४)

अथवा, अशा प्रकारेंहि (वर सांगितल्याप्रमाणें) तें कर्म मजला देण्याचें तुला साधत नसेल, तर, हे पांडुकुमरा, माझे भजन करीत जा. असें कर्मसमर्पणहि तुला करता येत नसेल, तर असे कर कीं, कर्माच्या फळाचा त्याग करीत जा, फळाविषयींची आशा ठेवूं नको. म्हणजे माझ्या भक्तीचा असा होशील. हे पांडुकुमरा, अगोदर मजला जाणून अस, मजला जाण, अखंड चित्तवृत्तीने माझा आठव करणें कसें तें जाण. येथें कर्माचें सेवन कसें करावें तें सांगतों : तरी मातें तूं भज ( वंद्य-गौरव ) : तरी ते तूं बुज ( जाण ) : तरी गा तूं भज ( नम ). (१२५)

कर्में करण्याला उद्युक्त करणाऱ्या बुद्धीच्या अगोदर व बुद्धीच्या लागोलाग किंवा अंतरानें – हातून जे कर्म होत आहे त्याच्या अगोदर किंवा नंतर – माझा संबंध जोडणें हें कठिण – दुवाड – अवघड जरी, तरी ते करीत अस. कठीण किंवा दुवाड म्हणून तुझ्या हातून हे जोडणे झालें नाहीं, तरी– (१२६)

तरी हरकत नाहीं. माझें वारंवार स्मरण करणें कां न करणें, मजबद्दलचा हव्यास घेणें कां न घेणें, कां हव्यास असणें हेंहि नको. पण इंद्रियनिग्रहामध्ये तूं आपली बुद्धि असूं देत जा : मदर्थ कर्म करण्याचा आग्रह – वाजवीपेक्षां जास्तपणाचा अतिशो – सांडी, सोडून दे : आपली बुद्धि इद्रियाचा निग्रह करण्यांत स्थिर कर – मन आंवरून धरणें तें कर – जसा तो शिवयतिच सिद्ध होऊन त्यानें संसिद्ध असें चित्तशुद्धीचें – ज्ञानदानाचें – क्रियायोगसिद्धीचें – होणें केले. संयतीसी वसो बुद्धि तुझी – मन संयमन करण्याची वृत्ति असूं देत जा. येथें संयतीं असेंहि पद : तसेंच ध्यान-धारणा-समाधि असे तिन्ही एकत्र. (१२७)

जेव्हां जेव्हां म्हणून संपूर्ण कर्मे हीं तुझ्या सर्वपणानें घडत असतील, सकळ कर्मे हीं घडत असतां, त्या कर्मांचीं तीं तीं फळे त्यजून असत जा – इच्छूं नको. यष्टव्यमेव असे समजून त्या त्या कर्माच्या फळाबद्दल अपेक्षा केव्हाहि वागवूं नको. जरी तुझ्या सकळपणानें, महत्त्वानें, महत्त्व देऊन केलेलीं तीं कर्मे असलीं, तरी त्यांचीं फळे अपेक्षूं नको. (१२८)

वृक्ष किंवा वेली ह्या त्यांना आलेलीं फळें त्यागितात – तीं दूर लोटून देतात, त्याप्रमाणे कर्मे करीत असतांना, जीं जीं म्हणून फळांसहित पूर्ण होणारीं – सिद्ध अशीं झालेलीं – तीं तीं कर्मे त्यांचीं फळें तूं सांडून अस, त्यागून अस, त्यांबद्दल निस्पृह अस तुका झाला सांडा म्हणजे तुकाराम त्यागी झाला. कर्मेसिद्धे म्हणजे जशीं कां एका सिद्धानें केलेलीं तीं कर्मे तेथे त्वरितच फळ मिळणारे होतें : फळ हें सिद्ध होऊन येतें : सिद्धसंभावन जसें इच्छासफलतारूपी संगम फळ देणारे : तेथे जसें का सर्व दुःख नाहींसे झाले : इच्छा ही तृप्त झाली : व जें कांहीं मिळवावयाचें तें मिळाल्याने कृतकृत्यता वाटू लागली : असे त्या फळाचें एक वृत्तोस उचल देणारें असतें. (१२९)

मनांत मला धरून असावें किंवा मजप्रीत्यर्थच कांहीं एखादें काम करावें, कां मीच तेथे उद्देशाचा केला, असेंहि नको : तें सर्व शून्यामध्येच जाऊं देत : शून्यवृत्ति जेथें कसलीहि वृत्ति नच पुढे घेतां असणें जे तेंच असणें तूं होऊन अस. शून्यच जसें एक, तेथे विचार करीत बसणें नाहीं : तूंहि कर्म घेऊ नकोस व मलाहि अर्पण करूं नकोस : तें तसेंच रिकामें राहूं दे : मनांत धरलेला जसा एकादा काहीं भाव का उद्देश हाच ( सकल्पात्मक झाल्यानें कांहींच करूं देत नाहीं ) मुळीं पुढे घेऊन आसगे ते करूं नकोस. (१३०)

ज्याप्रमाणें खडकावर पाऊस पडावा कां भाजलेल्या जमिनींत पेरणी व्हावी, कां अग्नीमध्ये जसें कां पेरणें झालें – पेरिलें – त्याप्रमाणें जे जे कांहीं कर्म तुजकडून होत आहे, ते स्वप्नच एक जसें पडत आहे असें पाहा : खडकावर पडलेल्या पावसाप्रमाणें किंवा अग्नींत घातलेल्या बीजांप्रमाणे कर्मे निष्फळ झालीं असें समज. (१३१)

**अगा आत्मजेच्या विषीं । जीव जैसा निरभिलाषी ।**
**तैसा कर्मी अशेषीं । निष्कामु होयी ॥ १३२ ॥**
**वन्हिची ज्वाला जैसी । वृथा जाय आकाशीं ।**
**क्रिया जिरों दे तैसी । शून्यामाजीं ॥ १३३ ॥**
**अर्जुना हा फळत्याग । आवडे कीर असलग ।**
**परी योगामाजीं योग । धुरेचा हा ॥ १३४ ॥**
**येणें फळत्यागें सांडे । तें तें कर्म न विरुढे ।**
**येकिच वेळे वेणुझाडें । वांझें जैसीं ॥ १३५ ॥**

**तैसें येणें शरीरें । शरीरा येणें सरे ।**
**किंबहुना येरझारें । चिरा पडे ॥ १३६ ॥**
**पैं अभ्यासाच्या पाऊटीं । ठाकिजे ज्ञान किरीटी ।**
**ज्ञानें येईजे भेटीं । ध्यानाचिये ॥ १३७ ॥**
**अगा ध्यानासि खेंव । देती अवघेचि भाव ।**
**तेव्हां कर्मजात सर्व । दुरी ठाके ॥ १३८ ॥**
**कर्म जेथ दुऱ्हावें । तेथ फळत्याग संभवे ।**
**त्यागास्तव आंगवे । शांति सगळी ॥ १३९ ॥**
**म्हणउनि यावया शांति । हाचि अनुक्रम सुभद्रापति ।**
**अभ्यासचि प्रस्तुतीं । करणें येथ ॥ १४० ॥**

(१३२) आत्मजेच्या विषीं = कन्येविषयीं निष्काम = कामेच्छाविरहित. (१३४) आवडे कीर असलग = निश्चयेकरून सोपा वाटतो धुरेचा = श्रेष्ठ. (१३५) न विरूढे = वाढीस येत नाहीं. एकचि वेळे वेणुझाडे – वेळु झाडें – वेळें झाडें – वांझें जैसीं = ज्याप्रमाणे वांबूसारख्या वाझ झाडाची पुनः उत्पत्ति नाहीं. (१३६) चिरा पडे = वाट बंद होते (१३७) पाऊटीं = पायरीने. (१३८) खेंव = आलिंगन. (१३९) आंगवे = स्वाधीन होते, पूर्ण शांति आंगभूत होते. (१४०) यावया – पावावया. प्रस्तुतीं = सांप्रत. अनुक्रम = हाच क्रम म्हणजे मनबुद्धि अर्पण करण्यापासून त्यागापर्यंतचा या वेळीं सराव ठेव.

हें पाहा कीं, स्वतःच्या आत्मजेविषयीं – कन्येविषयीं – मुलीविषयीं – जसा जीव हा निरभिलाष असतो, त्याप्रमाणें अशेषहि म्हणजे सर्व कर्मांमध्यें निष्काम, निरिच्छ असा अस. तेथीलच्या फळाची का कर्माची इच्छा ही मुळींच धरूं नको. (१३२)

ज्याप्रमाणें अग्नीची ज्वाळा, शिखा, झोत, जिव्हा – विकारवन्हीची ज्वाळा – जशी आकाशामध्ये व्यर्थ होते, आकाशामध्येंच का ती वन्हीची ज्वाळा फेंकली जाते, त्याप्रमाणे सर्व क्रिया ही शून्यामध्यें जिरूं दे. क्रिया ही जशी का शून्यांतच फेंकून दिली, कां शून्यावरच टेकली असे कर. महत्त्व नच दिलेले, तेथें मन नच लाविलें, बुद्धि ही पण तेथें बुद्धया अशी नच करावी : चतुर्थ म्हणजे चवथी तिथी हीच जशी चतुर्थ शून्याची, तेथेंहि पण स्वप्नच जसे एक का अव्यक्तच ते. इच्छा नाही तेथे काम नाहीं : जसे अतृणे पतितो वन्हिः स्वयमेवोपशाम्यति । (१३३)

असा हा फलत्याग, हे अर्जुना, निश्चयेंकरून सोपा वाटतो. वर हा तर सर्व योगांमध्ये धुरेचा म्हणजे कार्यभार वाहाणारा श्रेष्ठ असा श्रेष्ठ योग होय. योग म्हणजे तेथे ती ती क्रिया ही महत्त्व घेऊन असलेली. तसे येथें ह्या फलत्यागामध्यें – ह्या शून्यामध्यें – ती सर्व क्रिया जिरूं देणे होय. म्हणून येथे श्रेष्ठ असाच तो फलत्यागरूपी योग जेथें ती सर्व योगक्रिया ही शून्यावरच टाकून दिली – शून्यातच जिरूं दिली. वैकुंठाची केली, येथे शून्य हेच मुळीं महत्त्व घेऊन असलेले ते बुद्धीचे जसे काहीं ऋणच, व तेथेच ते तपणें कां सर्व अहंभाव ईश्वरार्पण करणे कर. वाङ्मयाचे ते तप – योगच जसा एक क्रियारूप होऊं आलेला. (१३४)

हा कर्मफलत्याग दिसायला सोपा असून सर्व योगांत श्रेष्ठ आहे. जसें वेळूचें झाड एकदं व्यालें म्हणजे पुन्हां वीत नाहीं अशा या फलत्यागानें सांडलेले – सोडलेले कर्म – वाढीस लागत नाहीं – वाढणारें होत नाहीं – रुजणारें होत नाहीं. ज्याप्रमाणें एकाच वेळीं वेळूझाडे हीं व्यालीं – प्रसवलीं – कीं तीं सडेसोटच होऊन आलीं, तीं पुन्हां नच व्याल्याकारणानें तेथे फांद्या, फुले, वगैरेची

गोष्टच नाहीं. म्हणून तीं वेळूझाडे एकदां विऊन वांझच जशीं म्हटलीं गेलीं. कारण तेथे पुन्हां विणे नाहीं, नुसते एक सोटाचे अंगच ते वाढणे, तेथे ना फळ, ना फूल, ना फांद्या – तेथे पुन्हा उत्पत्तिच नाहीं. (१३५)

तसे या शरीराच्या आधाराने असणे हे नेहमींच 'तसे स्थूल शरीराच्या आधाराने असणे बरे' हे संपते. किंबहुना येथे येणे व जाणे, जन्मणे व मरणे अगा या येरझारा ज्या होत असलेल्या त्या थांबतात. देहबुद्धीचे धोंडे आड लाविल्यामुळे तेथे जन्ममरणाची वाटच मुळीं बंद होते. रूपच एक, का मुखच एक, का स्वरूपच एक तेथे सापडते, व सगुण भावच आपलासा झाल्यामुळे कुंकुच लाविले. ह्या सगुणतेच्या रूपास देहाएवढे का देहबुद्धीचे होणे संपते, सगुणतेचें होणे होते हा भाव यांप्रमाणे फलत्यागपूर्वक केलेलें कर्म सुखदुःखाचा भोग देण्यासाठीं पुनर्जन्मास कारण होत नाहीं – अर्थात् जन्ममरणाचा फेरा अशाने चुकतो. (१३६)

आतां असे पाहा कीं, पायरीपायरीनें अभ्यासाचे झाले असता (अभ्यासाच्या पायरीवर पाय देऊन चालता चालतां) ज्ञान हे स्थिर होऊं लागते तेथे चित्त हे ऊर्ध्व सत्वसिद्धीचे होण्याचे करते. तेथे ज्ञान हे स्थिर झाल्याने ध्यानाची भेटी होते : मनच हे ध्यानरूप होते – ध्यान भेटते. येथे अभ्यासाची चिकाटी शांत चित्ताने पाहिली असता, सहजत्व हे अभ्यासास येते. ज्ञान म्हणजे वेदन धर्म जो – बहिर्मुखत्वामुळे दुरापास्ततेचा – तोच आता सहजच शांतपणाचा असा सिद्धच स्वभावास आला – स्वअध्यायास असा आला. (१३७)

ध्यान हेच जसे चिंतन कां आराधन तेथे स्थैर्यच एक ह्या चित्ताचे करावे लागणारे : तेथेच मग तसे ते ध्यान साध्य झाल्यावर ( मनस्थैर्य, चित्तस्थैर्य, बुद्धिस्थैर्य ) अनेक जे भाव तेच जसे ह्या ध्यानास आलिंगन देण्यास येणारे होतात. या भावाने स्थैर्य सापडल्यामुळे ह्या ज्या गोष्टी वायाच जाणल्या जाणाऱ्या – त्या कानावर का डोळ्यावर येणाऱ्या त्या – आपला गुण दूर करून, तसल्या गुणाना नच वाहून, एक शांतचित्ताचे असे स्थैर्य पाहू केल्याने, तेथे अस्तित्व, आस्तिक्य कां स्वभाव कां अभिप्राय कां विलास तेथे येऊं लागून, ह्या मनास आल्हादतेचें करून असतात. तेथे जसजसे चित्तस्थैर्य, तसतसे ह्या भावाचे ते येणे हे एकवटून येणारे असे होते येथे आतां तो कर्मजाताचा मुळीं हेतुच बाजूस झाला, किंवा स्थिर झाल्याने तेथे कर्माचे कामच मुळी नाहीं ते कर्म आता ( मर्यादा धरून असते ) दूर असेच होऊन जाते दीर्घ प्रयत्नाचे तें आतां ध्यानास आल्याने, कर्म करीत असणे हे दूरच होते, तेथे दीर्घ प्रयत्न हा स्थैर्यास आला – परिणामाचा झाला. (१३८)

कर्मच जेथे बाजूस झाले, तेथें त्या त्या कर्मफळानीं मध्ये येणेच नाहीं. सहजच मग एक कर्मफलत्याग हा जन्म घेऊन असतो. तेथे सख्यच एक सख्य होण्याची योग्यता पाहूं लागले असे, व अगा या सहज त्यागामुळे आपलेसें झालेले जे सख्य तेथे शांतीनें आपले अंगच दिले असे होते – सर्वांगांनी शांतिच वरिलो असे होते. शांति हीच तेथे शक्तीची कां शांतीची होऊन येते (१३९)

असें आहे म्हणून शांति शांति जी ती प्राप्त होण्याकरितां हाच अनुक्रम होय : हे सुभद्रापति, एवढयाचकरितां प्रस्तुतीं ( अशी ही शांति साधण्याकरितां ) अभ्यासच करणे बरे. तेथे अव्यक्त हेच जसे अभ्यासास आले – स्वतःचा अभ्यास करूं लागले असे असल्याने तेथे स्तुति असे म्हणणे म्हणजे तरी काय तें त्याचें कोडकौतुक करणे असे ! ते महत्‌कठिणतर असे असून ह्या मनास कां बुद्धीस नच सांपडणारें असते आणि म्हणूनच तर त्यास अव्यक्त असें म्हटले जातें; जसे स्तुति कां कौतुक का प्रस्तुतचें असे विद्यत्व होऊन आले. म्हणून नित्यत्व हेच तेथे महत्त्व घेऊन असलेले अशा ह्या अनुक्रमाचा सराव ठेव. (१४०)

**श्रेयो हि ज्ञानमभ्यासाज्ज्ञानाद्ध्यानं विशिष्यते ।**
**ध्यानात्कर्मफलत्यागस्त्यागाच्छान्तिरनन्तरम् ॥ १२ ॥**

अभ्यासात् ज्ञानम् श्रेय. = अभ्यासापेक्षां ज्ञान हें उत्तम असें कल्याणकारक होय तें मंगलकारक होय. जीव हा स्वतःच ब्रम्ह आहे. तेथें कर्म करणें, अर्थाचा आश्रय, फलत्याग, वगैरे म्हणणं म्हणजे स्वतःचे अस्तित्वास पाहून तेथे स्थैर्य हें करणे हे सहजच होत असतें : परंतु अभ्यासाशिवाय तेथे सहजपण हें उगवत नाहीं. ज्ञानात् ध्यानम् विशिष्यते = नुसतें ज्ञानच होणें यापेक्षा ध्यान म्हणजे चिंतन कां आराधन हें विशेष असें होय. तें अधिक होय. तें असामान्य असे होय. ध्यानात् कर्मफलत्यागः = अशा ध्यानामुळे कर्मफलत्याग संभवतो, उत्पन्न होतो, सख्य संपादन होण्याची योग्यता घेऊन असतो. नंतर त्यागामुळे निरंतरची अशी शांतिच ती कां शक्तिच ती अशी प्राप्त होते. तेथे चित्तस्थिरता हीच येते. विघ्नांचें निराकरण होऊन विराम कां स्थैर्यच प्राप्त होतें. शांतिः = सुखसमाधान, मोक्ष.

अभ्यासात् हि ज्ञानम् श्रेयः, ज्ञानात् ध्यानम् विशिष्यते, ध्यानात् कर्मफलत्यागः, त्यागात् अनन्तरम् शान्तिः ॥

अभ्यासापेक्षा ज्ञान हें कल्याणकारक होय. ज्ञानापेक्षां ध्यान हें असामान्य असें. ध्यानापेक्षां कर्मफलत्याग विशेष असा व त्यागाचे मागोमाग शांति ही मगलकारक होते. हीं एकापेक्षां एक अशीं उत्तरोत्तर उत्तम, मगलकारक, असामान्य व अगदीं जवळचीं अशीं होत.

अभ्यासाहून ज्ञान श्रेष्ट, ज्ञानाहून ध्यान श्रेष्ठ, आणि ध्यानाहून कर्मफलत्याग श्रेष्ट, कारण त्यागापासून त्वरित शांति प्राप्त होते.

**अभ्यासाहूनि गहन । पार्था असे ज्ञान ।**
**ज्ञानापासौनि ध्यान । विशेषिजे ॥ १४१ ॥**
**मग कर्मफळत्याग । जो ध्यानापासूनि चांग ।**
**त्यागाहूनि भोग । शांतिसुखाचा ॥ १४२ ॥**
**ऐसिया यया वाटा । इहींचि पेणा सुभटा ।**
**शांतीचा माजिवटा । ठाकिला जेणें ॥ १४३ ॥**

(१४२) कर्मफळत्याग = कर्माच्या फलाची इच्छा सोडणें. (१४३) इहींचि पेणा = अशा टप्प्यांनीं, अशा मुक्कामांनीं. माजिवटा = माजघर. ठाकिला = मिळविले, प्राप्त करून घेतलें.

हे पार्था, अभ्यासाहून ज्ञान खोल आहे; तें सहज साध्य होणारे असें सोपें व बालबोध असें आहे. ज्ञानापासून ध्यान हे असामान्य असे, अधिक गुणाचें आहे. (१४१)

आतां यानंतर कर्मफलत्याग जो तो तर ध्यानापेक्षाहि चांग चांग चांगला असा आहे. अशा या त्यागापेक्षांहि शांतिसुखाचा जो भोगविलास तो तर अति उत्तम असा आहे. येथे या भूलोकावरील ती पावन करणारी अशी सरस्वतीच. अभ्यासापेक्षा ज्ञान श्रेष्ठ, ज्ञानाहून ध्यान श्रेष्ठ, ध्यानाहून कर्मफलत्याग श्रेष्ठ आणि कर्मफलत्यागापेक्षाहि शांतिसुख श्रेष्ठ अशी चढती परंपरा आहे. हीसच भक्तिमार्गांतील निरनिराळीं साधनें व तद्वारां आत्मप्राप्ति म्हटलें आहे. (१४२)

अशा या वाटा, हयाच तर सुमटा, मुक्कामाच्या जागा होत. तेथें शांतीच्या माजघरांत तांबूस अशा प्रेमांत प्रवेश केला असें होतें. वैकुंठींचें पेणें म्हणजे पेठ, टप्पा जें रामनाम तेंच तेथें मुक्कामास

आलें. शांतीचा पुतळाच एक तो होतो जसा का. अशा या वाटेनें व या टप्प्यानें अखेरचा ब्रम्हानंदाचा पल्ला गाठता येतो (१४३)

**अद्वेष्टा सर्वभूतानां मैत्रः करुण एव च ।**
**निर्ममो निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ॥ १३ ॥**

सर्वभूतानाम् अद्वेष्टा = सर्व भूतांना प्रतिकूळ नाहीं असा, कोणत्याहि भूताचा द्वेष न करणारा असा. सर्व प्राणिमात्रांबद्दल उदास असणे, वैर न धरणें, स्वतःस हतबल न करणे. वासना ही मुळाशीं असल्याने ती वासना मुळीं बाजूस करून दुसऱ्या जागीं ती समाधानाची करणें. मैत्रः = मित्रता, सत्पात्र ब्राम्हण, गति, सृष्टिव्यापार करणारा असा. संभावनच एक. करुणः एव = सर्वथैव दयाळू. निर्ममः = ममताशून्य, निष्काम, विरक्त. निरहंकारः = गर्वहीन, देहाभिमान ज्याचा लीन झालेला असा. समदुःखसुखः = समद्वंद्व, निर्विकार. दुःखामधे का सुखामधे सारखा. क्षमी = क्षमाशील, सहिष्णु, सहनशील.

सर्व भूतानाम् अद्वेष्टा, मैत्रः करुणः एव च, निर्ममः निरहंकारः समदुःखसुखः क्षमी ।

कोणत्याहि भूताचा द्वेष न करणारा असा, मित्र ( मित्रभावानें वागणारा ), दयाळु, निष्काम, ( निर्मम ) ममताशून्य, अभिमानरहित ( निरहकार ), सुखदुःखाला सम मानणारा व क्षमाशील असा मजमध्ये अनुरक्त झालेला भक्त मला प्रिय होतो, प्रिय असतो.

**तो सर्वा भूतांच्या ठायीं । द्वेषातें नेणेचि कांहीं ।**
**आप पर नाहीं । चैतन्या जैसा ॥ १४४ ॥**
**उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे ।**
**हें कांहींचि नेणिजे । वसुधा जेवीं ॥ १४५ ॥**
**कां रायाचा देह चाळु । रंकातें परतें गाळु ।**
**हें न म्हणेचि कृपाळु । प्राण जैसा ॥ १४६ ॥**
**गाईची तृषा हरूं । कां व्याघ्रा विष होऊनि मारूं ।**
**ऐसे नेणेचि गा करूं । तोय जैसें ॥ १४७ ॥**
**तैसी आघवाचि भूतमात्रीं । येकपणें मैत्री ।**
**कृपेसी धात्री । आपणपां जो ॥ १४८ ॥**
**आणि मी हें भाष नेणें । माझें कांहींच न म्हणे ।**
**सुखदुःख जाणणें । नाहीं जया ॥ १४९ ॥**
**तेवींचि क्षमेलागीं । पृथ्वीसी पवाडु आंगीं ।**
**संतोषा उत्संगीं । दिधलें घर ॥ १५० ॥**

(१४४) तो – जो. काहीं – कहीं = कधीं. चैतन्य = सर्वव्यापी चिच्छक्ती. जैसा – जेवीं. (१४५) वसुधा = पृथ्वी. परतें – परौते = एकीकडे, बाजूस. परतें गाळू = वगळून दूर टाकूं. (१४७) गा – कां. (१४८) धात्री = धरित्री, आधार, आधारभूत. (१४९) भाष = बोली, वार्ता. (१५०) पवाडु = बरोबरी, योग्यता. उत्संगीं = मांडीवर.

शांतरसप्रधान असेच पुढे येणारें व्याख्यान आहे. जो सर्व भूतांच्या ठायीं ईर्षा कां द्वेषणें म्हणजे अप्रियपण कसलें तें हें कधींच मुळीं जाणत नाहीं. जसा कां मी सर्वगत निखळ चैतन्यच तो. तेथे काय आपले का परावें असें नाहींच.

अहो, जशी का पृथ्वी म्हणजे वसुधा ही उत्तमांनाच तेवढें आपल्या पाठीवर वाहावे, कां अधमाचा अव्हेर करावा हे कधींहि स्वप्नींहि जाणत नाहीं, ती सर्वांना सारखेच आपल्या पाठीवर वाहून असते.

प्रत्येक भूत हे जेथे ह्या पंचभूतांना सम अशा पातळीमध्ये येऊन ऐक्य पावते, तेथे त्या गुणमयी प्रकृतीचें ऐश्वरम् जसें शोभूं लागत, सत्ता करूं लागते : तेथें चेतस म्हणजे मदनासारखे सौंदर्य ह्या भूतांना प्राप्त होते. असे ते प्रत्येक भूताचें आपल्या अधिकारारूढ होणे होते – म्हणजेच चेतनाशक्ति हीच चित्तचैतन्य झाली अशी तेथे सर्व सौंदर्यें एकवटलीं – सर्व विषमता आपलेपणाप्रत म्हणजे समतेप्रत आली – देवत्वच जसे ते एक एकवटून आलेलें – तेथें आतां आप कां पर हे कसचे असणार बरे ? तेथें सर्वसुंदर मदनासारखे मारु पुरुषत्वच ते पुरुषास येऊन उभें झाले – प्रकाशले – नाम गाऊं लागले. जीवदशेची गोडी ही परिणमून आहे असे ते समान पातळीनें चालत असणारे – जात असणारे – ते कशास सम कां विषम हे पाहाण्याचें करील ? ते सर्व सत्ता, सर्व सुंदर, सर्व स्वभाव, सर्व आपलेपण हेच एकले चैतन्य जसे ते, ते कशास काहीं कां विद्वान आहे, कां विविद्विष आहे, का द्विजदत हाच जसा द्विष होऊन आहे, का ते विषाचे कां द्वेषाचे (आलस्य) ओझेंच पुढे झाल्यानें एका वाकुडेपणास आले असे पाहील ? हे म्हणजे दुसरेपण कां दुर्जेपणाचा भाव जेव्हा होणारा, तेव्हाच ते बोलणे ( बोलाने ) दुसरेपणास केलेले होते म्हणून येथे एकपणास आलेले ते द्विजत्व समतेचे सम असे साम्याचे झालेले ते चैतन्यच एक. तेथें जशी कां जीव ही उपमा-कोटी पुल्लिंग कां स्त्रीलिंग कां सर्वलिंग प्रमाणीभूत असे प्रामाण्यानें एकलिंगाची झालेली : तेथें प्रकाशच एका प्रकाशाचा झाला : जीवदशा बोलणारी आपल्या गोडीच्या जोडीची होऊन आहे अशी : येथें आतां व्यक्तिव्यक्त असे भावानें कां विभूतिवजा ते वागत असलेले तेथील महत्त्व हे काय बोलण्यासच येत नाहीं : कां नच बोलतां तसे स्वतः होण्याचा प्रयत्न करणे किंवा तेच होणे व्हावें, तरच मग अनुभव समरसून गेल्यामुळे मूर्तिमततेचे ते चैतन्य भेटले असे सर्व सौंदर्येच सौंदर्यास आलीं असे होय कां मान्यता ही देवपणास येऊन सर्वमान्य झाली.

भाव धरा रे । आपुलासा देव करा रे ॥ देव काहीं साधन नव्हे, पण देह हें मात्र साधन आहे· या साधनाच्या द्वारें ही पंचमहातत्त्वाची गोठली व्यवस्थिततेच्या त्या त्या भूतांच्या (प्रकाश – क्षेत्र ) प्रकाश घेण्यास योग्य अशी – विटण्यानें नच, पण त्या त्या प्रकाशास विनटण्यानेंच प्राप्त होणारी. म्हणून ह्या देहास् स्वच्छ, छानछोकीनें नव्हे तर स्वच्छतेनेच आपलेसें करावें लागणारे होय. तेथे काय कपडालत्ता, दागदागिना, छानछोकी, नटणेंथटणें हीं जीं तीं परतर दूर दूर असें जे अगण्य ब्रम्हांड परम चतुर जसे हेहि पाहविले : आतां त्या त्या मात्रा ह्या अक्षराच्या त्या सूक्ष्म सूक्ष्मतर होऊन, त्यांनीं लय घेतला, व आता तेथें ते नटणे जवळचे असे, त्यास सहजवैभवानें आपलेसे केलें तर प्रकृति ही नियमबद्ध होऊन आली असे परमरूप.

हा चेतनावर्ग जो आहे ( भूतानामस्मि चेतना – सर्व भूतमात्रांमधील जी आठवण ती देणारा मीच होय – तेथे ब्रम्हच प्रतिष्ठेने असलेले जसे तो मी ) तेथें या देहामधील सर्व कांहीं म्हणजे भूत म्हटलेले का न म्हटलेले किंवा भूतभासास नच येणारें जसें कां एक सम-प्रकाश-धारण करण्यास समर्थ झालेले – तेथें ते भूत म्हणावे का काय म्हणावे ? म्हणून तेथे ते भूतमात्रांमधील जे चेतन – पुरुषवजा – तें सर्व ब्रम्हच ह्या सृष्टीस प्रतिष्ठेचें करून असलेले होय : तेथें आतां ती चेतना ही पुरुषपणास आणलेली व्हावी ( स्वभावतःच ती चेतनेची असते, पण ह्या देहाभिमानामुळें ती त्रिगुणात्मक घडीच त्या मायेचें लिगाड पाठीवर वाहाणारी झाल्यानें – तीसच आपलें सर्व महत्त्व देऊन – देत – असल्यानें तेथें हा पुरुष म्हणजे जसा प्रकृतीमंत होय ! तेथे पुरुष हाच मुळीं सर्वथैव प्रकृतीचा झाल्यानें, तेथें

चेतन ते काय - चेतना ती कसली - किंवा नाथ तरी कोणता - हें सर्व कांहींच पदरांत पडणारे - पटत - नसतें. ) तरच तेथें हा सर्व चेतनावर्ग - जड, अजड, वस्तुमात्र, देहामधील चेतनावर्ग - हाच मुळीं त्या जीवदशेस - तेथीलच्या प्रकाशास म्हणा किंवा जीवज्योतीस म्हणा - कोणीहि ओळखण्याचे जर करील, तरच मग ते चेतन ते काय हे समजणारे होईल : म्हणून ह्या देहाधाराने असलेलीं इंद्रियें - तत्त्वें तीं - जीवज्योति जी प्राणप्रतिष्ठेवर उभी असलेली तीवर - ज्योतिप्रकाशावर किंवा मूळच जी वातज्योत ( घरवात ) तीवर - उभीं केलेलीं व्हावीं, तरच मग तेथें जशी का एक ह्या देहराज आत्म्यास आपली प्रिया भेटली अशी : सर्वगुणसुंदर ती बुद्धि दक्षिणाप्रिया हीच आपल्या जीवनाथ चैतन्यास आपली जशी का स्वामिणीच भेटली : तेथें केवढे प्रेम हे वस्तीस आलेले होतें वरे - सर्व प्रेम ते झालें, प्रीतीस आले, मैत्रीचे झाले : जीवचैतन्य तो नाथच कां ही प्रिया तीच मुळीं स्वामिणी का नाथ - प्रिय कां प्रिया : तेथें या प्रियेचे सर्व वंद्य असे परम प्रिय असे सर्व जीवित मद हास्य करूं लागले. शांत व स्थिर असे ते दिसूं लागल्यामुळे, तेथें जीवितभार हाच रमूं लागला - प्रिय झाला - सर्व सुंदर असा झाला तेथें स्वतःमध्येच सर्व सौंदर्ये भेटलीं - जीवित गोड झाले - सर्व अर्थ तेथें प्रस्थापित होऊन आले व आजवर जो काहीं मी ह्या देहबुद्धीने, देहाभिमानाने आपलासा केला गेलेला - गुणांनी आरोपिलेला - तो आता माझी ही प्रिया सापडल्यामुळे तेथें सर्व जग हे आनंदाने नृत्य करूं लागले. वृत्ति हो शांत होऊन त्या परम दैदिप्यमान अक्षरावर उभी झाली - बोलूं लागली - स्थिर झाली ! तेथें बुद्धि म्हणजे सर्व जीवितभार हा ह्या जन्माचे - जन्मास आल्याचे - कृतकृत्यपण भेटूं लागून, परम दिव्यच एक नजरेसमोर उभे, ते सर्व आनंद हा स्थितिस्थिरतेचा असा प्रवासच आतां एकेच जागीं राहून सर्व जग फिरून आले असे होतें : तेथें काय देव का देवत्व का ईश का ईशत्व हे काय दुसरे तिसरे नसून तेच ते होय

हेच आता बोलण्याचे ते कसें तर, अहो मदनच तो तर आत्मा सुरूपसुंदर असा - आपली प्रिया ‘ रति ’ ही सापडल्यामुळे त्यास सर्व जग - देहभार हा - सर्व सौख्येंच पदरात पडलीं अशी समाधानकारक मनोरचना होऊन आली व तिनें मनाच्या वृत्ति त्या सर्व शांत अशा करून, तेथें आता ती शुद्धि हीच मुळीं सर्व त्या परम अक्षराची झाल्याने, तेथें आता आणिक काहीं काय मिळवावयाचे आहे असे उरलेच नाहीं : सर्व सुखे तेथें आज उभरून आलीं आहेत अशी ती मनोरचना ही ह्या मनाचे जे व्यापकत्वाने असणे तेच आतां एकत्रित झाल्याने, तेथें मनपणच मुळीं नाहीसे झालें व ते उन्मन होऊन डोळस झाल्याने, ह्या शुद्ध बुद्धीचे चरणीं सर्वथैव लीन होऊन आहे असे.

येथें चित्त चित्त म्हणून जे परतत्त्व ह्या देहामधील तेच ह्या देहाच्या आधाराने किंवा साधनानें असलेले ते आता आपला नाथ म्हणा किंवा प्रिया म्हणा ती भेटल्याने तेथें योगच रूपास आला - क्रियायोग पूर्णतेचा झाला - व आतां चित्तचैतन्य हेच मुळीं योगरूप होऊन त्याने परमेश्वराचे दर्शन घेतले व जगासहि पण ते तसे दिले असे होतें : येथें स्वतःच तो ते दर्शन होय.

ह्या नरजन्मास येणे ते काय कशास ? येथें एकच तत्त्व ते म्हणजे ‘स्वतःस उद्धरून जगाचा उद्धार करावा’ असे आहे : येथें भक्तिबीजाचे ‘परमहंस’ असें ते धर्म्यामृत ते ह्या त्रिविध तापानीं ‘त्राहि त्राहि’ झालेल्या प्राण्यास सर्व निश्चयाचे करतें : तत्त्व आपलेसे करणे आहे - ईश्वरदर्शन व्हावे असे आहे - अमृत चारून अमर व्हावे असे तें - तेथे ईशचरणींचा प्रवास हाच मुळीं सर्व निश्चयाचा होऊन, ह्या विषयांना नच भुलून, त्या व्रतावर - त्या निश्चयावर - त्या धर्म्यामृतप्रेमावर - उभे होऊन, ह्या व्रतांना आपले महत्त्व देणारा झाल्यानें, तेथें सर्व तीर्थें हींच मुळीं ते चरण वंदन करण्यास येणारीं होत : असें तें खरेपणानें, प्रामाणिकपणानें, स्वतःस न फसवितां, मायेच्या भुलीस भुलथापीस न हार जाता,

आपल्या व्रतप्रेमावर उभे राहून जर झालें, तर तें सर्व सुखे चरणींचीं करतें : येथें ह्या विषयांना मुळीं ती व्रताची आंच पोहोचती झाल्याने, तींहि पण तसल्या त्या निश्चयाच्या पुरुषास आपलीं सर्व रहस्यें देऊन असतात.

विषयलंपटतेमुळे सर्व रहस्ये, अमृतबीजें, सेवासेव्यसेवकभाव हे वोहटं लागतात – व तीं म्हणजे जशीं का रेणुरेणूंसारखीं झाल्याने, आता भलत्याच ठिकाणीं पडलेलीं होऊन, भलत्याच ठिकाणचीं होऊन, तेथे त्या गुणांचे वैचित्र्य कां रिपूंचेहि वाटवध साधल्यामुळे, महत्त्वास पाहूं करितात – रिपू हेच मुळीं महत्त्वास पोहोंचतात व मग त्या महत्त्वमान्यतेच्या व्यक्तीसहि पण तसलाच तो रिपूचा डाव दिलेला झाल्यानें, तीं व्रतेच मुळीं आतां पळविलीं गेलीं – लांबविलीं गेलीं – व स्वतः तर मुळीं निस्तेजतेच्या अशा विषयभाराच्या जाळयात अडकल्यासारखे होऊन जाते.

म्हणून स्वतःवर जर प्रेम आहे – आचार्यांना प्रसन्न करून ते त्यांचें वचन पाळण्यानें होय, तेथें मग सहजच स्वतःवर प्रेम सापडणारे होते. प्रेम ते काय – प्रीति ती कसली – व्रत ते कशाचे – मैत्री ही कुणाशीं होणारी – हे जर आपल्या व्यवस्थतेस आले, तर ह्या विषयानीं – विषयींनीं – झकविणे नच होऊं देतां स्वमहत्त्वच आपल्या महत्त्वाचे होते : म्हणून येथे ज्याप्रमाणे खाऊसाठीं मुलेमाणसे ही यात्राप्रसंगांस का व्रतभारास का खाद्यपेयांचे विहारांना – मेवा का फळे हीं खाण्यास मिळाल्याने, हात पोहोचविणारीं होतात, तेथे पाहावे तो ते नटविले गेलेले बाल्यच एक मौज देखणारे – पाहाणारें – तोंडाकडे बघणारे – तोंड पाहा म्हणणारे होते. तेथे स्वतः आपण जो निश्चयाचा त्याने तर असल्या देखीच्या किंवा मौजेच्या किंवा कांहीं खाणेपिणे पाहाणेफिरणे त्याचे न होता, सांचेपणानें आपल्या निश्चयास – व्रतास – धर्म्यास – जागे राहून कसलेहि प्रकृतिमततेस किंवा व्यक्तिविशेषत्वास न भुलता, आपल्या निश्चयावर उभे होऊन असावे तेथे मग ते जीवित ह्या भिधेपणाचे कां उधारखात्याचें हे नच करिता, आपल्या रीतीस, आपल्या कुलाचारास, उत्तम धर्माचरणास, व्यवहारास, रिवाज जो आहे त्यास पांघरूण करूं लागून चोहोंकडे तशी तीच एक रीतिरिवाजाची मोड ही बांधणीची करून असते ! तेथे अनेक डोळेच जसे सौंदर्य पाहाणारे होणारे ! ह्या मायेशीं – लंपटपणाशीं – दोन हात करून, शौर्याचा धाकच मुळीं ह्या इतरांना – विषयांना – दिलेला झाल्याने, तेथे तीं इतरे का विषय हेच मुळीं ती रम्यता रमणीय अशी देखतात : त्यांच्या त्या लगटतेनेच मुळीं त्या शौर्यास साज केला अशी ही धैर्यवानाचीं जीं का शूरत्वाच्या आगचीं अशीं तीं अंगे त्यांना तर हा स्वर्गाचा दरवाजा नेहमीं उघडा असा होय.

क्षुल्लकतेचे असे ह्या विषयांना न म्हणतां हा जो त्यांत वागणारा आहे – त्यांना वागविणारा तोच मुळीं त्याचे ते क्षुल्लकत्व स्वतःवर घेऊं लागला, तर मग काय व्रत तरी कसचे व उद्धार तरी कशाचा व तो कुणी करायचा ! ह्या प्रकृतीचेहि पण महत् ते काय, जर तें धर्म्यामृताने त्या प्रकृतिधर्मास असल्या पुरुषबीजास नच आणणें केले – प्रकृति ही जी अनादि अशी तीसच मुळीं तें पातिव्रत्यपण पोहोचते करावे लागणारे व तेथे ती तर मग त्या पुरुषाचे चरणींच लान होऊन, आपले सर्व वैभव त्यास पेलवून असते : म्हणून येथे ते व्रत, तो निश्चय तोच मुळीं आपल्या ' परिग्रह ' धर्मास जागणारा होऊन, ह्या देहधारणेस लागणारे तेवढेच मुळीं योग्यतेचें करून, स्थितीस आणून, ह्या प्रकृतीस – धर्मधारणेस – आपले महत्त्व पोहोंचविणारा होतो. म्हणून प्रामाणिकपणाचा हो, व्रताचा हो, प्रेमाचा हो, आचाराचा हो, तरच ते हरविलेलें ते कां मध्यबिंदुस्थ असणारे ते उद्धरून असणें हे स्वतःसहि त्या प्रामाणिकपणाच्या बीजाचे करून, सर्व जगाकडून वाहवाच मिळविणारे होते हे केव्हांहि : परंतु ही वाहवा का ' स्तुत्य असे ' तें तर केव्हांहि मुळीं डोळयावर येणारें कां कानावर आलें असे होतच नाहीं : म्हणून

येथें ते भलेपण हे काय कुणाचें तें त्या विषयांना कां विषयींना नच समजणारें झाल्याने, तीं इंद्रिये कां विषय कां विषयी हे निमूटपणेच त्या चरणीं नम्र होणारीं होतात : येथे या विषयांचें महत्त्वमापन कां इंद्रियांचें लालन हेच मुळीं ह्या प्रकृतिभारास पोहोंचविणें व्हावे असे त्यांचें मागणें असून, तेथें मग अनेक अर्गी दिव्य किंवा प्रकृतिमंततेचीं उदाहरणे हींच सोडविलीं गेलीं व तीं पण ह्या दुसऱ्याच्या म्हणजे त्या विषयलंपटतेत फसणाराच्यावरच मुळीं उभीं झालेलीं : तेथें कसला तो दुःखाचा भार का अभावाचा कडा कां व्यवहाराचें नसणे का संसारधर्माचे नच उगवणें कां हा देहराज कुणाचा आहे कोण जाणे – असे हे झाल्यानें, येथे ह्या जीविताची ती जोड किंवा गोडी ही मुळींच पदरात नच पडणारी – तेथे सर्व दुःखेच मुळीं ह्या प्राण्यास जगामध्ये कोणीहि विचारणारा नच झाल्यानें, हा देह म्हणजे कशास जन्मला कोण जाणे असे होत.

म्हणून ती प्रिया हीच सांपडावी – सांपडून घ्यावी – व्रतांना व्रतपण द्यावे – निश्चयास निश्चयाचें करावे – प्राणास प्राणमहत्त्व द्यावे – तरच मग ह्या जीविताने जीवित जगलें असे परस्पर – प्रीतीचें बांधणे होऊन, हा जो देव विष्णु – का अक्षर ज्ञान – हाच मुळीं ह्या देहाचा संसार पाहूं लागतो तेथे सर्व सुखे हातचीं झालीं परंतु जो निरिच्छ किंवा स्वतःच्या जीवितास (जीवित – देह – जगण्यास) जेवढें म्हणून पाहिजे तेवढेच घेणारा होऊन असल्यानें, इतर जीं परिग्रहे त्यांना हा तर जसा एक जगाने लोटांगणच घालावे असा दिव्य वागविणारा पुरुष होय : म्हणून प्रामाणिकपणाचे होऊन ह्या व्रतास निश्चयाने आपलेसे कर : व स्वतःचा अगोदर विश्वास हाच मुळीं उद्धाराचा करून, मग पाहिजे तर ह्या जगाच्या दुःखास हातभार लावण्याचे होणारे – होतेच. परंतु जर स्वतःच तसा लंपटतेचा, तर तेथे उद्धाराकरिताहि पण स्वतःहि पण त्या व्रतचक्राच्या तेजामध्ये धडपडत असलेला होऊन, जगहि पण त्याचेंच मग होणारे असे : अशा त्या लंपटाच्या स्थितीस जगाने जेवढी कींव करावी तेवढी थोडीच होते : तेथे एक मात्र होतें कीं, तें जसे आत्मनिवेदनच ह्या जगाने जगाच्या डोळ्यास पाहविले असे हे लंपटतेचें दैन्य हे उद्धाराची गोष्ट – स्वतःच्या – आत्म्याच्या – उद्धाराची गोष्ट नच पाहूं लागल्याने, तेथें ते ते निश्चयी पुरुष – का ते ते तीर्थचरण सेवा करणारे – तेच मुळीं तेथीलचे ते उद्धरणें स्वतःवर घेऊन, त्यांतून स्वतःचा उद्धार करून घेणारे होतात. म्हणून ही लंपटपणाची कां लोभाची गोष्ट ही नीटशी समजून त्यापासून स्वतःचा बचाव कर व तो फक्त एका त्या व्रतास कां निश्चयास कां अमृत-धर्मास कां अमरत्वास जागल्याने होय हे केव्हांहि.

ही प्रिया न भेटल्याने ह्या जगानें ह्या विरहाचें होऊन, तेथे अनेक रम्यपणाच्या गोष्टी ह्या शब्दांना देऊन, ते ते शब्द परम सुंदर असे त्या प्रियेचे सर्वच्या सर्व अंगसौष्ठव गाऊं लागतात. ती ती भेटीची इच्छा ही परम रमणीयतेचें अंग घेऊन, तें ती प्रिया ही पण स्वतःच होऊं केल्याने, ती ती प्रकृतिरम्यता हीच जशी ती ती अवस्था – स्थिति – कां जवळ जवळ ओढलें जाणें – होऊन, ती प्रियेची गोष्ट मुळीं ह्या जगास आवडूं लागणारी होते. तेथे मग तुम्ही आम्ही जर हे विचारास घेतले, तर ती भेटीची उत्सुकता कां उत्कंठा ही व्रतानें कां प्रकृतीस उपचाराचें करून – साधनाचें करून – ती भेट ही घ्यावी असें बरे नव्हे काय ? नेहमींच तें रम्यपण कां सौंदर्य कां नेटकेपण कां सौष्ठव हेच मुळीं चढ दिले गेल्यानें, तेच मुळीं तसें ते खरेंपणाच्या सौष्ठवाचें ह्या विरहाच्या धगीनें उचलिल्यामुळे विरहवंताचें ते तें प्रकृतिरम्य – प्रकृतिमंततेचें मनोरम सौष्ठव दास्यच करूं लागतें, व तुम्हांस मात्र एका व्यर्थतेच्या अशा – लंपटपणाच्या अशा – त्या पतंगाचें ते नुसतेच आकाशांत गिरट्या घेणें व तेंच मुळीं एकसारखे पाहात राहाणें हे भावमहतीचे होतच नाहीं – तेथे हातास कांहींच येत नाहीं. वर ही हास्यलक्षणा कां छटा ही तर नसत्याच कामाच्या खोटीची खातरजमा ही सर्व प्रामाण्यतेच्या – प्राधान्यतेच्या – भ्रमाची होऊन तेथे असते. म्हणून प्रिया जी तीच मुळीं लावेचें गाणें नच गाणारी

अशी स्वतःच्या आचरणानें करावी लागणारी होय. तेथें देवतारहस्य कां देवमाहात्म्य हेच स्वतःच्या हास्याचा विषय न होऊं देतां, प्रामाणिकपणाचें 'स्व' असें करून, त्या त्या धारणधर्मास पुरतें होऊन असलें, तर मग ती प्रिया भेटणारी हें केव्हाहि. म्हणून व्रत सांभाळावे, आचार नीट वागवावा व आपलाच आपण उद्धार करून घ्यावा असें मग साहजिकतेचें तें बोलणें हे केव्हांहि.

येथे बाप शिरावर आहे तोपर्यंत कसलीहि ददात नाही, पण तोच बापपणाचा प्रसंग कां बाणा हा स्वतःवर येऊन घडकला, म्हणजे त्या बापपणाच्या कसोटीस उतरणें हे केवढें तरी ह्या प्रकृति-भारास निकटपणा का कुळाचाराचा व्यवहार कां त्या विषयलंपटपणाची धग ही उचलण्यास दिलेली झाल्यानें, तेथें तें बापपण रंगविणे का नटविणे हेच मुळीं सर्वच्या सर्व कसोटीच मुळीं आपल्या योग्यतेस आली असे होणारें केव्हाहि. म्हणून लहान अर्भकास आईच सर्व देवपदवी घेऊन असल्यानें, तेथ त्यानें त्या आईसच मुळीं सर्व देवत्वच लेवविलें होतें. सर्व जगापेक्षाहि ती आई त्यास श्रेष्ठ अशी असते, कारण स्तनीं लावूनच ती मुळीं त्याची ती भूक शमन करणारी. हे जसें तसें येथें तें बापपणाचें घटितव्य हेंच मुळी तेथीलची सर्व आच नच लागून घेता, तें तें पाहणें व्यवस्थित असें केलें तरच तेथीलच्या ज्या अडीअडचणी का ह्या जगातील व्यवहारास पाहाणाऱ्या रम्य अशा त्या जागा ह्या आपलाशा कराव्याच लागणाऱ्या – त्या तशा केल्याच पाहिजेत, तरच मग तें बापपण हेंच जसें आता आपल्या भाराचें होऊं लागणारें – तें अनुभवानेंच मुळीं आपल्या योग्यतेस येणारें होतें. ह्या ज्या काहीं ह्या जगांतील पाहाण्याच्या का ऐकण्याच्या जागा का ऐकविणाऱ्या जागा त्यानीच जर बाजूस होणें केलें, तरच थोडेबहुत तरी तें बापपण पदरांत पडणारें असे तें या अनुभवानेंच पाहविलें तरच बरें. सर्वभूतसाम्यलक्षणा हीच मुळीं त्या चेतन्यास सहज वर आणणारी होय.

चेतसा सर्वकर्माणि मयि संन्यस्य मत्परः ।
बुद्धियोगमुपाश्रित्य मच्चित्तः सततं भव ॥

मनानें किंवा सजीवतेनें ( जीवदशेच्या ज्योतिरूप तांबुसपणाच्या प्रकाशावर उभें होऊन ) किंवा ज्ञानानें ( जाणिवेनें ) कर्माबद्दलच्या ( सभावन जे काही केलें जाणारें – सृष्टिरचनेचें कौशल्य योज-लेलें तें ) फळाची अपेक्षा न करता, सर्व कर्में चित्तानें आपलीशीं करून, बुद्धियोगरूपी अक्षरज्ञानाचें कौशल्य पुढें घेऊन, तूं आपलें सर्व चित्त मजकडेस देऊन अस. प्रेम – प्रीति – मैत्री अक्षरानें घडविली अशी ती कर्म करण्याची हातोटी आपलीशी कर.

हे द्विजदंताचें ते द्विष – विविद्विष असे, एकाच्या सहज प्रकृतीचें ते दुसऱ्यास केव्हाहि विषय विषतेचें धारणें देणारें असल्यानें, तेथें व्रतभार हे महत्त्व घेऊन असतात. 'अगोदर केलें मग सांगितलें' असा तो ह्या विश्वेचा तगादा तो तर कोणीहि लक्ष्यात नच घेतल्यामुळे, तेथें हे व्यवहार्य हेच मुळी जें काही होत आहे तो योगच जसा असा पाहविला गेल्यानें, तेथें कुणाच्याच पदरांत काही पडत नाहीं-सर्वथेव सर्व बाजूंनीं सर्वां ठायीं जसें ते एक द्विजदंताचें मात्सर्यच मुळीं विषयविषाचें ते – ते कांहीच पदरात पडूं देत नाही. परंतु तेथें या जीवदशेस अंधुकशी जाणीव मात्र असते कीं हे आपलें असें करणें चुकीचें होय. परंतु काय करावें या विषयविषाचीं तर तींच तों पुढें बसल्यानें, तेथें तेच ते विविद्विषा-विद्वत्तेचे कां विविद्विषतेचें, विविधतेचें, 'हून श्रेष्ठ ते कां?' चे असें तें प्राचुर्य – तेथें सर्वेश्वरता ही कशी काय वागत असेल हीच मुळीं नेहमीं वादग्रस्ततेची ह्या बुद्धीनें नेहमीं पुढें घेतलेली आकांक्षा हीच मुळी तें प्रियासौंदर्य सापडवूं देत नाहीं – तेथें संशय थरारून येतो. म्हणून येथे विषयविष द्विजताच मुळीं सर्व माती झेपणारी झाली – नटलेली विदुषीच ती झाली व तिजला मग हे द्विजत्व मुळीं नच आवडून, तें देहाचे – बुद्धीचे - सर्व सौंदर्यास आवडणे करून घेण्यानें, तेथें ती प्रियामरणा हीच भारली गेल्यानें,

आतां ती प्रिया सापडला तरच मुळीं ह्या जीवचैतन्यानें कां पुरुषानें आपल्या प्रियतमेस पाहूं केल्यानें, तेथें सर्वगांत असें लक्षण तें मुळींच ह्या मात्सर्यास कां विषयांना त्याचे विष आपल्यावर घ्यावें असें महत्त्वच देत नाहीं. तेथें जी कांहीं प्रिया हीच मुळीं सर्व विश्वांतर्गत चैतन्याची ती एकच असल्यानें, तेथें माझें कां तुझें असें केव्हांहि नाहीं पण तेथ व्यवस्था ही मात्र रम्यतेची झाल्यानें, तेथें पुरुषभार हाच आपल्या व्यवस्थितीचा झाला व आतां येथें काय तें आप कां काय तें पर असें नाहींच. तेथें सर्वगत चैतन्यच एक – सर्व प्रेम – सर्व प्रीति व सर्व मैत्रीच होऊन आहे असें सर्वात्मकतेचें होय तेथें उत्तमत्व कां अधमत्व हें नाहीं. तेथें चांगला तेवढाच घ्यावा व अधम तो टाकावा असें नाहीं. अहो, तेथें मग पृथ्वीच जशी कळवळिली अशी वास्तविकता आल्यानें, तेथें चांगलें कां मध्यम, कां लहान कां मोठें हा भावच मुळीं नाहीं ह्या पृथ्वीवर अनेक की अनेकीं एक प्रकार कां प्रचाराची अशी ती ह्या गुणवैचित्र्याची भेसळ जरी, तरी ती वसुधा ही कांहीं तसलें तें भेदलक्षण हें मुळींच पाहात नाहीं. ह्या पृथ्वीवर अनेक वृक्ष, अनेक असे वस्तुजात असलें, तरी ती काय चांगलें, नीटनेटकें, व्यवस्थित केलेलें तेवढेंच माझें होय व दुसरें जें नेटकें नाहीं, ओबडधोबड असें तें माझें नाहीं असें ती पृथ्वी केव्हांहि म्हणतच नाहीं.

वसुधा ही अग्निगोलकासारखी ती उत्तम गुणांनी नटलेलें तेवढेंच – फुलेंफळें, कां पानें हीं परोपकार, कां दान कां दातव्ययोग्यता अशी देणारीं अशीं उपकारक जीं तेवढीच – आपल्या पाठीवर वाहाणारी आहे व अधम अशा गुणांनीं जसे कां चालताना पायास कांटे मोडणारे कां धोंडे टोचणारे – कां याहूनहि एका अधमतेच्या अशा भेदास पाहाणारीं ती मात्र नच पाठीवर वाहावीं असें ती केव्हांहि करीत नाहीं तिजला काय उत्तम, कां अधमतेस येण्यानें बोलूं लागणारें तें लक्षण ( तेथें मध्यमतेचा भाव हा मुळींच त्याबाबत आपलें मत दर्शविणारा झाला नाही असें वाटणें ) असें तें पृथ्वीसारखें सहनशील कां परमोत्तमतेचें कां सर्वाधमतेचें होणें हें स्वभावाचें एक दीर्घपणच जसें पाहाण्यास आलेलें ! असा जो पृथ्वीसारखा सहनशील – बोलणें हें उत्तम झालें, स्तुति करूं लागलें, कां तच आतां अधमतेचें होऊन, त्यानें आदराचा अव्हेर करून आदरास घेतलें नाहीं असें तें जो हें दोन्हीहि सारख्या किंमतीनें सहन करणारा जसा कां अधम जरी पण तेथें जसा कांहीं एका उत्तमतेचा भावच घेऊन आहे, देऊन आहे – असे तें पृथ्वीसारखें क्षमाशीलत्व सर्वतऱ्हेचें निंदात्मक कां अपमानात्मक तें साहून जो असतो, तो पृथ्वीसारखा क्षमाशील होय पृथ्वीच तो जसा दुःखानें कळवळून गेलेल्या प्राण्यास उचलून घेऊन सुख देणारा कां संकटकाळीं तें संकट सहन करण्यास क्षमाच अशी जशी ती पुढें झाली – असें तें पृथ्वीसारखें क्षमाशीलत्व तें जो स्वतः होऊन आहे : तेथें काय उत्तम कां अधम असें प्रसंगाचें होणें तें सर्व साहून तें गुणाचें जसें तसें नच निराळें करून एका सहनशीलतेच्या भावाचा अलंकार हा स्वभावास केला असा जो : तेथें स्वतःच तें होणें हें झाल्याशिवाय कांहीं तेथील उत्तमत्वाचें, क्षमाशीलतेचें, सहनशीलतेचें "प्रसाददान" अशा प्रकृतीच्या भावाचें सौंदर्य किंवा उत्तमत्व होय येथें स्वजीवित ज्या देहानें धारण केलें तो देह साधनाचें साधन सर्व एक – तेथें तसा गुण वठलेला तो काय मान्य कां राजमान्य नव्हे असें कोण म्हणेल बरें ? देह सर्व प्रकृतिभाराचें एक निधान जसें – तेथें निरभिमानाचें असें आत्मत्व कां गृहस्थच एक आपल्या कुटुंबवत्सलतेच्या भाराचा झालेला – डोळयांनीं असें तें सुरसतेचें पाहाणें केलेलें – जेथें स्वभावाची सर्वसुंदरता ही पुरस्कारून यावी – पुरस्काराची व्हावी – असेंच तें होय. तें स्वतःच होऊन असावें तर बरेंच बरें असें स्वभावप्रसादन ! (१४४-१४५)

**अहो, तो कसा म्हणावा तर राय म्हणून त्या एकासच तेवढें जवळ घेतलें व रंक म्हणून त्या दुसऱ्यास दूर केलें असा तो नसून, जसा कां प्राणच तो कृपाळ कृपाळ असा सर्व.**

असें तें परम कृपाळपण प्राणाचें होऊन असणें – तें काय थोर काय गरीब त्यांना हा प्राण कधीं काळीं कांहीं म्हणणारा कीं, थोर म्हणून त्यांस खेळवून आपलासा करूं कां लहान म्हणून त्यांस पलीकडे कां परतें करून दूर वगळून टाकूं असें नाहीं.

हा प्राण हा जीवच जसा एक : हा जीव हा शिवच पण मायेच्या मोहांत अडकल्यामुळें सविकारतेचा झाल्याने, या मायामोहाचा सर्वथैव. अशा जीवदशेचें उपमासादृश्याने पाहिलेलें जे उदार वृत्तीचें गहनत्व तें जसें कां स्वतःच्या प्राणासच अलंकारणें तें : येथे भुकेल्यास अन्न घातल्यानें ज्याप्रमाणें ह्या अन्नकोशासच प्राणधारणेचें परिधान देण्याने, स्वतःचा जीवच जसा तृप्त झाला. अहो, डोळ्य नें पाहिलेले सौंदर्य तें या जीवदशेस – डोळ्याच्या देखणेपणास – निवालेपण देणारें असें असल्यानें, स्वतःच जीवच कां प्राणच जसा तृप्त होणारा : तेथें ह्या प्राणाने ह्या मनुष्यदेहास परमचातुर्याची सीमा घेऊन त्या मनुष्यदेहात रिझविणे करणारी त्याची ती माणुसकीची – मनुष्यदेहधारणेची – आवड (ऐश्वरम्) तीच जशी पुरती केली . तेथें प्राण प्राणानेंच सर्वथैव आपल्या प्राणभरणास आल्यानें, जीवदशेचे जे परम औदार्य तेच रम्यतेस आलेले किंवा देखीस येणारें असें होय. तेथें तो प्राण एक मनुष्यप्रीतिच पुढे घेऊन असल्याने, तेथें योगच जसा एक ह्या प्राणक्रियेचा व प्राणशक्तीचा सर्व असा असतो, तो आपले उदारपण किंवा एक औदार्यच कसल्याहिं स्थितींत पुढे करून असल्याने, त्यास राय कां रंक असें विभेदन नाहीं एक हा मनुष्यदेह त्यासच तो पाहाणारा असल्याने, त्यास राय का रक असें भेदानें पाहाणें नाहीं हा जीव हा महान् उदार असाच असल्यानें, त्याचें तें तेज पूर्णतेनें जेव्हां स्थिर होते, तेव्हा तोहि पण ह्या प्राणाच्या उपमेस पाहाणारा असा होय तेथें त्याचे सर्व कौशल्य कां करामत हीच मुळीं ह्या जगतास मोठेपणाचा डौल देते : हे सर्व किंव हेंच जसा तो सर्व होऊन आहे असा ह्या विश्वातील सर्व मोठेपणा कां उदारभावच एक त्याची ती जीवलक्षणा पाहाण्यास आल्यानें, त्यानें तेथें औदार्याची सीमाच करणे होणारें हे केव्हाहि म्हणून प्राण हा जीवच एक, कां जीव हा प्राणच एक ह्या जीवभावाच्या गोडीचा झाल्यानें, तेथें औदार्याची भूमिका ही नटविण्यानें जसे का तो स्वतःसच ती भूमिका रंगविण्यास देत असलेला : तेथीलची ती भूमि कां भूमिका ही पूर्ण प्रभावाच्या उदार लक्षणानें आपण स्वतःच स्वतःस तो पोशाख केला असें होय. या मनाच्या प्रसन्नतेपुढें सर्व जगहि तुच्छ लेखलेले असें एक एका ह्या मनाच्या वृत्तीनें सर्व प्रभवन हे हातास आणून स्वतःचें मन – प्रभवन – शील – हे ज्याचें त्यास देऊन ह्या ऐश्वर्यास ऐश्वरम् तें कसें हें दाखवून दिले तें होय. म्हणून हा प्राण हा आपला जीव जसा, तसे सर्व जीव, किंवा सर्व जगाचा जीवच आपण होऊन आहे, किंवा अनेक जीवाचें जें जीवचैतन्य तें तो स्वतःच होऊन आहे, असा झाल्याने – असल्याने – तेथें त्याचे दृष्टीस कांहीं उच्चनीच कां थोरलहान असा भाव असणें केव्हांहि नाहींच प्राण हा प्राणच, व जीव हाहि पण प्राणाच्या कोटींत बसल्यामुळे तेथें त्यास जीवप्राण असेच म्हटले गेल्यानें ह्या जीवप्राणाची जोडी ही ह्या जीवदशेची परम गोडी ही देवत्वच एक तेथें स्थिर करणारें होय व अशी ही ह्या प्राणाची ती जीवगोडीची परमसमाधानाची, शांततेची, प्रसन्नतेची, प्रशंसेची सीमाच ती झाल्यानें, तेथें त्याने आपले जोडीचें तें रसमाधुर्य आपलेसे करून देवपणांतच स्वतःस उभें केले असें होय अहो, असा हा परम प्रसन्नतेचा हातच तो मुळीं कसा हें जाणण्यासच मुळीं हे जग एकसारखे धापा टाकीत असल्याने, तेथें ती सीमा पाहाण्यास मिळाल्यानें, आतां सर्व ऐश्वर्येच जणुं त्या प्राणास आपलें प्रसन्नपण देऊं इच्छिणारीं होऊन असतात असें हे पाहाण्यास तरी पण कुठें मिळते – मिळते कुठे ? ह्या बुद्धीच्या दानतेची गोष्ट ऐकणें व ती प्रत्यक्ष आचारांत आणणें हेंहि पण अति दुर्लभ असें असल्यानें, हे ऐकणें, पाहाणें, आचरणें कां विचारांत घेणे हेहि पण जसें का ह्या जीवदशेचे परम तृप्तीचें भरणेंच स्वतःस केलें – स्वतःस भरविलें असे होय. तेथें पोटच भरलें, समाधान

झाले व हा जीव किंवा हा प्राण हा या ईश्वराचें ऐश्वर्यासच तो रंग पोहोंचता करणारा झाल्याने, तो स्वर्मासच शोभविणारा असा जीवऐश्वर्याचें सर्व माहात्म्यच घेऊन आलेला होय.

जो जीवाचाहि जीव, प्रेमभावाचाहि भाव असा – ज्यावांचून हे सर्व कांही जीवित मुळीं नच आवडणारे – काय थोर काय लहान, काय श्रीमान काय गरीब अशा सर्वांना हा प्राण म्हणजे जीवितच मुळीं जगत असलेले असे प्रेमाचे झालेले असे होय. या मनुष्यदेहाने असलेले जीवित हे प्रेमाने बांधले गेल्यामुळे त्या प्रेमाच्या पोटींपाठीं धांवत असणारा असा ह्या जीविताचा श्वासभार – जणू एक प्रेमच ते आत वसलेले – हा जणं जीवगोडीची गोष्टच सांगत आहे तेथें या जीविताने अथवा ह्या जीवदशेनें कुंकू लेइले व आपल्या लावण्यात प्रेमरसाचा वर्षाव जेणें करून होईल असे ते जीवित लावण्यास आणिले. तेथें जसे का हात जोडणेच का देहभाव हा नत होणारा, विलीन होणारा असा – जसा कां सर्वच्या सर्व विकारणे हेच मुळीं प्रेमास आले काय येथे या जीवितान्या जगण्याची मजा, शोभा, प्रेमच चालत बोलत वागत असलेले तें. अहो ! तो प्राण काय राव आहे म्हणून त्याचा तेवढा देह चाळवूं – वळवूं व रंक म्हणून त्यास पिळून काढूं असे तो प्राण – तो कृपाळु प्राण – केव्हाहि नच होय अहो, या प्रेमाने आराधना करणे ज्याने करावे तेथें तो प्राण केव्हाहि त्याजबरोबर मिळून जाऊन आपणहि पण तेथील त्या प्राणाचं व्हावे – गोडीचें व्हावे – प्रेमाचें व्हावें – असेच म्हणत असणारा, तो केव्हांहि रंकपण का रावपण हे नच पाहाणारा : जीवदशेचें प्रेम हे कांहीं त्या रावपणाने का रंकपणावर तोलले जाणारे केव्हांहि नव्हे तसा परम कृपाळु जो प्राणासारखा कृपाळ (प्रिय) होऊन असतो, तो या जगास नेहमी हवाच – व्हावाच कोणी झाले तरी तो परम दयाळ, परम कृपाळ, असा कृपार्द्र दृष्टीचा असा कृपेचा वर्षाव करणारा होणार हे केव्हांहि : म्हणून तसें व्हावें, तरच तेथील गुण हे काहीं प्रमाणांत तरी पदरांत पडणारे होतील, म्हणून ही जी कांहीं दैविकी लक्षणे तीं स्वतः तींच होऊन असावे तरच बरे.

"सुदैवानें परिमळ – सुगंध – दरवळला, तेथें दिव्यतेचे देवस्वरुप जसे आपल्या प्रेमास पाहून तेथे आले सुंदर सावळा असे रूप कासेस पीतांबर असलेला तो दिसूं लागून सर्व जीवित स्वरूपमय झाल्याने, तेथें सर्व प्राण हा तन्मय होऊन गेला माझी सर्व दृष्टी भरून – मीं डोळे भरून – त्यास पाहिले. तेथें माझा सर्व प्राण तन्मय झाला, पण न्याहाळून जेव्हा पाहूं लागलो, तो काय चमत्कार. अहो कीं, तो वनमाळी कोठे गेला ते कांहींच समजेना मी आपल्या मनास बोध करूं लागलो व आतां पाहावें तो, अहो, तो प्राणच होऊन राहिला माझे सर्व प्राण त्याने आपलेसे केले अहो, असा तो सुखाचा श्रीविठ्ठल त्यानें तर कायावाचामनें मजला आपलेसे करून ठेविले. वेधच त्याचा मला लागल्याने – वेधानें मला पाहिल्याने – तोच जसा दिसावा असे होऊन गेले "

हिरव्या चाफ्याच्या पिकलेल्या फुलाच्या सुगंधाने ह्या श्वासास रम्यपण आले – प्राणच जसा सर्व प्राणाचा होऊन स्वर्गीन संचार करूं लागला तेथें राव आहे म्हणून त्यास जास्तींत जास्त सुगंध व रंक आहे म्हणून त्या सुगंधातून त्यास वगळणे हे केव्हांहि नाहीं अहो, उमललेले गुलाबाचें का शेवंतीचें फूल ते डोळ्यांना सर्व रम्यता देणारे, त्या रम्यतेमुळे स्वतः पाहाणाराच मुळीं सर्व सौन्दर्य होऊन आला व तेथें डोळयांना तर ह्या जन्मास येऊन आज मुळी दृष्टीचें साफल्य झाले असे वाटणारे ते ह्या दोहोंनाहि – राव कां रंक ह्यांना – सारखेच होय तेथे दोहोंचाहि जीवितप्राण तो अति सुंदर, अति प्रिय असा मानलेला. तो स्वतःचें ते सुंदरपण ह्या सर्व देहासच मुळीं देऊन रम्यतेची नवाई पाहूं देणारा झाल्याने, तेथें जो मनुष्य ह्या फुलाच्या प्रफुल्लितपणासारखा का सुवासासारखा, तो तर सर्व जयाचा जीवच होऊन असल्यानें, तो सर्वांना एकसारखा प्रिय प्रिय बहुप्रिय असाच होऊन असतो.

म्हणून स्वतःच तो प्राण किंवा त्या प्राणासारखे होऊन असणें म्हणजेच तेथीलची ती रम्यतेची नवलाई ही प्रिय अशी सर्व जगाशीं मैत्रीच होणारी. सर्व विश्वांत संचरून असणारा प्राण हा मुळींच आतां आपल्या प्राणप्रियपणास आल्यानें, तेथे जीवितगोडीची जोड ही सांपडावी तरच बरें. तेथें आतां खरेंखुरें जीवित हे अमरपदच जसे पाहूं लागले असे होणारे होतें. तेथे आत्म्याचे संपूर्ण बळ कां जीवनकलेचे अमतत्व कां जीवितयात्रेची अपूर्वता ही पूर्णतेस आल्यानें, सर्व वायु जो ह्या हृदयात असणारा तो प्राणपणास आल्यानें, देवपदवीच एक जशी तेथें विराजूं लागली – विलासाची झाली – प्रसन्न होऊन आली

ह्या जगतास रमविणारा कां रंगविणारा तो प्राणच एक – तेथें उत्तमत्व तेवढेच त्या प्राणानें आपलेसें म्हटले व अधमत्व हे नाकारले असे केव्हांहि होतच नाहीं या नरदेहाची अपूर्वता ही सत्वच तेथें महत्त्व पाहून असल्यानें, केव्हांहि ह्या मनुष्यदेहधारणेस ती ती रम्यता देऊन असते. तेथें आनंदच एक नांदण्यास आला आहे ह्या भूलोकावर असे होऊन असलेले : म्हणून जीवितगोडी ही ह्या प्राणानें प्रतिष्ठा पावून असल्यानें तेथें रमणेच एक : ह्या जीवदशेची देहधारणेची आवड मुळीं ह्या प्राणामुळ आवडीची झाली मनुष्य मनुष्य तो – ह्या देव का गधर्वयोनीचा का तिर्यग्योनीचा असा – तो ह्या देहधारणेनेच मुळीं त्या त्या वृत्तिरम्यतेचा झाल्यानें, तेथें देव का दिवौकस कां जीव-पक्षी कां तिर्यग्योनी ह्यानीं ह्याच मनुष्यदेहाचा मुळीं आश्रय करून, आपापले ते जगणे जगविलेले असें होय. तिर्यक् म्हणजे वांकडे चालणारे ते मनुष्येतर प्राणी, पशुपक्षी, त्यानींहि पण ह्या मनुष्य-देहावरच सर्व भिस्त टाकून त्याचे ते ते मनुष्यअलंकरण नटविले, सजविले, रम्य केले असें होय. तेथे प्राण जो विश्वचक्षूच जसा त्यानें ह्या सर्वांना आपापले महत्त्व पोहोचविले जसें असें होतें. म्हणून हा प्राण जो तो काय लहानमोठा का रावरंक कां उत्तमअधम असे नच घेतां, तो सर्वांना पुरता होऊन आपल्या आपणासच प्राणाचे करून असल्यानें, तेथें सर्व विश्व हे श्वासानें प्राणाचें झाले, जागूं लागले, जीवितास आले, जीवनकलेतच रमूं लागलें असें होतें म्हणून भक्ति का प्रीति, लज्जत का हौस, रति कां रुचि, आसक्ति का अनुराग, निष्ठा कां आवड हीं ह्या जीवितास – देहधारणेस – विभक्तपण नच देता भक्तच होऊन असावे, ऐक्याचें होऊन असावें, तेथें सर्व प्रीति ही प्रेमच झाली असे करावेच करावे असे होय तेथें मग सहजच प्राणप्रियता ही प्राणच माझा का जगाचा जसा असा रम्यपणाचा होऊन विलसूं लागला असे होय

येथे या साधनाने – मनुष्यजन्मानें, नरदेहधारी असा हा मनुष्य ह्यानें – मायाक्रीडावनाचें न होतां, तपाचरणानें व क्रियायोगरूपी भक्तीनें तो प्राणच आपलासा करावा, सुदृढतेचें व्हावें असेच आहे. म्हणून येथे जी अनुरक्तता – ह्या वडिलाच्या उन्नतींना पोहोचती व्हावीच व्हावी अशी – ती केव्हांहि फटाळूं नयेच नये व त्या त्या म्हटलेल्या आपल्या ज्या ज्या भागा – जागा त्या त्या जागांत साजेशा व्रताचरणादिनीं आपल्याशा करून ते ते स्थान शोभवावे व स्वतः तेथीलची ती रम्यता व ईशवात्सल्याची गोडी चाखून इतरांना म्हणजे जगासहि पण ते ते प्रसन्नपण पावते करावें असे आहे. तेथें परस्पर मैत्री ही आनंदसूर्य जीवित घेऊन असणारी ती योग्यता ही त्या दोहोंनाहि प्रेमानंदाची अशी झाल्यानें, तेथे कलह तो कसचा ? तो घडीवजा कां एक घटकाभरचा होऊन पुन्हां ती ती गोडी आपल्या महत्त्व-भाराची झाल्यानें, तेथेहि पण मैत्रीचे ते सुघटित असे एकजीव होऊन येतें. तेथें केव्हांहि विभक्तपण नाहीं. तेथें एकच ते प्रेम कुठेहि असले तरी ते डोलूं लागणारे होतें. ह्या जीवितप्रियतमेची रम्यता ही सर्व सौंदर्येंच जेथें एकवटून असलेलीं अशी होय येथें या मनुष्यदेहाचें वैभव हे एकत्रित होऊन त्या या मनुष्यजन्मास – मनुष्यदेहास – जागविलें – शोभविले, रम्य केलें, स्वर्गांत नांदविलें असे ते देवपणच एक सर्व रमणीयत्व घेऊन आहे असे होय. म्हणून तो प्राणच तो प्रिया झाला, व ह्या

देहाची जी देवता तीसच शोभवूं लागल्यानें, तेथें जीवितप्रेम हें जसें का सर्व जगाचा जीवच होऊन आहे असें होतें. ह्या सर्व देहामधील अणूअणू – रेणूरेणूची जी अतिप्रिय अशी सर्व कल्याण पाहाणारी ती प्रिया ही ह्या जीवितास आनंदाचें करतें – ह्यापेक्षां दुसरें एखादे विशेष प्रियपण भेटेल असे नाहीं. तेथें सर्व प्रियपण सर्वप्रिय होऊन आले, त्यानें जीवितास जगणें दिलें : जोगणें (कां जीवन-यात्रा) साफल्यतेचें ते पदरांत पडूं देऊन जीवित आपले आपण सर्व रम्य झाले व इतरांनाहि पण तेथीलच्या ओढीची, प्रेमाची आतुरता ही पोहोंचती केल्यानें, तेहि पण तेथीलच्या चरणींचा प्रवास व्हावा अशी आतुरता दर्शवून, अहमिहकेनें पुढे होऊन, आपले मन कां सर्वस्वच त्या चरणीं वाहूं लागले असें होतें. तेथें परम अशी ती या दोहोंच्या प्रेमाची रम्यता ती स्वर्गांतील देवांनीं पाहून त्यांनाहि पण आपण अशा पवित्र नि रम्य स्थळीं पोहोंचावें व त्या प्रेमाचें व्हावें असें वाटूं लागन, ते देवच मुळीं आतां भक्त व देव अशा दोहोंत स्वतःस वांटून घेऊन, ती देवकोटी कां भक्तकोटी शोभवूं लागले असें होय. कर्म-बंधनानें भूतआशयस्थित असा आत्मा विराजमान होऊन असल्यानें, तेथेच जखडला गेल्यानें, या जगा-मध्ये दुसरीकडे कोठेहि त्यांना प्रियपण भेटणारे होतच नाहीं. येथेच मुळीं जेव्हां ते आपापल्या बंधांत बसावें, तेव्हाच ती ती रम्यता ही जीविताची नवलाई पाहूं लागणारी होते. तेथे सर्व प्रेम हे भक्ति कां भक्तिसीमेची एक ख्याति – तशी ती आकांक्षेची कां आवडीची सीमा – घेऊन येतें तेथे ती सीमा ही जगांतील सर्व सौंदर्यें आपलीशी करून असल्यानें, तेथेच गोडी कां ओढ घेऊन, त्या त्या व्यक्तीस ती ती अनुरक्तता ही पोहोंचती करणारी होतेच होते. सर्व जगच मुळीं तेथे लोटांगण घालीत असल्यानें, तेथील रम्यता अवर्णनीय होय. तेथीलची ती सीमा ही तें भक्तपण कां प्रियपण होऊन असावें तरच मग हें सर्व जीवित जसें आनंदाचें झाले व तेथीलची रम्यता अनुभविल्यानें ह्या डोळयाचें कां मनुष्य-देहधारणेचें कां ह्या जन्माचें पारणेंच फिटले असे होय. असा तो प्राणच होऊन असणें हे केव्हांहि बरेच बरे ! (१४६)

अहो, जसे का पाणी प्यावयास गेलेली जी गाय ती गाय म्हणून, गरीब म्हणून, तिचीच तेवढी तृषा म्हणजे तहान भागविण्याचें करते म्हणजे तहान भागवितें, व व्याघ्र जो पाणी पिण्यास गेलेला तो क्रूर म्हणून त्यास विष होऊन पाणी जसें मारीत नाहीं, त्या पाण्यानें विष होऊन मारणें नाहीं – असें जें तोय, त्याप्रमाणें जे भक्त कां सत्पुरुष ते दोघांचेंहि तें आर्त सारखेच पुरविण्याचें करतात. या परमात्म्याने हे विश्व आपल्या सत्तेने चालविले असल्यानें, तेथे उणे कां पुरे, चांगले कां वाईट असें नाहींच तेथे सर्व जीवित हे प्रेमाचें सर्वथैव असेच : व मग तेथे पाणी माळयानें जिकडे न्यावें तिकडे शांतपणेंच जातेच. अहो प्रेम हे काय कुणास नकोसे असते ? तो अलंकारच एक ह्या जीविताचा जीवनाचा.

हें चित्त कसें तर पाण्याप्रमाणें शीतळ असून ते पाण्याची पातळी – धार – महत्त्व – पाहाणारें होय. एकादा तोयाचा थेंब जर भडकलेल्या चित्तावर पडला, तर तेथे ते तोय आटूनच जातें, ते स्वतःस प्रेमाच्या रूपांतरतेनें पाहावें असें करीतच नाहीं. तापलेल्या लोखंडावर घाव बसला तर तो काय लोखंडास लागतो कां अग्नीस लागतो ? पण तेथे वळणें कां वळविणें हे होणारें होते. तोय हे तापलेल्या लोखंडावर पडलें, तर तेथे पाण्याचें नांवसुद्धां उरत नाहीं. परंतु त्या पाण्याचा संसर्ग मात्र तेथे उरून असतो. कमलिनीदलावर जर किंवा नलिनीदलावर जर एकादा थेंब पडला, तर तें जसें मौक्तिकाचें सत् असें दिसतें. नलिनीदलावरील सलिल अति तरल, त्याप्रमाणें जीवित हें अति चपलतेनें जात असतें, म्हणून विकारवशतेचें न होतां त्या परमात्म्यास भज. तेथीलच्या प्रेमाचा हो, म्हणजे तुझें जीवितहि पण प्रेमसंसर्गामुळें – प्रेमसंस्कारामुळें – अति आवडणारें असें होईल. अहो, तें तोय जर स्वाती

नक्षत्रामुळे तर शुक्तिपुटामध्ये पडल्याने सुंदर नेटकें असें मोतीं घडते – बनतें, म्हणून उत्तम कां मध्यम कां अधम दशा ही संसर्गामुळे टिकणारी होते, शोभूं लागते – तेथे ती स्वतः योग्यतेची होऊन जे ज्ञान तें प्रामाण्यास आल्याने ज्ञानच होऊन जाते जसें. त्याप्रमाणें तोय हे गाय जी गरीब म्हणून तिची तहान तेवढी भागवावी व क्रूर तो व्याघ्र म्हणन त्याचे वेळेस स्वतः विषाचें व्हावे असें केव्हांहि नाहीं – तेथे ते तोयच ते मुळीं त्या गाईस कां व्याघ्रास जसा संसर्ग त्याप्रमाणें करते – तीं एके ठायींहि नांदू शकतात – असें ह्या सत्संगानें व संसर्गानें घडून येणारे होय. व्याघ्रास उत्तम संसर्ग जर, तर ते तोयहि पण त्यामध्ये सहनशीलतेचा गुण – मैत्री – उत्पन्न करू शकते : गाईस जर उत्तम संसर्ग, तर तीहि पण हे पाणी पिण्यापासून सर्व तऱ्हेचे क्रौर्य हे मुलीनतेमध्ये परिणत करूं केव्हांहि शकणारच! म्हणून येथ संसर्गावरच सर्व मात टाकली गेली असे आहे – म्हणून संतसंग हाच या संसर्गासहि उत्तमत्व सहज पाहविणारा होतो. पृथ्वीसारखी क्षमाशील गाय व पुरुषव्याघ्र हा त्यागाचा धडा होय : येथे संसर्गानें ते ते गुणलक्षण हे संतभावाचें कां सतभावाचें होणारे केव्हाहि. पुरुषकुंडलिक – पुरुषसमवाय=मनुष्ये.

गो म्हणजे इंद्रिय -- जे बहुव्यापकतेनें असणारे व जे या मनास तेथीलचा अर्थ – विषय पुरविण्यास अतिशयतेने ओढणारे – तेथीलची ओढ इतकी विलक्षण की, बलात्काराची अशी ती इच्छा पुरविलीच पाहिजे अशी ती या मनुष्यास पार त्राही करून सोडते : म्हणून या गाईची म्हणजे इंद्रियांची ( भूक) तहान तेवढी भागवावी व व्याघ्र जो त्याचे वेळेस विष व्हावे असे पाणी जाणतच नाही – असे ते पाणी केव्हांहि नव्हेच अहो व्याघ्र जो ह्या इंद्रिय – विषय - इच्छाना आवरणारा तो जसे का येथे त्या इंद्रियांचे महत्त्व, गहनत्व का व्यापकपण हेच मुळीं त्या त्यागरूपी व्याघ्रपुरुषावर स्वार झाले व त्यानें तर हा सर्वच्या सर्व तपभार कां यज्ञभार हाच जसा त्या पुरुषाचा जीवनज्ञानसंसार हाच मुळीं उलथून पाडून त्यास चीत केले. व एका इंद्रियांचा अर्थ पुरविण्यासाठीं त्याचीच तेवढी इच्छा पुरविली, लोभ आपलासा केला, तहान भागविली. ह्या पुरुषव्याघ्रास तर ते तहानेल्याचे व्याकुळपण या वेळेस विषाचें जसे झाले असे का न म्हणावे बरें ? म्हणून एका विषयेच्छेनें इंद्रियांचें उलथापालथ होणारे असें ते तहानेचे शमन करावे व पुरुष जो सर्व यज्ञ का दानतपभार त्यास विषरूप व्हावे असे ते पाणी करीत नाहीं. अंगामधील तेज हेच जसे तोय ते सस्कार कां संसर्गजन्याचा उपक्रम पाहात राहिल्याने तेथे हेतुच एक पुढाकार घेऊन आहे. व तो म्हणजे इंद्रियग्रामाचे ते – ‘ यज्ञो ज्ञानं तपश्चैव पावनानि मनीषिणाम् ’ – म्हणून असा हा त्रिविधतेने असलेला संप्रकीर्तितः त्यागः तो कर्मसंग सोडून व फलत्यागानें आचरावा लागणारा होय असा हा पुरुषव्याघ्र (त्याग) हा तीन प्रकारचा म्हणजे त्रिविधतेनें गौरविलेला महत्त्व पाहून आहे. पहिले ते यज्ञ, दुसरे ते दान व तिसरे ते तप होय हीं तिन्हीं कर्मेच जशीं या विश्वरचनेस उभारणारीं व या देहाचा संसार करणारीं होत. म्हणून येथे तोय हे काहीं म्हणत नाहीं कीं, ह्या तापलेल्या प्रसरणधर्माचीं असलेलीं ती इंद्रिये त्याचीच तेवढी तहान भागवावी व ह्या देहास आधारभूत असलेलीं ती पुरुषव्याघ्ररूपी तीं यज्ञदानतप कर्मे त्याचे ते आचरणे हे विष होऊन मोहानें तामस त्यागाचा आश्रय करून बढाई मारावी – जाहीर करावे व हाणून पाडावे : कारण तोय जे त्याचे गुण हेच मुळीं त्या संसर्गानें आपलेसे केलेले झाल्यामुळे – तेथे तो संसर्गच आपलें सर्व महत्त्व पाहून असलेला होय. म्हणून येथे संस्कार कां संसर्ग का सत्संगति कां संतसंग कां संतसेवा हीच जशी ती सर्वच्या सर्व महत्त्व पाहाणारी – ह्या पावनतेस आधारभूत असलेली होय - ती केव्हांहि आचरणांत असावीच असावी.

गाय = प्रकृति, क्षेत्र, सौम्य स्वभाव, पुरुषार्थ, नारी, लीनता, पुरुष, देहधारणा, जीवित, जीवचैतन्य. (१४७)

कृपाच सर्व एक असा आपण आधारभूत सर्व भूतमात्रांना – जशी एकपणाची मैत्रीच एक असा – कृपाच सर्व अशी दाईच एक मातृतुल्यतेची – सर्वस्वपणे सर्व कृपाच एक अशी – भूतमात्रीं गति – असा सत्वाचा ब्राम्हणच एक.

सर्व भूतमात्रामध्ये एकत्व पाहून एकपणानें सख्यत्वानें प्रीति ती मैत्रीस आली असे ते कृपाळुपण – सर्वस्वपणें सव कृपाच एक अशी – मातृतुल्य जीं दाई कां देवीच ती साक्षात् – धात्रीच ती – आत्मपणच ते कां माताच एक जशी.

यामध्ये दोन उलट सुलट बाजूंचा विचार होतो. एक ते सगुणांत मिळून जाणें, व दुसरे तें अभावाने या जीवदशेचें मुळीं विस्कटलेले होऊन व्यर्थतेच्या शून्यांत अडकून पडणे ते. म्हणून ज्या कांहीं भक्ति, मौन, जिकडे तिकडे तोंड न देणें, पायलीच्या पन्नासांत स्वतःस खितपविणें, जिव्हेस किंवा खाद्यपेयाकरितां कांहींच धरबंध न ठेवणें, इत्यादिनीं हा जीवच मुळीं त्या अव्यक्ताच्या, शून्याच्या, आडसधींत फसविला जाऊन स्वतःचा कंठच मुळीं अडकविला गेला : व तें जे वर्तन तें नच राखिल्यानें तेथे प्रत्येक ह्या जी देहाची हालचाल हीच मुळीं व्यभिचारात्मक भावाची झाल्याने, मनुष्यास हारीं जाणें होतें. म्हणून ज्यायोगे तो जीवबंध, देहबंध, हाच उत्तम तऱ्हेनें आपल्या योग्यतेस पाहील असेंच व्यवहारणें हे डोळयांत तेल घालून असावें, तरच मग ते जें अर्पण हे अर्पण नच होतां तेथे ते सगुणांतच राहून आपल्या व्यवहारास उचलून असते. नुसतेच ते अर्पणाचे म्हणजे वृत्ति किंवा शब्दोच्चार हा तेथे आंधळविला गेल्यानें, ती बुद्धि व वृत्ति यांमध्ये भलतंच द्वंद्व लागून तेथे अनेक पेच पुढे येतात. ह्या मनुष्यानें वागावे कसे हेच जेव्हां तेव्हां पुढे येतें. काय शहाणा, काय सुर्ता, काय शिकलेला, काय विद्वान्, काय अज्ञ या सर्वांना या द्वद्वाच्या अडचणींत फसविल्यामुळे तेथें ती बुद्धि आपला संसार उत्तम तऱ्हेने उचलील, तरच मग या वृत्तींना जसे पोषण मिळाले असे होऊन, एका ह्या जीवदशेच्या रम्यतेंतच उभे होणे होतें. येथे दुसऱ्यास जे कांहीं सागण्याचें नसून ह्या बुद्धीच्या अनेक प्रकारांनीं ह्या जीवप्रेमाच्या गोडीसच प्रकाराप्रकाराने उचलावे लागत असलेलें. तेथे मग वृत्ति ही आपोआपच सांपडूं लागल्यानें ही वृत्तिच मग तेथीलचा संसार करणारी होते. या बुद्धीच्या उत्तम भारांना – प्रज्ञा, मेधा, श्रद्धा, विद्या इत्यादिना – आपल्ेपणास आणल्यानें तेथे वृत्तिरम्यता ही व्यवहारास उचलणारी होऊन, तेथे मग स्वाभाविकपणेच ते जोडून असणें हेच या अक्षराचें दिव्य ते नेहमींच असतें. तेथे मग हा देहच मुळीं सर्व तऱ्हांनीं पोसला गेल्यानें, तेथे पुष्टि व तुष्टि ही ह्या मनुष्यदेहाचे स्वाभाविक योग्यतेवर उभे होण्यानें मनुष्य स्वतःच्या कर्तव्याचा होऊन येतो. असे हे एक तऱ्हेचें ह्या आत्मार्पणाबद्दलचें असे द्वंद्व ते एक व्यभिचारणें हे व्यर्थतेचें – शून्यतेच्या आडसंधीचें होय. दुसरें, आपला भारच उचलून स्वतःच्या वृत्तींना शीलाचें करणें हे होय. नीटसें समजून त्यांतच रमून असावें, म्हणजे स्वजीवित हे अव्यभिचारी भावाचें, वृत्तीचें, जीविताचें करणें होय. ही गोष्ट नीटशी समजली म्हणजे या जीविताचा भार हा – किती तरी प्रमाणानें योग्य आहे हे तेथील धग समजली असतां – नीटसा पदरांत पडतो. तेथे दोनीहि बाजू अशा परस्परांस डाव देत राहिल्याने जेथें मूळातच शून्य अशा व्यक्तीवर तेथीलचें सर्वच्या सर्व बोजाचे प्रदर्शन हे जेव्हां तेव्हां आपल्या या देहाच्या संसाराच्या प्रक्रियेस आल्यानें, तेथें सर्व कुचंबणे हेच होते; म्हणून ही भक्तिबीजाची गोष्ट ही अतिरम्य असून ती अशी वागवावीच वागवावी. तरच तेथे हे जीवित मुळीं आपल्या देवपणाच्या शिरस्त्यावर उभे होऊन, देवपणच एक शुद्ध असें शीलाचें असें वृत्तींनीं पांघुरलेले असे प्रिय हे स्वतःसहि पण प्रिय होऊन, दुसऱ्यांच्या डोळयांनाहि पण सर्व प्रिय असेंच होऊन येते. म्हणून या भक्तियोगाचें रम्यत्व हे या बुद्धीस परम समाधान देणारें होऊन असतें. याजकरितां हे परोपरीनें स्वजीवित हें दुसऱ्याचें करून उपमेनें तें कसें असावें असेंच सांगत आहे. व मग स्वभावेंकरूनच तें आपलेसें जर तर तेथे तें कसे वागतें कां

वागवावें लागतें – हें ह्या मनाच्या अनेक कोटिकौटिल्याच्या बाजूंना पुढें नच घेतां ते उपमास्मृतीचें किंवा दुसऱ्या मनुष्यासीं कसें वागावें व तें कां हेंच नजरेसमोर करून, मग ह्या स्वजीविताच्या आपल्या अशा मनाच्या धड्याला व्यवस्थितपणाचें पूट बसणें देऊन, तेथें मग हें आचरणें, वागविणें, वर्तणें, प्रवर्तणें हे ह्या देहाच्या संसाराचें ते विचित्र अंग हे एकदां कां आपल्या स्थितीस आले, म्हणजे तें परोपरीनें साभाळतेंच. व असा हा येथे सांभाळ हाच पालनपोषणाचा झाल्यानें, तेथें असे ते अभ्यासणे हे कोणास बरें आवडणार नाहीं ? तें सर्वांस प्रिय असेच होय. (१४८)

मीपणाचें त्याचें बोलणेंच नाहीं. माझे असे तो म्हणतच नाहीं. सुख कां दुःख जाणिवेस आले, नेहमीं एकसारखा तो सर्वात्मक भाव एकत्वास आलेला, तेथेच तो स्थिर असल्याने त्यास सुख कां दुःख असे – मीपण नच घेतल्याने – लागणेच नाहीं. आणि जो ' मी ' असें जाणतच नाहीं, देहास उद्देशून देहबुद्धीचे बोलणें असें जो जाणतच नाहीं : व ' माझे ' म्हणणे कां ' मम ' असे कांहींच म्हणत नाहीं; हे सुख कां ते दुःख असें जो ओळखीत नाहीं, जाणत नाहीं; जो विरक्त, निष्काम, ममताशून्य असा : व सुखदुःखादि द्वंद्वाना निर्विकार असा जो (साम्य). (१४९)

त्याचप्रमाणें क्षमाशील कसा म्हणावा तर जशी का पृथ्वी ही क्षमाच अशा सर्व पवाड्याची सहिष्णुतेची : संतोषास ज्यानें आपल्या मांडीवर घेतले आहे असा – ज्याने आपली मांडी देऊन या संतोषास राहाण्याचें घरच करून ठेविलें आहे, संगीच केले – कलहाचें नांवच नाहीं असे – तेथे आलिंगनच दिलें आहे या संतोषास असा तो.

संगी जागविला कां उत्तमांग जे तेच भागीदार होऊन आले : शक्ति, देवी, कलत्र का जोडीदार तो संतोष – समाधानच एक तेथे – मांडीवर त्यास घेऊन किवा मांडीच त्यास देऊन आपल्या गृहाचें केलें – त्याचे राहाण्यास आपले देहरूपी गृह दिले – असा तो संगीच एक करणे : तेथे मग कलहाचें नाव नाहीं. त्याजबरोबर मात्र कलह (वासनाचाचल्याने) कधीं करूं नये – मग काय मूर्तिमंत समाधानाची मूर्तिच एक तो : तेथे आलिंगन झाले, ब्रम्हच आकळिले जसें. योगियास क्षमा ही जननीच एक. दुसऱ्यांनीं कोणी दुःख दिलें कां अपमानास्पद बोललें, किंवा अमर्षतेच्या बहुवसपणास पाहूं दिलें तरी जो क्षमाशील आहे, त्यास पृथ्वीचेहि ते क्षमाशीलत्व हे कमीच असे. जे कांहीं होत आहे – त्यांतच संतोष मानून जो आहे, त्यास कसलें तें मी-माझेपण ? म्हणून आतां येथे संतोषच एक मांडीवर घेऊन त्यास गृहाचें केले – संगी केलें. (१५०)

## संतुष्टः सततं योगी यतात्मा दृढनिश्चयः ।
## मय्यर्पितमनोबुद्धिर्यो मद्भक्तः स मे प्रियः ॥ १४ ॥

सततम् संतुष्टः = सदा सर्वकाळ इष्ट घडो, अनिष्ट घडो, तरी आनंदित असलेला, तोषित होऊन असलेला. सततं योगी = नैरंतर्य हे योगक्रियारूप झाले. जेथे तप एक साक्षात्चें, कां स्वजीवित-गोडीच एक आपले हृदयांतील गुजगोष्ट सांगूं लागली. तेथे जीव हा कानच झाला ते श्रवण करण्यास. पातिव्रत्य धर्मच जसा उगवला. छाया जशी देहाबरोबर. तशी ती क्रियारूप ( योगशक्ति ) होऊन असणारी बुद्धि ही व्रतच जसें पतिपरायणतेचें. यतात्मा = मनोनिग्रही आत्मा, स्व, यत, नियत; आत्मभार हा सर्वच्या सर्व जेथे आंवरून धरलेला असा तो; आत्मसंयमी. दृढनिश्चयः = दृढव्रत, तीव्रव्रतावर उभे होऊन तेथे सर्व निश्चयाची जी आत्मिका तीच जशी क्रमच एक त्या वज्रयोगाचा कां अहिंसादि तीव्र व्रतांचा निश्चय हा चांगल्या कामाचा तो डळमळूं देऊं नये : निग्रही असावें, निश्चय हा कल्याणकारक असून, तेथील आड येणारी जी इच्छा हीच मुळीं लयाची असावी. मयि अर्पित

मनोबुद्धिः = माझे ठिकाणीं अर्पण केली आहे अंतःकरणांतील जी सर्व बुद्धि व मन तेहि. यो मद्भक्तः = जो " प्रेमरूपी परमात्मा " त्याचा भक्तच होऊन आहे. सः मे प्रियः = तो माझा प्रिय होय, तो मला आवडतो. प्रिया व प्रिय हे जसे एक झाले असें त होय. प्रिय व प्रिया, गोडी व सिद्ध यांचा संगम झाला असें.

सततम् संतुष्टः योगी यतात्मा दृढनिश्चयः, मयि अर्पितमनोबुद्धिः यः मद्भक्तः सः मे प्रियः।

संतुष्ट, नेहमीं योगरूप, सतत असा क्रियायोगनिष्ठ, सर्व आत्माच आवरून धरलेला आहे असा, तीव्र व्रतावर दृढनिश्चयाने उभा झालेला, व माझ्या ठिकाणी अंतःकरण, बुद्धि व मन हीं ज्याने अर्पण केलीं आहेत असा तो भक्त माझा आवडता होय, तो मला प्रिय होतो, मला प्रिय असतो.

**वर्षायेविण सागरू। जैसा जळें नित्य निर्भरू।**
**तैसा निरुपाचारू। संतोषी जो॥ १५१॥**
**वाहोनि आपली आण। धरी जो अंतःकरण।**
**निश्चया सांचपण। जयाचेनि॥ १५२॥**
**जिऊ परमात्मा दोनी। बैसोनिया ऐक्यासनीं।**
**जयाचिया हृदयभुवनीं। विराजती॥ १५३॥**
**ऐसा योग समृद्धि। होऊनि जो निरवधि।**
**अर्पी मनोबुद्धि। माझिया ठाईं॥ १५४॥**
**आंतुबाहेरी योगु। निर्वाळलेयाहि चांगु।**
**तरी माझ्या ठाईं अनुरागु। सप्रेम जया॥ १५५॥**
**अर्जुना गा तो योगयुक्त। तोचि योगी तोचि मुक्त।**
**तो वल्लभा मी कांत। ऐसा पढिये॥ १५६॥**
**हें ना तो आवडे। मज जिवाचेनि पाडें।**
**हेंहि येथें थोडें। रूप करणें॥ १५७॥**

(१५१) वर्षायेविण – वार्षियेविण = वर्षाकाळावाचून, श्रावण–भाद्रपद नसतांहि. निर्भर = परिपूर्ण. (१५३) ज्ञानी भक्ताच्या हृदयांत जीव व परमात्मा एका आसनावर ऐक्यभावानें शोभतात. (१५५) निर्वाळलेयाहि = आंत ध्यानाने व बाहेर योगाने सिद्ध झाला तरी. चागु = चांगला. अनुरागु = प्रेम, भक्तींत रंगून जाणें (१५६) वल्लभा = प्रिया, स्त्री. कांत = पति. पढिये = आवडता, प्रिय. (१५७) पाडें = बरोबरीनें, योग्यतेनें थोकडे – थोडके = उणे, अल्प.

सागर जो आहे तो काय वर्षाकाळींच तेवढा अगदीं हर्षनिर्भर म्हणजे हर्ष गगनांत मावेनासा असा, अहो तो जसा नेहमींच्या नेहमींच जळानें तुडुंब भरलेला किंवा परिपूर्ण असा असतो, त्याप्रमाणे तो भक्त पूजा-उपचारादिनींच काय तो संतोषित होणारा असा नव्हे. तो तर नेहमींच्या नेहमींच तेथें उपचार केले नाहींत तरी (जेथें सहज उपचारच जसे – आंत सर्व उपचार भरून आहेत असाच) एक संतोषाची मूर्तिच होय. पूजोपचारादि जरी केले नाहींत, तरी तो संतुष्टतेचा असाच संतोषी.

वर्षाकाळच्या नदींना पूर येऊन त्यांचें पाण्यानें जसा सागर सागरपणास आला असें नसून, सागर ज्याप्रमाणें नित्य निर्भर असा आनंदाचा, गर्जत असणारा असा अतिशयतेचा, विपुलतेचा,

त्याप्रमाणें जो नेहमीं विपुलतेनें असणारा संतोषच एक – त्याचा सत्कार केला नाहीं, तरी तेथें सर्व सत्कार सहजपणें अतिशयतेनें असणारा – सेवा केली नाहीं तरी सहजसेवा तेथें पुष्कळपणें असणारी - सर्व इलाज तेथें सहजपणें निधिपणानें असणारे – नजरनजराण्याचीं येणीं तेथें नच झालीं, तरी सहजपणेंच तेथें ती बहुयोजनेची कुशलता ही पण खोलपणानें असणारी, तेथें विनंति ही त्या त्या गुणांनीं, प्रारब्धभोगादिनीं किंवा त्रिविधतापाकडून होत असलेली – ही अतिशयतेनें सहजपणेंच तेथें सर्व उपचार ! जरी प्रत्यक्षपणें ते केले गेले नाहींत, तरी होतच असणारे केव्हाहि ! असा जो तो काय देवतातोडीचा किंवा दैवतच एक जसें पूजिले जाणारे सहज असें - तेथें संतोषास कां तृप्तीस किंवा आनंदास काय बरें कमी असणार ? अहो, तेथें संतोषी असा तो नेहमींचा होय. (१५१)

निश्चयाची बुद्धि जी दुर्मिळ दुर्मिळ या त्रिभुवनांत ती ज्याच्या कृपेनें - ज्याच्यामुळें – आपलें महत्त्व घेऊन येते, तेथें जसे का त्यानें आपली शपथ घालून आपलेंच अंतःकरण तिजला बसण्यास दिले : तेथें खरेंपणाचा भाव – जो अंत.करणास स्वाधीन ठेवतो व केलेला निश्चय अखंड चालवितो असा – हाच जसा वचन का प्रतिज्ञा यांवरच उभा झाला : अंतःकरणाची जी विष्णु देवता तीच तेथें येऊं लागल्यानें, एक देहस्वभावच जसा भेटूं लागला : तेथें जीवितदिव्य, आत्मविकास हाच देवपणाचा होऊन त्यास ते साचपण पटवीतच जणूं आहे असे.

हे जे अनेक व्यवसाय तेथें ती व्यवसायात्मिका बुद्धि हीसच त्यानें आपली शपथ दिली – शपथ वाहिली : ही व्यवसाय पाहाणारी बुद्धि ही आत्मिका जशी, तेथें अनेक शाखाचें असे अनेकत्व का बहुत्रसपण असल्यामुळे ती समधिगम्य अशी नच होणारी – पण या व्यवसायांना मग आईबापच नाहींत असे ते (होत) : परंतु ह्या असल्या व्यवसायावर निश्चय उभा झाल्यानें, निश्चय उभा करुन, ज्यानें स्वतःची आणच वाहिली. तेथीलचे अंतःकरण आपलेंसे करून कळवळयाचें, आपलेंपणाचे, स्वहिताचें असे पाहवून – पटवून – तेथें ज्याच्यामुळे सांचपण येणारें असा जो सांचा आपला म्हणविला जाणारा तो होय : निश्चयाचें बळ । तुका म्हणे तेंचि फळ ॥ असे ते निश्चयाचें एक ऐन डबघाईचे प्रसंगीं कां वेळेस जे हातीं धरलें जातें व आपलें म्हणविलें गेलें, तेथें निश्चय हा म्हणजे पीयूषधाराच वर्षली असें दैव-देव, आधि-व्याधि, संचित प्रारब्धावर उभे झालेलें ते क्रियमाण किंवा कर्म हेच मुळीं या निश्चयास टाळतें : परंतु सत्संग, शपथेवर उभे होणें केलें, आपलेपणाच्या महतीचें, प्रेमाचें ते खरेपणास तेव्हांच येऊं लागतें, जर तेथें निश्चयाचें बळ असेल. म्हणून या व्रतउपवासादिचीं महिमान स्तोत्रे ऐकत राहिलों, व त्यांनीं तर त्या क्रियमाणासच हात घालून, जेथें ते उगवले त्याचेच गुण गाण्यास मानविणे केलें – मानण्याचें केले : परतु स्वतःवर प्रेम जर, तरच ती निश्चयाची गोष्ट पदरांत पडते. येथेंहि पण एक जशी का ती वाटवध करणारीं महेंद्रादि पदे आड पडून त्यांनीं ह्या निश्चयाच गोष्टच मुळीं बाजारांत विकत मिळते अशी करुन ठेविली तसेच या पुरुषार्थाची बाजू स्वहितसाधनास पाहाणारी ती बुजगावणं पाहू लागली व तिकडे ढुंकूनहि पाहिना. आता येथें सर्व उपाय खुंटले, व येथेच मुळीं ज्याच्यामुळे ती निश्चयाची बाजू पुन्हां उलट घेऊन आपल्या व्रतावर उभी होणारी होते, असे तें म्हणजे प्रत्यक्ष ते जेथें एकवटून असलेलीं तीं तीर्थें किंवा व्रते होत. असा तो ज्याच्या ठिकाणीं जीवशिवैक्य प्रसन्नतेस आलेले - तेथें जीव (चैतन्य) व परमात्मा (शिव) यांना ऐक्यरूपी आसन बसण्यास मिळाल्यामुळे – असा तो त्याच्या ठिकाणीं तर जीवशिवाच्या ऐक्यानें एकच स्थान शोभविलें, एकाच आसनावर त्यांनीं बसून ऐक्यच ते जीवशिवाचें – तेथें तो शिवच एक या मनुष्यदेहानें वागणारा – वहिवाटणारा कां फिरणारा असा – त्याच्या अंत करणांत विराजमान झालेला – त्याच्या हृदयभुवनामध्यें प्रकाशत्व करून आहे असा – ' राजत ' असलेले, प्रसन्नतेनें असलेले ते ऐक्यासन – तेथें एकच अंतःकरण सर्वव्यापी व तेंच मुळीं या जगताचें पालनपोषण करणारें विष्णुबीज होय. तेथें सर्व योम समृद्धीस आला.

असा तो योगनाथ एक अमर्यादतेनें असणारा – सततच असा – तो होऊन मज परमेश्वराचे ठायीं आपलें मन व बुद्धि हीं अर्पण करणारा होय. तेथे आपली प्रतिष्ठा कां स्थापना, कां दान किंवा ठेवणेंच एक आत्मस्वरूपीं अर्पण केलेलें तें – याहिवर तो अधिक उत्तमतेचा होऊन असतो.

माणसाळलेलीं हीं मनुष्ये जेव्हां नवीन प्रदेशांत जातात, तेव्हा तीं अस्थिर होतात : एकाच देशांतील जनावरें हीं घरांत खपवून घेतलीं जातात तेव्हा तेथे तीं माणसाळलेलीं होतात मनुष्यामध्ये ह्या ज्या हिंस वृत्ति त्या जेव्हां मनुष्यदेहामध्ये वृत्तिरूप होऊन येतात व जेव्हा त्या नच परिणाम केलेल्या होतात, तेव्हां सिंहतेप्रत आलेल्या होतात : वृक्ष हा परदेशावर जेव्हां दुसऱ्या देशाचा होतो, तेव्हां त्यास नेट घेऊन संधी सांभाळणारा असे म्हणतात : म्हणून मूळ वृक्ष हा जेथला तेथींचा तो जरी, तरी नव्या देशांतील नेट बांधून तेथीलच्या संधि प्रकाशास झेपणारा झाला असें म्हणतात, त्याप्रमाणें ही जी मनुष्यदेह रचना ती ह्या गुणागुणाच्या परिक्रमाची ती गुणातीततेच्या उपक्रमास पाहाणारी जेव्हा तेव्हाच मूळ जे ब्रह्म त्या पदाप्रत येणारी होते परंतु येथे एक गोष्ट लक्षात घेण्यासारखी ती म्हणजे तेवढ्या पुरताच तो तसा गुणातीत होऊन असतो. परंतु जेव्हां अनेकीअनेक असे जेव्हां ते गुणांचें स्वलन झेपलें होणारे – झेपले जाणारे – तेव्हां मात्र निरनिराळ्या देहाभिमानावर उभे झालेले मनुष्यप्राण्याचे जीवित हे मात्र झेपले जाणारे क्वचितच : परंतु जो त्या ब्रम्हसंज्ञेस पात्र झालेला किंवा ब्रम्हच होऊन असलेला तो मात्र ह्या अनेकाच्या पातळींना झेपून त्या त्या व्यक्तीला ते ते अंगवळण देऊं करून, त्यास आपल्या उत्तीर्णत्वासाठीं ते ते काम किंवा व्रत देऊन त्यास सर्वार्थ पुरविणारा होतो : असे तें अनेक भूतभावाचें ते जेव्हां एकस्थ होऊन असतें, तेव्हाच त्यास ती ब्रम्हपदाची योग्यता येऊं शकते.

येथें त्या त्या वृत्तींना किंवा निराळ्या प्रदेशांच्या असलेल्या त्या हवामानांनीं आपलासा केलेला तो जेव्हां त्या रूप गुण वेष तन्मात्रादिनीं आपलासा केला जातो, तेव्हाच तेथे ते कंटाळणे हे दूर होऊन संग्य, संग किंवा हवामानाचे एकीकरणानें ते ते गुण जसे मूळच्या रहिवाश्याचे असेच होऊन जातात : येथे एक हितच पुढे घेतलें तर अशीं हीं माणसे तेथील त्या त्या अदूरदर्शित्वास नाजूक करून, त्या त्या जातीस महत्त्व पोहोंचवून, स्वतःपण तेथीलच्या व्यक्तींनीं प्रशंसा केलेलीं होऊन, एक वडिलपण जसें शोभविलें अशीं होतात : अशी ही ह्या गुणांची परिक्रमणा ती जर अतीततेची झाली, तर कल्याणच ह्या मनुष्यजातीचे पुढे होते मग तेथे तो तो गुणधर्म हाहि पण तशा तशा परिशीलनाचा होऊन, तो मायेच्या वैचित्र्यास भर नच घालणारा झाल्यानें, तेथें मग काय व्यवहार जे सर्व तेहि पण आपल्याच घरचे असे होऊन येतात : येथे विश्वास हाच श्वास घेणारा व सर्व संसार हाहि पण त्याच तोलाचा झाल्यानें, तेथें केव्हांहि हितच पाठीवर वाहिलेले असल्यानें, त्या त्या व्यक्ति किंवा प्रकृति ह्या दोषास नच पाहतां, तेथे एक सहज समजविणेंच ह्या व्यवहार्य अशा व्यक्तिमात्रास होतें तेथे काय ते बाल्य, कां काय ते तारुण्य किंवा काय ते वार्धक्य अथवा पंचेचाळिशी उलटल्यावर येणारे जे एक ह्या व्रतादिकांच्या आचरण्यास लागणारे नैपुण्य – तेथे जसें का एक पडदीच घातली व मग नितराजतेनें किंवा यथास्थित तेच्या स्वस्थतेने तीं तीं कामे उरकलीं जाणारीं. येथें बाल्य, तारुण्य, वार्धक्य ह्या दशांना ती ती व्यवस्था पोहोंचवावीच लागणारी असल्याने, ती ती योजना जर आपलीशी झाली, तर मग तेथें सर्व कांहीं यथाक्रम होऊं लागून, अव्यवस्थिततेचे अंग हे सुस्थितीप्रत येणारे असें केव्हांहि होतेच. गुणांचें जे प्रदर्शन तेंच मुळीं ह्या दृश्यमात्रांनीं आंवरिलेले असल्यानें, येथे मनुष्याच्या ज्या कांहीं वागणुकी त्या स्वच्छ स्थिर चुळबुळ न करणाऱ्या झाल्या, तर मन हेच मुळीं तो सर्व वोरबार घरबार आपला असे म्हणून ह्या संचयींना हार देते : तेथें मग सहजरीत्याच त्या त्या डोळे मोडणे करणाऱ्या वृत्ति ह्या

शांततेस येऊन, एक शुचिर्भूततेचें अंग पाहून, प्रसन्न झाल्यानें, तेथें गृहच आपलें असें होऊन जातें : सहज शांतपण हें तर महाग खरेच, कारण ह्या उपप्राणांनीं ती ती चांचल्याची बाजू तरळली झाल्यानें, तेथें तारंबळच एक जशी देहाचें सर्व बूडच हालविणारी. म्हणून त्या तशा वृत्ति – जांभई आली – श्रीमुखच पसरणें कां फाडणें – नाकांत बोट घालणें – पायच जसा ओढणें, ओढविला जाणें – शिंकणें म्हणजे जसें कांहीं एकाद्या गाडी ओढणाऱ्या बैलासच गाणें गाऊन त्याची आठवण देणें – ढेकर देणें म्हणजे जसें कांहीं डरकणेंच ते – म्हणून त्या त्या तशा संवयी त्या त्या जागीं खपणाऱ्या जर, तरच शोभलेल्या होतात : परंतु त्या शोभणाऱ्या होतात असें म्हणणें म्हणजेहि पण एक अतिक्रमणच त्या उपप्राणांचें होय. म्हणून ह्या कृतींना जर आळा बसला, तर जे ह्या प्राणाचें स्खलन जें नेहमींच मुळीं ह्या देहाचा संसार चोरणारे तेच मुळीं आतां आपल्या योग्य जागेचें – आपआपल्या योग्यतेवर उभे राहणारे झाल्याने, येथे उपमर्द किंवा अपमानास्पदतेचे वारे हें मुळींच डोळ्यावर येणारें होत नाहीं. येथे डोळ्याचें पाहाणें हेच सर्वथैव ह्या देहास किंवा मनास महत्त्वाचा पोषाक करणारे होऊन उदार भावाचें पोषण करतें व करवितें. मनुष्याचें मन हे औदार्य सर्व जर झालें, तर तेथे ह्या मनुष्याचें सर्व सौंदर्यच त्यास पेहनविले असे होतें. मग तेथें डोळे मोडणे हें होतच नाहीं. तेथे सर्व रंग हा ह्या मनास आल्याने तें प्रसन्न होऊन, व्यक्तिगणित आदराच्या क्रमाचा पेहराव देत राहून – करीत राहून – महत्त्वाचे असेच ते व्यक्तिमात्र होऊन येतात : म्हणून येथे स्वच्छता, शांतता, स्थिरता, वाचेचे सहज सुंदर कां मौनच बरें असे तें – ह्या मनुष्यास आदराचा – वैभवाचा किंवा गौरवाचा साज करणारे केव्हांहि होतेच होतें : : म्हणून असल्या ह्या संवयी जर नीटनेटकेपणाच्या व्यवस्थिततेच्या (बाण्याच्या कां स्वभावाच्या) केल्या, तर प्रत्येक व्यक्ति ही डोळ्याना खपूं लागून तेथे सहजपणे मग एक सर्व आदरच आपलासा होतो असे नव्हे काय ? तेथें सर्व रम्यता हीच पुढे होऊन दृष्टिरम्य, स्वभावरम्य, बोलणे चालणें, व्यवहारणे हे सर्व रमणीयतेचें मापच घेऊन असल्यानें, तेथें सर्व सौंदर्य हीं सहजपणेंच घरीं येऊन नांदू लागणारीं होतात व मग केवढा बरें तो गौरव करणारा परिचर्यारूपी भार ! सर्व सेवा, परिचर्या का कामकाजाचें करणे हे परम दीर्घ असे ह्या मनुष्याचे स्वभाव मापणे करून, त्यास सर्व सौख्यें हीं पावणारीं अशींच होऊन येतात हे केव्हांहि : तो तो गुण त्या त्या वर्णास पोहोंचता झाल्यानें, तेथे मग एकच गुण प्रकाशूं लागून, ह्या मनाच्या मोठेपणास शोभूं लागणारा झाला असे होतेच ! त्या त्या गुणाचीं कामे का दाने कां व्रतें हीं आपल्या सर्व योग्यतेस पाहूं लागल्यानें, तीं कामे मग सहजासहजींच आंवरिलीं जाणारीं कां आचरिलीं जाणारीं अशीं त्या त्या वर्णांना कां गुणाना शोभवीत राहिल्यानें, ह्या मनुष्यास मग स्वर्गतुल्यतेचा असा हा मनुष्यजन्म होऊन येतो : व मग ह्या सृष्टीवरच जसा स्वर्ग उतरला आहे असें कां न वाटावे बरे ? म्हणून दृटिरम्यतेची अशी ही बाजू केव्हांहि ह्या मनुष्यास सर्व प्रकारांनीं रमणीयतेची अशीच करून असणारी व्हावी, तरच मग हें जे नेमकेपण कां माणसाळणे कां सिंहाळणे हे ह्या मनुष्यदेहास परम रमणीय असाच परिक्रम देऊन असणार हे केव्हाहि होय. तेथे मग ' न हिंस्यात् सर्वभतानि ' हाच तो सर्व भूतमात्रांचा बंधच मुळीं स्थिरतेचा झाला असे होय. (१५२-१५३)

असा जो क्रियारूप होऊन सर्व योगच जसा – योगनाथच एक योगाची परम सीमा घेऊन आहे असा – तो माझ्या ठिकाणीं अनिर्वचनीय प्रेमस्वरूपाचा – ह्या प्रेमस्वरूपाच्या ठायीं सर्वत्र ब्रम्हानुभव असल्यानें, सर्व विश्वच आपला देह आहे अशी बुद्धि वृत्ति झाली – सर्वच्या सर्व देह व मन (मानस) हे मजला अर्पण करून असतो. कलत्रच जसा का तो एक समृद्धतेनें असणारा असा क्रियाभार कां तपभार, कां स्वाध्याय म्हणजे वाङ्मयतपभार, कां योगच सर्व वर आला, कां देहच जसें विसरलें असा नेहमीं योगावर उभा.

मन-बुद्धि हीं माझ्या ठिकाणीं अर्पून असलेला – अहो, तसें त्यानें केल्यानें तर सर्व हा मी तं-पणावर उभारला जाणारा हा बंधनांत पाडणारा हा खटाटोप तो तर आता मुक्त आत्म्याचें जसें का येणें झाल्यानें संपला. म्हणून समृद्धतेचीं लक्षणें तींच अपरंपारपणानें – अमर्यादतेनें – योगास आलीं, असा तो होय तेथें अंतःकरण हेंच परिणाम केलें गेल्यानें तेथें क्रिया हीच उगवली. शपथच एक निश्चयाचें व्हावें म्हणूं लागली व तेथे सांचेपण या भावास येऊन त्याबरोबरच मुळीं जेथें उचलिला होतो जो प्राण त्याबरोबर तीं इंद्रिये हींहि पण सहज उचलिलीं जाऊन देहाभिमान हाहि सहजच मग तेथे येऊन मिळतो. तेथे सर्व व्यापकपणच आपलेसें केलें गेलें. डोळसपणच या बुद्धीस आलें, व तें रूपाचें होऊन सुंदर दिसूं लागलें (१५४)

आंत व बाहेर सर्व योगक्रिया चांगलेपणानें – जसें कां सिद्धसरस्वती ती योगावर आरूढ होऊन आहे अशी : असा तो सर्व सिद्ध आहे तरी मज परमात्म्याविषयीं त्यास सप्रेम असाच अनुराग. मज परमात्म्याला तो विसरला नाहीं : तो तर मजविषयीं माझे ठायीं सप्रेम अशा अनुरागाचा होऊन असतो – असलेला होतो – असा आहे – असा असेल : प्रेमाच्या बोलण्यास प्रेम दिसते – प्रीतीची गोष्ट प्रीतीस आवडते – प्रेमरसाचा पान्हा हा जसा क्षीराचा पूरच आला अशाच अपेक्षतेचा केव्हांहि असणार : तसा तो सर्वसिद्ध असा माझे ठायीं अलोट अशा प्रेमाचा असतो. तेथे सानुराग, प्रेमप्रीति जिव्हाळा, क्षेम, मधुर असें जीविताचें माधुर्य पाहाण्याचें कां पाहविण्याचें कौतुकच एक करणास ती असतो. प्रेमच मुळीं प्रमास प्रेमाची आवड – इच्छा ही जीविताची गोडीच एक हास्य करूं लागणारी – जेथें या जीवदशेचें रंजनरागात्मक असे ‘ मला हवें, मला हवे ’ असे जो तो म्हणणारा होऊन असतो. प्रेम हे केव्हांहि स्पृहणीय असे जीविताचें सौभाग्यच तें – तेथे प्रेम हे उचलून घेऊन त्यासच चालविले – बोलाविले जाते, म्हणून असें तें प्रेम नेहमींच पुढे घेऊन, महत्त्व देऊन, सोय करून, ते रत्नाच्या योग्यतेस आणले असे तें. तेथे आतां बहुरत्ना वसुंधरा अशी ती उक्ति ही तर येथेंच येऊं लागून तें रत्नाचें बहुपण हे ( योग्यतेस आणिले गेलेलें, योग्यतेचें झालेले, रत्नच ते असें तें झालेले ) पाहाणेस मिळणें, म्हणजेच जसे का या रत्नानें रत्नास किंवा ह्या रत्नानें रत्नाचें जे कांहीं दिव्य असें तांबस लक्षण – प्रेमभरण – तेंच उजविलें. तेथे आतां अक्षर हेच प्रेम होऊन आलें व त्याने या जीविताच्या गोडीस प्रेमाचा असाच एक साज केला – साद दिला – मधुर हास्य दिधलें – रगच गालावर येऊन सर्व लज्जा ही आतां प्रेमास आल्याने तिनें सर्व देह हा त्या एका गालावरील प्रेमासच दिला : लज्जा ही, “ ह्री ” ही, लोकलज्जा ही आपलें प्रसरण पावलेलें लक्ष एकत्र करून, गालावरच येऊन, तिनें हास्य केलें, माधुर्य पाघरले व एका प्रेमासच ती आली : तेथे साद हाच ऐकूं लागला व त्यानें ते प्रेमाचें ते सादणे होऊं केले – तेथे ऐकणें हे गोडीचे झालें – कानच जसा जीव होऊन आहे – असा तो प्रेमभार म्हणजे सुवर्णाचा मेरुच एक सांपडला असे होय : तेथें चित्तासारखा चित्तास रागरंजन देणारा तो अनुकार हा नच सांडणे होते : त्याचा अव्हेर केव्हाहि होत नाहीं : अशा प्रेमास तो दिव्य रत्नरंग (पुष्पराग) देणारा होतो. तेथे अलोट प्रेम हें अखंड असें झालें. तेथील प्रेमधारा ही अखंडित अशीच होऊन आहे. असा तो आंत ध्यानानें व बाहेर योगाने सिद्ध झाला तरी ईश्वरत्वच तें नच बोलता येण्यासारखे असें प्रेमाचें. (१५५)

बारे अर्जुना, असा जो भक्त तोच योगयुक्त, तोच योगी, तोच मुक्त, तो वल्लभा मी कांत असाच आवडता – आवडच सर्व एक : येथें हाच पाढा वाचिला जातो : त्याचे ठायीं सर्व योगक्रिया ह्या युक्त होऊन आल्यानें, क्रिया ह्या त्याजमध्येंच बोधरूप होऊन असलेल्या : तो योगी जसा काहीं योगनाथच : मुक्ततेच्या भारानें ढाळ देणारी अशी ती त्याची तनु – असा तो मुक्तच होय : आठहि योगांगांमध्यें लवणारें असें मौक्तिकच एक – ज्योतिच जशी एक : तो जसा काय जीवदशेचें जे

बालमरूपी प्रेम – एक वालभर सुवर्ण – तें होऊन आहे : तेथीलचा भार वाहाणारा असा वल्लभच एक – स्वामीच एक – वल्लभाच एक कां स्वामिनीच एक – असा तो व मी जो येथे आहे तो पाहावा तर कांतच जसा एकांतास पाहाणारा – असेंच येथे ते त्याचें असणें हे सर्व पढिये कां पढियंत असें होय. शिकणें हें शिकण्यावरच शिकलें जाते – कां शिकविणें हे भावाचें जे ते शिकतां शिकतां शिकते – कां शिकवितां शिकविता शिकलें, शिक्षणास आलें असें होते, शिक्षारूप झालें असें होते – कां शिक्षारूप हें शिक्षणरूप झाले असे होते. क्रियारूप होण्यानें योगास येणें होते : क्रिया सर्व मुरल्या जेथे, तेथेंहि क्रियेसहित असणें तेंच योगी होणे होय : तेथे तनु ढाळ ढाळ असेंच म्हटले.

असा तो आंतबाहेर सर्व दृष्टी क्रियारूप झाल्यानें सिद्धकोटीच शोभविली : तेथे या भूलोकावरील सरस्वतीच ती – चांगा हीच – सिद्ध झाली, व यावरहि तेथे मजविषयींच्या प्रेमळपणाचा असा रसनाभार – रंगरसनाभार – हाच तेथे आहे, तरच मग तोच योगी मूर्तवंत झालेलें ते युक्तपण किंवा क्रियाशक्ति – निष्ठाच जशी लंपटतेस आली – मुरून गेली – आपले जीवितगुज पाहूं लागून रंगूं लागली – अधिकाधिक रम्य दिसूं लागली – तेथे जसें का त्रिभुवने हीं पण पायींच लोळत राहाणारीं त्या प्रेमाकरितां असे तो रंगरसनाभार प्रेमास पाहाणारा, प्रेमच एक आपले स्नेहच सर्व असा तो लाजणारा – म्हणजे ताबुस-पणाचा तो सलज्जतेचा हा महिमा – एक रंजन, हौस, प्रीति हीच तेथे म्हणूं करणारी – युक्तवान् अशा क्रियेस जोडलेली तोच (भक्त) मग योगी असाच एक तोच ' मी–माझे 'पासून सुटलेला असा मुक्तच एक : एवढेच नव्हे तर तो म्हणजे वल्लभच एक होय – वालभाच ती होय व मी जो एकांत त्यास तर पढणे किंवा पढविणें करणे करून दाखविणें, पढणे, पढविणे, वाचणें कां वाचनास पाहविणे ते जसे का एक महिमानच या भक्तिबीजाचें आतां आपल्या सुखरूपतेस आल्यानें प्रसन्न होणारे (१५६)

एवढेच नव्हे, तर जीवभावाबरोबर तुलला असतां तो मला तर माझा जीवच जसा असा आवडतो, व असें बोलणेंहि पण येथे थोडेच होय, थोकडे होय, उणें असे होय. रूपकानें सांगितले किंवा रूप कां वर्णन एक त्यास देऊन बोलणे केले तर तो माझा जीवच जसा – असे म्हणणेहि पण येथे कमीच वाटते तो जीवदशेपेक्षांहि जास्त आवडता असतो : येथे तृप्ति व निस्पृहता ही योगीच होऊन आली, क्रियारूप झाली. (१५७)

**परी पढियंतयाची कहाणी । हे भुलीची उभारणी ।**
**इयें तंव न बोलणीं । परी बोलवी श्रद्धा ॥ १५८ ॥**
**म्हणउनि गा आम्हां । वेगा आली उपमा ।**
**येऱ्हवीं काय प्रेमा । अनुवादणें असे ॥ १५९ ॥**
**आतां असो हें किरीटी । पैं प्रियाचिया गोष्टी ।**
**दुणा ठावो उठी । आवडीचा गा ॥ १६० ॥**
**तयाहिवरी विपायें । प्रेमळ संवादिया होये ।**
**तियें गोडी ऐसी आहे । कांटाळें मग ॥ १६१ ॥**
**म्हणौनि गा पांडुसुता । तूंचि प्रियो आणि श्रोता ।**
**वरी प्रियाचीहि वार्ता । प्रसंगें आली ॥ १६२ ॥**
**तरी आतां बोलों । भलतया सुखा मीनलों ।**
**ऐसें म्हणतखेंवी डोलो । लागले देव ॥ १६३ ॥**

(१५८) कहाणी = गोष्ट. भुलीची = भुरळ. उभारणी – भारणी, भुलीची उभारणी = भूल पाडणारी गोष्ट. इये तंव न बोलणीं = हें बोलून दाखविण्यासारखे नाहीं. (१५९) प्रेमा अनुवादणें

असे = प्रेम शद्बांनीं बोलून दाखवितां येईल काय ? (१६०) दुणा ठावो – थावो = दुप्पट बळ. आवडिचा – आवडी. (१६१) विपायें = क्वचित्, कदाचित. गोडो ऐसो – गोडियेसी – गोडीसी. कांटाळे = तुलना. (१६२) आणि श्रोता – आणि तूंचि श्रोता. (१६३) भलतया – भले या. सुखा मीनलों = सुखानें सुखाप्रत आलों. म्हणतखेवीं = म्हणतांक्षणींच.

येथे पढियंतयाची कहाणी पाहिली असतां तेथे एक भुलीची उभारणी केली होते – वाटते : भूलच जशी आमिषाची – तेथे भुलविले जाणें होणारे : हीं असलीं बोलणीं बोलून दाखवूं नयेत – नच बोलण्यासारखीं होत : भारले जाणें, भुरळ पडणें कां विसरभोळेपण कां विसराळुपण हेंच येथे उभारणी दिलें गेलें, का हयाचीच येथे उभारणी केली असे होत असणारे : भुलीनें उभविला जसा का मंडपच एक तसे होणारे जरी, तरी–किंवा–परंतु येथे चूकभूल द्यावी घ्यावी असे : परंतु काय करावे, श्रद्धा जी तीच येथे बोलवीत आहे, पुरुष जसा का बोलण्यानें भुलविला जावा, भुलीचा व्हावा, तेथ पढियंतें तेंच हरविले व एकादी गोष्टच सांगावी असे झाले. (१५८)

म्हणून आम्हांस आपले ‘ सारखेपणाची ’ ही उपमा जी, कां तुलना जी, तीच आपले महत्त्व, प्रवाह कां उल्हास पाहून आहे : एरव्हीं पाहिले तर जे प्रेम तें काय अनुवादणें होतें ! प्रेमा तो काय बोलं येणारा ? तो पुनःपुनः उच्चारानें प्रेमाचा होणारा ? प्रेम हे बोलास येत नाहीं – तें अबोल असेच. (१५९)

आतां हे किरीटी, हें असो. प्रिय, प्रिया, सिद्ध जो त्याची गोष्ट करूं लागले असतां, तेथे आवड ही दुपटीची होऊन येते. सर्व प्रेमच तेथे आवडतयाचें होऊन आल्याने, ते दुप्पट बळ घेऊन उभे होते, बोलणें करतें असें हे किरीटी आहे. बरें असो. हितकर्ता, आवडता जेथे प्रेम कां स्नेहच एक तेथील रति म्हणजे विलासामध्ये रममाण होणें, तेथील प्रफुल्लितपण कां चेतन हे जसे का सिद्धांच्या गोष्टीच, कहाणीच – तेथे आवड ही आपला ठाव पाहाणारी व तो ठावहि पण तेथे दुप्पट बळ घेऊन आलेला असा होतो. (१६०)

असें असूनहि वर पाहावें तों संवादिया जो तो तर अतिप्रेमळ असा सहज कां कदाचित् तेथे गोडी ती अशा प्रियाप्रकाराची होते : तेथे गोडी जी ती कांहीं उपमेनें सांगता येत नाहीं. म्हणून ती गोडी गोडीसारखीच होय. व मग पण काटाळे एक तेथे पुढे घेतले, तेथे स्वतःसच त्या प्रेमळपणाच्या गोडींत बसविले, व प्रेमळ असा संवाद करणारा प्रिया का प्रिय हीं दोन्हीहि जशी का आपणासच लागू केली, दोन्हीहि आपणच झाला. (१६१)

तेथे आतां असे आहे म्हणून, हे पंडुसुता, प्रिया तूंच व श्रोताहि पण तूंच – याहिवर ती प्रियाची वार्ताहि पण प्रसंगाप्रसंगानेंच पुढे झाली : प्रेमाचें वर्तणें हे सहजपणेंच आतां तुजकडून होऊं लागणारे : तेथे जसे का तो प्रिया, कां श्रोता, कां प्रेमाचा प्रिय कां क्रिया या सर्व एकवटून आल्या व त्यांनीं तुलाच आपले गृह केले. अशी ही तुझी गोष्ट-वार्ता त्यांनीं ऐकिली. तेथे आतां सर्व प्रेम हें समरसून आले व त्यानें तुला सर्व प्रेमाचें असे आपले ठिकाणच करून ठेविलें. देवपणच हेच आतां उगवले : विश्व हे उभविले जाऊन उदयास आले : तेथीलच्या देवपणाची ती गोडी काय बोलण्यानें आपलेपणास येणारी ? तेथे सर्व गोडीच. सर्व प्रेमाची चटकच एक देवपणाची गोष्ट पाहूं लागली, संयोगाची झाली, समयास आली, सोयीची झाली. (१६२)

असें जेव्हां होऊन आलें तेव्हां ‘ बरें हें असो ’ असेंच तेथें बोलणें बोलों लागलें होऊन, देवांचें भलतेच म्हणजे अतिशयत्वाचे सुखांतच रिझणें झालें. दिव्यसुखच तेथे प्राप्ततेस आलें – देवच झाले : असें म्हटल्याबरोबर देव जे श्रीकृष्ण ते तर डोलूंच लागले : त्यांना अतिप्रसन्नता आली : सुप्रसन्न असे

ते होऊन तेथें प्रसादता हीच प्रसन्न झाली, संतुष्ट झाली, कृपाळुपणास आली : नामाचें चतुर्भुज असे तेथे दर्शन हें जसे कां भक्ताने देवासच – देवरावासच – मुळीं देवपणाचे केलें असे : देव जे भक्ताची वाट पाहाणारे येथे आतां भक्तानें तर देवच उजविला व त्यानें देवास चतुर्भुज असे रुपडे धारण करण्यास लाविलें : तेथें डोलच आला, अतिसुखांत बसणे झाले, देवत्व सडोळस झाल्याने दिसूं लागले. (१६३)

**यस्मान्नोद्विजते लोको लोकान्नोद्विजते च यः ।**
**हर्षामर्षभयोद्वेगैर्मुक्तो यः स च मे प्रियः ॥ १५ ॥**

लोकः यस्मात् न उद्विजते = ज्याच्यापासून लोकांना भय अगर त्रास वाटत नाहीं. यः लोकात न उद्विजते = लोकांपासून ज्याला भय अगर त्रास वाटत नाहीं. बोलण्याचे जे वाचेचे मोकाट सुटणें तें करूं नये, क्षुल्लकपण केव्हांहि दाखवूं नये. हर्षः = हरखणें. अमर्षः = संताप, उतावीळपण, असहिष्णुत्व, क्रोध. भयः = अधीरपण, भीति. उद्वेगः = चित्तास येणारी अस्वस्थता, भयाने व्याकुळ होणें, खंती, संताप. त्रासूं नये, त्रास करून घेऊं नये. मुक्तः = अलिप्त, संसारव्यथेपासून सुटलेला. अमर्षः = परकृतावज्ञादिनानापराधजन्यो मौनवाक्पारुष्यादिकारणभूतश्चित्तवृत्तिविशेषोऽमर्षः ।

यस्मात लोकः न उद्विजते, च यः लोकात् न उद्विजते, च यः हर्ष-अमर्ष-भय-उद्वेगै: मुक्तः सः मे प्रियः ।

ज्याच्यापासून लोकांना त्रास अथवा भय वाटत नाहीं व लोकांपासून ज्याला त्रास किंवा भय वाटत नाहीं, तसेच हर्ष, क्रोध, भय आणि उद्वेग यापासून जो अलिप्त असतो, असा भक्त मला आवडतो, प्रिय होतो.

**मग म्हणें जाण । तया भक्ताचें लक्षण ।**
**जया मी अंतःकरण । बैसों घाली ॥ १६४ ॥**
**तरी सिंधूचेनि माजें । जळचरां भय नुपजे ।**
**आणि जळचरीं न बुजे । समुद्र जैसा ॥ १६५ ॥**
**तेवीं उन्मत्तें जगें । जयासी खंति न लगे ।**
**आणि जयाचेनि आंगें । न सिणे लोक ॥ १६६ ॥**
**किंबहुना पाण्डवा । शरीर जैसें अवयवा ।**
**तैसा नुबगे जीवां । जीवपणें जो ॥ १६७ ॥**
**जगचि देह जाहलें । म्हणोनि प्रियाप्रिय गेलें ।**
**हर्षामर्ष ठेले । दुजेनिविण ॥ १६८ ॥**
**ऐसा द्वंद्वनिर्मुक्त । भयोद्वेगरहित ।**
**याहिवरी भक्त । माझां ठाईं ॥ १६९ ॥**
**तरी तयाचा गा मज मोहो । काय सांगों तो पढियावो ।**
**हें असो जीवें जीवो । माझेनि तो ॥ १७० ॥**
**जो निजानंदें धाला । परिणाम आयुष्या आला ।**
**पूर्णते जाहला । वल्लभु जो ॥ १७१ ॥**

(१६५) माजे = उचंबळण्यानें, क्षोभाने. न बुजे – नुबजे – नुबगिजें – नुमजे = त्रासत नाहीं, कंटाळत नाहीं. (१६६) खंती = कंटाळा, वीट. (१६७) नुबगे = कंटाळत नाहीं. नुबगे जीवा जीवपणें जो = आपण जीवपणानें जीवाचाहि जीव आहों असे मानून त्रासत नाहीं. (१६८) हर्षामर्ष = आनंद व क्रोध. (१६९) द्वंद्वनिर्मुक्त = सुखदुःखादि द्वंद्वापासून अलिप्त. भयोद्वेग = भयचिंता, संताप, खेद. (१७०) पढियावो = प्रियपण, प्रेमा, प्रेमभाव. जीवें – जीवीं जीवें " " "' माझेनि तो = माझ्या जीवाचा जीव, प्राणाचा प्राण, माझ्या जीवचैतन्याने जीविताचा झालेला. (१७१) धाला = पूर्णता पावला. परिणाम = पूर्णावस्था. पूर्णते जाहला वल्लभु जो = प्रेमाची परिपूर्णता अशी जो तिचा कांत.

यावर त्यांनीं म्हणूं केलें कीं, ज्या भक्तास मी अंतःकरणांत वाहून असतो, ज्यास आपलें अंतःकरणच बसूं घालतो, अशा भक्ताचे लक्षण आतां जाणून घे - सांगतों, ऐक. (१६४)

हा (संसार) सिंधु जो आहे त्याच्या गर्जनेनें - क्षोभाने – त्यांत वावरणारे – फिरणारे – जे जलचर त्यांना केव्हांहि भय वाटत नसतं आणि (समुद्र) सिंधु हाहि पण जलचरांना केव्हांहि कंटाळत नाहीं, व बुजतहि पण नाही – भात नाहीं जलचराप्रमाणे (समुद्र) सिंधु केव्हाहि त्रासत नाहीं, व्याकुळ होत नाहीं, आणि जलचरानांहि पण समुद्राप्रमाणेच समुद्रामध्ये असताना गंभीरतेनें असणे असतेच; जसे न कंटाळणे, नच कासावीस होणे, नच त्रासणे. सिंधूच्या क्षोभानें जलचराना भय वाटत नाहीं, व समुद्र हाहि पण जलचरांमुळे त्रासत नाहीं, लाजत नाहीं, बुजगावणेच जसे का या जलचरांचें असणें असे समजून समुद्र कटाळत नाहीं त्या जलचराचें असणे हे बुजगावणेच एक असें तो समजत नाहीं – त्यानीं लाजविला जात नाहीं – त्रासास येत नाहीं – कंटाळवाणा होत नाहीं. समुद्र हा समुद्रतेचा असा तो मुद्रतेचा होण्यास लाजत नाहीं. मनाच्या मोठेपणाचा जसा का असा तो समुद्र केव्हाहि गुदमरत नाहीं. (१६५)

त्याप्रमाणें उन्मत्त जगामुळे ज्यास कंटाळवाणे वाटत नाहीं, वीट येत नाहीं, आणि ज्याच्या सान्निध्याने किंवा सहवासामुळे, तसेच अंगचे असण्याने, लोकहि पण शिणत नाहींत, त्रासत नाहींत. (१६६)

किंबहुना पांडवा, आपणहि जीवपणानें असल्याकारणानें जसे शरीर अवयवांस त्रासत नाहीं, त्याप्रमाणे अनेक जे जीव आहेत त्यांना तो कंटाळत नाहीं, खजिल करात नाहीं, खट्टू करीत नाहीं, त्याचा पाणउतारा करीत नाहीं – आपणच ह्या सर्वांचा जीव आहों असें मानन तो असतो. तो त्यांना भिववीत नाहीं, भीति दाखवीत नाहीं घाबरवीत नाहीं, बुजवीत नाहीं. तो न भितां, न लाजतां, नच खट्ट होतां, भ्रांत न होतां असतो तो अनुकारानें त्यांत स्थिर असतो – तो अनुकारानें न बुजतां त्यांत बसतो – भजणेंच जसें एक त्यांना असे करून असतो. (१६७)

जगच देह झाले म्हणून प्रिय कां अप्रिय असे नाहीं – हंसणे का रागावणे हेहि – तेथे दुजेपण नसल्यानें, अद्वयपणच तेथे असल्याने – नाहींसें झाले. तेथे ही स्त्रीलिंगी बुद्धि ही ह्या मनास जाचणी करीत असणारी कीं, एक अर्ध्या हळकुंडानें कांहीं पिवळे व्हायला नको; असे बोलण्यानें ह्या मनास समजविणें कां बुझविणें देत असणारी अशी – मन हे उत्सृखल नच होऊं देतां शांत स्वभावाचे कां नच होऊन असावे ? गभीरतेने तो हर्ष कां अनुराग पाहावा असे ती वरचेवर इच्छिते.

असा सुखदुःखादि द्वंद्वापासून निःशेषपणे मुक्त असा व भीति कां अस्वस्थता यांनीं रहित असा तो असतो : व याहिवर भक्तच एक जसा का माझ्याविषयींच्या भक्तपणाचा – सर्वविषयींच्या चतुरतेचा – एक बाणाच मिरवीत असलेला असा होय.

एकांताची गोष्टच येथें पुढें झाली. झालें, सर्व तंटा मिटला. कांती जी तीच येथें सर्व सौंदर्य झाली. आतां भांडायाचें तें कुणाबरोबर व तें कशाकरितां बरें ? म्हणून येथें जशी ती हरिनामाची शेती कां खेती कां कात कां शेतकऱ्याची बाजूच मुळीं आपला सर्व कारभार व्यवस्थित करूं लागल्यामुळे, येथे सर्व भांडणें शम होऊन आल्यामुळे, येथे द्वद्वें हींच नाहींतशीं झाल्यानें. पापच मुळीं दिसेना. सर्व पापें विलय घेऊन आहेत व ब्रम्ह जें सनातन तेंच आतां आपलेंपणाप्रत आल्यानें येथें सर्व संसार हा सुखाचा झाला. अहो ! हे भांडणच कां तंटाच तो ह्या विकारांना पाय देणारा होत असलेला – दिलपसंतीचें तें एक कडबोळे भांडणाचा विषय होत असणारें असे तें – तो तंटाच मुळीं आतां ती विलासिनी किंवा प्राणप्रिया भेटल्यानें येथे सर्व देह हेच शांत होऊन आहे. येथें सर्व विद्या ह्या मंदस्मित होऊन हास्य करूं लागून प्रसन्नतेप्रत आल्यानें, आतां येथे जो तो आपापल्या कामात गर्क होऊन गेल्यानें, तन्मयता हीच मुळीं जशी कां प्रतिष्ठा होऊन आहे. तेथें प्राणच जसा सर्व स्थैर्य होऊन आल्यानें आतां सर्व तंटा मिटला व द्वंद्वें हीं विरून जाऊन एक तें एकांताचें असेंच मुळीं आपलेसे होऊन आहे असें. हीं शिव-शक्ति हीं तर दुजेपणानेंच मुळीं आपला संसार करणारी, तीं आतां एकांतास आल्यानें, येथे तंटयाचें काम सपले, कलह आटोपता झाला. हें जे जग तेच मुळीं आपलेसे केलेलें असें – तेथें एक सहजच मैत्री नांदू लागल्यानें कलहाचें कामच मुळीं पुढे होईना, तें जेव्हां तेव्हां आपलेपणास आल्याने घरचें झाले बापेच तीं कां माणसेच तीं जशीं का एकाच घरांत नांदणारीं व एकमेकांचे सुखदुःख जाणणारीं झाल्यानें, तेथें उपचारादिनीं सर्व कांहीं एक जे कामकाजाचें तें स्थितीस आले. व्यवस्थिततेचा असा क्रियाकलाप तेथे ती तीं योजना पूर्णपणें पाहूं लागला. आतां जसे का ते सुखाचें जोड चें मैत्रच एक प्रकाशानें प्रकाशास पाहूं लागल्यानें, बुद्धि ही सर्व भार घेऊन, तिने ती स्थितप्रज्ञतेची बोलीच मुळीं आपलाशी केली. ती आनदाने घरांत रमूं लागली – गृहाची झाली – तेथें ती गोष्ट, बातचीत का देह-दिव्याची वात हीच मुळीं चागभलं कां चांगलं कां स गल अशी कठभरणाच ती ह्या वाणीनें आकंठ तृप्त होऊन, तिनें रम्य-मधुर असेच बोलणे करूं आदरिले या संसारातील लहानसहान अशा खेळण्याच्या जागा – बाळलेणींच जशीं – तिनें पाहूं करून तेथेंच तिने आपले घर सर्व सोयीचें असें करून ठेवल्याने, तेथें नडणें हें संपले व सर्व कामे उपस्थित झाल्यानें, नीटनेटकेपण हेच पुरतें होऊन आलें असे झाले.

त्या त्या प्रसंगास तो तो थाट दिला गेल्यानें, येथे प्रसंगावधान हेच मुळीं प्रसंगरम्य झाले व ती तीं योजना चोहोंकडून पुरती होऊन आली. एकाच पुरुषाचा हा सर्व संसार कां कुटुंबवत्सलेचा भार तो अनेक बाजूंनीं – अनेक ठिकाणांनीं – तेथें आपापलें ठाणच व्यवस्थित असें मांडण्यानें, ते ते प्रसंग अवधानाचे झाले, पुरतेपणास आले तेथे त्या त्या व्यक्तींना मुळीं त्या भूमीनें कां भूमिकेनें पाहिल्यामुळे ही वसुधा आतां मैत्रच पाहूं लागली – कळवळून करुणास्पदतेस आली – कृपाळुपणास येऊन तिनें कृपावत्सलतेचे असेच तें व्रत आपलेसें केले व त्यांतच ती बसली – चित्तवत् सायुवितक अशी प्रेमळ झाली. (१६८–१६९)

असा तो त्याचा मजला मोह पडतो बरें ! काय सांगावा तो त्याचा प्रेमा अहो ! अहो, तो तर जीवपणानें ज्यांत जीवचैतन्याचा उदय झालेला असा तो माझ्या प्राणाचाहि प्राण केव्हांहि होय. हें असो, काय सांगो तो पढियावो । जीवें जीवो । माझेनि तो ॥ काय सांगावें ते त्याचें प्रेम ! जीवपणानें तो जगाच्या जीवपणाचा झालेला असा तो जगाच्या जीवपणानें जगत असतो असेंच एक कुशल जगाकडून त्यास दिले जाणारें : जीवदशेमध्यें जीव होऊन असलेला असा जीवपणानें ज्यांत जसें एक क्षेमच एक जीवदशेस देणारें – तेथें जसें कां अनुमोदनानें त्याचें ते चालणें – जीवजगताचें कुशलच एक वाहून असणें – तें मजमुळे होणारें होय. तेथे केव्हांहि तो स्तब्ध न राहतां ही पृच्छाच जशी ह्या भरणपोषणाच्या क्षेमकुशलचें महत्त्व पाहून असणारो ! (१७०)

जो निजानंदानें तृप्त झाला आहे व तेणेंकरून पूर्णपणच ते जसे आयुष्यास आले ज्याचे – त्याचे पूर्णपणामुळे आयुष्यास येणे होते – येणें झालेले – पूर्णता ही जी तीच मुळीं त्याच्या योगाने कुंकू लावणारी झाली. ती भक्तीच झाली, तेथें वेणीच पडली, हृदयवल्लभच सापडला, का वैराग्यास भर आला. तेथें निजानंदाचें लग्नच लागलें, संतांच्या घरीं राबणे होऊं लागले, तो वल्लभच जसा त्या पूर्णतेचा झाला. ती पूर्णतारूप भूतदया परिपूर्णा झाली, भक्तीच पोचली, प्रेमकिंकर तो, कां प्रेमशरण तो सहजच मला जिंकणारा होतो. तरुणीचा – भक्तिरूप पूर्णतेचा – पतिच झाला – पूर्णतेस पावला हा भाव. (१७१)

**अनपेक्षः शुचिर्दक्ष उदासीनो गतव्यथः ।**
**सर्वारंभपरित्यागी यो मद्भक्तः स मे प्रिय ॥ १६ ॥**

अनपेक्षः = निरिच्छ, निस्पृह. शुचिः = शुचिष्मंत, पवित्र असावे, मनाने, वाणीने व बुद्धीने चांगुलपणाचा स्वीकार करीत राहावे दक्षः = सावधान. उदासीनः = वैराग्यपूर्ण. ( ज्यांचा सर्व देहच ब्रम्हरूप असा. ) गतव्यथः = जन्मणे, मरणे, ससार कसा झेपेल इ ज्या मनाच्या व्यथा त्यांपासून जो अलिप्त, भयचिताशून्य. सर्वारंभपरित्यागी = आरंभशूर इ टोचणी ज्यास नाहींत. तो तर सर्व आरंभाना उल्लंघूनच जाऊन त्या परित्यागानें पूर्ण असा खेदरहित सर्व काम्य कर्माचा अगर कर्तृत्वाभिमानाचा त्याग करणारा. सर्वथैव त्यागी कर्मयोगामध्ये हेच विचित्र आहे. येथे अगोदर मुळीं कर्म म्हणजे काय हेच समजत नाहीं. असे अभ्यास करता करतां जेव्हा तेथील समभावन ( कर्मयोग ) हा स्थिरतेस येऊं लागतो, तेव्हा तेथील फळ मिळावे अशी इच्छा होते, परतु तें आचरण हें नित्य युक्तत्वाचें झालेलें तें त्या आरभास पाहात नाहीं. ते कर्तव्य असेच झाल्याने हेतु धरून केलेले जे तें ह्या परित्यागासंबंधीचें आहे.

अनपेक्षः शुचिः दक्षः उदासीनः गतव्यथः सर्वारंभपरित्यागी यः मद्भक्तः सः मे प्रियः ॥

निरिच्छ, शुचिष्मंत, सावधान, वैराग्यपूर्ण असा ( ब्रम्हरूप ) व जो मनाच्या व्यथेपासून दूर झालेला असा, व सर्व आरभास उल्लघून जो पूर्ण त्यागच असा, तो भक्त मला प्रिय होतो, प्रिय असतो.

निरपेक्ष, अतर्बाह्य शुचिर्भूत, दक्ष, उदासीन, खेदरहित, सर्व काम्य कर्माचा अथवा कर्तृत्वाभिमानाचा त्याग करणारा माझा भक्त मला प्रिय असतो.

**तयाच्या ठायीं पांडवा । अपेक्षे नाहीं रिघावा ।**
**सुखासी चढावा । जयाचें असणें ॥ १७२ ॥**
**मोक्ष देऊनि उदार । काशी होये कीर ।**
**परी वेंचणें लागे शरीर । तिये गांवीं ॥ १७३ ॥**
**हिमवंतु दोष खाये । परी जीविताची हानी आहे ।**
**तैसें उचित्व नव्हे । सज्जनाचें ॥ १७४ ॥**
**शुचित्वें शुची गंगा होये । आणि पापतापहि जाये ।**
**परा तेथ आहे । बुडणें येक ॥ १७५ ॥**
**खोलिये पारु नेणिजे । तऱ्ही भक्तीं न बुडिजे ।**
**रोकडाचि लाहिजे । न मरतां मोक्षु ॥ १७६ ॥**

**संताचेनि अंगलगें । पाप तें जिणणें गंगे ।**
**तेणें संतसंगें । शुचित्व कैसें ॥ १७७ ॥**
**म्हणउनि असे जो ऐसा । शुचित्वें तीर्थां कुवासा ।**
**जेणें उल्लंघविले दिशा । मनोमळ ॥ १७८ ॥**
**अंतर्बाह्य चोखाळु । सूर्य जैसा उजाळु ।**
**आणि तत्त्वार्थी पायाळु । देखणा जो ॥ १७९ ॥**
**व्यापक आणि उदास । जैसें कां आकाश ।**
**तैसें जयाचें मानस । सर्वत्र गा ॥ १८० ॥**

(१७२) अपेक्षे नाहीं रिघावा = इच्छा स्फुरण घेऊन असत नाहीं. चढावा = सभ ाभरित, उल्हास. (१७४) हिमवंतु = हिमालय दोष खाये = पाप नाहींसे करतो. उचित्व – शुचित्व. (१७७) आगलगे = अंगस्पर्शानें, नामसामर्थ्यानें केमे = काय सांगावें ? (१७८) कुवासा = आश्रय. उल्लंघविले दिशा – उल्लंघविली दिशा = देशोधडी केले. (१७९) अंतर्बाह्य = आंतबाहेरी. चोखाळु = शुद्ध. उजाळु = तेजस्वी. उजाळु – निर्मळ. तत्त्वार्थी – तत्त्वार्थिंचा = तत्त्वरूप धनाचा. पायाळु = पायाळूचे डोळे घेऊन देखणा झालेला.

अशा भक्ताच्या ठिकाणीं कसल्याहि अपेक्षेचें येणेच नाहीं. त्यास कशाचीहि अभिलाषा नसते – कसलीहि इच्छा त्याच्यांत शिरत नाहीं : हे पांडवा, त्याच्या ठिकाणीं कसल्याहि इच्छेचा शिरकाव – उदय – होत नाहीं, कसल्याहि जरूरीमध्ये तो आपला रिगावा करून घेत नाहीं, हे त्याचे कांहींहि नच मागण्याने उमजावें अशा भक्ताचें सान्निध्य – सहवास – ( निजानंदानें तृप्त असणे हेच त्याचे आयुष्यास येणें ) हेंच जसे कांहीं भरतीच सुखास येऊन आहे असे. अशा भक्तामुळे सुखाचा चढावोच असणें – असेच एक त्याचे असणे होय. तें जसें का ब्रम्हस्थितीच सर्व व्यवहारास आली – सर्व संसार प्रकाशित झाला, असे तें त्याचे सान्निध्यामुळे घडणारे ! (१७२)

मोक्ष देऊन काशी बाजूस होते उदारपणानें भिरविते. उदारपण दाखविते. तेथें सर्व शरीरच मुळीं त्या काशी गांवीं द्यावें लागतें. तेथे त्या काशीक्षेत्रातच देह ठेवणाऱ्यांना मोक्ष मिळतो. म्हणून येथे भक्ति जर एक महत्त्व पावून असेल, तर तेथे मोक्ष हा नेहमींचाच होय. (१७३)

हिमवत जो तो दोषच खाऊन टाकतो. हिमालय तो पाप नाहींसे करतो. परंतु तेथे जीवितहानि होण्याची भीति असते – तेथे मरणाची भीति असते : परंतु जे कांहीं हे सज्जनांचें शुचित्व तें त्यासारखें नव्हे – नाहीं ते निष्पाप असे असतें. तेथे जीविताच्या हानीची गोष्टच नाहीं. तेथे निष्प प असे ते त्यांचें शुचित्व – स्नानदानच दिले असें. (१७४)

गंगा पावन करणारी खरी : आपल्या पावित्र्यावर उभी होऊन पवित्रपणामुळें पवित्र करणारी व याहिवर पापतापहि तिच्यामुळे नाहींसे होतात परंतु तेथें कदाचित् बुडणे मात्र असतें – बुडण्याची भीति असते. गंगा पवित्र खरी, पण तिच्या पाण्यांत स्नान करणारांनाच ती पवित्र – पण तेथें बुडावे लागतें, बुडी द्यावी लागते.

कापुराचें जसें दृतिमार्दव, शुभ्रपण तसें गंगेचें शुचित्व निर्मळपण होय. ह्यास शौच असेहि म्हणतात. रत्न जसें आंतबाहेर सर्वप्रकाशाचें – जसें का सूर्यच एक – तसें भरीवपणानें तो भक्त सर्व प्रकाशाचा असतो. बाहेर कर्में करून धुतला गेला व अतरीं ज्ञानाने उजळला – त्याचें अंतःकरण ज्ञानानें उजळ झालेले आहे. अशा ह्या बाह्य व अंतर क्रियांनीं स्वच्छतेचा झालेला तो – एका पाखाळास म्हणजे निर्मळपणास आलेला असा तो – भक्त बाह्य चोख असा व अंतरामध्ये ज्ञानदीप लागलेला

असा शुद्ध होय. एरव्हीं पाहिलें तर, हे अर्जुना, अंतर जर शुद्ध नाहीं, तर बाहेर केलेलीं कर्मे म्हणजे विटंबनाच एक – विटंब तो कसा तर जसा का गाढव तीर्थामध्ये न्हाऊं घातला, कां मृतच एक शृंगारिला किंवा कडु दुध्या भोपळा जसा गुळानें माखला. त्याप्रमाणें बाह्यात्कारीं केलेलीं कर्मे हीं मोठें मोल देण्यानेंहि आपलें हीनपण टाकून देणारीं होत नाहींत – मदिरेचा घडा हा मोठी थोरली किंमत देऊन आणिलेला असला तरी पवित्र अशा गंगेची योग्यता व थोरवी पावत नाहीं योग्यतेनें हीन असा पदार्थ मोठे मोल देण्यानेंहि थोरपणाच्या योग्यतेचा – बरोबरीचा – होत नाहीं. मदिरा ती मदिराच, ती कांहीं आपलें मदिरापण टाकून गंगेची योग्यता पावणारी होणारी नव्हे : तिला पवित्र करण्यास – तिचें हीनपण नाहींसें करण्यास – जरी मोठे मोल दिले असलें, तरी मदिरा आपले हीनपण टाकून गंगेच्या बरोबरीची योग्यता पावेल काय ? म्हणून अंतरामध्ये ज्ञान व्हावें, तरच मग बाह्य जे तें स्वभावेंकरून लाभणारें होते. कर्मानें ज्ञान जन्मतें कां संभवतें असें कुठें बरे ते ? असे कुशलत्व तें कुठे सांपडणारें बरें ? कर्मानें ज्ञानास क्षेम देणें असें तें कसचें ? कुशलत्व, कुशल कुशल असें क्षेम कां हित कां कौशल्य कर्मानें ज्ञानास पोहोंचते झालें असें होत नाहीं म्हणून अंतरामध्ये ज्ञान असेल, तर बाह्य वर्तणे ते सहजपणेच सांपडणारें लाभाचें होतें बाह्य असा जो भाग म्हणजे हिस्सा, वांटा, वांट्यास आलेले काम जर उत्तम प्रकारे कर्म करून चांगला धुऊन टाकला – भागास आलेलें काम जर उत्तम प्रकारे केलें, तर मात्र मग ज्ञान होऊन अंतरींचा कलंक हा नाहींसा होणारा होतो. तेथे अंतर कां बाह्य असे दोन्हीहि नाहींसे होऊन तें एकपणाचें किंवा निर्मळत्वच तें झालें व आतां, किंबहुना उरलें जे, ते सर्व शुचित्वच (शुद्धपणच) होय ह्या निर्मळपणानें बाह्यहि गेलें व आंतरहि पण नाहींसे होऊन एक निर्मळपणच आलें असे होतें – तेथे सर्व उरले पाण्याने हिरा भिजत नाहीं, अधण आलेल्या पाण्यांत हरळ (दगड, खडे) शिजत नाहीं, त्याप्रमाणें मनोवृत्ति ही विकल्पजातानीं लिंपली जात नाहीं – मनाच्या ज्या वृत्ति त्या विकल्प येत असले तरी बंद होणे नाहीं – त्या वृत्ति विकल्पांनीं आपल्याशा केल्या जात नाहींत – मनाच्या ज्या वृत्ति (समाधान, शांती, महत्तत्व) त्या विकल्पानीं आपल्याशा केल्या असे होतच नाहीं, जसे का अधण आलेल्या पाण्यांत खडे शिजत नाहींत. विकल्पाने समाधान पाहाणे नाहीं : विकल्पास शांती कुठची ! विकल्पानें मनाचें मोठेपण पाहाणें नाहीं : जो शुद्ध स्वच्छ प्रकाशाचा हिरा – ज्ञानप्रकाशानें असणारा संत तो (परमात्माच जसा का) – तो काय या मायेच्या बाजारानें आपलासा केला जाईल ! असा जो तेथीलचा गुण त्यासच शुचित्व म्हणावें असें ते शुचित्व संपूर्णपणानें जेथे तूं पाहाशील तेथे, हे पार्था, ज्ञान आहे असे जाण. (१७५)

जन्मदिव्य हें अहो, अति खोल, अति गहन असें आहे. त्याचा पारच लागणारा नाहीं. असें परम गहन, परम दिव्य – तेथे भक्तीचा अंगीकार केला तर मात्र बुडणें होणारे नाहीं : तेथे तर रोकडा मोक्षच हातीं लागतो. ह्या जीवित्वाने नच मरणे करतां मोक्षच लाभतो. जीवितसंसार मोक्षाचा होतो. अशी भक्तिनदी ही अगाध आहे तरी तींत बुडून नष्ट होण्याची भीति नाहीं. जिवंतपणींच तेथे मुक्ति मिळते. (१७६)

संतांचें पावित्र्य या सर्वांपेक्षां श्रेष्ठप्रतीचें आहे. ते तीर्थांनासुद्धां पावन करतात. संतांच्या सहवासानें – संतांच्या अंगस्पर्शानेंच मुळीं – ती गंगा पापास जिंकते : पाप हें संतांच्या सहवासामुळेच ती गंगा ही धुऊन टाकते. अशा संतसंगानें पावित्र्यपण हें तीर्थांनासुद्धां पावन करणारें होतें.

“ रामनाम केवळ गंगा । पावन करी सकळा जगा ॥ ” (१७७)

म्हणून असा जो संतमहिम्याचा – संतांचे पावित्र्याचा – कां संतच एक तो – आपल्या संतपणानें, शुचिर्मूतपणानें तीर्थांना पावन करणारा, पवित्रपणाचे तेजानें ह्या तीर्थांना आश्रयच एक होऊन असतो.

अहो, काय सांगावें कीं, हीं तीर्थंच मुळीं त्याचा आश्रय घेतात. ही तीर्थें अशा संतासच तर धुंडण्याचे करून त्याच्या आश्रयानें तीर्थपणास येतात, पावित्र्याचीं होतात, कारण अशा संतशुचिष्मंतांनीं तर हे मनाचे मळ, मनाचे दोष पार देशोधडीस केलेले, तेथें शुचित्वच एक मूर्तिमंत. (१७८)

अंतर्बाह्य शुद्ध, सुवर्णाप्रमाणें तेजस्वी – जसा का सूर्य निर्मळ व उजाळ असा – आणि तत्त्वरूप धनाचा पायाळ असा देखणा जो. (१७९)

आकाश ज्याप्रमाणें व्यापक व उदास, त्याप्रमाणें ज्याचें मानस सर्वत्र असते, दक्षपणच एक तेथें. (१८०)

संसारव्यथें फिटला । जो नैराश्यें विनटला ।
व्याधाहातूनि सुटला । विहंगु जैसा ॥ १८१ ॥
तैसा संततु जो सुखें । कोणीहि टवंच न देखे ।
नेणिजे गतायुषें । लज्जा जेवीं ॥ १८२ ॥
आणि कर्मारंभालागीं । जया अहंकृति नाहीं आंगीं ।
जैसें निरिंधन आगी । विझोनि जाये ॥ १८३ ॥
तैसा उपशमुचि भागा । जयासि आला पैं गा ।
जो मोक्षाचिया आंगा । लिहिला असे ॥ १८४ ॥
अर्जुना हा ठायवरी । जो सोहंभाव सरोभरी ।
तो द्वैताच्या पैलतिरीं । निगो सरला ॥ १८५ ॥
कीं भक्तिसुखालागीं । आपणचि दोहीं भागीं ।
वांटोनिया आंगीं । सेवकै बाणे ॥ १८६ ॥
येरां नाम मी ठेवी । मग भजती वोज बरवी ।
न भजतया दावी । योगिया जो ॥ १८७ ॥
तयाचें आम्हां व्यसन । आमचें तो निजध्यान ।
किंबहुना समाधान । तो मिळे तैं ॥ १८८ ॥
तयालागीं मज रूपा येणें । तयाचेनि मज येथें असणें ।
तया लोण कीजे जीवें प्राणें । ऐसा पढिये ॥ १८९ ॥

(१८१) नैराश्यें – निराशे विनटला = निरिच्छ होऊन शोभूं लागला. विहंगु – विहंगम = पक्षी. (१८२) टवच = त्रास, टोचणी, रुखरुख. गतायुषें = मेलेल्यास. (१८३) निरिंधन = जळणाशिवाय, लाकडाशिवाय (१८४) उपशमु = शांती. (१८५) सरोभरी – सरोवरी सोहंभाव सरोभरी = जीव व परमात्मा यांच्या ऐक्यभावानें तन्मय झालेला निगो सरला = निघून गेला. (१८६) दोहीं = देव व भक्त. बाणे – बाणी. आंगीं सेवकै बाणे = आपल्याकडे सेवकपणा घेतो. (१८७) येरा नाम मी ठेवी = दुसऱ्याला देव म्हणतो. वोज = तऱ्हा, रीत. (१८९) लोण = कुरवंडी, ओवाळणे. ऐसा पढिये = इतका आवडता असतो.

संसारव्यथेपासून दूर झालेला जो व निरिच्छतेनें पूर्ण भरलेला असा तो व्याधाहातून सुटलेला पक्षीच एक कां बाणच एक जसा. तो विहंगमाप्रमाणें उदासीन असा असलेला. (१८१)

त्याप्रमाणे जो नित्य अशा ब्रम्हाचा तो तेथे सतत असाच सुखाचा होऊन कसलीहि मनाची टोचणी त्यास पाहाणारी होतच नाहीं. जसे का मेलेल्यास लज्जा ही नाहीच – कां मेल्याशिवाय स्वर्ग

दिसत नाहीं. तेथें लज्जा ही कशी बरे ? ब्रम्हभावामुळे गतव्यथच म्हणजे जन्ममरणाच्या फेऱ्यामधून – संसारदुःखामधून – सुटल्यामुळे त्यास आतां ती संसाराची व्यथाच नाही. (१८२)

आणि प्रकृतीवर उभे व्हावें व पुण्य कर्म करून स्वर्ग साधावा अशा तऱ्हेची अहंभावना त्याचे अंगीं मुळींच नाहीं – जसा का इंधनाशिवाय अग्नि हा केव्हांहि विझूनच जातो. अहंकृतीचा नाही असा निर्विकार कर्मारंभालागीं ! (१८३)

त्याप्रमाणें ज्याच्या गुणाला (गुणसंग्रहास) शांतता किंवा निवृत्ति प्राप्त झाली आहे, तो तर मोक्षाच्या गांवचा आहे असेच पाहिले जाते. मोक्षाच्या अंगचा असाच तो शांतीचा जिव्हाळा – शांतीच सर्व जेथे – तेथे तर अहो ! मोक्षच तो असे लिहिलेले होते. (१८४)

हे अर्जुना, येथपर्यंत किंवा असा हा ठावच एक ह्या सोहंभावाचा – तो परमात्माच मी अशा भावनेचा – ओतप्रोत भरलेला असा हा सोहंभाव ज्याच्यामध्ये, तो तर द्वैतपणाच्या पैलतीरावरच जाऊन पोहोंचला असा होय जीवपरमात्मा याच्या ऐक्यानें तन्मय झालेला जो तो तर द्वैतास पार उल्लंघून गेला – द्वैताच्या पार झाला – द्वैताच्या पलीकडे निघून गेला – अद्वितीय झाला. (१८५)

असेंच तेथे जाण कीं, भक्तिसुखाकरितां त्याने आपणास दोन ठिकाणीं वांटून घेतले; व सेवकपणाची महति हीच बाणविली. तो तर सेवकपणाचा बाणा मिरवितो – वर भक्तिसुखाची – आश्रयसुखाची – शरणसुखाची तर तो मूर्तिमंत मूर्तिच असा – भक्तीचा अंकित – भक्तच एक व सेवकहि पण – असे दोन्ही आपण झालेला. सेवकपणाची वेळ तेथे तो भक्तीचा फक्त असे म्हणून बाजूस झाला नाहीं : त्याने तर तें सेवकपण उचलून घेऊन, तें पतिकाराचें करून कां पतकरून, आपण त्या परमात्म्याचे सेवक आहो असेहि पण त्याने वागून प्रत्यक्षत्वास आणून जगास दाखविले, तेथे सेवकपण अंगीकारणें तेंहि पण भक्तिच एक सेवागुणामुळे सेवकपणाची होऊन सुखास आली – बाण्याची झाली – महत्त्व पाहूं लागली व दिव्य आनंदामुळे देवपणाची झाली : देवहि पण तोच व भक्तहि पण तोच. देव आणि भक्त या दोन भागांत स्वतःस वाटून दिलें व सेवकपण आपल्याकडे घेतलें. (१८६)

आपल्याहून दुसरा जो त्याला – देहाला – म्हणजे सेवकपणाच्या बाण्याला – मी असे नांव ठेवून भजण्याची जी कांहीं रीति ती निगाह – तेजस्विता जो – भजत नाहीं त्यास दाखवितो, असा तो योगिया ! अहो ! असा तो योगिया क्रियारूप होऊन आहे ! योगक्रिया योग्यतेची करून आहे, वर योगिया असेहि म्हणून घेत आहे. तेथे जे न भजणारे नच नमणारे त्यांना ही अशी बरवेपणाची भजती रीति कुशलपणानें भजता रीतिरिवाज दाखवून आहे – ती पद्धति कां तो प्रघात आतां स्वभावच होऊन आहे असा. (१८७)

व्यसनाचे ठायीं आसक्त जसा तेथील दोष आवडीमुळे उठविला – दूर केला – व एक सर्व आसक्तिच तेथे. त्या आसक्तीशिवाय दुसरे कांहींच दिसत नाहीं. व्यसन म्हणजे आवड व तेथे शीण येतो असे म्हणणें पुरत नाहीं. अहो ! आवड ती सर्व आवडच एक – तेथे शीण हाहि पण आवडच. म्हणून तेथे शीण हा नाहींच : तेथे शीण हाहि पण आवडीनें उठवून लाविला असें ते आवडीचे व्यसन, भक्तिच अशी ती त्या योगियाची – भक्ताची – भक्तिच आम्हांस आहे – आवड ती सर्व. अहो, आमचें तो तर आमचें निजध्यान – अंतरंगींचें निदिध्यासन होय. सगुण असें निजनारायणाचें कां निजशुद्धीचें ध्यानच तो. सततचें असें किंबहुना एक अतुल समाधानच पुढे येते, पुरें होते, जर कां तो आम्हांस मिळेल. असा आम्हांस मिळे तर एक समाधान समाधान असा आमचा सुखाचा उल्लेख अहो असतो. असा भक्त मला फार प्रिय वाटतो. त्याच्यासाठींच आम्ही सगुण रूप घेऊन जगांत वावरतो.

भक्तावरून जीवप्राण ओवाळून टाकावेत असें वाटतें. तो भेटला तर किंवा तो भेटतो तेव्हां परम संतोष आम्हांस होतो (१८८)

अहो ! त्याजकरितांच मी रूपास येतों, मजला स्वरूपधारण करणें होतें. त्याचेमुळे कीं अहो ! मी येथे असतां : माझे येथे असणें असते. त्यावरून तर ह्या जीवप्राणाची कुरवडीच करावी असे आवडते. त्याजमुळेंच रूपाचे घडणें होतें – रूपच तेथे घडविले जातें – रूपच पाहाणें होतें. (१८९)

**यो न हृष्यति न द्वेष्टि न शोचति न कांक्षति ।**
**शुभाशुभपरित्यागी भक्तिमान्यः स मे प्रियः ॥ १७ ॥**

न हृष्यति = जो हरिखत नाहीं, हरिखणें हे जसें उगीच एकादी ऊर्मी घेणें म्हणजे आंधळेपणच जसें काय. हृष्यति या शद्वाचा अर्थ हर्ष पावतो असा न घेतां जसे काहीं एक ऋषींचें ते शांतपण, अगाधपण कां स्थिरभावाचें ते पाहाणें, असा घ्यावा. न द्वेष्टि = प्रिय, अप्रिय, प्रियाप्रिय (अप्रियतेचें लक्षण), जो द्वेष करीत नाहीं, परंतु येथे प्रिय कां अप्रिय असें भासून घेऊन त्याबद्दल सदोषतेनें पाहाणे, ते खेदच एक त्या बुद्धीस देणे तें कां ? तेथें प्रिय का अप्रिय असे न पाहतां उदासीनतेच्या एका भावलक्षणांतच बसलेले बरे. आपणच जो दोन्ही बाजू होऊन असतो, त्यास तो अद्वयतेचा कां द्वैताचा (द्वैताद्वैतविरहित) असा तो वृत्तिभार, कां असूं नये बरें ? यः न शोचति = खिन्न होणे जे. जो अपेक्षेचा होऊन कां मत्सराचा होऊन, कां अगम्यतेचा होऊन, "अव्यक्ता हि गतिर्दुःखम्" असा होऊन, या शोकाकुलतेस पाहातो, तेथें चित्तच एक शुद्ध असेल, तरच ते चित्ताचे स्थिर होणें होणारें. (शोक करीत नाहीं : आळस करूं नये. जेथे कमी पडले, तेथें ते पुरे करावे. कमी पडल्याने औदासिन्य येतें व त्यामुळें शोकरूपी उद्विग्नता ही त्या मनास त्रस्त करते. करितां आळसूं नये. भावनाधर्माचा आठव पाहावा.) यः न कांक्षति ( दर्शनकांक्षिणः ) = पुन्हा इच्छा जो करीत नाहीं, किंवा जी रचना या स्वभावानें अंगीकारिलेली, जशी संभावना तीच जशी जेव्हां का जेथें संपादनतेची होते, तेव्हांच तेथे तें कांक्षिणे हे असणार नाहीं हे केव्हांहि : उत्कट इच्छा ही मोठेपणाची, खाणेपिणे इ. ची असते ती केव्हांहि फायद्याची नाहीं. इच्छा ही शांत राहो. शुभाशुभपरित्यागी = शुभ कां अशुभ, मंगल सुख कां अप्रतिष्ठ असे न घेतां, जो परित्यागावर ( परोपरीनें त्यागावर ) टेकून आहे, तो क्षोभच किंवा शोच्यताच पाहाणारा होत नाहीं भक्तिमान् = भक्तिमंततेचा, भक्तिप्रेमभावसपदासंपन्न.

यः न हृष्यति, न द्वेष्टि, न शोचति, न कांक्षति, शुभाशुभपरित्यागी भक्तिमान् यः, स मे प्रियः ।

जो हरिखत नाहीं, अप्रिय समजून व्यर्थ त्रिकारभावाचा जल्प करीत नाहीं, जो शोचनीय अशा ( शोकाच्या पोकळपणाच्या ) वृत्तींना आपल्यावर ओढून घेऊन शोचनीय असा – दुसऱ्यांनीं त्यास पाहिले असतां करुणाच की त्यांनी करावी असा – असत नाहीं. जो वेळेस जें योग्य तेंच पाहून असतो, कां भलत्याच वेळेची प्रार्थना कां इच्छा करीत नाही. जो शुभ कां अशुभ असा ध्यास घेऊन असत नाहीं, पापपुण्याचा त्यागच करतो. असा भक्तिमततेचा अंकित, भक्तिसंपत्तीचा जो तो मला आवडतो.

जो कधीं हर्षित होत नाहीं, कोणाचा द्वेष करीत नाहीं, कधीं शोक करीत नाहीं, ( कशाचीहि कांक्षा म्हणजे इच्छा करीत नाहीं ), तसेंच शुभाशुभ कर्माचा – पापपुण्याचा – त्याग करणारा असतो, तो माझा भक्त मला प्रिय होतो.

जें आत्मलाभासारिखें । गोमटें कांहींच न देखे ।
म्हणौनि भोगविशेषें । हरिखेना जो ॥ १९० ॥
आपणचि विश्व जाहला । तरी भेदभाव सहजचि गेला ।
म्हणऊनि द्वेषु ठेला । जया पुरुषा ॥ १९१ ॥
पैं आपुलें जें सांचें । तें कल्पांतींहि न वचे ।
हें जाणोनि गताचें । न शोची जो ॥ १९२ ॥
आणि जयापरौतें कांहीं नाहीं । तो आपणची आपल्या ठाईं ।
जाहला यालागीं जो कांहीं । आकांक्षीना ॥ १९३ ॥
वोखटें कां गोमटें । हें कांहींचि तया नुमटे ।
रात्रि दिवस न घटे । सूर्यासी जेवीं ॥ १९४ ॥
ऐसा बोधुचि केवळ । जो होऊनि असे निष्कळ ।
त्याहिवरी भजनशीळ । माझ्या ठाईं ॥ १९५ ॥
तन्हि तया ऐसें दुसरें । आम्हां पढियंतें सोईरें ।
नाहीं गा सांचोकारें । तुझी आण ॥ १९६ ॥

(१९०) आत्मलाभासारिखे = ब्रम्हानुभवासारिखे. गोमटें = चांगलें, आवडणारे. न देखे = पाहात नाहीं. भोगविशेषे = विशेष ऐश्वर्यानें. हरिखेना = आनंदी होत नाहीं. (१९१) द्वेषु ठेला – द्वेषु दुरी ठेला = द्वेष नाहींसा झाला. (१९२) आपणचि – आपणपेचि. (१९४) वोखटें = वाईट. नुमटे = वाटत नाहीं. (१९५) निष्कळ = पूर्ण, शुद्ध. (१९६) पढियंते सोयरे = आवडते, जिवलग.

आत्मस्वरूपाच्या लाभासारिखे चागले तो दुसरे कांहींच पाहात नाहीं. आत्मस्वरूपासच जो उत्तम असे, सुखाचे असे, देखून असतो – त्यास दुसऱ्या एखाद्या असामान्य अशा भोगानें का भोगामुळे किंवा भोगाकरितां हरिखणे केव्हांहि नाहीं. आत्मस्वरूपच (सगुणच) एक संतोष देणारे व तेथेच तो पाहात असतो. जो आत्मस्वरूपाच्या प्राप्तीइतके मौल्यवान दुसरे कांहींच समजत नाहीं – विषयभोगाने आनंदित होत नाहीं. (१९०)

जो आपणच विश्व होऊन आहे त्याचा भेदभाव मग सहजच नाहींसा झाला आणि म्हणूनच तेथे द्वेष हा नाहींच. आपणच सर्व – तेथे आवडत नाहीं म्हणून कोणाचा तो द्वेष करणे व तो का? व तसेच तो कसलाहि शोक करीत नाहीं. नामाचें कवच धारण केल्यानें तेथे बुद्धीनें तो भेद पाहाणें कां मायाने ते कल्पित होणें असें नाहीं. भेदभाव नाहींसा होऊन एक नामाचें लेणे लेइले. सहजच मग तेथे विविद्विषतेने कां विद्वत्तमतेने डोळे मोडणे हें दूर होते. अहंभावाचा – देहाभिमानाचा – लय पाहाणारा असा तो. (१९१)

आपले स्वतःचें जं विद्यमान – सद्यः – असें जें खरेपणानें आहे ते तर कल्पांतींहि नष्ट व्हावयाचें नाहीं असे समजून जो गतगोष्टीचा शोक करणें सोडून देतो. (१९२)

आणि ज्याच्यापेक्षां दुसरे असे कांहींच नाहीं किंवा ज्यापलीकडे कांहींच नाहीं असे ते आपणच आपल्या ठिकाणीं झाल्यानें आतां (दुसरे) कांहीं आकांक्षणे नाहींच. (१९३)

वाईट अथवा चांगलें असें त्यास कांहींच वाटत नाहीं. अहो, सूर्य जो आहे त्यास रात्रीचे होणे कां दिवसाचें असणें हे घडतच नाहीं : सूर्य जो सर्व प्रकाश तेथें रात्रि का दिवस असे पाहाणें कसचें ! बरे व वाईट यांमध्ये तो भेद पाहात नाहीं. (१९४)

असा बोधच जो केवळ प्रत्यक्ष – बोधच जो पूर्ण शुद्ध असा होऊन आहे – याहिवर माझे ठायीं भजनशील असा. (१९५)

तरी त्यासारखें दुसरें आम्हांस पढियंतें सोयरें नाहीं अशी तुझी आण घेऊन सांगतों. तुझीच शपथ वाहून सांगतों कीं, त्याजसारखे दुसरे एकादे कांहीं आम्हांस खरेंपणाने आवडतं आहे किंवा आवडत होते असे नाहीं (१९६)

**समः शत्रौ च मित्रे च तथा मानापमानयोः ।**
**शीतोष्णसुखदुःखेषु समः संगविवर्जितः ॥ १८ ॥**

शत्रौ च मित्रे च समः = रिपुमित्रांना सारखा. समबुद्धीचें हित – आपले हिताची गोष्ट – निंदास्तुति उपेक्षेनें असणें. मानापमानयोः समः = मान आणि अपमान यांना समान शीतोष्णसुखदुःखेषु समः = शीत आणि उष्ण, सुख व दुःख हीं ज्याला समान झालीं. संगविवर्जितः = ज्याला कसलीच आसक्ति नाहीं (देह) सगानें असणें कां नसणें हे ज्याला सारखे आहे, देहबुद्धीचा संग न पाळणारा : देहधर्म (साधन) रहस्यरूपी अमृत, आपल्या स्वतःचा स्वभावच व तेथील रहस्य.

शत्रौ च मित्रे च समः, तथा मानापमानयोः, शीतोष्ण सुखदुःखेषु समः, संगविवर्जितः ॥

रिपु अथवा मित्र, मान का अपमान, शीत का उष्ण, सुख कां दुःख ही ज्याला समान ( समसाम्यतेचीं ) झालीं, ज्याला कसलीच आसक्ति नाहीं, (देह) (कर्म) सग असला काय का नसला काय हें ज्याला सारखें असतें ( समसंग ), ( असा भक्तिमान् पुरुष मला आवडतो. )

**पार्था जयाच्या ठाईं । वैषम्याची वार्ता नाहीं ।**
**रिपुमित्रा दोहीं । सरिसा पाड ॥ १९७ ॥**
**कां घरींचियां उजेड करावा । पारखियां आंधार पाडावा ।**
**हें नेणेंचि पांडवा । दीपु जैसा ॥ १९८ ॥**
**जो खांडावया घाव घाली । कां लावणी ज्यानें केली ।**
**दोघां एकचि साउली । वृक्ष दे जैसा ॥ १९९ ॥**
**ना तरी कां इक्षुदंडु । पाळितया जैसा गोडु ।**
**गाळितया कडु । नोहेचि जेवीं ॥ २०० ॥**
**अरिमित्रां जैसा । अर्जुना जया भाव ऐसा ।**
**मानापमानीं सरिसा । होतु जाये ॥ २०१ ॥**
**तिन्हीं ऋतु समान । जैसें कां गगन ।**
**तैसा एकचि मान । शीतोष्णीं जया ॥ २०२ ॥**
**दक्षिण उत्तर मारुता । मेरू जैसा पांडुसुता ।**
**तैसा सुखदुःखप्राप्ता । मध्यस्थ जो ॥ २०३ ॥**
**माधुर्यें चंद्रिका । सरिसी राया रंका ।**
**तैसा जो सकळिकां । भूतां समु ॥ २०४ ॥**
**आघवेया जगा येक । सेव्य जैसें उदक ।**
**तैसें जयातें तिन्ही लोक । आकांक्षिती गा ॥ २०५ ॥**
**जो सबाह्य संगु । सांडोनिया लागु ।**
**येकाकी असे आंगु । आंगीं सुनी ॥ २०६ ॥**

(१९७) वैषम्याची वार्ता नाहीं=वांकुडपणाची गोष्ट जाणत नाहीं : द्वैतभाव कधीं कानीं मुद्धां आला नाहीं. सरिसा पाड = सारखेपणानेच मानतो. पाड – पाडे. ( १९८ ) उजेड – उजियेड. पारखियां – पारिकियां=परक्यांस, बाहेरच्यांस. (१९९) ग्वाडावया=तोडण्यासाठीं. लावणी=लागवड. वृक्ष दे जैसा – वृक्ष जैसी. (२००) जैसा गोडु – गोडु. (२०१) सरिसा=समान, सारखा. (२०२) ऋतुं=ऋतूंमध्ये (२०३) मारुता=वाऱ्याला. मध्यस्थ = साक्षी. (२०४) माधुर्यें चंद्रिका=आपल्या प्रसादाने जणुं शीतल चद्राप्रमाणेच – तेथें राय कां रंक हा भावच नाहीं. (२०६) जो – तो. लाग= संबंध. आंग आगीं सूनी येकाकी असे=मन मनावर ठेवून एकांतानें असतो.

हे पार्था, ज्याच्या ठिकाणीं विषमतेचा भाव कां वाकुडपणाची वार्ता नाहीं, दुःसहनेची गोष्ट ज्याचे ठिकाणीं ऐकूं येत नाहीं – द्वैतभाव कधीं कानींसुद्धां ऐकूं आला नाहीं, ज्याचे ठिकाणीं वैषम्य नाहीं – काय रिपु, काय मित्र अशा दोहोंनाहि जो सुखभावाचे सारखेच मानतो, महत्त्व देतो, सारख्याच योग्यतेनें पाहातो. (१९७)

कां घरचा म्हणून तेवढयासच उजेड करावा व परका म्हणून कां पारकिया जो कां बाहेरचा असा जो त्यास अंधार करावा – त्यावर अंधार पाडावा, असे जसा दीप म्हणजे दिवा जो तो करीत नाहीं – त्याप्रमाणें दिव्यासारखा जो आहे. (१९८)

अहो, तोडण्यासाठीं घाव घालणार जो, किंवा ज्यानें लावणी केलेली अशा त्या दोघानाहि एक सावलीच देणारा जसा वृक्ष तसा तो – कृपाळुपणाने जसा सावलीच एक. (१९९)

तसेच हे पाहा कीं, हा ऊंस जो आहे तो जो त्यास पाळणारा त्यासच तेवढा गोड रस देणारा व गाळणारा जो त्यास काय कडू रसाचा असा केव्हांहि नव्हे : तो त्या दोघानाहि गोडच होऊन असतो. गाळणारा म्हणजे चरकांत घालून पिळून रस काढणारा त्यासहि पण तो गोडच असा. (२००)

त्याप्रमाणे काय अरि का काय मित्र अशा दोहोंच्या ठिकाणीं ज्याचा सम असा भाव असतो. तो मानाने फुगत नाहीं का अपमानानें खिन्न होत नाही – तो दोहोंमध्ये सारखाच असतो : उलट त्याच्यामधील चांगुलपणाच मुळी वाढूं लागून वाढता होतो – त्या सम असण्यामुळे त्याचा सन्मान केला काय किंवा त्यास महत्त्व दिले कां दिले नाहीं काय, किंवा अपमान केला काय असा मानाने कां अपमानानें जो विकारवश होत नाहीं. (२०१)

उन्हाळयामध्ये कां पावसाळयामध्ये, तसेंच कां हिंवाळयामध्ये गगन हे सारखेंच असते – ते समानच असते जसे, त्याप्रमाणे शीत कां उष्ण याना एकच मान जो देतो, थंडी वाजली कां ऊन लागले तेथें त्याचें सारखेच मनाने मानणे होतें देहाभिमानानें हुकारणारा कां दोषावर टेकून थंडीच वाजविणारा – भीति देणारा – भयभीत करणारा - असा जो प्रसंग तेथें जो भूतमात्रांनें अभय दिलेला असा अभयच एक समतोलाचे असा एकसारखाच असतो. देहप्रारब्धभोग भोगण्याकरितां आलेले जे काहीं एक तापाचे हिंवणेंच जसे – तेथें जो तो देहच मुळीं बाजूस करून किंवा त्यांतच राहून प्रसंगास सादर होतो. उष्णता म्हणजे विकारवशता ही सत्वदर्शनानें प्रशांत होणारी व शीत हेहि पण एक तेजोमय असेंच त्या स्वरूपावर परिणमणारे असें ते विश्वदाक्षिण्य कां प्राणदर्शन. (२०२)

दक्षिणेकडील कां उत्तरेकडून आलेला वायु – मारुत – त्यास मेरु हा जसा, तसा सुख लाभले कां दुःख प्राप्त झाले – भासले - वाटले – तेथे मध्यस्थच एक जसा जो – तेथे गृहस्थबाणा मिरविणारा असा गुणमध्यस्थ. (२०३)

आल्हाद देणारी चंद्रिका ही रंक असो कां राय असो त्या दोघांनाहि ती सारखीच प्रसन्नता देणारी – प्रसन्न करणारी – तसा जो सकळभूतांचे ठायीं सम म्हणजे एकसारखा आनंददायक किंवा सुखकारक असा. (२०४)

[ दीप – सम – येथें साम्य हेंच सिद्ध होऊन आलें असें करणें तें ह्या कोटींनीं, त्या साम्याची सीमाच मुळीं ह्या उपमाकोटींनीं कसोटीस लावली. अहो, या उपमेची थोरीव ही सर्व उत्कृष्टतेचा भर घेऊन आहे येथे पाठीमागून येणाऱ्यांनीं हुंबरणें ते कां ? तेथीलचें महत्त्व रहस्य कां होऊन नसावें तें ? तें आचरावें कां न ? घागवावें कां न ? ह्या वचनांचीं स्तोत्रे म्हणजे एक निराळींच जशीं सन्नागर – स्तुतीचीं – बोलणीं : म्हणून येथे सौजन्याची कसोटीच या स्वभावानें पाहूं केलेली कीं, तो जो आपणपें म्हणजे आत्मसात् केलेला स्वभावभार हा तेथीलच्या महत्त्वाचा – तेथील महत्त्वाचें – कां बरें नच आपण स्वतः व्हावे ? म्हणून जे कांहीं उत्तमत्व तेच किती प्रमाणानें अगीं बाणले आहे कां नुसतें उथळपणच ते कसावर लावण्याचे वेळेसच मुळीं ते पारखले जाणारे – एरव्हीं सर्व कांहीं माहीत आहे, पण तें नुसतें जाणणेच होय : तेथें देहाभिमानाचें गोठलेले तर कांहींच उपयोगाचें नव्हे. म्हणून येथे तप तप जें कांहीं, कां भक्ति भक्ति जी ती, ती तर कळवळ्याचें असें वात्सल्यगोडीचें मातृवत्सलतेचे एक निरभिमान असें. येथे उपमासौंदर्य, कांति ही दीप होय. तेथे स्मृति ही शुद्ध झाली. अशी सर्व श्रवणगोडी हीच पुढे होऊन आहे अशी. हा दीप काय तो दीप पाहावा तर व्यक्तीसच आणिला गेल्यानें, तेथे काय कांहीं त्याच्या ठायीं वैषम्याची गोष्ट मनास विषमता वाटली अशी तेथें मुळीं गोष्टच नाहीं. तेथे रिपु का मित्र या दोघांनाहि सारखीच समता कां महत्त्व असा तो दीप व्यक्तीसच आणला गेला; व आतां स्वतःवरच ती कसोटी देण्याचे काम पडले, तेव्हां तेथे पाहावे तो काय तो दीप असे म्हणतो काय कीं, घरच्यास तेवढा उजेड करावा आणि दुसऱ्यांना मात्र अंधार पाडावा असें तो जाणतच नाहीं. तमे येथे तसले ते दीपाच्या अगाधतेच्या म्हणजे खोल स्वभावाचे जे होऊन आहेत ते होत अगाधतेचा जसा दीपप्रकाश, वृक्षाप्रमाणें अजातशत्रु जसा, मनाच्या समतोल-पणाचा जसा ऊंस, अरिमित्रांना मात्र जसा सारखा, तसा मानापमानानें हा स्वभावाचा समतोलपणा जसा कसोटीवर घांसला गेला. गगन हें तिन्ही ऋतृंत सारखेंच – तसें चित्त हें परिग्रहाबाबत सारखेंच. किंवा चिद्गगन हे सुष्टु किंवा प्राणदर्शनप्रकारानें पाहिलें असतां एकसारखे, तिन्हीं अवस्थांमध्ये त्रिकाळींहि नच बदलणारें, तसें शीतोष्णद्वंद्वीं चित्त सारखें. मनावर उमटलेल्या वृत्तिविशेषांनीं भासविलें जाणारे जे ह्या बोलण्याने होणारे एकच मन तसा – जसा गृहस्थ गुणांचा मध्यस्थ, तसा सुखदुःख-प्रसंगीं मेरू जसा उत्तर कां दक्षिण वायूस सारखा – उत्तरेचा वारा हिमाच्छादित, दक्षिणेचा वारा जसा सागरामधून येणारा. माधुर्यचंद्रिका रायारंकां सम, तसा सकळभूतांना सम म्हणजे एक वाढून दिलेलें असें साम्य उदक – पाणी आपली धार पाहाते. नेहमीं नम्रपणाची जशी आपली पातळी पाहाणारी तशी जीवनधाराच जो – तेथें आकांक्षा तशा पुरुषाविषयीं असा – आंत व बाहेर जो देहसंगाचा कां कर्मसंगाचा नच होतां तेथीलच्या देहाच्या संबंधतेचा कां कर्मसंगी म्हणजे कर्माच्या संबंधाचा नच होतां एकांत पाहून आहे. तेथें एकांताच्या गुणाने सर्व अंग शोभविलें – एकांताचें अंग सर्व लेइले – एकांत जो संतांना पसंत असतो, साधूंना पसंत असतो, तो आपल्या अंगींचा जो करून आहे – असा जो ते ते गुण त्या त्या प्रसगानीं पाहविले गेले : तेथे तो गुण म्हणजे आपणच स्वतः तेथीलच्या मूर्तमंततेस येणें करणें हेंच मुळीं त्या त्या उपमेची स्मृतिपटलावर बाणलेली वृत्ति ही स्वतःच तें तेथीलचें प्रतीक असे जेव्हां तेव्हांच मुळीं हें लिहिलेलें म्हणजे यथोक्त तें शोभविलें – संतवृत्तिच पांघरली – संत होणें झालें असें – वृत्तीच मग तुमच्या द्वारें मूर्ततेस आली असें नव्हे काय ? ]

पाणी हें जसें सर्व जगास सेव्य असेंच – सेव्यसेवकमात्र, स्वामीभक्तसंबंध, स्वामीसेवागहनत्व – जेथे तिन्हीहि लोक ज्याची आकांक्षा करतात अशा त्या पुरुषाचा सहवास असावाच असावा, कां तसें तें पाणी आंगीं असावेंच असावें – सेवन करण्यास मिळावें जसे. (२०५)

जो आत बाहेर सर्व संग सोडून, देहाभिमानी नच होऊन, सर्व संबंध – लोभपर होणे ते – सांडून एकाकी असा आपले आंग पेलून – पेहरून – असतो, आपले मन आपल्या आंतल्या मनाशीं जोडून असतो – आपले मनच मनास प्रसन्न करून असतो. (२०६)

**तुल्यनिंदास्तुतिर्मौनी संतुष्टो येनकेनचित् ।**
**अनिकेतः स्थिरमतिर्भक्तिमान्मे प्रियो नरः ॥ १९ ॥**

तुल्यनिंदास्तुतिः = जो निंदा स्तुति समान मानणारा, बरोबरीचे मानणारा. मौनी = मननशील. येनकेनचित् संतुष्टः = जे काहीं मिळेल त्यावर संतुष्ट, त्यानें तृप्त. ( जे कांहीं पाहिजे असेल, ज्याची इच्छा असेल, ते मिळविण्याचा प्रयत्न हा आड येणारा असतो, म्हणून जे काहीं मिळेल त्यानें संतुष्ट ) अनिकेतः = अमुकच माझे घर अशी ज्याला आसक्ति नाहीं घरादारांत ममता व आसक्ति न ठेवणारा. स्वतःला स्वतःचा आश्रय घेणारा असा आत्मविश्वासी. ( निकेतन = मंदिर, गृह. ) स्थिरमतिः = स्थिर बुद्धि, स्थिर उपदेश, स्थिर अभिप्राय. स्थिर = स्वाधीन. भक्तिमान् मे प्रियः नरः = भक्तिमंत, आवड, उपचार, रचना, भाग, आकृति कां आराधनप्रिय असा भक्त, पुरुष, हितकर्ता, सिद्ध मला प्रिय होतो

तुल्यनिंदास्तुतिः मौनी येनकेनचित् संतुष्टः अनिकेतः स्थिरमतिः भक्तिमान नरः मे प्रियः ॥

निंदा का स्तुति बरोबरीचे, समान मानणारा, मौनी, नच बोलणारा किंवा बहु नच बोलणारा किंवा मननशील ( कारण बोलण्यानें भलतीच भावना भलत्याच ठिकाणी उगवणारी, तेथे हेतुच मुळीं दडपला जाणारा होतो, म्हणून जो मौनच बरें समजून मौनी असतो. ), जे काहीं मिळेल त्यानें तृप्त, तुष्ट, संतुष्ट, मनबुद्धि स्थिर असलेला, घरादाराचा लोभ, ममता न ठेवणारा, असा स्थिर बुद्धीचा, स्थिर मतीचा, भक्तिमान् पुरुष मला आवडतो, मला प्रिय असतो.

**जो निंदेतें नेघे । स्तुतिस्तव न श्लाघे ।**
**आकाशा न लगे । लेप जैसा ॥ २०७ ॥**
**तैसा निंदे आणि स्तुति । मान करूनि येके पांती ।**
**विचरे प्राणवृत्ति । जनीं वनीं ॥ २०८ ॥**
**सांच लटिकें दोन्हीं । न बोले जाला मौनी ।**
**जो भोगितां उन्मनी । आरायेना ॥ २०९ ॥**
**जो यथालाभें न तोखे । अलाभें न पारुखे ।**
**पाऊसेविण न सुके । समुद्र जैसा ॥ २१० ॥**
**आणि वायूसी एके ठायीं । बिढार जैसें नाहीं ।**
**तैसा न धरीच कांहीं । आश्रयो जो ॥ २११ ॥**
**आघवाचि आकाशस्थिति । जेवीं वायूसी नित्य वसति ।**
**तेवीं जयाचि विश्रांति- । स्थान जया ॥ २१२ ॥**

**हें विश्वचि माझें घर । ऐसी मती जयाची स्थिर ।**
**किंबहुना चराचर । आपण जाहला ॥ २१३ ॥**
**मग याहिवरी पार्था । माझिये भजनीं आस्था ।**
**तरी तयातें मी माथां । मुगुट करी ॥ २१४ ॥**

(२०७) न श्लाघे = धन्यता मानीत नाहीं, वढाईनें सांगत नाहीं. (२०८) पांती – पंक्ति = ओळ, एकार्थ. (२०९) उन्मनी आराणेना = उन्मनी अवस्थेतील सुखभोगापासून विमुख होत नाही (२१०) सतोखे = संतुष्ट होतो. न पारुखे = कोपत नाही, रुष्ट होत नाहीं. (२११) बिढार = वसतिस्थ न. काहीं – कंहीं = कोठे. (२१३) हे विश्वचि माझे घर = घरावर जशी आसक्ति – प्रेम, त्याप्रमाणे सर्व विश्वातील प्राण्यांवर एक भाव मति स्थिर = बुद्धीचा गात – हा ब्रम्हभाव. चराचर आपण जाहला = जगातील स्थावर व जगम सर्व पदार्थ आत्मरूप समजतो. (२१४) याहिवरी – ययाहिवरी – यावरीहि आस्था = भारी आवड. माथा मुगट करी = तरी त्या ज्ञानी भक्तास आपल्या मस्तकीं मुकुटाप्रमाणें धारण करितो – अत्यंत प्रेमाचे दर्शक, शंकरांस श्रीविष्णूनीं मस्तकीं बसविले असे.

निंदा ऐकिली असतां जो आपण तिचा होत नाहीं, ती आपल्यास चिकटवून घेत नाही, व स्तुति झाली असतां धन्यवाद मानीत नाहीं – महत्त्व गात नाहीं, ज्याप्रमाणे एकादे चित्र काढले तर ते जसे आकाशास तो लेप देऊन त्यावर काढलेले असते, तसे दुसऱ्याचे ते निंदास्तुतीचे लेप आपणांवर तो घेत नाहीं (२०७)

त्याप्रमाणे निंदेस का स्तुतीला एकाच पक्तीस बसवून – एकाच पंक्तीचा मान देऊन – जो आपला प्राण व आपली वृत्ति ही स्थिर करून, जगामध्ये कां वनामध्ये आंगाने पुष्पपराग सेवन करणारा, हुंगणारा विचरत असतो प्राण हाच वृत्तिरूप असा तो प्राणच एक सर्व जनामध्ये व वनामध्ये विचरत असणारा. (२०८)

साच म्हणजे खरें कां लटकें म्हणजे खोटे असे जे दोन प्रकारचें बोलणे ते मुळीच न बोलणारा असा मौनी – मननशीलच तो (नच बोलता येत असा मुका नव्हे असे त्याने इतर दुसऱ्या काहीं गोष्टी बोलून समजविलेले म्हणून बोलोनि न बोले) असा तो पाचवी योगअवस्था जी उन्मनी तीसच भोगत असतो – जी अवस्था भोगण्यास तो कधीं कटाळत नाहीं – त्या अवस्थेपासून जो कधींहि विन्मुख होत नाहीं – उन्मनीचे सुख भोगल्याशिवाय जो राहात नाहीं. (२०९)

यथालाभे म्हणजे जे काहीं सहज मिळेल त्यावरच जो संतुष्ट असतो, त्याने जो तृप्त असतो, त्याने जो संतोषतो – व अलाभे म्हणजे जे मिळण्यास कठीण असे ते जे मिळाले नाहीं तरी त्याने रुष्ट होत नाहीं, पारुखत नाहीं, रुसत नाहीं – जसा का समुद्र हा पाऊस नसला तर सुकत जात नाहीं. येथे सर्व परिग्रहच जसा आपले इत्थंभूतपण घेऊन त्याने ते कर्माकर्माचें मिसळणे हे संतोष कां अलाभ का पारुखणें कां लाभाचे ते जसें हया ब्रम्हवस्तूवर पाहूं म्हणून अजमावण्याचे जसे – तेथे अहो! समुद्रासारखे कां सागरासारखे जे अपरंपार ब्रम्ह – तेथे का हया त्या कर्माकर्माच्या धारा त्यास रुपणाऱ्या होतील – होतात? येथे तो परिग्रहच मुळी प्रसन्न होऊन त्याने सर्व जगच पुढे केले – नम्रपणाने हात जोडून जगातील सर्व वस्तुच त्याने त्यास अर्पण केल्या. (२१०)

हया वायूस काय एकेच ठिकाणीं राहणे होते? वायु तर सर्वत्रच असतो. त्याप्रमाणे जो कोठेच मुळीं आश्रयास धरून असत नाहीं – कशाचाहि आश्रित होत नाहीं – जसा का "वायुः सर्वत्रगः महान्" मारुत जसा कां गगन जसें, तसे ज्याचे सर्वत्र असणे एक दैवतच जसे का तो. (२११)

स्थिति जी सत् म्हणतात, तेथे यज्ञदानतप हेंच जसें चित्स्वरुपानें आपलेसें केलें. व मनपवन हाच वास्त्व करून असल्याने त्यास विश्राति ही जगरूपी स्थानच होय. आघवी आकाशस्थिति जी तेथें वायु जसा नित्य वास्त्व करून असतो, त्याप्रमाणें जग हेच विश्रांतीचें ठिकाण ज्याला. (२१२)

असे झाल्यामुळे मग सहजच हें विश्व माझें घरच अशी ज्याची स्थिर मति झाली, त्यास सर्व चराचर आपणच होय, अवघे जगत् गृहच होय असे का नव्हे बरे ? इच्छा, उपदेश, मति हीं ज्याचीं स्थिर झालीं, अगास विश्वच घर होय. किंबहुना, एवढेच नव्हे तर, तो आपणच मुळीं चराचर होऊन आहे, आपणच चराचर झाला असा तो त्याच्या बुद्धीचा हा ब्रम्हभाव शांत व जगांतील स्थावरजंगम सर्व पदार्थ आत्मरूपच. (२१३)

असा जो विश्व होऊन आहे, व बाहिवर जो, पार्था, माझ्या भजनामध्ये आस्था बाळगून आहे, कळकळीचा आहे, जीवित्व जीवशिव ऐक्याने जागते आहे, भजनीं आस्था ठेवून आहे जर, तर त्यास मी आपल्या मस्तकावर धारण करतों. त्यास मी आपल्या माथ्यावरचा – माथींचा – मुकुट करतो. (२१४)

उत्तमासी मस्तक । खालविजे हें काय कौतुक ।
परी मानु करिती लोक । पायवणिया ॥ २१५ ॥
तरी श्रद्धावस्तूसी आदरु । करितां जाणिजे प्रकारु ।
जरी होय श्रीगुरु । सदाशिव ॥ २१६ ॥
परी हें असो आतां । महेशातें वानितां ।
आत्मस्तुति होतां । संचारु असे ॥ २१७ ॥
ययालागीं हें नोहे । म्हणितलें रमानाहें ।
अर्जुना मी वाहे । शिरीं तयातें ॥ २१८ ॥
जे पुरुषार्थ सिद्धि चौथी । घेऊनि आपुल्या हातीं ।
रिघाला भक्तिपंथीं । जगा देत ॥ २१९ ॥
कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडी बांधी करी ।
कीं जळाचियापरी । तळवटु घे ॥ २२० ॥
म्हणोनि गा नमस्कारूं । तयातें आम्ही माथां मुगुट करूं ।
तयाची टांच धरूं । हृदयीं आम्ही ॥ २२१ ॥
तयाचिया गुणांची लेणीं । लेववूं आपुलिये वाणीं ।
तयाची कीर्ति श्रवणीं । आम्ही लेऊं ॥ २२२ ॥

(२१५) खालविजे = वांकवावे, नम्र करावे पायवणिया = चरणतीर्थास. (२१७) वानितां = वर्णितां. आत्मस्तुति होतां संचारु असे = आत्मस्तुति केल्यासारखे होणार आहे. (२१८) रमानाहे – रमानाथे = श्रीकृष्णांनीं, रमानाथानीं. (२१९) पुरुषार्थ सिद्धि = मोक्ष. (२२०) मोक्षाची सोडी बांधी करी = मोक्षरूप धनाची सोडबांध करतो. तळवटु घे = नम्रता धारण करतो. (२२१) टांच धरूं = भृगूची टांच – श्रीवत्सलांछन – मिरवितों तशी. (२२२) लेणीं = अलंकार.

अहो, उत्तम जे कांहीं त्यास नमस्कारणें, त्याजपुढे मस्तक नम्र करणे, मस्तक खालविणें हे स्वतःच्या आस्थेवाईकपणामुळें आपोआपच होतें. येथे कौतुक असे म्हणणें ते नाहींच. अहो ! तेथ

स्वर्ग, मृत्यु, पाताळ असे तिन्ही लोकहि त्या चरणतीर्थास महत्त्व देणारे, त्या तीर्थाकरितां खेटे घालणारे असतात. त्या चरणतीर्थास तिन्ही लोक मानतात – सन्मान्य असे करून असतात. (२१५)

अहो! श्रद्धावस्तूचा आदर कसा करावा हे परम गुरु जे श्रीशंकर त्यांपासून शिकावें. तेथें भगवंताच्या चरणापासून निघालेली – पायातळीं जन्मलेली – जी गंगा ही त्यांनीं आपल्या मस्तकावर धारण केली आहे. असा हा भक्तिआदर म्हणजे ह्या श्रद्धावस्तूस दिलेले महत्त्व ते काय महान् असे ते. देवत्व जे ब्रम्हभावावर उभे होणारे तेथे अडविणारे जे तेहि पण आदराचे केले. श्रीसदाशिव जे श्रीशिवशंकर तेच सर्व महत्त्व वाहून असलेले होत. त्याबद्दल श्रीशंकराची स्तुति केल्यासारखें होणार आहे. (२१६)

परंतु हे आतां असो महेशास म्हणजे श्रीशंकरांस वर्णितां आत्मस्तुति केल्यासारखे होणार आहे. कारण परनिंदेचा दोष कां संचार तेथे आंत डोकावेल म्हणून. तेथें फिरणेच एक जसे का – ह्या पृथ्वी-मधील संचार – ह्या देवतांच्या मार्गामार्गासंबंधाने, म्हणून येथे श्रद्धावस्तु जी तेथे प्रकार हे अनेक असामान्य असे असल्याने, ते जे ओंकाराचे प्रकारण हे ती श्रद्धावस्तुच आदराची अशी संस्कार का प्रेम झालेली. तेथें जशी कां प्रदक्षिणा केली, म्हणून येथे त्या जोडशद्वाची ( म्हणजे आत्मस्तुति – परनिंदा – पर म्हणजे इंद्रियांचे बेतालपण तेंच निंदेचें कारण जसे) बांधणी पुढे येते.

[ तेथे ती मियते यत तत् मात्रा तीच उपप्राणावर टेकून लावविली जाणारी – म्हणून येथे आत्म-स्तुति ही निंदाच केल्यासारखे : असें ते करणे स्तुत्य म्हटलें तर निंदच जशी कां निंदणेच एक त्या परवस्तूचे ते झोपेत ढकलल्यासारखे होते. प्राज अभिमानी हा लपविला गेल्याने सहजच मग तो कारण देह लपविला गेला व आतां जागृति ती कशास म्हणतात कोण जाणे ? का गृहस्थधर्माचे जे अग्निसेवन ते लोपविले गेले जसे. बुद्धीचें सर्व रणच अजमाविण्याचे केले तर तेथे चालणे कां मौनच बरे - व मौनच बरे म्हटले तर ते कां ? मूळ माया जी तेथीलचे अक्षराचे लपविले जाणे ते जर जोडून घेऊन सम केले, तर जसा गृहस्थानें गृहस्थ शोभविला असे. नाहीं तर एकीकडेच कलणे होते व मग अभावाचा उपवास हा कोणीं उजवावा असे प्रश्नच नेहमीं ] (२१७)

म्हणून ते तसे नाहीं – म्हणजे परनिंदेचा दोष येऊं पाहात आहे असे ते नसून, हे अर्जुना, मी त्यास आपल्या शिरींच वाहातों – जसे कां फूलच मस्तकीं वाहिले, चरणतीर्थच वंदिले, फुलानें पूजाच केली, पत्रच भोगास दिलें, तसा तो भक्त म्हणजे मीं आपल्या मस्तकावर धारण केलेला असा होय – मस्तकानें वाहिलेला, झेललेला, झेपलेला असा असतो – त्यास मी आपल्या शिरीं वाहातो. महिमा पाहातां महेशु जेणे मस्तकीं वंदिला। तो हा विठोबा निधान। ब्रम्हादिकां ज्याचें ध्यान॥

स्तुति ती निंदा – तेथे देवतेनें देवतेसच प्रदक्षिणा केली : आत्मस्तुति ही त्या ब्रम्हास चेव देऊन स्वतःच तेथीलचे वतनदार होण्यास महत्त्व घेऊन असते, व त्या परवस्तूस – कारणास – हारवूं पाहाते : हार देऊन सर्व महत्त्व स्वतःस पोहोंचावें अशीच ती वृत्ति – कां उदास, का दीन, कां हळुवारपण पुढे करून असणारी.

संचलन – विचलन, स्तुति तेचि निंदा, स्तुतिजोगा नव्हसी गोविंदा ॥ महतः परमव्यक्तम् । ती जी सगुण अथवा गुणमयी मूळमाया – ब्रम्हशक्ति, शातब्रम्ह – तीच या महेशादिकांना प्रसविणारी असल्याने, तेथे गुणागुणांचे रण उल्लंघिले जोंपर्यंत जात नाहीं, गुणातीत असे सर्व भूतभाव एकस्थं आस्थितः जोपर्यंत होणें नाहीं, तोंपर्यंत हे (हीनपणाचें) दुसऱ्यावर टेकणें हें होतच असणार. (तोंपर्यंत मौनच बरे). आणि म्हणूनच श्रीमहाविष्णूंनीं – रमावल्लभांनीं – श्रीकृष्णांनीं – असेच म्हणूं केले कीं, मी अशा भक्तास, हे अर्जुना, आपल्या मस्तकीं वाहातो, आपल्या मस्तकीं त्यास वंदितो. (२१८)

सरूपता, समीपता, सलोकता, सायुज्यता ह्या ज्या चार मुक्ति – यांपैकीं चौथी जी सायुज्यसिद्धि, तेथें पुरुषार्थ हाच मोक्ष : धर्म, अर्थ व काम ह्या तिहींना त्यानें उल्लंघिलें व ही सायुज्यसिद्धि आपल्या हातीं घेऊन त्यानें भक्तिच जगास दिली. पंथच एक, का मार्गच तो जसा ह्या जीवदशेनें प्रेमाचें होणें कसें ते पाहिलें जाते जेथें. सायुज्य सदनच असा तो त्याचा हातभार हा सर्व मोक्षच ह्या पंथाचा, ह्या मार्गाचा, भक्तिपथाचा अहो ! तेथीलचें दिव्य काय बोलावें ? या इंद्रियाचें सागरासारखें अफाटपण – बहु गर्जणेंच तें एक – तेथें त्यानें अचेतस जे त्यांना इंद्रियाना रजविण्याचें करून तेथें सव दिव्यच भारास आलीं असें तें करणें – इंद्रियांनीं तर अक्षराचें शोभणें पाहून सती जाण्याचें व्रतच जसें घेतलें व आतां तेथें भक्तीस लागणें तेच इंद्रियांनीं सती जाऊन पुरुषच उजविला - मदनाचें निशाणच उभें केलें असें होय त्यानें जगत् प्रसन्न झालें व संसार हा मोक्षाचा असा तो कव्हा बरें पाहाण्यास मिळेल म्हणून त्या हाताची वाटच पाहात असलेले आपल्या जीवदशेचा स्वतःचा जेथें ठावच पाहाण्यास मिळाला – असा विश्वासाच विश्वास दिला – विश्वास श्वास घेऊं लागला – धीराचा झाला – जीवित जगणें – जीवित जागविणें – तेथें नियतचैतन्याचें झालें, आनंदलें, प्रिय झालें, विश्वासानें श्वास घेऊं लागलें – शरण शरण म्हणूं लागलें, आम्हास तुमचा आश्रय असावा असें प्रार्थूं लागलें. (२१९)

असा तो कैवल्यपदाचा अधिकारी – मूर्तिमत ज्ञानच तो – अथवा असें ते कैवल्यपद तेथें स्वर्ग कां मोक्ष हे तर त्याचे हातचें खेळच जणं – हे कसें तर तें पाणी जसें आपली पातळीच धुंडतें, तसें नम्रतारूपी प्रेम हेच तळीचें तें तळवट घेऊन एका पातळींत सरळ रेषेतच येणारें तें पाणी का तेज का महत्त्व का संतत का नित्य कां त्वरित का वेळा साधण ( सदैव ) तें त्यानें आपल्या अधिकारावर ठेवलेलें. तेथें तें मोक्षद्वारीचें उघडणें कां मोक्षच बांधून टाकला का पाहूं केला असें सर्व अधिकारपरत्वें आपल्याच अधिकारानें तें कैवल्यपद शोभविलेलें ! वृत्तीचें निमणें, निवृत्त होणें, निरिच्छता का प्रेम हेच तेथें एका प्रेमाचें झालें - प्रेमास आणिलें – तेथें सत्वगुणच महत्त्व पाहू आला – तमच प्रकाश झालें – उष्णता ही अमृत स्रवूं लागली, नम्र झाली.

पाणीच आसन झालें जसें – बैसका पाण्याची केली – तेथें पाणी तेजधारा ही आपला तळ पाहू लागली. मोक्षसंपदेचें भाग्य तें संपत्तिमान करणें हें त्यानें आपल्याच हातात ठेविलें. मूर्तिमंत विनयच ते कां असिधाराव्रतासारखें काठिन्याचें. (२२०)

असा तो त्यास आम्ही नमस्कार करणार हे केव्हांहि ! त्याचें हाताना आमच्या नमस्कारण्यानें आमच्या हाताचें अवलंबन मिळालें – पोहोचलें आमचेच हात त्या प्रेमास पाहूं आदरणारें असे. त्यास आम्ही आपल्या माथींचा मुकुट करतो – मुकुट करूच करूं. त्याची टाच आम्ही आपल्या हृदयीं धरतो – धरितोच धरतो – हें जसें श्रीवत्सलाछनाचें प्रकरणीं प्रामाण्यास आलेलें खरें असें – त्याचें अपुरेतपण हे आम्हीं आपलें असें म्हणून त्यास आपल्या शिरीं वाहू, व नमस्कारानें त पुरतें करून घेतांच घेतो. असें तें तेथीलचें प्रेमाचें उचंबळणें हें काय बोलण्याचें ? (२२१)

त्याच्या गुणाचें अलंकार हे आम्ही आपल्याच जिव्हानटीस कां जिव्हा जी रससारज्ञा व जिला नेहमीं मधुर रस आवडणारा तिजला ते लेववं. त्याची हीं सद्गुणाची लेणीं आम्ही त्यास लेववून असं. अहो काय सांगावें, एवढेच नव्हे तर, त्याची जी नित्य नवी नवेपण घेऊन असणारी – जिला नाविन्य हें बहुप्रिय आहे – अशी कीर्ति – ( गुणगान महिमा वर्णन ) – महत्त्वबोधन – गृहशृंगार – अहो सौंदर्यावरहि मात करणारी का जिच्यामुळच मुळीं सौंदर्य हें सुंदर झालें अशी जी ह्या जीवदशेची गोडी प्रिय होऊन आहे – प्रिय झाली ती जीवगोडी – ती कीर्तिच एक सर्व सौंदर्य वाहून आहे – तीच आम्ही नेहमीं ऐकण्याचें करूं. श्रवण तेच आम्ही नामगोडीचें करून आपल्या कानीं लेववूं – कानास त्या कीर्तिसुखाचे अलंकार करूं. (२२२)

तो पाहावा हे डोहळे । म्हणऊनि अचक्षूसी मज डोळे ।
हातींचेनि लीलाकमळें । पुजूं तयातें ॥ २२३ ॥
दोंवरी दोनी । भुजा आलों घेऊनी ।
आलिंगावया लागोनी । तयाचें आंग ॥ २२४ ॥
तया संगाचेनि सुरवाडें । मज विदेहा देह धरणें घडे ।
किंबहुना आवडे । निरुपम ॥ २२५ ॥
तेणेंसी आम्हां मैत्र । येथ कायसें विचित्र ।
परी तयाचें चरित्र । ऐकती जे ॥ २२६ ॥
तेहि प्राणापरौतें । आवडती हें निरुतें ।
जे भक्तचरित्रातें । प्रशंसिती ॥ २२७ ॥
जो हा अर्जुना साद्यंत । सांगितला प्रस्तुत ।
भक्तियोग समस्त । योगरूप ॥ २२८ ॥
जे मी प्रीति करी । कां मनीं शिरसा धरी ।
येवढी थोरी । जया स्थितिये ॥ २२९ ॥

(२२४) दोंवरी दोनी भुजा = दोन भुजावर आणखी दोन मिळून चार. आलों = अवतरलों, चतुर्भुजरूप घेऊन आलों. (२२५) सुरवाडें = सुखातिशयानें. (२२७) प्राणापरौतें = प्राणापलीकडे; ते भक्त माझ्या जीवापेक्षाहि मला खरोखर जास्त आवडतात, जे भक्तचारित्र्याची स्तुति करितात. (२२८) साद्यंत = मळ ज्ञानेश्वरींतील आदिअंतासह भक्तियोग समस्त योगरूप = भक्तीने – नितात प्रेमानें – देवाशीं तादात्म्य पावणें ते सर्व – कर्म, ज्ञान इ. योगाचा ज्यात समावेश होईल असा.

याशिवाय तोच पाहावा असा तो परमप्रिय सर्व आनंदच स्थिर होऊन आहे – तोच आम्हीं पाहावा असे डोहळे होऊं लागणारे हे काही नवल नव्हेच. अहो, स्वाभाविकपणेच जीव हा त्या गोडीत रमणारा - ती गोडीच हवी असेच म्हणत असणारा – व आता ते पाहाणे ते कसे साध्य होईल अशी जी उत्सुकता – उत्कंठा – ती पुढे होऊन, तिने तर मला–मी जो अचक्षु असा त्यास – डोळे दिले– त्यास डोळस केले – मजला डोळेच आले ह्या हातीच्या लीलेसच येणारे जे पाहाणे – हस्तरूपी कमळ किंवा कमळासारख्या हाताची लीला ही कमलिनी होऊन आली, व तिने पूजनीय असे ते केले: हाता-मध्ये कमल वाहून आहे अशी जी, किंवा हातच मुळीं कमलासारखा सुदर तेथे तोच मुळीं कमळ होऊन असणारा – तेथे जसे का श्रीलक्ष्मीचे वास्तव्य स्वभावतःच – अशा त्या हाताची लीला ही कमळामध्ये वास करणारी जी श्री तिचीच होय. तेथे आम्ही काय सन्मान कां पूजा कां महत्त्व पाहून असणार नाहीं ? साग बरे, लीला ही लोक झाली, ती प्रकाश पाहूं लागली, आता तेथे ती कमळगर्भा हिचा तो हात, ती लीला, ते कमल व ती पूजा, पूजनीयतेचे महत्त्व घेऊन आहे. असो ! आही येथे ते सर्व झाल्यानें, तेथें आता देवच जसा सर्व चक्षु होऊन आला – तो दिसूं लागला. भावानेच तो देव देखता झाला. असे पूजन त्याचे आम्ही करीत असूं हे केव्हाहि – आम्ही ते पूजन करणारे होतोच होतो. त्याचें पूजन करितोच करितो, हे काय सांगण्याचे का बोलण्याचे ते ? ह्या देहास तर दोनच भुजा, परंतु तेथें काय नुसते ते देहास देहाचे महत्त्व कां सौंदर्य, चारुपण गात्रांचें ते, अहो ! येथे जर ह्या सौभाग्यास पाहूं दिले नाहीं – तेथे त्यास नाविन्यतेचा कां रमणीयतेचा हात पोहोंचला नाहीं, तेथें जीवदशेची गोडी आपल्या गोडिवेस पाहाणारी केली नाहीं, तर नुसते ते तेथे स्तब्धतेचें असणें तें काय सुंदर म्हणावें ? तेथे जर उपचार नाहीं, आचार नाहीं, प्रेमास येऊं देणे नाहीं, प्रीतीचे पांघरूण नाहीं,

तर ते नुसतेंच एका बाहुलीप्रमाणें कां बाहुल्याचें. म्हणून तेथे जे कांहीं ह्या देहानें साधनपर होऊन का त्यास साधनतत्पर करून, म्हणजे सर्व साधनें एकवटून येणारीं आलेली जेथे असा हा देहच मुळीं (त्याचे हातच मुळीं आसन झाले, किंवा जसा हा मनुष्य म्हणजे हातच एक ) व तो आता लालनतेचें पोषण पाहूं केल्यानें, सहजच तेथे प्रीति ही पुढे झाली व तिनें रंगरूपास येऊ केले. ते कसे म्हणाल तर या मनास भाव आणला, जीवितावर त्यास पहुडविले, जीवच आथरला व त्यावर त्यास बसवून आपल्या आरोग्यास ये म्हणूं केले. आता येथे या रचना जर मूर्तिमान नाहीत, तर ते काय कसचे प्रमाचे ? म्हणून येथे ते प्रेम, ती प्रीति, ते सौंदर्य हे स्वभावास पाहावें म्हणून मूर्तवान् झाले त्याने ते मूर्तिमंततेने असणारे ते प्रेमच मुळीं दुसऱ्यामध्ये पाहिले – दुसरेपणाने ते नामारूपास आणूं केलेले: म्हणून आता ते तर प्रत्यक्ष पाहाण्यास मिळाल्यानें, त्यास आनंदाचा एक विलासच मुळीं नांदण्यास येत आहे असे झाले. तेथे आता तर तो जीवदशेचा प्रेमा हा साक्षाततेचें अंग घेऊन ह्या जीवगोडीनें आपल्या जोडीस घेतला. उत्तमत्वाचे जे अंग त्यातच त्या प्रेमास बसविले तेथे राजणे का प्रकाशणे का सुयोजणे हे झाल्याने नाम हेच तेथे आपलेपणास आले व त्याने लग्नच पाहिले. साज सध्य झाले व त्याने हे नामच ते म्हणूं करून जसे कां चतुर्भुज असेच ते रूपास आले, सुविद्य झाले, नाम पाहिले, नर झाले, अपारतेचें झाले – तेथे जसा का देवच पाहिला: सर्वांग हे नामाचे झाले, तेथे आलिंगनच त्या देवनामानें ह्या अंगास देऊन आतां देह देवच झाले असे का न म्हणावें बरें ? तसे प्रेम गांवावरच उभे झाले, देह विसरले, नामच पुढे झाले, त्याने त्या देहास त्या अक्षराचे लेणें केलेले ते नाम सगुण होऊन – चतुर्भज मूर्तिच जशी – व्यवहारास उचलणारी ती व्यक्त – अव्यक्त होऊन आहे. अक्षर मी जो अचक्षु त्यास आता ह्या सुलग्नतेने पाहता येऊं लागले – बोलता येऊं लागलें – व त्यामुळें प्रेमच ते प्रीतीवर उभे झाले, स्पष्टतेस आले – असा मी पहिल्या दोन भुजावर आणिक दोन भुजा घेऊन त्याचे आगच आतां आलिंगावयास आलो. जीवदशेचें तांवुस हसरे प्रेम स्थितीत आले, गुणमयी तेथे नामारूपास आली – अगागाने प्रेमाचा छंदच घेतला. (२२४)

अशा त्या सुखाच्या विश्रांतीमुळे सुखातिशयाने मी जो विदेह त्यास देहा येणें घडते – देह धारण करणे घडते. या देहासच सर्व अलंकार पोहोचविला – देहास आधारभूत केले – देहास सर्व आधारावर उभे केले – असे ते देहाचें जे घडणें, जीवदशेचें प्रेमास येणें – जीवदशाच मुळी गोड अशी प्रेमाची झाली व परस्परानें जे सर्व दिव्यच होऊन असणें, तेथे काय प्रकाशभार म्हणावा का देदीप्यमान म्हणावें, कां सर्व प्रकाश म्हणावें बरें ? तेथे जीवितच सर्व जीऊं लागले, चैतन्यच सर्व प्रेमास आले असे ते पुरुषभाराचे सगुण तेच येथे ( पूर्ण बोधाच्या ) भरास आले : सर्व बोध झाला ज्ञान केवळ झाले. सवित् ही तेथे सम्यक स्वयं – तेथीलच्या सगुण गुणमयीचे प्रत्यक्षत्व हे परम दर्शन होय सर्व विश्व जागे असे ते बोलण्यासच मुळीं येत नाहीं. तेथे सूर्याची उपमा ही पण थोडीच, कारण ज्या ब्रम्हावर ही विश्वप्रतिष्ठा तीच आता प्रतिष्ठेस आली – प्रतीतीची झाली तेथे केवढा बरें आपलेपणा ! का आईबापाचे जसे विसांवणें झालेले सर्व वस्तुजातास प्रेमाचें केल्यानें ह्या ब्रम्हांडात – तेथे आपलेपणाच्या प्रेमाची सोयच झाली असे सर्व विश्व प्रसन्न झाले – मंद हास्य करू लागले – तेथे प्रेम एक जे ते मूर्त झाले – व आतां देहामधील जे अणुअणु, रेणुरेणु ते सर्व जसे सर्व ब्रम्हांडातील असे होऊन अतितरतेस येणें कां अतित होऊन असणें असे ते काय बोलण्यापलीकडचे होय म्हणून आपण जो उचललेला भार तोच प्रेमाचा करून त्यांतच रममाण होणें हेच एक त्या तेथीलच्या गोडीसहि उल्लंघून सर्व गोड अशी प्रेमाची जोडच झाली. तेथील आवड ही सौम्य, सुखकर, हळुवार, उपमारहित अशी असल्यानें, ती गोडी जेव्हां स्वतः व्हावें, तेव्हांच ती प्रतीतीनें आपलीशी हे णागी मग तेथे वाखाणणें, बोलणे ते कसचें ? उपमा ही पाहूं लागली – डोळस झाली – मूर्त झाली – आतां तेथे जे कांहीं पूर्वतरचें जे जुने पुराणे अतिपुरातनचें

तेच आपल्या उज्जीवनास आल्यानें ते पुरातन आता नवेंपणास येऊन जीविताचें झालें : तेथें सर्व प्रेमच डोळस झालें – रूपास आलें – असे काय तेथें केवढा बरें भार – तो काय बोलविला जाणारा केव्हाहि नव्हे : म्हणून निरुपम असे तें स्वतः स्वतःसारखेंच, प्रेम ते प्रेमासारखेंच, देवता देवतेसारखीच, चतुर्भुज ते सगुणासारखेंच – त्यास उपमा मुळीं नाहींच – ते त्यासारखेंच : देव देवासारखाच : म्हणून देवच व्हावें तेव्हाच ते देवपण कसलें असतें तें अनुभविलें जाईल : येथें देहानें – विदेहानें – देहासहित विदेह व आता येथें योग योग जो तोच आपल्या प्रसन्नतेचा झाल्यानें पुन्हां त्याने देहास येणें, त्याचे देह धारणें घडणे हें काय त्या सुखाची परम अशी – परिपूर्ण अशी – सौंदर्यसीमेची सीमाच होय : येथें प्रदक्षिणा झाली व आता काय कांहीं प्रेम जे ईश्वराचे अनिर्वचनीयत्व तेच सर्व सर्वोत्तम सर्व भाराचें प्रेमच असे कोण म्हणणार बरें नाहीं ? असे ते देहविदेह – विदेहाने देह धरणे हे केवढया भाराचे बोलणे ते अनुभवलेले बरेच बरें ! (२२५)

आतां येथें मैत्री झाली असे म्हणणे ते तर विचित्र असे सहजच प्रेम तें सहजस्वभावाचे प्रेमकलत्राच जसे, तेथे तें बोलणे तरी कसचें ? सर्व मैत्री मूर्तिमंत मैत्रच एक, तेव्हा आता केवढा आदर, केवढे प्रेम, केवढे आपलेपण, काय एकत्व, काय जीवित सर्व ते एकपणास आलेले – तेथे ते बोलून कां बोलले तरी काय प्रेमाचें होईल ? प्रेमाचे व्हावें असेच तेथे ते श्रवणाचे महत्त्व : ते आनंदाश्रूंनीं मूर्त व्हावे – मूर्त झालें असेच आहे असे तें ऐकणे हेहि पण त्या प्रेमांत बसण्यास मिळाल्यामुळे आपल्या भारास आलेले होतें : तेथें जीविताची सर्व इच्छा ही पूर्ण झाली : असे परम विश्रांतीचे – सौख्याचें – निरुपम असेच जीवित सर्व समाधान झालें, आपल्या गोडीनें जोडीस आलें असेच होय. (२२६)

भक्तचरित्रानें जे होणें ते जे ऐकतात तेहि प्रशंसाप्रशस्त झाल्यानें हे मनच मुळीं उदार तत्त्वाचें परिपालन – परिशीलन – झाल्यानें, आपल्या मोठेपणास येऊन, महान् होतात. ते प्राणापेक्षांहि प्रिय होऊन आवडणारे होतात जे का या भक्तचरित्राते गातात असे ते चरित्र गाणें तें गाणेच मुळीं ते झाल्याने, तेथें गायन हेंच भक्त झालें, प्रेम झालें, तेथे सर्व आवड त्या गायनांत येऊन बसल्यामुळे, तेथें चरित्रच मुळीं चारित्र्याचें झालें. त्यानें आपलेपण हे जसे युगाचीं युगें गेलीं तरी नेहमींच्या जीविताचें केव्हांहि जागतेपणच एक तेथें – जागती ज्योतच ती – तेथे ज्ञानज्योत ही परम आनंदाची कला, जीवन हे सर्व कलेचे झाल्यानें, तेथील ते चरित्र कां प्रेम कां भक्ति का भक्त कां डोळस का जागती ज्योत हे काय बोलण्यासारखें नसून ते प्रेमच सर्व चराचरास दिलेलें सर्व विश्व प्रसन्न झालें असे. तेथें प्रतिष्ठाच ह्या ब्रम्हास दिली व त्यास आपल्या खरेपणाच्या प्रतिष्ठेवर उभे केलें – महत्त्व दिलें – प्राणप्रियतेस आणिलें – मूर्त झालें – सुंदरतेच्या सौंदर्याचें झालें – तेथें प्रेम हेंच मुळीं आपलें रंग उचलूं लागल्यानें सर्व आनंदाचे रहस्यबीजाचे ते झालें – तेथे आता काय देवत्वच ते तेथे सर्व जीवितभार हाच ओतला गेला व तेथें प्रशस्ति ही प्रशंसेची झाली – प्रसन्न झाली. (२२७)

हे जे सांगितलेलें किंवा हा जो, हे अर्जुना, आतांपर्यंत सांगितलेला तो साद्यंत असा आदिअंतासह भक्तियोग होय तेथें प्रस्तुततेनें सांगितलेलें जे ते सर्व ते समस्त योगरूप होय. येथे योगानें, भक्तीनें रूपास येणें केलेलें योग म्हणजे ज्या क्रियेनें ते भक्तिबीज शोभविलें जातें तेच मुळीं येथे सर्वपणें ( सर्व म्हणजे कर्म, ज्ञान, इ. योगाचा ज्यांत समावेश होईल असा सर्व योगांचा भक्तियोगाशीं समन्वय ) रूपास आलें. तेथें आतां प्रत्यक्षत्वाचे पूर्णपणच होय. योग रूपास आला, देव झाला, तेथे काय आतां दुसरा तिसरा कां कोठीलचा एकादा आपणयाचा नसून जो प्रत्यक्ष भगवंत जो श्रीकृष्ण महायोगेश्वर हरिच तो तोच मुळीं येथे रूपास आला, स्वरुपाचा झालेला कां नव्हे बरें ? योग जो येथील श्री तो श्रीकृष्ण येथे आतां साद्यंतपणें सांगितलेला प्रेमाचा झाला, पूर्ण योगच जसा मूर्तिमंत ! (२२८)

तेथें आतां प्रीति गिरसावंद्य कां थोरी त्या भक्तियोगस्थितीस आलेली – तेथें जसें कांहीं ते यज, तप का दान हेंच सर्व आपापलेपण पाहूं करून मूर्तिमान झाले – जसे कां त्यानीं देहच धरणे केले – देहवन हांण केले - व आतां येथें ते ते गुण हे अनेक मूर्तींनीं घडले गेले – मूर्तींमध्ये विलसूं लागल्यानें तेथ योग्यच कीं अहो असें म्हणणें कीं जसा का त्या देवाचा – त्या श्रीकृष्णाचा – जसा हा अतिप्रीतीचा ह्ा योगच वर आला. (२२९)

**ये तु धर्म्यामृतमिदं यथोक्तं पर्युपासते ।**
**श्रद्धधाना मत्परमा भक्तास्तेऽतीव मे प्रियाः ॥ २० ॥**

इति श्रीमद्भगवद्गीतासूपनिषत्सु ब्रम्हविद्यायां योगशास्त्रे श्रीकृष्णार्जुनसंवादे
भक्तियोगो नाम द्वादशोऽध्याय. । ॐ तत्सदिति श्रीकृष्णार्पणमस्तु ॥

तु = तात्पर्य. श्रद्धधानाः = अत्यंत श्रद्धावान : कल्याणाच्या इच्छेनें श्रद्धा ठेवून आचरण करणारे, येथें श्रद्धा हीच आपलेपणाप्रत येत असलेली अशी आहे व ती माझे ठिकाणीं परम म्हणजे श्रेष्ठ अशा प्रकारच्या पुरुषार्थानें असलेली व तिने युक्त होत्साते जे आचरण करितात ते मला (परमेश्वराला) फारच प्रिय होतात : ते अभेदत्वानें असण्याचा अभ्यास करितात. मत्परमाः = ईश्वरपरायण, माझे एकनिष्ठ भक्त. धर्म्यामृतम् = धर्मरहस्यरूपीं धर्मशील अमृत. पर्युपासते = अनुवृत्तीचें अनुष्ठान करतात, अनुष्ठितात.

अति + इव = जसा कां तो गणपतीच कां गणेंद्रच त्याचे महत्त्व घेऊन असलेला - देवा गणपति ह्या मायेस उल्लघून ईशाचरणींचा प्रकाश करणारा. अतितरतेचें गम्य रम्य गण्य असे जे अगम्य, अगण्य असे रम्य झाले, रम्यतेस आले : तेथें सर्व काया सुंदर झाली – गुणास उल्लंघून महत्त्व घेऊन आहे – महान अशी झाली : महत्तत्व जे तेच सर्व तिने आपलेसें केले - गुणमयीच ती झाली. मत्परमाः = श्रद्धा ही पुरुष झाली, पुरुषाच्या अभिधानाची झाली, श्रद्धा नामाची झाली

तु ये श्रद्धधानाः मत्परमाः भक्ताः यथोक्तम् इदम् धर्म्यामृतम् पर्युपासते, ते मे अतीव प्रिया. ।

जे श्रद्धावान् पुरुष असे हे पवित्र अमृततुल्य — धर्माचरणास योग्य असें धर्म्य — अमृततत्त्व त्या तेथीलच्या गुणधर्मास आणण्याकरितां ईश्वरपरायणता एकातादिनी अनुष्ठितात, त्याच्या आश्रयास राहतात, तेच होऊन असतात, असे ते, श्रद्धाच सर्व पुरुष झाली असे मतिमान, माझ्या आश्रयास राहातात, स्वामीच मानतात, स्वामीच होतात असे जे भक्त, ते मला अति अति प्रिय आहेत. प्रिया· असें ते वल्लभत्वच एक अलकृत झाले.

जे श्रद्धावान् पुरुष मत्परायण होऊन या वर सांगितलेल्या धर्ममय अमृताची – अमृततुल्य धर्माची — उपासना करितात ते भक्त तर मला अतिशय प्रिय होतात.

**ते हे गोष्टी रम्य । अमृतधारा धर्म्य ।**
**करिती प्रतीतिगम्य । आइकौनि जे ॥ २३० ॥**
**तैसीचि श्रद्धेचेनि आदरें । तयाचिया ठाई विस्तारे ।**
**जीवीं जया थारे । जे अनुवृत्ति ॥ २३१ ॥**
**सुपरी निरुपिली जैसी । तैसीच स्थिति मानसीं ।**
**मग सुक्षेत्रीं जैसी । पेरणी जाहली ॥ २३२ ॥**

परी मातें परम करुनि । इये अर्थी प्रेम धरुनि ।
हेंचि सर्वस्वें मानुनि । घेती जे पैं ॥ २३३ ॥
पार्था गा इये जगीं । तेचि भक्त तेचि योगी ।
उत्कंठा तयालागीं । अखंड मज ॥ २३४ ॥
ते तीर्थ ते क्षेत्र । जगीं तेचि पवित्र ।
भक्तिकथेसी मैत्र । जयां पुरुषां ॥ २३५ ॥
आम्ही करूं तयांचें ध्यान । ते आमुचें देवतार्चन ।
ते वांचून आन । गोमटें न मनूं ॥ २३६ ॥
तयांचें आम्हां व्यसन । ते आमुचें निधिनिधान ।
किंबहुना समाधान । ते मिळती तैं ॥ २३७ ॥
पैं प्रेमळाची वार्ता । जे अनुवादती पांडुसुता ।
ते मानूं परम देवता । आपुली आम्ही ॥ २३८ ॥

(२३०) धर्म्य=धर्मानुकूल, धर्मशील. करिती प्रतीतिगम्य=अनुभवास आणतात. (२३१) जीवीं जया थारे = ज्याच्या अंतःकरणांत हा भक्तियोग उत्तम तऱ्हेनें ठसतो. अनुवृत्ति – अनुष्ठिती. (२३२) सुपरी – परी. तैसीच – तैसिये. सुक्षेत्रीं = उत्तम शेतांत (२३३) मातें परम करुनि=मला अत्यंत जीवाभावापलीकडील श्रेष्ठतेचे करून. (२३४) अशा प्रकारचा जो परम भक्त असतो तोचि योगी, त्या भक्ताची कधीं भेट होईल अशी आवड मला सतत असते. (२३७) निधिनिधान – निधान. (२३८) अनुवादती=शद्धानीं दुसऱ्यास सांगतात.

अमृतधारा ही गुणाची झाली – तेथीलचे रम्यत्व पाहिले - प्रतीति आली अनुभवास आणिली – असे जे ह्या अमृतपणाच्या रम्यतेची नवाई ऐकून करतात – (धर्मपणास येण्याचें अनुकूल असे तें अमृतत्त्व ) : (२३०)

तसेच किंवा परंतु, तेथील जे निरूपिलेले अमृतत्व – निरूपिलेली स्थिति – होऊन आहेत – सर्व मानस त्याच स्थितीचे (प्रकाशक सत्व गुण जो, क्रियारूप रज जो व स्थितिरूप तम जो – जसे पूर्ण देवत्वच गुणातीतचे) झाले, तर मग काय बहारच ती जशी कां उत्तम अशा क्षेत्रात – शेतांत पेरणीच झाली – तेथीलचें पीक अपार असेच ह्या शुद्ध मानसाच्या रम्यरमणीय स्थितीवरून लक्ष्यांत येणारे! (२३१)

श्रद्धाच सर्व आदर होऊन आली व तिनें अनुअनु, दिनदिन, दिवसेदिवस, तेंच ते फिरफिरून स्थितिरूप होणे केले – ती वृत्तिच एक एकसारखी ह्या जीवदशेत आपला विस्तार घेऊन आहे – पुरुषच होऊन आहे अर्थच ज्याचे ठिकाणीं – अनुष्ठिती चर्याच एक तेथे – पुरुषपणाचा विस्तार घेऊन विस्तारलेला होऊन आहे – आपल्या जीवींचे ते गुरुष झाले असेच जे होऊन – करून आहेत – ज्यांच्या अंतःकरणात हा भक्तियोग उत्तम तऱ्हेने ठसतो – " पीठच " होऊन असतो – वडीलपणास येतो – थोरपणाचा होतो – असे ते झाले. (२३२)

याहिवर ते तर मलाच महत्त्व देणारे झाले – परम, दीर्घ प्रतिष्ठेनें अति श्रेष्ठतेचें ते माझे असणे असेच त्यांनीं संपूर्णपणें मानिलें–मला सांगितलेले हेंच आपलें सर्वस्व असे मानून त्यानीं तें घेतलें – आपल्या सर्वस्वाचें केलें – कसें तर ह्या येथीलच्या अर्थावर प्रेम ठेवून, प्रेमाचे असेच हे त्यांनीं तेथीलचे अर्थ( महत्त्व, योग्यता, सीमा, श्रेष्ठत्व, गहनत्व, गम्यत्व) रमणीयतेच्या प्रेमाचे केले – असे ते करतात. (२३३)

हे पार्था, असे या जगामध्ये जे तेच भक्त होत, तेच योगी होत व तेच माझ्या प्रेमाचे होत. अशांच्या प्रेमासाठीं मी तर अखंड उत्सुक असलेला – कधीं बरे तें प्रेम भेटेल अशी आवड घेऊन

असतो – अत्यंत उत्कंठित असें माझें मन ( त्यांच्याकरितां ) ते पाहाण्याकरितां असतें. येथे जसें तो सर्व योगच एकवटलेला जरी तो निरनिराळेपणानें काय बुद्धि, काय ज्ञान, कां काय कर्म असे सविस्तरतेचें निरनिराळेपणानें बोलिलेलें जरी तरी तें सर्व ह्याच्यामध्यें एकवटून आले असे जे तेच काय मग न म्हणावेत कीं ते भक्तच होत, ते योगीच होत, ते ज्ञानीच होत व अशांच्या भेटीची जेवढी केवढी तरी उत्कंठा उत्सुकता माझ्या ठिकाणीं असावी हे केव्हांहि साहजिकच ! (२३४)

तीर्थांना तीर्थत्व (रूप कां स्वरूप असे) त्यांच्यामुळेच आले – अहो, क्षेत्र (पुण्यभूमि, शरीर, शेत) जें तेंहि पण त्यांच्याचमुळे क्षेत्रपणाचा (देहदिवसाचा – उमलेलेलें फूल) बाणा पाहूं केलेलें – तें आताच पाहूं लागलें – एवढेच नव्हे तर, काय सांगावें तेथीलचें महिमान कीं, वा रे, तेच ते पावित्र्याचें मूर्तिमंत असे ' ज्ञेयच ' जे तें ह्यांच्यामुळेच पवित्र झालें – व अशा ह्या गोष्टी म्हणज त्यांचें तें भित्रपण हे भक्तिकथेची रम्यताच मुळीं आपलें रम्यपण – प्रियपण पाहूं लागली – पाहाण्यास आली – असे ते पुरुष होत – त्यांनीं पौरुषाचा पुरुषच तो पुरुषत्वास आणिला – पुरुषाचा केला – पुरुषच तो प्रत्यक्षास आला असे ते होत. (२३५)

मग अशाचेंच आम्ही सर्वथा ध्यान करणारे व्हावेत हें कांहीं काय नवल कसचे ! आम्ही त्याचें ध्यानच करतों – तेंच आमचें सर्व देवतार्चन होय व त्याच्याशिवाय, त्याच्यावाचून, दुसरें काहींहि आम्हीं गोमटें कां चांगलें मानूंच नये हें केव्हाहि – त्याच्यावांचून दुसरें कांहींहि आम्ही गोमटे ( मनास आवडणारें चित्रांतल्या बाहुलीसारखे रेखीव सुंदर) असे न मनूं – न मानूं – मानीत नाहीं – दुसरे काहींच आम्हास त्याहून आवडणारे असे नाहींच. (२३६)

त्याचें आम्हांस व्यसन – आमचें निधिनिधान – तें सर्व निधींचें निधानच एक – बहुत काय लिहिणे, परंतु ते मिळाले तरच आम्हांस परम समाधान भेटणारे : आवड म्हणावी तर तेथें लाजणें ते का ? तसेच व्यसन म्हटलें तर तेथें अखंड रात्रदिवस तेथेच असणे – तेथे शिणणें तें नाहींच – आम्ही तेच ते पाहाण्यास, त्याना भेटतांना श्रम झाले तर तेथे केव्हाहि शिणत नाहीं – सर्व ठेवींचा जो ठेवा असे महागुप्त धनच तें असे ते आम्हास होत – तेथेच म्हणजे ते भेटले तरच आम्हास परम समाधान वाटते. (२३७)

प्रेमळाची वार्ता ( गोष्ट, हकीकत) मात, गुह्य, भाडवल, वर्ताा, वागणूक, चालचलणूक, वर्तन, प्रवर्तन, वर्तणें, व्यवहार, सहज व्यवहार, वागविणें, सुनंदाचें जागणे, वाक् – वाग् – वागणें – वर्तन्, जे अनुवादण्याचें करतात – बोलण्यास घेतात – बोलण्याचें करितात – तेच एक नेहमीं अनु अनुकरू जसा – तेच एक महत्त्वास घेऊन आदरास आणून, उत्तमत्व सर्व तेथे रंगले असे जे सांगतात – पढियंता भावच तेथें शिकविणारा झाला – शिकणारा संग्रहाचा झाला – कां जेथें देवहि आपण व भक्तहि पण स्वतःच असें जे दोन्हीं ठायीं स्वतःस वाटवून घेऊन तेथील रम्यतेची नवीनता नवलाई ही ज्यांनीं अनु अनु अशी एकसारखेपणानें, केव्हाहि तेथें खुटणेच नाहीं अशा दीर्घपणानें का परम आदरानें सांगितली, त्यांना तर आम्ही आपली परम श्रेष्ठ अशी देवता समजूं – मानूं : तें जेथें ह्या देहाचें जे मनुष्यपण तें जसे देवत्वावर उभे झालें – सर्व देवता तेथे एकत्रित होऊन आहेत असे आम्ही त्यास देवतांचें एक आलय असेच जसे आम्ही त्यास मानतों – मानूंच मानूं – समजतोंच कीं अहो – असे ते देव दुसऱ्यांना सांगत आहेत. (२३८)

**ऐसें निजजनानंदें । तेणें जगदादिकंदें ।**
**बोलिलें श्रीमुकुंदें । संजयो म्हणे ॥ २३९ ॥**
**राया जो निर्मळु । निष्कलंक लोककृपाळु ।**
**शरणागता स्नेहाळु । शरण्यु जो ॥ २४० ॥**

पैं सुरसहायशीळु । लोकलालनलीळु ।
प्रणतप्रतिपाळु । हा खेळु जयाचा ॥ २४१ ॥
जो धर्मकीर्तिधवळु । अगाध दातृत्वें सरळु ।
अतुल बळें प्रबळु । बळिबंधनु ॥ २४२ ॥
जो भक्तजनवत्सलु । प्रेमळजनप्रांजळु ।
सत्यसेतुसरळु । कलानिधि ॥ २४३ ॥
तो श्रीकृष्ण वैकुंठीचा । चक्रवर्ती निजांचा ।
सांगतुसे येरु दैवाचा । आईकतसे ॥ २४४ ॥
आतां यावरी । निरुपिती परी ।
संजयो म्हणे अवधारीं । धृतराष्ट्रातें ॥ २४५ ॥
तेचि रसाळ कथा । मऱ्हाठिया परिपथा ।
आणिजैल आतां । अवधारिजो ॥ २४६ ॥
ज्ञानदेवो म्हणे तुम्ही । संत वोळगावेति आम्हीं ।
हें पढविलें स्वामी । श्रीनिवृत्तिनाथें ॥ २४७ ॥

इति श्रीज्ञानदेवविरचितायां भावार्थदीपिकायां द्वादशोऽध्यायः ॥

श्लोक २०, टीका २४७ एवं २६७ ॥

(२४०) निष्कलंक=शुद्ध, निर्मल. शरण्य=शरण जाण्यास योग्य (२४१) सुरसहायशीळ – साहयशीळु – सहायशीळ=देवाना साहयभूत होणे हाच ज्याचा स्वभाव प्रणतप्रतिपाळु=शरणागतांचें रक्षण करणारा. (२४२) बळिबंधनु=बळीच्या प्रेमास भुलून त्याचा द्वारपाळ झालेला. (२४३) प्रेमळजनप्राजळु=प्रेमळ भक्तांना सुलभ सरळु – सकलु सत्यसेतु=सत्य हेच ज्याचे ब्रीद त्याना तारून नेणारा. (२४४) चक्रवर्ति निजाचा=भक्ताचा स्वामी. (२४५) परी=पद्धति. येरू दैवाचा= सभाग्य अर्जुन. (२४६) परिपथा – प्रतिपथा=मार्गाने, भाषेने, मराठीच्या द्वाराने (२४७) वोळगावेति=भजावेत श्रीनिवृत्तिनाथ म्हणतात गुरुदेवाकडून संतसेवा करणे शिकलों.

संजय म्हणाला, असे आपले म्हणविलेले जे त्याना पाहून जसे का एक जनपदच वसविले, तेथे जनांमुळे का जनाजनांच्यावर उभे झालेले ते पद, तेथीलचा सर्व आनंद रमणीयतेचा असा त्या जनपदास रमणीयत्वाचें करून आनंद मानणारे असे ते श्रीमुकुंदरूपी श्रीकृष्ण!!! त्याचप्रमाणे या विश्वाचे जे मूळ, या जगताचे जे आदि, हे जगच मुळीं ज्या कारणावर उभे झाले आहे तेथीलच्या मुळाशीं असलेला आनंदाचा पिंडच – शिवप्रेमपिंडच – ते कां आदिजगत्कंद असे ते श्रीमुकुंदरूप श्रीकृष्ण त्यानीं असे म्हटले. प्रेमळ जनाना आनंददायक – प्रेमी जनांचा आनंद–असे निजजनानंद – आदिजगत्कंद का जगत – आदि – कंद – जगाचा आदि आनंद – असे ते देवकीनंदन – जगतामधील प्रथमचा – पहिल्या दर्जाचा – आनंद पाहणारे : (२३९.)

हे राया धृतराष्ट्रा, असे भगवान् श्रीगोपाळकृष्ण ते कसे म्हणशील तर प्रथमपणानें श्रेष्ठ, स्वच्छपणाने शुद्ध, व कलंकरहिततेने निर्मळ – परमेष्ट असेच – लोकांनीं त्यांना ब्रम्हाच एक कां देवच एक असे मानलेले–तेथे काय अहो! ते देव कां भक्त म्हणणें–जेथे दुजेपण हें शिवतसुद्धां नाहीं – विचारास येत नाहीं–असे ते लांछनरहित असे संतांचें दर्शनच एक – ज्यामुळे धन्यपण येऊन सर्व हा संसार – पुण्यरूप झाला – असे ते एक एक ती मूर्तिमान् दयाच होऊन आहे असे ते दयावंत व्हा! रक्षण करणारे व्हा!

आहेतच आहेत असा ज्यांचा लोकांनीं आश्रय केलेला – शरणागताचा प्रेमळपणाने प्रतिपाळ करणारे – त्याना सांभाळणारे ते–व जे संरक्षणरूपी घरच होऊन आहेत असे ते–शरण्य म्हणजे शरण जाण्यास योग्य असे–आश्रित होण्यास कां त्यांचा आश्रय घेण्यास पूज्य असे (२५०)

सुर म्हणजे देवांना साहाय्य करणे हेच ज्याचे शील, कां आवड, का स्वभाव, कां इच्छा असणारे असें लोकांचे लालनपालनादि पोषण हे सौंदर्यच एक, का मधुरताच एक आपल्या बहारीची – तसेच पोषण ते क्रीडेनें, कां विलासाने, शोभेनें ज्याची लीलाच एक – शरणागताचे सरक्षण, प्रतिपाळ सहज लीलेने करणारे अहो ! असे ते ज्यांच्या हातचा खेळच जसा असे ते श्रीकृष्ण !

धर्मकीर्ति ती पुण्यरूप कीर्तिच ! सोज्वळ यशच तें, कां लौकिकच तो–ढवळा महादेवच जसा का, का स्वामीच ते जसे शतेषु जायते शूरः सहस्रेषु च पण्डितः । वक्ता दशसहस्रेषु दाता भवति वा न वा ॥ ‘ दाता भवति वा न वा ’ ची कोटी ज्यानीं आपले सर्व ईश्वरत्व ती कोटी भरून काढण्याकडे लाविलेली असे ते अतुळ बळाचे असे – शक्तीचे – महाबळवान असे – प्रबळ ते – भक्तीमुळे बांधले गेले ऋणीच करून ठेविले त्या बळीनें त्याना – ज्यानें आपले सर्वस्व आत्मनिवेदनाने श्रीगुरुचरणींच का देवचरणीं वाहिलेले – असे भक्तऋणी ते.

दान देऊन कां दान घेऊन, भक्त होऊन का देव व भक्त दोन्हीहि बाजू आपण होऊन त्रिपाद भूमि दान दिली का या सर्वस्वाचे आत्मनिवेदन केले – कां भूमि सर्व आक्रमण झाल्यावर तिसरा पाय तो कोठे ठेवूं असे म्हणून देवानीं ज्या बळीस देवमाहात्म्याने बाधून टाकले – का भक्त असा तो बळी त्याने आपल्या देवप्रेमाने सर्व देह अर्पण करून देवास ऋणी केले का देव हा भक्ताचा ऋणी झाला – येथे ऋणी ते कोण व बंधन ते कोणास – का द्वारपाळपणच एक पत्करणे ते जसे हे विचित्रच एक असे देवमाहात्म्याचे ! तेथें प्रेमाला भुलून जाऊन देव बळीचे बळीबंधन होऊन द्वारपाळ झाले – असा देव भक्तीनें देहच सर्व अर्पण करून बाधला गेला असे विचित्र तऱ्हेचे या भक्तिचरित्राचे का भक्तिमहिम्याचे गायनच एक – गुणगानच एक – असे ते देव – जे मुकुंदरूपी जेथे सर्व लक्ष्मीच स्थिर झाली – जेथे सर्व लक्षण लक्षण्य. लक्ष्मीवान असे ते श्रीकृष्ण ! म्हणून येथे दोनी बाजू आपणच झालेले ते काय देव का भक्त बाजू आपणच होऊन स्वामीसेवासबंध दृढ केलेले अशी ही भक्ताकोटी अति विचित्र असून तेथे देवदिव्य असे ते सर्व होय.

तेथे एक गोष्ट पुढे करावीशी वाटते ती ही कीं, जर स्वत त्या प्रेमाचा नच झाला, ह्या मायाक्रीडेचे मोकळे असणे – या मनास बंधनच नच असणे – जेथे प्रेमच एक ह्या व्यक्तिमात्राचे, का जीवदशेचें का स्वतःबद्दलचे – ते जर नच होणे केले, तर हे जीवित कां हे प्रेम, कां जीवित प्रेम हे तर कुणाचे असें तेथे विचारणे होते म्हणून ज्यानं त्यानें केव्हाहि सर्व काळीं स्वप्रेम – जीवितगोडी – हे एकाग्रतेने, भक्तीनें साधावेंच साधावें, तरच मग येथे डाव जो येतो तो दूर होऊन तेथे देवच एक या जीवदशेचें दिव्य होय तेच ते परम दयाळु देव स्थिर करणारे होतात – असे सहजच म्हणून येथे ही देहबुद्धीची कसोटी हो ह्या प्रेमावर का प्रीतिवर घासून प्रेमच एक व्हावे, तरच मग देहबुद्धि ती रुपातराने आता प्रीति का प्रेम झाल्याने तेथे व्यक्तीवर डाव येत नाहीं. असे हे चरित्रच एक या जीवदशा गोडीच्या प्रेमाचे. तेथे प्रेमच एक होऊन असावे हे बरे. येथे वाटच बांधली गेली – एक सरळ मोकळीकच तेथे वाट ही बाधली गेल्याने वाटवध करणारीं हीं महदादि पदे भक्तिबीजाशिवाय असणाराना आडविणारीं अशीं तीं होत नाहींत. येथे भक्तिकोटी ही परम सीमेची एक महती असून ती कोटी सर्वार्थपणे जाणली जावी हे बरे. येथे योग का भक्ति हीच मुळीं सर्व कांहीं आक्रमण करून असणारी असल्याने, तेथे ही क्रिया ही स्थितीची व्हावी व प्रेम हे खरेखुरेपणाने महत्त्वच घेऊन असावे तरच बरे. ते आपल्या अंतिमतेचे

असावें – तेथें मग हीं जन्मजोडी आपल्या गोडीची झाल्यानें तेथें कसलाहि बाध येऊं शकणारा न॰हे. (२४१, २४२)

भक्तजनांचें वात्सल्य, प्रेमळजनांशीं मोकळया अंतकरणानें वागणारे, जनांना प्रांजळ म्हणजे सहज, सत्याला सेतु म्हणजे खऱ्या रीतीनें जागणाऱ्याचे तारक असे सरळ, जे सर्व कलांचे विधिच, शोभा, सामर्थ्य, सांठा, संचय जे – असे ते श्रीकृष्ण ! (२४३)

असे ते वैकुंठीचे भगवान निजनारायणच ते ! ही निद्रा कां अज्ञान जें आहे ते या देहबुद्धीवर टेकणारें असल्यानं तेथे देहबुद्धि सोडून जे आपलें निज – स्वजीवित – तत्त्व तेंच जे सर्वपणें तेथीलचे चक्रवर्तीच जसे कां एक – कां सर्व ज्ञान होण्याचें महाव्रतच ज्यांनीं घेतलें आहे – असे सार्वभौम कां भक्तांचे राजेच एक – असे ते चिदानंदरूपी श्रीकृष्ण तेच मुळीं या प्रेमाबद्दलची कथा कां आनंद हे सांगत आहेत – कां अमृतवचनें सांगत आहेत व दैवानें सभाग्य असा तो अर्जुन ते ऐकत आहे. " तेथें जसे का चित्तास भोंवणारा संकोच तो का ? बहुताचें जे सुख – बहुतांना जे सुख देणारे तेंच करावें, या भूतांचें पालन म्हणजेच देवाचें पूजन. येथे मत्सर तो जसा का सर्वांनाच शिण देणें होय अहो, रुसून असणे का फुगून असणें तें आपल्यावरच करीत असावें, मग तेथे जे कांहीं उरतें ते हरितत्त्वच एक ! यासच दुसरे नांव तें सतपण होय; अशा तऱ्हेने सगळयाचा जीवच आपण होऊन असणें ते झाले तरच संतपण शोभविले. शीण जो – बहुताना शिणविणें जे तें – असंत असे लक्षण म्हटले जाते. तेथं या मानासच निष्ठुरतेनें वागविले कां अतिवादाचे केले : अहो ! अंतरामध्ये जे तेंच बाहेर उमटणार – तेथे मग ओळखीच जशी आपोआप झाली : येथे चित्तानें निर्मळ व संतुष्ट असा जो तेथे समय कां वेळ ही संत झाली – आतां संत तेच समय होत व ओळख ती वेळ होय : तेथे हितच एक उचित का अनुचित हेच नित्य विचारावे लागतें. " तुका (२४४)

आता यावर निरुपणाची रीति, पद्धत, प्रकार, धाटी, प्रकारणा, प्रकार, प्रकाराप्रकारानें निरोपणास घेतलेली तीबद्दल संजय राजा धृतराष्ट्रास म्हणं लागला कीं, ती आतां ऐकण्याचें करावे. ती रसाळ कथा मराठीच्या मार्गानें द्वारावर आणून सांगण्याचें करतों. अशी ती रसाळ कथा चहूबाजूंनीं परोपरींनीं – सर्वतोपरी – पुन्हां पुन्हा मार्गावर आणून सांगण्याचें करतों. मराठीच्या मार्गानें – द्वारानें – परि म्हणजे चहूंबाजूंनीं – चहूंकडे – सरळ रस्त्यावर आणून – द्वारावर आणण्याचें करतों – मार्गावर आणण्याचें करतो – तें अवधारावे अमृतवाणीची अशी ती रसाळ कथा तो मार्गच पुन्हां पुन्हां शोधिला – असे मार्गावर आणून ती सांगण्याचें करतों. मार्गामार्गाचें सांकडे भेदून मराठीचे अनुमोदन घेऊन म्हणजे अनुमोदनाने सरळ रस्त्यावर आणून सोडतो. ज्ञानव्यवस्था, कीर्ति कां जो आशय तो अनुमोदनास घेऊन, उपायास आणून, निर्धाराचे होऊन, भाषेची संमति घेऊन, तिजकडून मान्य झाल्यावर, नीट वाटेवर आणून सोडतों हा पथ जो आहे तो तिच्या मार्गानें प्रकाशित करून सांगण्याचे करतों. तें अवधारावे. (२४६)

ज्ञानदेव म्हणतात, तुम्हीं आम्हीं संतांना शरण जाऊन त्यांना सेवावें असें स्वामी श्रीनिवृत्तिदेवांनीं निवृत्तिनाथांनीं मजला पढविलें. ही संतसेवेची शिकवण – संतसेवा कशी करावी तें – निवृत्तिदेवांनी मला शिकविलें – ते मी त्यांच्यापासून शिकलों मराठीशीं बोलण्यानें संवाद करण्यास सुख येईल. तो संवाद सुखरूप होईल. दुसऱ्या मार्गाला तेथीलचा संचार करणारा सांपडेल. प्रश्नास उत्तर देणारा भेटेल. किंवा प्रति उत्थान देऊन किंवा घेऊन संवाद करील असा. (२४७)

॥ इति शुभं भवतु ॥

*

## मुक्त कां बद्ध भ्रामक

अत्यंत जड अशा आकारापासून तों बुद्धितत्त्वापर्यंत सर्व विश्व हें प्रकृतीचें कार्य आहे असें सांख्य मत आहे. प्रकृतीच्या पलीकडे पुरुष असून ते अनंत व निर्गुण आहेत – ते निर्गुण असतांहि सुखी अथवा दुःखी असे आढळून येतात, याचें कारण काय ? हें परावर्तनाचे कार्य आहे असे सांख्य मत आहे. पांढऱ्या स्वच्छ स्फटिकाच्या मागे लाल रंगाचें फूल ठेविले, तर तो स्फटिक पांढरा असतांहि लाल दिसूं लागतो. त्याचप्रमाणें आत्मा अथवा पुरुष स्वतः निर्गुण असतांहि परावर्तनामुळे सुखी अगर दुःखी असा भासूं लागतो. आत्मा प्रकृतीच्या बाहेर आहे. तो प्रकृतीहून सर्वथैव निराळा असून प्रकृतीच्या आटोक्यांत कधींहि न येणारा असा आहे. प्रकृति आणि पुरुष हीं दोन्हींहि अनंत काल विभक्तच राहावयाची. बुद्धि ही मिश्ररूप असून ती कमी अगर अधिक होते, तसेच ती शरीराप्रमाणें बदलणारी असून जवळ जवळ शरीरासारखेच तिचे धर्म आहेत. आपल्या हाताच्या नखाचा शरीराशीं जो संबंध आहे, तोच शरीराचा बुद्धीशीं आहे. नखे हीं शरीराचा भाग असतांहि त्याजपासून शेकडों वेळां निराळीं करिता येतात आणि त्यांच्या अभावीं शरीर जिवंत राहूं शकते. त्याचप्रमाणें बुद्धि ही युगानुयुगेहि राहू शकेल व त्या अवधींत हजारों देह जातील व येतील. शरीर नष्ट झाले तरी बुद्धि नष्ट होणार नाहीं असे आहे. तथापि बुद्धि सर्वथैव अविनाशी आहे असें नाहीं. कारण ती मिश्रणाचे कार्य असल्यामुळे तिजमध्ये कमीअधिकपणा होणें व ती सर्वथैव नष्ट होणें शक्य आहे. मिश्र पदार्थ कधींहि अमर होऊ शकणार नाहीं. त्यांत कालेकरून फरक होत होत तो नष्ट होणारच. बुद्धीचेंहि अशाच प्रकारचे मिश्रण कार्य आहे, आणि ज्या अर्थी ती मिश्रण कार्य आहे, त्याअर्थी तिच्यापलीकडे एकादा शुद्ध पदार्थ असलाच पाहिजे हे उघड आहे. ती मिश्रणमय म्हणून नष्ट होण्यास पात्र अशी असल्यामुळे ती स्वतंत्र मुक्त स्थितींत असूं शकत नाहीं, व जे जे म्हणून मिश्रण कार्य आहे तें प्रकृतीच्या अमलाखालीं असलेच पाहिजे, व जे प्रकृतीच्या अमलाखालीं आहे ते सर्वकाल बद्धावस्थेत राहाणार; तर मग स्वतंत्र अथवा मुक्त कोण आहे ? असा प्रश्न येथे उत्पन्न होतो. जो स्वतंत्र किंवा मुक्त असेल तो कारण आणि कार्य यांच्या मर्यादेपलीकडे असलाच पाहिजे. रूपांतर किंवा परिणाम होऊन त्यांतून कार्य बनते ही गोष्ट आमच्या आर्यतत्त्वज्ञानीं व अर्वाचीन उत्क्रांतिशास्त्रानीं सिद्ध केलीच आहे. अमुक वस्तु कारणरूप आहे असें म्हटले कीं ती रूपांतरक्षम्य असणार हें उघड आहे, आणि जी वस्तु रूपांतरक्षम्य आहे, ती स्वतंत्र कां मुक्त असूं शकणार नाहीं, याकरितां स्वतंत्र कां मुक्त वस्तु कारणकार्यांच्या पलीकडे असली पाहिजे. पूर्ण मुक्तावस्था भ्रमरूप आहे, तिला वस्तुस्थितींत अस्तित्व नाहीं असे म्हणणारेहि कोणी भेटतात त्यास उत्तर इतकेच आहे कीं, तुमची बद्धताहि पण भ्रामक आहे. ह्या दोन्ही अवस्था ज्या कालावर परस्परावलंबी आहेत त्यांतील कोणतीहि एक कल्पना स्वतंत्र नाहीं त्या परस्पर सापेक्ष कल्पना आहेत. यामुळें त्यापैकीं एक आमच्या मनांत उत्पन्न झाल्याबरोबर दुसरीचें अस्तित्वहि तिजबरोबर येतेंच. यापैकीं एक नष्ट झाली कीं, दुसरी गेलीच. आजच्या स्थितींत मला बद्धावस्थेचा पदोपदीं अनुभव येतो, म्हणून त्याच्या अपेक्षेनें मुक्तीची कल्पना माझ्या मनांत उद्भवते. या अनुभवामुळेच मुक्त व्हावें, बद्धतेच्या पलीकडे जावें असे माझ्या मनांत येते. मी बद्ध आहे ही कल्पना माझ्या चित्तातून नष्ट झाली, तर मी मुक्त व्हावे ही कल्पनाहि माझ्या मनात जन्म पावणें शक्य नाहीं. अशा रीतीनें ह्या कल्पनाद्वयाचा संबंध अविभाज्य आहे. या दोन्ही कल्पना एकमेकींपासून वेगळया करिता येत नाहींत आपण स्वतंत्र आहों असे हरघडी आपणांस वाटत असते. पण त्या भावनेने आपण कांहीं करूं लागलों, म्हणजे शेकडो अडथळे आपल्या मार्गांत आडवे पडून मार्ग निरोधन करितात, आणि त्या वेळीं मी परतंत्र आहे, परिस्थितीचा गुलाम आहे या गोष्टीची जाणीव आपल्या ठिकाणीं उत्पन्न होते. आपल्या प्रत्येक कार्याचा आरंभ मी स्वतंत्र आहे या भावनेनें होत असतो. आणि एकाद्या

अडथळयानें मार्ग बंद झाला, म्हणजे आपली स्वातंत्र्याची कल्पना नष्ट होते. आपलें सर्व आयुष्य म्हणजे या दोन कल्पनांमधील काळ असें म्हणावयास हरकत नाहीं. मग या दोहोंत खरी कोणती व खोटी कोणती ? यांपैकीं एक खरी म्हटली तर दुसरीहि खरी म्हटलीच पाहिजे हें वरील विवेचनावरून उघड आहे. दोन्ही कल्पना खऱ्या आहेत असें योगयाचें म्हणणें आहे. केवळ बुद्धिगम्य मार्गानें विचार केला, तर आपण बद्ध आहों, कारण कांहीं विशिष्ट मर्यादेपलीकडे आपली बुद्धि जाऊं शकत नाहीं. दुसरें असें कीं, बुद्धि ही मिश्रणरूप आहे हे पूर्वी दाखविलेंच आहे. म्हणून बुद्धीच्या मर्यादेंत आपण आहोंत तोंपर्यंत आपण बद्ध आहों असेंच म्हटलें पाहिजे. ही मर्यादा उल्लंघून पुरुषाच्या अवस्थेपर्यंत आपण पोंहचलों म्हणजे आपण मुक्तहि आहों. आपण प्रकृतिपलीकडे आहों, पुरुष आहों, याचा अर्थ आपण मुक्त आहों हाच आहे. आपलें खरें स्वरूप पुरुष हेंच असून तें प्रकृतीपलीकडे व कारण आणि कार्य यांच्या मर्यादेपलीकडे आहे. मनबुद्धि इत्यादिकांनीं त्याचें तें स्वतंत्ररूपच दृश्यत्वास आलें आहे. त्याचा प्रकाश अनेक द्वारांनीं विश्वांत ओतप्रोत भरून राहिला आहे. बुद्धि स्वयंप्रकाश नसून पुरुषाच्या प्रकाशानें ती प्रकाशते. प्रत्येक बाह्येंद्रियाचा गोलक मेंदूंत असतो – सर्व इंद्रियांचा एकच गोलक असतो असें मात्र समजूं नये. प्रत्येक इंद्रियाला एक एक स्वतंत्र गोलक असतो; असें असतांहि सर्व इंद्रियाच्या कार्यांत समरसपणा असतो तो कोठून येतो, हीं सर्व जेथें एकत्र होतात असें मध्यवर्ती ठिकाण कोणतें ? जर मेंदूंत हीं सर्व एकत्र होत असतील, तर त्यांचा गोलकहि एकच असणें योग्य होय. पण ते गोलक निरनिराळे आहेत ही गोष्ट इंद्रिय-विज्ञान-शास्त्रानें प्रत्यक्ष सिद्ध केली आहे. गोलक निरनिराळे असतांहि आपण एकाच वेळीं पाहाण्याची व बोलण्याची क्रिया करूं शकतों. यावरून ह्या ज्ञानक्रिया जेथें एकत्र होतात असें मध्यवर्ती ठिकाण कोठे तरी असलें पाहिजे. बुद्धीचा संबंध मेंदूंत आहे, पण पुरुष बुद्धीच्याहि मागें असून सर्वांचें मध्यवर्ती ठिकाण तेंच आहे. त्याच ठिकाणीं सर्व संवेदना आणि बाह्य ज्ञान एकत्र आणि एकरूप होतें. पुरुष म्हणजे आत्मा हा मध्यबिंदूसारखा आहे; परिघावरील सर्व संवेदना त्या मध्यबिंदूंत एकत्र आणि एकरूप होतात. पुरुष स्वभावतः मुक्त स्वतंत्र आहे आणि तुमच्या ठिकाणीं स्वतंत्रतेची जाणीव तोच उत्पन्न करतो. मी अमुक ठिकाणीं जाईन, तमुक करीन असें तुम्ही म्हणता, त्या वेळीं तसें करण्यास आपण मुखत्यार आहों, स्वतंत्र आहों अशी जाणीव तुमच्या ठिकाणीं असते; आपल्या आयुष्याच्या प्रत्येक क्षणीं अशा प्रकारच्या स्वतंत्रतेची जाणीव आपल्या ठिकाणीं असते; ही जाणीव कोठून उत्पन्न होते ? स्वतंत्र अथवा मुक्त पुरुषापासूनच ही जाणीव उत्पन्न झाली आहे. पुरुष मुक्त स्वतंत्र नसता तर स्वातंत्र्याची कोणतीच कल्पना आपल्या ठिकाणीं उद्‌भवली नसती. पण या स्वातंत्र्य कल्पनेच्या आरंभींच आपल्या हातून एक चूक होते, व तीच सर्व भावी अनर्थाचें कारण आहे – आपल्या मनाशीं आणि बुद्धीशीं या स्वातंत्र्याचा संयोग आपण करूं पाहातों. मी केवलरूप आहे, मी स्वतंत्र आहे, ही भावना सोडून माझें मन, माझी बुद्धी, माझा देह असें आपण म्हणूं लागतों. आपल्या स्वातंत्र्याचा आरोप आपण त्यांच्यावर करूं लागतों. पण मन आणि बुद्धि हीं मिश्र पदार्थ असून परतंत्र आणि परप्रकाशी असल्यामुळे आपण त्यांच्या ताब्यांत गेल्यावर आपणहि परतंत्र होतों हें नीटच आहे. याच रीतीनें स्वातंत्र्याचा आरोप देहावर करून तेथेंहि पहिल्या चुकीची पुनरावृत्ति आपण करितों. देह, मन, बुद्धि इत्यादिकांचें स्वामित्व प्रकृतीकडे असल्यामुळे त्यांच्या ताब्यांत आलेल्या पुरुषावरहि प्रकृतीचा ताबा असतो हें कायद्यास अनुसरूनच आहे. आपल्या ठिकाणीं स्वातंत्र्य आणि पारतंत्र्य यांच्या संमिश्र कल्पना यामुळेंच उद्‌भवल्या आहेत. योगी ह्या दोन्ही कल्पनांचें पृथक्करण करून पाहातों आणि त्यायोगें त्याचें अज्ञान नष्ट होतें. पुरुष हा स्वतंत्र व मुक्त असून ज्ञानमय आहे व तेंच ज्ञान बुद्धिद्वारां व्यक्त होऊं लागलें म्हणजे तो परतंत्र होऊं लागतो. आत्मा हा स्वतंत्र असून त्याच्या प्रकाशानें मन, बुद्धि, देह इ. सर्व प्रकाशित होतात व आत्म्याचा निश्चय होतो.

---

# पञ्चदशी-सार

## विवेक-ख्याति

**(१) तत्त्वविवेक, (२) पंचभूतकविवेक, (३) पंचकोशविवेक,**
**(४) द्वैतविवेक, (५) महावाक्यविवेक.**

(१) **तत्त्वविवेकः**—ज्ञान हे नित्य असें एकच आहे व तेच नित्य ब्रह्म होय आत्मा हा आवडता, त्यास सच्चित्सुख म्हटले. आत्मस्वरूपाचे सुख अमर करणारे ते अमृतत्व. पण विरोधी भावामुळें अनादि अविद्या आड आल्याने प्रतिबंधच एक. अशी भानाभानाची ती कारण आहे.

पंचभूत किंवा पंचतत्त्वसमुदायास स्थूलतेशिवाय (स्थूलदेहधारणेशिवाय) भोग्यता नाहीं. म्हणून हा पंचभूतसमुदाय अगोदर सूक्ष्म होतो. प्रत्येक भूताचा अर्धा अंग व इतर भूतांचा अष्टमांश मिळून पंचीकरण झालेले. अन्नपानादि भोग्य विषय जराजन्ममोह इ. ऊर्मि यांना या भूतसमुदायानें भोगण्यासाठीं हा देह निर्माण केला. पंचतत्त्वांचे जाडय त्यात आले. असा हा विचित्र पंचपाक होय. एकादा कोणी दैवयोगानें परतीरावर पोहोचला, तर त्यास श्रीगुरु प्रणवाची धारणा देऊन शवलासह (रंगीबेरंगी) आंत ढकलतात. त्यास मोक्षनगरासच पोहोचविले असे होते.

जीवात्मा—मलिनप्रधान प्रकृतींत प्रतिबिंबित चैतन्य.

ईश्वर—शुद्ध, सत्त्वप्रधान प्रकृतींत प्रतिबिंबित चैतन्य (विद्या-शिव).

अन्वय-व्यतिरेक समजून घेऊन आत्मरूप होऊन ऐस. तत्त्वमसि महावाक्याचें ब्रम्ह तें सविकल्प कां निर्विकल्प असे नाहीं. ब्रम्ह तें ब्रम्हच, तेथें निर्विकल्प म्हणण्यानें विरोध येणारा कां सविकल्प म्हणण्यानें दोष येणारा.

(२) **पंचभूतविवेकः**–ब्रम्ह हें अद्भूततेचें अखंड असें. तें वस्तुकालदेश व उगमनाशरहित. त्यास परिच्छेद नाहीं. एकमेवाद्वितीय हाच वाक्यभाव. तेथें स्वगत, सजातीय, विजातीय असे भेद नाहींत. आत्मा (वस्तु) शून्य नव्हे पाहाणारा प्रत्यक्ष असल्यानें शून्यत्वास बाध येतो. कालाचें अस्तित्व सृष्टिपूर्वी असलेलें; म्हणून कालाच्या अस्तित्वाची सद्वितीयता ही द्वैतभावनेमुळें होणारी, पण तेथें एकामेवाद्वितीय म्हणून व्याख्यालक्षणा नाहीं. **सद्ब्रम्ह** – एकं सद् विप्राः बहुधा वदन्ति। सत्ची शक्ति सतूहून भिन्न असल्यानें माया ही असत्य म्हटली जाते. सत् जे त्याची शक्ति सतूहून भिन्न अशीच आहे. अग्नीची शक्ति दुर्ज्ञेय, ती कार्यावरून अनुमानिली होते जशी. **सद्रूपब्रम्ह.** सत्ताच एक. निजरूप निवडावे. वेगळें केलें तर जग हे खरेंच आहे असें भासते, दिसते. पण सद्रूप हीच सत्ता समजल्यावर अज्ञान नाहींसें होतें. विचारानें सुवर्णमाती ही दृष्टीस दिसत नाहीं तोंपर्यंत अलंकार-घट असेंच पिसे.

(३) **पंचकोशविवेकः**—मन, बुद्धि, प्राण, शरीर, जड भोक्ता, आनंद, जीवचैतन्य प्रतिबिंब. मोक्ष व्हावा तर पंचकोश विवरून पाहा. देहामध्यें प्राण हा शक्तिदाता खरा. मन हें कर्ता भोक्ता मानलेले. आंतमध्यें गूढ अशी मूर्तिच एक निजलेली (ब्रम्ह). (१) पूर्वी मातापितरांनीं भक्षिलेलें जे अन्न त्याचा हा देहरूपी अन्नमय कोश. ह्यास जन्म व नाश आहे, म्हणून ती मातीच होय. व ब्रम्ह तर नित्य अबाधित असें आहे. (२) प्राण हा नखशिखांत देहांत व्यापून असलेला, पण चैतन्य-

विवर्जित जेव्हां, तेव्हां धोंडाच एक जसा. कारण मनुष्य निद्रेमध्ये घोरतो तेव्हां प्राण असूनहि व्यर्थच. या कोशास ज्ञान हे नसते असें प्रज्ञान ब्रम्ह या श्रुतिवाक्यानें उपदेशिलें. (३) मन हे संकल्पाने भरलेलें तें चंचल व विकारी असल्यानें हा मनोमय कोश आत्मा नव्हे. (४) बुद्धि विज्ञानमयाख्या म्हटली. विलयादिक दोष या बुद्धीस आपलेसे करतात, व ब्रम्ह तर वस्तुकालदेशासहि अनावर असे. म्हणून या कोशास आत्मता नाहीं. (५) निद्रेमधील आनंदवृत्ति जी हीसच तत्त्वदर्शी आनंदकोश म्हणतात. पण हा जड भोक्ता होय. हा आत्मा आहे अशी भ्रांति होते; पण ब्रम्ह तें भोक्ता कसे होईल? येथें तो प्रतिबिंब सुखाला भुलून असतो. बिंबरूप जगदीश त्यास पाहा. याप्रमाणें पाचहि कोश फोल ठरतात. येथें सहावा कोणी दिसत नाहीं, म्हणून शून्यवाद येतो. या पाचहि कोशांना सहावा जो साक्षी (देखणा) पाहतो, तोच आत्मा होय. तो स्वप्रकाश असा साक्षी (देखणा) आहे. असा जो साक्षी त्यास आपलें अहपण टाकून न ट प हा. म्हणजे अज्ञान नाहींसे होईल.

(४) **द्वैतविवेकः**—‘ दुर्जेन मनोधर्मे ’ पाहूं नको. जीव ब्रम्हच एक. जीवद्वैताचें निवारण कर. जीवो ब्रम्हैव नापरः। पण असा जीव हा आपल्याच संकल्पानें सुखदुःख भोगणारा होतो. एकच वस्तु एकाला सुख व एकाला दुःख देणारी होते. स्वप्नांत मनुष्य घाबरतो. पण गाढ निद्रेंत त्याच्या अंगावरून व्याघ्र गेला तरी तो सुखानेंच झोप घेत असतो. वचकवार्ता ऐकून एकादा रुदन करूं लागतो—दूरदेशी असलेला मुलगा सुखरूप असला तरी. म्हणून प्राणी आपल्या मानससंसाराने बंधन पावतो जीवसृष्टि दुःखास कारण आहे. ईश्वरसृष्टि मिथ्यत्वानें आरोपिलेली ठरल्याने तीपासून बाधा नाहीं. तेथें ब्रम्हच एक शेष उरते. ईशसृष्टीमुळे गुरुशास्त्रसंबधाचा फायदाच आहे. मग तिचा तिरस्कार तो कां करावा! येथे ती आरोपिलेली आहे इतकी मनाची खात्री झाली म्हणजे पुरे. जग हें साधक आहे. त्यापासून तुजला बाधा नाहीं. गुरुशास्त्रादिक नकोच म्हणावे तर तुला उपदेश तो कोण करील बरें? सज्जन हे ईशाचा वेश पाहून त्यात रमतात. जेथे सद्‌गुरु तोच सुखाचा देश. हातीं मोक्ष येई तों साधन सोडूं नये. चित्तीं ज्ञानाचा मोड येई तों अभ्यास सोडू नये. ज्ञानाचा अभिमान धरून दुराग्रहाचे होऊं नये. एकाच पिसानें मोर होऊं म्हणतोस तर पाहतां पाहता देहबुद्धि ही गांठील. भूक असून धालों म्हणशील तर उपाशीच राहसील. तेथे धालेंपणाचें सुख मग जाणणेंच होणारें नाहीं. ध्यानसमाधीशिवाय ज्ञानास सिद्धी ही कशी बरी येईल! अल्प तृप्ति ही परमार्थीं उपयोगीं नाहीं. जीवनमुक्ति दुर्लभ ती टाकून देऊं नये. अर्धवट ज्ञानामुळें पापभीरूपणाचे जागीं विषयलंपटता येते. तत्त्व जाणून जर विषयलोभ चित्तांतून गेला नाहीं, तर ही तुझी वेदांत्याची रीत ती विषयलंपटताच एक. म्हणून शमदमसंपदा साधून मोक्षसंपत्ति ही पूर्णपणे भोगावी अशी विनवणी आहे.

(५) **महावाक्यविवेकः**—(गुरुवाक्य-शब्दमेघ जसा ब्रम्हत्व पाहून आहे. वाक्यभाव एकमेवाद्वितीय.) वेदवृक्ष विधिविधानात्मक व निषेधात्मक वाक्यांनीं भरलेला आहे. त्यास हीं चार अमृतफळें लागलीं आहेत. सद्‌गुरु ज्याच्या मुखात तें अमृत घालतात तो अमर होतो. (१) प्रज्ञान चाहम्। ऋग्वेद. ज्याच्या तेजानें जीव हा शब्दस्पर्शादि जाणतो, त्यास चैतन्यप्रज्ञान म्हटले. (२) अहम् ब्रम्हास्मि। यजुर्वेद. जगदात्मा स्थिरचरव्यापक : ब्रम्ह अंतर्बाह्य व्यापून आहे. बुद्धीचा साक्षी पूर्ण परात्मा अहं लक्षणारें स्वतःपूर्ण असें ब्रम्ह तें अस्मि पदानें जीव व ईश्वर यांचें ऐक्यत्व दर्शविते. (३) अयमात्मा। अथर्ववेद. प्रत्यक्ष जो स्वयंप्रकाश तो अयम् शब्दानें सांगितला. देहादि अहंकार संगाचे जरी तरी साक्षी तो नच दूषिला, तोच आत्मा असें अथर्ववेद सांगतो. सर्व जगाचें अधिष्ठान जें ब्रम्ह तेंच तो होय. (४) तत्त्वमसि। सामवेद. सृष्टीपूर्वी एकच होते, त्यास नामरूप होतें, अशी ती सद्‌वस्तु तत् शब्दाला विषय झाली. शिष्य जो शरीर व इंद्रियें यांहून अतीत असा तो त्वम् म्हटला गेला. व असि क्रियापदाने उभय पदांची मिळणी झाली.

*

# दीपपंचक

## (१) चित्रदीप (२) तृप्तिदीप (३) कूटस्थदीप (४) ध्यानदीप (५) नाटकदीप

(१) **चित्रदीपः**—ब्रम्हरूपी वस्त्रावर जंगम-स्थावर असे चित्रच काढलें आहे. तेथे आत्म्याचे ठायीं चित्, अंतर्यामी, सूत्रात्मा व विराट् अशा चार अवस्था व ब्रम्हमायेचे आवरण - सूक्ष्मजगत् अवतरण- असें स्थूल पंचीकरण दृश्य होय. शुद्ध स्वच्छ वस्त्रावर - पटावर - काढलेले चित्रच एक, तसें हें विश्व ब्रम्हावर भासतें. शुभ्र पट विमल असा त्यास खळ लाविली, तो आंखला, रंगविला - तेथें धौत, घटित, लांछित, रंजित अशा या चार दशा चित्स्वरूपीं जाण. चित्रामधील जीवदशेस वसनआभास तसा प्राण्यास चिदाभास शुद्ध व लिहिलेला पट त्यातील भेद जाणणें जसें बिकट, तसें जीव व चित् सरसकट एकच भासतें. चित्रामधील पर्वतवृक्ष इ. प्राणरहित तेथें वस्त्र हें नांवामहि नाहीं. त्याप्रमाणे पाषाणमृत्तिकामय सृष्टींत चिदाभास नाहीं. चित्रामध्यें अंगास दिलेला रंग तेथे मूळच्या वस्त्रास त्याचा संगहि पण नसतो, त्याप्रमाणें संसार हा आत्मस्वरूपास सर्वथा नाहीं जरी, तरी या मोहपाशानेंच प्राणी बद्ध होऊं पाहातो. हा संसार जरी आत्मस्वरूपावर जीवगत आहे, तरी तो आहे असे जे अतरामध्ये मानून असणें त्यास अविद्या म्हणतात. याच्या उलट समजणें ती विद्या होय. ही विद्या ही पाहिजेच, कारण तिज-शिवाय या मोहाचा नाश हा केव्हाहि होणारा नव्हे. अशा या चित्रदीपास हातीं घे व आत्मरूपास पाहा-तेथे श्रीगुरूचा उदय झाला असें होईल व हृदयकमल हें विकसित होईल.

चित्रपटावरील चित्राप्रमाणें आत्म्याचे ठायीं ही स्थावरजंगमात्मक सृष्टी उत्तमाधम भावेंकरून दृष्टीस पडते. कल्पित वस्त्राचे रंग जसे आधारभूत वस्त्रासच लागलेले दिसतात - दृष्टीस पडतात, त्याप्रमाणें या जीवदशेचा संसार भ्रमामुळेंच आत्म्याला असल्यासा दिसतो हीच अविद्या. चित्र व पटाच्या दृष्टांतानें विश्व हे ब्रम्हावर कसे झाले आहे तें दाखविलें.

चिद्रूपावर ब्रम्ह, ईश, कूटस्थ व जीव असे चार भेद झाले. अवाढव्य पोकळी तें महाकाश. महा-काशाचे मेघामध्ये बिंब तें घनाकाश अथवा अभ्राकाश, कुंभामधील व्याप्ति घटाकाश, घटांतील उदकांत प्रतिबिंबित झालेलें आकाश त्यास जलाकाश म्हणतात. ब्रम्ह हें सर्वव्यापक असल्यानें ते महदाकाशस्थानीं मानिलें. मायेमध्यें बिंबित ईश तो सर्वज्ञ आहे, घनांबराप्रमाणे त्याला मानिलें. घट अथवा वस्त्राप्रमाणे देह उपाधीस्तव कूटस्थ असे मानिलें. जलाकाश जे तेथें पाण्यांत प्रतिबिंबित झालेलें जें चैतन्य त्यास जीव असे मानिलें. ज्याप्रमाणें घटामधील जलामध्ये प्रतिबिंबित झालेल्या आकाशांत घटाकाश लपलेलें असतें, त्याप्रमाणें या जीवदशेनें कूटस्थासच पार झाकून टाकले आहे, हें तत्त्व ज्यास समजलें ते भव-सागर तरले.

अनुभूति म्हणजे प्रत्यक्ष इंद्रियद्वारा ज्ञानाचा अनुभव. परिणाम कां उपभोग हाच पुढें घेऊन चालावें. अनुभवावर भरंवसा ठेवल्यानें निश्चय करण्याचा होतो. तर्क करणें व्यर्थ होय.

प्रत्यक्ष प्रमाण घेऊन ( चक्षुर्वै सत्यम् ) पूर्वापार संबंध न जाणतां आत्म्याबद्दल तर्कवितर्क करणें नको.

बुद्धीपलीकडील आनंदकोश तोच आत्मा.

आत्मा हा विभु आहे, तो सर्वव्यापी आहे.

पंतजलीच्या मतांत चिद्रूप पुरुष मानतात.

माया सत्या, तुच्छा, अनिर्वचनीया; पण भोळा, विरक्त असा शहाणा जो त्यास माया तुच्छ वाटते. मायेची अचिंत्य रचना वीर्यबिंदुवत् वटबीज घेऊन वर्णिली आहे. मायारूप वस्त्राच्या अंतरीं भूतें जणूं खरींच आहेत असें मानून ईश्वर हा खेळ करतो.

जागा झाल्याशिवाय उपाय सांपडणें नाहीं. आत्मज्ञानावांचून मोक्षप्राप्ति नाहीं.

ज्ञानप्राप्तीस कारणीभूत अशी चित्तशुद्धि होईल. भावच श्रेष्ठ करून असणारे अज्ञ (मूढ) बरे; म्हणून भाव हा येथें अल्प जरी वाटला तरी त्यास बोध हा द्यावाच

सृष्टीपूर्वी असणारें ज्ञात ब्रम्ह तें सांप्रत आहे, तेच पुढें असणार – अशा एका ह्या ब्रम्हाखेरीज बाकीच्या सर्व गोष्टी मिथ्या आहेत.

अभ्यासांत आळस करूं नको. तूं आपल्या देहबुद्धीस सोडून आपले स्वरूप पाहा. तूं ध्येय आहेस, अहंकाराचा साक्षी आहेस. ऊर्मि तुझ्या स्वरूपाच्या ठिकाणीं नाहीत

आत्म्याच्या असंगत्वाचा अनुभव म्हणजे ग्रंथीभेद. द्वैतसृष्टी पूर्वी नव्हती, आतांहि नाहीं व पुढेंहि नसणार असा जो अनुभव त्यास ग्रंथीभेद म्हणतात.

तत्त्वबोधाला रोग मानणाऱ्या बुद्धीची कमाल झाली. ज्ञानाचें लक्षण म्हणजे क्रियाशक्तीचा ऱ्हास नव्हे. आत्मज्ञानाला वैराग्य, तत्त्वज्ञान व उपरति या तीन साधनांची जरूरी असते. तत्त्वबोध झाला त्यास त्वरित मोक्ष मिळतो, पण विरक्ति व उपरम पूर्ण नाहीं तर शांति भेटत नाहीं. विरक्ति – उपरम पूर्ण आहे पण तत्त्वबोधास अंतरलेला त्यास पुण्यलोक मिळेल पण मुक्ति मिळणार नाहीं. पूर्ण विरक्ति तेथें ब्रम्हलोकहि तुच्छ. सुषुप्तीप्रमाणे विस्मृतीची सीमा ती पूर्ण उपरति होय. कर्माप्रमाणे भिन्नभिन्न अशीं ज्ञानियांचीं आचरणें असतात.

**शुक्ति-रजत-भ्रमः**—शुक्तीवर जसें रुपें दिसते, तसें कूटस्थावर जीवभ्रम होतो अधिष्ठानाचा अंश – कांहीं ज्ञात, काहीं अज्ञात हे भ्रमाचें लक्षण जीवदशेला म्हणजे चिदाभासाला पूर्णपणे लावून दाखविलें आहे. शिंपीची काळी पाठ झांकलेली असून तिचा चकचकित भाग जसा वर दिसतो, तशी कुटस्थाची असंगता झाकलेली असून जीवचैतन्यामध्ये त्याचा आहेपणा व ज्ञान अनुभवाला येतात.

**कुटस्थ-जीव-भ्रांतिः**—कूटस्थाची म्हणजे निर्विकार आत्म्याची जी पहिली निर्विकार असंग सुखरूपता तेथे त्रिकोण, आकृति व निळी पाठ ही कांहीं झाकलेली व कांहीं उघडी अशी शुभ्र दिसणारी, तेथें जीवदशेला व कूटस्थाला आभासामुळे भ्रांतिच एक मीपणाची लागलेली. ह्या निळ्या पाठीच्या शुक्तीचें स्वरूप जसें रजताची भ्रांति लावणारें, तसे सत्तेच्या आभासाचें स्वरूप एक भ्रांति लावणारें. या शुक्तिरुप्याचा जसा भेद, तसा स्वय जे व मीपण जे तेथें भेद तो असतो. भ्रांति हीच जेथे तेथे मीपणाची स्थिति.

**(२) तृप्तिदीपः**—आत्मानं चेत् विजानीयात्। अभिमान हा तिन्ही शरीरात मी मी म्हणून असतो. स्थूल शरीरास बहुविध व्याधि; लिंग शरीरास रिपुषट्क ग्रासते, कारण शरीरात नेहमीं अज्ञान वास्तव्य करून असते. भोक्तृत्व हें भ्रांतीमुळेच भोगण्याचें होतें चित्त हें दयासागर श्रीगुरुरूपी अमृताच्या ठायीं अमर होण्याकरितां लुब्ध होऊन भ्रमरीप्रमाणे विलसत आहे.

अहंकाराचे तीन प्रकार – एक मुख्य व दोन गौण. अज्ञानकाळींचा जो अहंकार तो देह व आत्मा मिळून मी असा हाच मुख्य होय. ज्ञान काळीं (१) कधीं केव्हां मी ब्रम्ह व (२) कधीं केव्हां मी देह असे दोन गौण होत.

सत्य अनृत असा स्वप्नामधीलच जसा वाद पाहून, त्यास भिऊन मनुष्य जागा होतो. जीव म्हणजे चिदाभास हा जगापैकींच असल्यामुळे तोहि मिथ्याच म्हटला पाहिजे व मग अशा मिथ्या ज्ञानानें संसारनिवृत्ति कशी व्हावी ती ? या शंकेचें निवारण असें कीं, संसार मिथ्या जसा तो त्यास घालविण्यास मिथ्या ज्ञानाचाच उपयोग केला होतो. भूत तसा बळी अशी म्हण आहे. अहं ब्रम्ह असें ज्ञानहि अज्ञानाचा नाश करून आपण लयाचे होतें.

दशमाचा दृष्टांत. जीवदशेच्या ज्या सात अवस्था आहेत त्या (१) अज्ञान, (२) आवरण, (३) विक्षेप, (४) परोक्ष ज्ञान (ब्रम्ह आहे). (५) अपरोक्ष ज्ञान (तत्त्वमसि), (६) शोकापगम,

(७) तृप्ति. या दशमाच्या दृष्टांतानें स्पष्ट करून दाखविल्या. दहावा असून दिसेचना, तो दहावा प्रत्यक्षत्वानें दाखवून आनंदाप्रत आला.

पदार्थज्ञान हे पदार्थ व बुद्धि या दंपतीने होते. पदार्थाबद्दलचें अज्ञान हें चिदाभासासहित बुद्धि त्या पदार्थास व्यापून नाहींसे करते. आत्मा स्वयंप्रकाश आहे तरी बुद्धि ही आत्म्याला व्यापते. मति-व्याप्तीबद्दल मनसैवेदम् ही श्रुति प्रमाण आहे. चिदाभास हाहि आत्म्याला व्यापतो. पण त्याचा प्रकाश ब्रम्हतेजामध्ये लोपून असतो. असा तो लोपलेला प्रकाश आपलासा करणें महत्त्वाचे आहे — तेथे अनुमोदन अथवा मनोगत हे जरूरी आहे. जीवदशेचें बुजल्पण काढून टाकणे व तें जीवित आपलेसे करणे जरूरी असते. अंधारांतील वस्तु पाहण्यास डोळा जसा पाहिजे, तसे हातीं दिवाहि पण पाहिजे. पण जेव्हा का दिवा हा (ज्ञानदिवा) पाहिलेला असतो, तेव्हा नुसत्या डोळ्यानींच पाहाणे पुरतें होतें. अशीच या ब्रम्हज्ञानासंबंधी गोष्ट आहे. तेथे मग चिदाभास म्हणजे जीव हा लक्षांत घेतला असनां तो व्यर्थच जसा.

महावाक्याने अपरोक्ष ज्ञान झाले तरी श्रवण, मनन, निदिध्यासन हें पाहिजेच. श्रुति भिन्न भिन्न आहे; विषय आवरण्यास कठिण आहेत, संशयाच्या आडवाटा लागतात, विपरीतभावरूपी काटा पायांत मोडणारा होतो, म्हणून अभ्यास हे सांगितले आहेत तेथें श्रवण म्हणजे जीवब्रम्ह एक आहेत हे तत्त्व जाणणें; मनन म्हणजे सत्य असा शास्त्राने शोधिलेला सिद्धांत त्याची अनुभूति वारंवार घेणे म्हणजे आत्मा धुंडणे; व निदिध्यासन म्हणजे श्रवणमननाने झालेला सिद्ध अर्थअनुभवणें. तेथे देहबुद्धि नाहींशी होते. ब्रम्हास्मिचा उहापोह हेच ज्ञानियाचे निदिध्यासन.

ब्रम्हाभ्यासास कसलाहि निर्बंध नाहीं, पण तेथे योग्य तीं पथ्ये करीत जावीं ज्ञान व्हावे हे सत्य जर, तर आपली सोय अगोदर करावी ज्यायोगे चित्त हे स्थूल होईल व ते ज्ञानास प्रतिकूल होईल ती उपाधी निर्मूल कर. विषयसुखाच्या मागे लागूं नये. विषय हे कालत्रयींहि दुखःदायक आहेत. ते मिळविण्यास कष्ट होतात व मिळाल्यावर रक्षण करण्यास अतिशय काळजी वाटते. आत्म-सुख जे जवळच आहे ते टाकून विषयसुख हे दूरच धांवत असते.

ज्ञानी हा विरागी, निरिच्छ असा, संसाराबद्दल उदासीन असा, ज्ञानिया जो तो तर विषय सेवीत असला तरी निःसंग असाच असतो. संसाराचा लोट अंगावर आला, तरी साधेपणाने तो झेपतो.

ज्ञानयोगानें बंध तुटला तरी कर्मभोगापासून कोणी सुटत नाहीं जगाचें मिथ्यात्व समजणे हे ज्ञानाचे काम आहे दुर्वासना, दुराग्रह, दुसऱ्याची इच्छा असे हे त्रिकूट पाठीं लागले आहे. तेथे जीवदशेकडून प्रारब्ध भोगवून ते कर्म सपणारे होते.

आत्म्याचें प्रत्यक्ष ज्ञान – तेथे द्वैतविस्मृतीची गरज नाहीं परमात्मलीला वर्णनपर – तेथे अनुरक्ततेमुळे भक्तिबीज विसरणारे होत नाहीं. देहभावच मुळीं स्वरूपदर्शनाने गलित व्हावा, तेव्हाच गुण-माहात्म्य का ज्ञानस्मृति ही कसलाहि अडथळा नाहीं अशी पाहिली जाणारी. येथे अर्धपाषाणीं वस्ति झाली अशी ती समाधी.

दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीकडे लक्ष न देतां एका साक्षित्वाच्या अभ्यासांत रत असत जा

भोगाची जी आवड तेथे मीपण खोटे ठरले. बुद्धीस प्रायश्चित दिले. कृपाहस्त मस्तकावर त्यानें शुद्धीवर आलों निःसंग, निरंजन, साक्षी असा चिन्मयमूर्ति – पण प्रतिबिंबरूपी जीवदशा जी तिनें तुमची निर्मळ कीर्ति लोपविली ती आतां प्रकाशूं लागली, सत्ताच एक तेथे वागत आहे.

मी – माझे करून ह्या जीवपणाच्या दुसरेपणाचे ओझें घेत आहेस. आपलें खरे स्वरूप पाहा. चिदाभास जो त्यास ताप नाहीं. तर मग चंचल न होणारा, निरंतर अशा त्या साक्षीस तो कसा

बरा होईल? म्हणून मीपण टाकून दे - "मी - माझें" पणाचा होऊं नको. दोरीच ती एक, पण साप समजून कंप आदिकरून होणारे जे परिणाम एकदम नाहींसे होत नाहींत जरी, तरी पण हादरून जाऊ नको. तर मगच तुझा हा ताप नाहींसा होईल.

मोक्षप्राप्तीनें आनंद होतो (हर्ष होतो), तेथें प्रापंचिक सर्व दुःखें विसरलीं होतात. ज्ञानानें मुक्ति लाभली ती सर्व दुःखाना नाहींशी करते, तेथे दहावा मिळाला जसा. ज्ञानावस्थेशीं तद्रूप झाल्यानें तेथें निरंकुश तृप्तिच एक लौकिक दृष्टया कांहींच करण्याचें उरत नाहीं. निदिध्यासनादि साधनांची जरूरी वाटत नाहीं. ब्रम्हच होऊन असणें जसे.

**जीव - शीव - ऐक्यः**—अज्ञ, दुःखी असा त्वम् पदार्थ जीव, याविरुद्ध तत् पदार्थ ईश. उपाधि वर्ज करून, ज्ञानांश पाहिला तोच बोध. सरोवरामधील गोड पाणी कां डबक्यामधील उदकच एक मनात घ्यावे. देव पाहताच मनामध्यें ऐक्य होऊन जातें. गुरुवाक्यावर विश्वास त्यास ज्ञानरूपी फळ येतें ब्रम्हच एक सत्य हे परोक्षतेचें ज्ञान मूळ होय, तेच गुरुवाक्यावर विश्वास ठेवल्याचें फळ होय.

(३) **कूटस्थदीपः**—जीवज्ञान, कूटस्थ ज्ञान, सामान्य ज्ञान, विशेष ज्ञान यांचा खुलासा.

सूर्यप्रकाश दर्पणादि त्याच्या प्रकाशानें जसा झांकतो, तसा ब्रम्हप्रकाश जीवदशेच्या प्रकाशानें झाकला आहे. ब्रम्हसूर्य जो त्याची छाया बुद्धिरुपी आरशामध्यें पडलेली असा चैतन्यजीवच एक ही कांहीं माया नव्हे. सूर्य हा सृष्टि भासवितो, तशी तुझी काया ही भासमान होणारी तेथें अहंपणरूपी किरण हे वायांच एक अहंतेचे असे. हे नरा, तूं जरा आंत पाहा. तूं कांहीं माया नव्हेस, तर जीवच एक, कसा तर ब्रम्हसूर्याची बुद्धिरुपी आरशांत पडलेली छायाच. सामान्य चैतन्य, ब्रम्हचैतन्य व जीव-चैतन्य यांतील भेद जे जाणतात ते दैवाचे होत.

जगतामधील ईश्वरत्व हे जीवात्मा स्पष्टतेस आणतें. जीवात्मा हा फक्त पदार्थांना वृत्तिद्वारां प्रकाशित करतो, पण अंतराळ विषयास परमात्माच प्रकाशित करतो. दोन वृत्तींमधील जी अवस्था त्यास अंतराळ म्हणतात परमात्मा व्यापक, जीवात्मा व्याप्य जीवात्म्याचें अस्तित्व असो वा नसो ( म्हणजे सुषुप्ति ) परमात्मा हा जीवात्म-भाव-अनुभवाला प्रकाशित करतो.

एकांत, ध्यान, वृत्ति, मुक्ति, आहेपण. मग वृत्तिरूप न राहातां ब्रम्हच एक होशील. ॐ शब्द भक्ति. एकांतीं ध्यानानें पाहिलेस - तेथे दीप्ती ज्या त्यांचा मध्यसंधि पाहा. मेघ आकाशांत तसे सागरांतहि येऊन मावळतात तेथ वृत्ति म्हणजे काय हे समजूं लागेल. नीट पाहा, चित्त धट कर. वीट मानूं नको, आळसं नको. तीच सध्या म्हटली वृत्ति येते कोठून, मावळती कोठे हे समजल्याने वृत्तीचा झरा सांपडेल. तेथे मुक्तीच एक लाभली सद्‌गुरुकृपा मग सहजच. वृत्तीचा आहेपणा व नाहींपणा समजल्यावर तूं वृत्तिरूप न राहाता ब्रम्हच होशील जसें हे आंतमध्यें, तसेच विश्वांत चहूंकडे. येथे चैतन्यद्वय - जीव ब्रम्ह - याचा अनुभव होईल जीवदशेस अमुक एक घट असें समजलें, म्हणजे घटबुद्धि मावळते येथे जाणीव ही ज्या स्वतःस समजली, तेच मुळीं ब्रम्ह जाण. घटमात्र जसा तसा हा चिदाभास. आंतमध्यें खरेपणानें उच्चार - प्रणव ओंकार - कसा तो तर एक शब्दच पण अवाङ्मय असा. अभ्यास कर. गुरुवाक्यावर पूर्ण विश्वास असावा हा कूटस्थदीप हातीं घेऊन आपल्या स्वतःस पाहा. भक्तिरुपी तूप या दिव्यास पाहिजे, तरच हा तेवणारा होईल.

(४) **ध्यानदीपः**—उपासना गोपींची तीं "दहीं घ्या" म्हणण्याऐवजीं "गोविंद दामोदर माधव घ्या" म्हणूं लागली. ईश्वरभावच तेथें सहजतेस आला. तपच जसें. अशा सिद्धी तपावर प्रगटतात. तप वेगवेगळे असल्याकारणानें वेगवेगळे फळ मिळतें. ध्यानामध्यें नसून तेथें ती वस्तु आणावयाची असते. ज्ञानामध्यें वरील आवरण नाहींसें होऊन ती वस्तु व्यक्त व्हावयाची असते. तेथें

इच्छा जरी नसली, तरी ज्ञान हें होत असतेच पण उपासनेमध्ये इच्छा असेल तरच ते प्रगट व्हावयाचें होतें. कर्तुमकर्तुम् अन्यथा कर्तुम असा हा समर्थ असतो.

बुद्धि विचार करण्यास असमर्थ आहे असा ब्रम्हउपासनेस अधिकारी. संवादी भ्रमाचें खरें स्वरूप – उपासनेच्या बळानें काष्ठपाषाणादि देव होतात, तर मग तूं ब्रम्ह असून का बरे ब्रम्ह होणार नाहींस ? शास्त्रात पारंगत होण्याची खटपट ती अवकाशच पाहाणारी. निर्गुण ब्रम्हाची उपासना हा सोपा मार्ग आहे ह्या मार्गानें जडमूढहि निजरूपास पावतात. पण गुरुवाक्यावर पूर्ण विश्वास – पूर्ण निष्ठा – ही मात्र येथे जरूरी आहे. त्या विश्वासानेंच मुळीं ती ब्रम्हप्राप्ति ही त्वरिततेने होणारी होते. मणिप्रभा मणि समजून घेतली तर मणि प्राप्त होतो. दीपप्रभेवर मणिप्रभेचा भ्रम होऊन जर दीपाकडे जाशील, तर मणि प्राप्त होणार नाहीं, पण पोळणें मात्र पदरांत येईल अयथार्थवस्तुविज्ञानात् फल लभ्येत ईप्सितम् । काकतालीयतः सोऽय संवादी भ्रम उच्यते ॥ शिळेच्या मूर्ति पूजिल्या असतां त्या देव होतात, त्यासहि पण हीच संवादी भ्रांती कारण होय. सद्गुरूनें सांगितले तूंच ब्रम्ह आहेस, ते वचन चित्तीं विश्वासानें वागव. स्वस्थ बसून सोऽहं धारणा धर. तेथे अहपण जाऊन ब्रम्हपदच एक येईल. येथे विचार करण्याची मुळींच जरूरी नाहीं. अशा या उपासनेला विचाराची गरज नाहीं. मूढ जनाना ही कामधेनूप्रमाणें आहे.

ज्यांनीं जन्मांतरीं तप केलेले नाहीं, जे कामक्रोधानीं गांजलेले आहेत, ज्यांच्या बुद्धीला मांद्य आलेलें आहे, ते या उपासनेचे अधिकारी होत ते तात्काळ मुक्ति पावतात जनकासारखे विरळा पुरुष होत. सांख्यांची ती हीच वाट त्याना दाविली. पण तशी योग्यता सर्वांना कुठची लाभणारी बरे ? ब्रम्हयोग्यता सिद्ध झाली म्हणजे सविकल्प समाधी सिद्ध होतो, नंतर निर्विकल्प व मग असग असे ब्रम्हच एक. साधकाच्या ज्ञाननिश्चयास प्रतिबंध ते म्हणजे बुद्धिमांद्य, कुतर्क, दुराग्रह हे वर्तमान प्रतिबंध, भरतास तीन जन्म घ्यावे लागले हे भावी प्रतिध व पूर्वजन्मींचे संस्कार हे भूत प्रतिबंध होत. सर्व विद्या शिकून तत्त्व जाणले नाहीं असा हा वर्तमान प्रतिबंध नाहींसा होण्यास श्रवण करावें. पूर्वजन्मींची आठवण, अध्यात्मचिंतन का ज्ञाननिश्चय, तसेच उरलेले प्रारब्ध यातून श्रीगुरु पार करतात.

तत्त्वज्ञान (पंचतत्त्व शिवात्मक) वस्तुतंत्र आदि ब्रम्ह ते ज्ञानानें सिद्ध केलें, तेथें जे सृष्ट म्हणजे निर्मित झालें नाहीं तेच ब्रम्ह मुळीं ज्ञानानें दर्शविले. तेथें ज्ञान नाहींसें झाले तरी खरें ब्रह्मपण हे नाहींसें होत नाहीं कर्म, उपासना, कर्तृतंत्र (भाव तसा देव) – मनानें ध्यानाचा अवलंब केला. तेथें ध्यान गेलें कीं ध्येयहि नाहींसे होणारें मातीमुळें कुंभ, आरशामुळे प्रतिबिंब, ध्यानानें मनाच्या वृत्तींवर अवलंबच धरला होतो. म्हणून ध्यानानेच नेहमीं ऐस व मग ब्रह्मलोक. का देहबुद्धिअतीं ज्ञान होईल हें पंचदशीचें सार हे मुक्तीचे द्वारच होय. वाणीच मुळीं येथें उद्धार पावणारी होते.

चित्तनिरोधनात कां आत्मचिंतनांत दंग असलेला ज्ञानी नव्हे, तर साधकच एक. वृत्ति तोंपर्यंतच ब्रम्हप्रतीति. क्रियेविषयीं कंटाळा केल्यानें वरचेवर त्रासतो. रागद्वेष नाहींसे झाले, तेव्हाच मुळीं ज्ञान झाले म्हणावें. गुरुकृपादृष्टि ही सर्व आशा पुरविणारी होय. प्रवृत्तीचा कंटाळा व निवृत्तीची आवड असेपर्यंत साधकास ज्ञान झालें असे म्हणता येत नाहीं. येथे ज्ञान, उपासना ( भक्ति ), योग व तपाचरण अशीं हीं चार अशीं अति खडतर सिद्धी पाववीणारीं साधनें आहेत यथे श्रीसद्गुरुचरणीं राहाटी ठेवावी. लोकांना महत्तत्त्व तें कळो यावें, सगुण भक्तीची कास धरून आनंदाने प्रेमामृत पीत असावें, सद्गुरूंचा उपदेश घ्यावा, तत्त्वमसीनें ब्रम्ह जाणावें व स्थिर असावें.

कोणी भक्ति श्रेष्ठ मानतो, दुसरा कोणी ज्ञान श्रेष्ठ म्हणतो विषयलंपटतेपेक्षां कर्मानुष्ठान बरें त्याहून सगुण उपासना. त्याहून निर्गुण उपासना. ( ज्ञानाची पायरी सर्वांत उच्च आहे. ) याप्रमाणे अपरोक्ष ज्ञान होईपर्यंत एकहून एक अशा श्रेष्ठ पायऱ्या आहेत. येथे तंटाच मुळीं उरत नाहीं अज्ञानाने

उपाशीं राहण्यापेक्षां ज्ञानभिक्षा मागणें बरें. तेथें ज्ञानभक्‍ नमते. विषयासक्तीपेक्षा कर्म श्रेष्ठ जरी, तरी साधकास त्याहूनहि सगुण उपासना श्रेष्ठ होय. त्याहून निर्गुण. ज्ञानाची पायरी सर्वांत उच्च आहे. या विषयीं तर सत्य नेणून उपासकाची निंदाच केली जाते. येथील माधववैखरी येथे अतिशयच आवडली.

आत्मगीतेचें तात्पर्य असें कीं बुद्धि ही सारासार विचार – नित्यानित्यविवेक – करण्याच्या योग्यतेची नाहीं, तर रात्रंदिवस ध्यान करावें. तेथे अक्षररूपी बुद्धियोग वर यतो. बुद्धिरूपी कुदळीनें देहरूपी शिळा बाजूस करुन, मनरूपी भूमीचें खनन केल्यानें निजरूप – परमात्मरूप – ठेवा हातीं येतो ध्यानखनन करीत असता वृत्तीचा झरा लागेल, मोक्ष घरीं येईल. निश्चयावर उभे होऊन श्रीसद्‌गुरुचरण सेवावे, उपासावेत – ते तुम्हास खरा मार्ग दाखवितील.

(५) **नाटकदीपः** – सृष्टीपूर्वी होता जो अद्वय परमात्मा तोच जीव झाला विष्णु, शिव, इ. देहांत प्रवेश करून विष्णु, शिव, इ. उपास्य तोच झाला. मनुष्याचे देहांत शिरून उपासक बनला, सर्व श्रेष्ठ, व्यापक असा अद्वय जो सृष्टीपूर्वी होता तो जग व जगत्राता झाला. जगामध्ये त्यानें जीवरूपनें प्रवेश केला. विष्णु, शिव होऊन पूज्य झाला. मनुष्यरूपानें पूजक तोच बनला, तोच कर्ता व करविता होय. जन्मोजन्मीं ईश्वरास पूज्य मानले, ईश्वराची पूजा केली व आतां तो ईश्वर कसा आहे हे आता प्रत्यक्ष स्वरूपदर्शनाचें व्हावें अशी इच्छा झाली. विचाराने माया नाहींशी झाली, तेथे स्वरूपच एक बाकी उरतें

भेददृष्टी हाच बंध, अभेददृष्टी हा मोक्ष – असें तें आनंदरूप अद्वय असें आहे. येथें भ्रांतीमुळे दुःखद्वैत किंवा द्वैतदुःख होतें. ह्या द्वैतास वेदांतामध्यें बंध असें म्हटले, व स्वरूपी राहाणें त्यास मोक्ष असें म्हटलें. अविचारामुळें बंधरूपी व्यथा झाली, तिजवर विचार हेंच योग्य औषध आहे. जोपर्यंत अनुभव आला नाहीं, तोंपर्यंत चित्तानें नित्यानित्यविवेक कां सारासार विचार करण्याचें सोडूं नये. मी मी अशी जी वृत्ति तोच जीव; अशा या जीवदशेचें सर्व कर्मांमध्ये साधन मन हें होय. जो सर्वांचा देखणा आहे तो स्वामी जाणावा. सद्‌गुरु मोक्षदायक होत.

नाटकाचें रूपकानें साक्षीचें स्वरूपः—साक्षी हा अहंकारादि सर्व पदार्थांना प्रकाशित करतो तो नाटकगृहातील दिव्याप्रमाणें आपल्याच ठिकाणीं स्वस्थ असतो. विषय व इंद्रियें यांचें आंतबाहेर येणें-जाणे हें बुद्धिअहंतेचे खेळ आहेत, आत्म्याचे नव्हत नित्यनिरंजन साक्षी दीप प्रकाशत आहे. रंगभूमी-वर बुद्धि रंभा का उर्वशी अशी थय्‌थय् नाचून, विकार दाखवून प्रेक्षकजनांस फशी पाडीत आहे. फांकडी अशी बुद्धि – नारच ती पण विरळा अशी – नेत्रादि इंद्रिये तिच्या नाचण्यागाण्यावर लुब्ध होऊन आहेत. तिच्या हातीं मृदंगवीणा आहे व सर्व इंद्रिये निमग्न होऊन ताल धरीत आहेत. उच्चासनावर बसलेला व मीपणाचें वस्त्र लेइलेला असा रूपानें नटलेला अहंकार विराजत आहे. बुद्धिस्त्रीचें रूप पाहून, तिचें नृत्य व गाणें ऐकून तो मनामध्ये फार भुलला आहे. मधूनमधून वाहवा करीत आहे जगामध्ये धनी काय तो मीच असे तो मानून आहे. विषयांचे थवे, धन, सुंदर कांता, चंदनाची उटी इ. एक नवीन नाटक पाहण्यांतच येत आहे रसिकानीं केलेली वाहवा ऐकून बुद्धिनटी फार फुगून गेली आहे. तेथे साक्षी दीप हा विषय, इंद्रियें आलीं गेलीं त्यांना, तसेच अहंकाररूपी नृपास प्रकाशून आहे असें नाटकच एक आम्होंहि पहावें कां जे तें सद्‌गुरूंनीं दाखविलें असा हा साक्षी आत्मदीप नित्य व अबाधित तो कल्पांतींहि विझत नाहीं. तो आंतहि प्रकाशून आहे व बाहेरहि प्रकाशून आहे. स्थिरचर व्यापून असणारा परात्मा तो स्वस्थानस्थित तसेंच स्थाणु असा तूं परतून आपल्या अंतरीं पाहा. हा दिवा तेलवातीशिवाय प्रकाशत आहे. या दिव्यावर आलेली अज्ञानरूप काजळी काढून तो दिवा नीट पाहण्याचे कर, त्या दिव्याचा प्रकाश तुझ्या भवास - संसारास – नाहींसा करील.

# ब्रम्हानंद ( आनंदच ब्रम्ह – आनंदच योग )

(१) ब्रम्हसाक्षात्कार झाला म्हणजे हृदयग्रंथी सुटतात. तेथे द्वितीयाद् भयं भवति असें उरत नाहीं. कारण भिद्यते हृदयग्रंथिः तस्मिन् दृष्टे परावरे। व सर्व संशय नाहींसे झाले.

(२) आनंदं ब्रम्हणो विद्यात् – आनंदच ब्रम्ह होय. आनंदच अद्वय ब्रम्ह. भूतें ब्रम्हींच होतात – जातात, ब्रम्हामुळेंच त्यांचें रक्षण होतें. प्राणी सुरतानदांत जन्मतात, अन्नपानादिकांनीं तीं वाढतात, निजसमाधीमध्यें तीं लय पावतात, तेथें त्यांना सुख होतें, असें भृगूनें वरुणास उपदेशिले.

(३) यो वै भूमा तत्सुखम् नाल्पे सुखमस्ति। सनत्कुमारांनीं भवशोक झालेल्या नारदास वैषयिक सुखांतील दोष दाखवून ब्रम्हसुख हेंच खरें सुख असें सांगितलें. दृष्टीला तुष्टि देणारे पण पंडुरोगासारखे विषय हे बाहेर हुंगून आंत आले म्हणजे माहेरास परत आले म्हणजे चित्तास सुख झाले असें वाटतें, पण ते विषय तुझे प्रतिबिंब होत. उन्हांत जाऊन परत कां येतोस? छायेंत बैस. असें हे स्वय प्रकाशरूपी सार आहे.

(४) हेतूच निद्रेचें ठाणें होय. सुषुप्तीचा दृष्टांत तेथें अद्वैत (अद्वय) हे सुख होय. विषयानंद, वासंनानंद व ब्रम्हानंद यांचें स्वरूप हेंच जाण या तीन आनंदावांचून दुसरा आनंद जगात नाहीं.

(५) इंद्रिये व बुद्धीविण ते स्वयंप्रकाश सुख समज. निद्रेमध्ये रोगी कां जखमी कां अधु हें भान नाहीं. सुखदुःखाचा अभाव तें सुख होय. जागा झाल्यावर इतका वेळ मी स्वस्थ होतों म्हणतों. प्रत्यक्ष सिद्ध असें जें सुख ते सुख होय. मृदु स्पर्शानें जी अंतर्मुख वृत्ति – विषयसुखाची वृत्ति – तीच निद्रासुखास कारण होय. पक्षी उडून दमला, घरीं आला, कर्मक्षय झाला म्हणजे जीव हा अज्ञानामध्ये लय पावतो. तान्हें बालक – संकल्परहित असे तें – मातेने स्तनीं लाविलें, स्तनांतील दूध पिऊन तें हंसतें, सुखानें झोंपी जाते.

ऐहिक सुखभोगानें मनुष्यानंद शिखरींचा (राजा) सुखमय होऊन बसला; ब्रम्हज्ञानी ब्रम्हज्ञानानें कृतकृत्य झाला, जीव हा ब्रम्हानंद डोहामध्ये बुडी देऊन राहातो – भ्रमर असा कमलिनीमध्ये गुंग होऊन राहातो.

निद्रेच्या अगोदर व नंतर जी निर्विकल्पवृत्ति तिजला वासनानंद म्हणतात. प्रारब्धाचा भोगवटा त्यास जागृति म्हणतात. जीवदशेच्या अतर्मुखवृत्तीचा परिणाम तीच निद्रा होय व तेथील आनंदाचा भोक्ता त्यास आनंदकोश म्हणतात. वासना व विषय या दोहोंची उत्पत्ति ब्रम्हापासून आहे. अनुभूति, श्रुति व युक्तीनें ही प्रतीती घ्या.

**अभ्यास कसा करावाः**—चित्त कुरवाळून त्यास स्वरूपीं प्रस्थापित करावें. बुद्धीचें धैर्य लोपवूं नये. चित्तामध्यें राग मानूं नये, तरच सिद्धी सोपी होईल. जेथें चित्त धांवेल, तेथून त्यास परत आणून स्वरूपीं स्थिर करावें. आपण दमूं नये. त्यासच दमवावें. येथे फार अवधि लागतो असें नाहीं. दोन्ही भुवयांमध्यें दृष्टि ठेवावी, अभ्यासानें प्राण – अपान सम करावेत. दोन्ही एकत्र चिद्गगनांत मिळाले, म्हणजे त्यांची मैत्री होते, संगति कां सोबत होते. तेथें गंगाच जशी. एकदां कां स्वरूपाची भेटी झाली, कां तेथें पक्की गांठच पडते. ती गांठ केव्हांहि सुटणारी होत नाहीं. दुःखाची दाटी झाली कां मोठमोठीं सुखें लाभलीं, तरी आत्मचिकाटी ढळत नाहीं. पाठीं पोटीं सर्व स्वरूपच एक समाधीः सर्व सुखाचा कंद असा ब्रम्हानंद – जागृति पळाली, निद्रा गळाली, सर्व वृत्ति बंद झाल्या, दाही दिशा मत्त अशा,

द्वेषदृष्टी नाहींशी झाली, मागेंपुढें एकच सच्चित्सुख भरलें आहे. (आतां मी काय करूं व कोठे जाऊं ?) मनाचा जय करावा.

संसारांत जसें चित्त जडलें आहे, तसें आत्मचिंतनांत तें जडलें असता, तेंच मोक्षास कारणीभूत होते बधाला कां मोक्षाला चित्तच कारण आहे. टिटवीनें सागर उपसला – नारद, चातक, मेघ, चित्त हें कलत्रवित्तामध्यें जसें लावलें आहे ते आत्मस्वरूप पाहाण्याकडे लावावें. चित्तविषयीं रत जें ते विरक्त केलें असतां, तात्काळ भवताप घालविते.

चित्तावरील संकल्परूपी मळ येणारे जे ते काढून टाकून चित्तरूप आरशांत निजरूप दीप पाहा. नारदरूपी चातकास पाहून मेघ अनुकंपायुक्त झाला जसा : टिट्टिभ हट्ट धरून सागर उपसण्याचें करूं लागला. मोक्षद गुरु साधकावरील साक्षेपपण पाहून, सदयहृदय होऊन, जन्ममरणाच्या खेपा चुकवितात.

सरोवरामध्यें अर्धें अंग बुडून आहे, अर्धे वर आहे, त्यास वरती ऊन व खालीं थंडगार पाणी. एकच बब्बुळ दोन्हीं डोळयात वापरून कावळा दोन्ही डोळयांनीं बघतो. ज्ञानी संसार व ब्रम्ह एकाच वेळीं भोगतो.

मन हें चंचल – तें आत्मचिंतन टाकून द्रव्यदारा यावर टपून असतें. योग जरी चित्तवृत्तींचा निरोध करण्याकडे योजला, जरी मनाचा जोर अधिक असतो. हातीं धरून ठेवलें तरी ते हातावर तुरी देऊन निसटतें. तें कुठें लपतें तें समजतच नाहीं. लोण्याहून मऊ जरी तरी वज्राप्रमाणें खुपणारें होतें. या मनरूपी (विषयरूपी) गजानें तर मुखरूपी कमलवचन पार उध्वस्त करून टाकलें आहे असें तें मर्कटच तर्कटणारें तें भक्तीस पार चीत करतें, भक्तीचें नांवहि उरूं देत नाहीं, भक्तीस मुळीं-हून पार नाहीसें करतें. धैर्य हलवून सोडतें, बुद्धीस भुलवितें, आपला पारहि लागूं देत नाहीं. भजनपूजनामध्यें तपाचरणानें आपलेसें केलें तरी आपला ठावठिकाणा न सांपडवूं देणारें होतें असेहि तें आहे. एरव्ही तें चुकविणारें असें तें होय. द्रव्यदाराधनसुत इ. विषयीं खपून असतें, राबून असतें. प्राणापेक्षाहि जास्त काळजी घेऊन त्यांना तें जपत असतें. अशा या माजलेल्या चित्तरूपी गजास वैराग्य-रूपी अंकुशाचा मार देऊन जिंक, तें हातां येईल व चित्त स्वत सच जिंकून घेईल.

(१) **आत्मानंद-भक्तीचा ठावः**— तेथींचा उघड भाव म्हणजे भक्तीचा ठाव तो आत्माच एक– असें हें गूढ आपल्या चित्तीं वागव – रूढ करून ऐस. बाकीच्या भक्तीच्या कोटी आहेत. त्या (मूढ) गांधळलेपणच एक अशा होत. द्रव्यपशूंवर मनुष्य जी प्रीति दाखवितो – प्रेमाचे दिग्दर्शन हे स्वतःस तेथील दिग्दर्शन होय - ती कोटीच जशी : पण जगाची राहाटीच अशी आहे. राजा – प्रजा, पुत्र – पिता पृथ्वीच्या पोटीं म्हणजे एकत्र वसणारें असें आत्मतत्त्वच एक. येथे आत्मार्थच मुळीं गांठी भेटी होत असतात. असा याज्ञवल्क्यांनी आपल्या मैत्रेयी नामक पत्नीस बोध केला.

जेथें जें इष्ट तेंच उत्कृष्ट, अवशिष्ट तें गौण. आत्म्याचे तीन प्रकार आहेत – एक मुख्यात्मा, दुसरा गौणात्मा, तिसरा मिथ्यात्मा. ज्या व्यवहारास जो आत्मा योग्य झाला तो त्या व्यवहारामध्यें मुख्यत्वेंकरून असतो.

मनुष्याच्या मनांत चार प्रकारच्या वृत्ति असतात. १ परमप्रिय, २ प्रिय, ३ द्वेष्य, ४ उपेक्ष्य. यावांचून इतर वस्तु त्या देशकालनिमित्तानुसार ( प्रिय, द्वेष्य, उपेक्ष्य ) होत. वस्तु ही वृत्तींप्रमाणें चार प्रकारांनीं व्यवहारते. ज्याला ज्या वेळेस जें भेटतें, त्याप्रमाणें तें मुख्य, गौण इत्यादि होते. पुत्र, देह, साक्षी निजात्मताच एक. आत्मार्थच ते प्रियपण, याशिवाय निराळे ते प्रियपण नाहीं.

उपेक्ष्य ती काष्ठतृणआदि इ. वस्तु करूनची – मार्गी असणारी कां येणारीं अशी – उपेक्षा का द्वेषास पात्र होते.

द्वेष्य ती व्याघ्र, सर्प इ. दुष्ट प्राण्यांबद्दल. पण दरवेशास वाघ प्रिय. एरव्हीं वाघ समोर आला असतां उपेक्ष्य. पांचहि कोशांचा जो साक्षी, जाग्रत् स्वप्न सुषुप्तीचा द्रष्टा तोच आत्मा – श्रुति, युक्ति, अनुभूति.

प्रियं त्वां रोचति हें वाक्य शिष्याला बोधरूप आहे. ते प्रतिवाद्याला शापरूप आहे. आत्मा सोडून नाशवंत अशा दुसऱ्या पदार्थावर प्रीति ठेवली, तर ते सुख नाशवंत असल्यानें तें सताप देणारें होतें म्हणन प्रिय प्रिय जे जें म्हणणे होतें, ते खचित रडवितेच. हे सर्व आत्मरूपच नटलेलें. प्राणापासून धनापर्यंत जे त्यावरील प्रीति काढून ती निजरूपी स्थिर करून ऐस – निजरूपीं लाव. द्रव्यापेक्षां सुत, सुतापेक्षा देह, देहापेक्षा प्राण, प्राणापेक्षा आपलेपण का आत्मपणच ते प्रिय हे केव्हाहि होय असे हे सारें आपलेंपणावर टेकलेले, आपलें म्हटल्याने, आपले मानल्याने नटलेले होतं आत्म्याकरिताच (एकोऽहम बहु स्याम्).

**मोक्ष योगानें मिळतो व विवेकानेंहि मिळतोः**—बुद्धि मंद पण अभ्यास करण्याची हौस त्यास योग सोपा वाटतो; बुद्धि उत्तम पण कार्य करण्याकडे प्रवृत्ति कमी त्यास विवेक आवडतो. चित्ताचा निरोध केल्याशिवाय ब्रम्ह जे या मनुष्याने जाणणें हाच मुळीं सांख्यबुद्धिगत विवेकाचा सिद्धात होय. अहब्रम्हवृत्तिनगरास दोन मार्ग मिळाले आहेत. तेथे महावाक्यरूपी ज्ञान होत हेच ज्ञान मोक्षदायक होय. सांख्य व योग दोन नसून एकच आहेत – ते वेगळे जरी तरी त्याचा प्रकाश एकच होय – भिन्न मार्ग जसे एकाच गांवास जाणारे. योग सहज साधला म्हणून कोणास तो सोपा वाटतो, ज्ञान हें झाल्यानें तेच कोणीं सुलभ असे म्हटलें. येथे काय योगाचे कां काय ज्ञानाचे फळ ते एकच होय असे जाणतो जो तो शहाणा होय आकाश हे मेघानीं आच्छादिलेलें तेथे अबरच का आकाशच मुळीं कळेना – द्रष्टा व दृश्य हे दोन्ही मिसळून गेले. कामक्रोध आड येणारे म्हणून चित्तवृत्तीचा निरोध करून, वृत्तीचे अनेकत्व टाकून देऊन योग साधतात, एकाच वृत्तीचा अवलंब करतात. भक्तीनें योगाची हातवटी त्वरित साध्य होते, म्हणून भक्ति ही महत्त्व घेऊन आहे. तेथे योगाची बैठक लवकर सांपडते. बुद्धिवान मुमुक्षु कोटयवधि युक्ति शोधून काढतो. असे हे दोन (मंदबुद्धीचे व बुद्धिमान्) योगाचे अधिकारी होत हे नीट लक्षात घ्या. महावाक्याचे ज्ञान होण्यास का अहब्रम्ह नगरास पोंचविणारे हे दोन मार्ग होत – जरी ज्ञानाशिवाय मुक्ति नाहीं असे म्हटले गेले तरी

**(२) अद्वैतानंद – अद्वयब्रम्हः**—ब्रम्ह अद्वय जसे, आत्मा व्यापकत्वानें असलेला, सर्व उत्कंठा पाहाणारी झाली जेथे तेथे अद्वैतच आलें सच्चिदानंद ब्रम्ह जसे.

जगाला कारणीभूत ब्रम्ह ही एकच वस्तु आहे. म्हणून तिला अद्वय, अद्वितीय असें ब्रम्हच म्हटले पाहिजे. उपादान कारणे तीं तीन प्रकारचीं – १ आरंभवाद, २ परिणामवाद व ३ विवर्तवाद (रज्जुसर्पवाद).

जगाला आनंद होण्याला एकच ते अद्वितीय ब्रम्ह कारण झालें. ब्रम्ह जे योग्य – योगगम्य – तेथे आरभ, कां परिणाम कां विवर्त या उपपत्तींना महत्त्व नाहीं. कारणापासून भिन्न जे कार्य त्यास आरंभवाद म्हणतात. पदार्थाची पहिली अवस्था जाऊन दुसरी अवस्था जी येते – जसें दुधाचें दहीं होणें – त्यास परिणामवाद म्हणतात. आतां विवर्तवाद – पहिली अवस्था तीच मुळीं जाईना, ती भ्रांतिरूप होऊन आहे, तमाचें ते रूप, पण मंद असे ( माती ती जड किंवा हलकी ) – तेथें दोरी ती

डोळयांना सर्पच भासते – तसे ब्रम्ह जे आनंदरूप ( स्वयंभू कां सच्चिदानंद ) त्यावरच मुळीं हें जग भ्रांतीमुळें सहज ( उगीचच ) दिसत आहे : कसें तर आकाश हें नसूनहि भासते – पोकळीच ती तरी पण भासतेच; तसे जग हे आनंदरूपच पण ब्रम्हावर ( सत् चित् ) भ्रांतीमुळे नसतेंच तें दिसत आहे, जनाना असे सांगणें होत आहे.

पदार्थाचें सत्यत्व तें खोटे उगीच वरवर भासणारे, तेथे सहज दिसणारें हें जग अजिबात न दिसणें ही निवृत्ति नव्हे ( तेथे शून्यवाद येतो ). मातीचा घट जसा, तसे विकार हे मायारूप आहेत. तसें जगावर मिथ्यात्व आरोपिलेलें आहे. तेथे सत्यत्व अशी जी बुद्धि जगताच्या खरेपणाची ( अज्ञान ), ती खरेपणाची भ्रांति नाहींशी होणे तीसच निवृत्ति म्हणतात.

माती निराळी करून घटास पाहिलें असतां घट नाहींसा होतो पिंडदशेस माती म्हणतात व व्यक्तदशेस घट म्हणतात व अव्यक्त दशेस शक्ति म्हणतात. जरी शक्ति तरी पण या घटाविषयीं काहीं युक्ति चालत नाहीं. युक्तीनें त्यास व्यक्तीचें म्हणजे पिंडाचे करतां येत नाहीं. नाशवंत असा केवळ नाममात्र हा घट मिथ्याच होय. मृत्तिकाच एक ती कालत्रयींहि मृत्तिकाच एक अशा तथ्यतेची होय. त्याप्रमाणे जग हे आदीं का अंतीं अव्यक्तच होय. ते मध्यंतरीं व्यक्त झालेले असते. येथ प्रमाण श्रीमद्‌भगवद्गीता आहे करितां नामरूप परतें सारून ब्रम्हच एक आंत दृष्टी घालून लक्षिले असतां सर्व सृष्टी सच्चित्सुखमय होऊन जाईल.

( ३ ) **सच्चिदानंदः**—सच्चिदानंद हा शब्द स्वतः ब्रम्हवाचक नव्हे. सच्चिदानंद हा शब्द सत् आदि तीन प्रतियोगी शब्दांना ( असत, जड, दुःख ) भावना–स्वभाव दूर करण्याचे निमित्तानें तात्पुरता जीवदशेस आला आहे, एवढेच. सच्चिदानंद हा शब्द प्रतियोगी स्वभाव–भावनांचा नियामक आहे. वस्तूचा स्वत वाचक नव्हे सच्चिदानंद असे अद्वितीय सदैव. सत् – चित् – सुख जिकडे तिकडे भरून आहे. असे तें अस्ति – भाति – प्रिय न्याहाळून पाहिले असतां नामरूप – नामरूपात्मक दुसरे सर्व काहीं – विसरतें. अलकारामध्यें का घटामध्यें सोन्याशिवाय किंवा मातीशिवाय दुसरें काय असणार ? सर्व परमात्मरूप – तेथे मायारूप आकाश व परमात्मरूप हे वायु होय – सदेव सोम्य इद- मग्रे आसीत् । आरशामध्ये अनेक वस्तु दिसतात – भासतात, तसे अखंड ब्रम्हावर जग हें आकाशा सह पाहा. अगोदर भिंगरूपी आकाश दिसते व मगच आंतील वस्तु नजरेस पडतात ब्रम्ह हेच मुळीं आधारभूत तें आकळल्याशिवाय नामरूपात्मक जे कांहीं तें बुद्धि–मति–पुढे होतच नाहीं. म्हणून सहजच असें आले कीं, मनुष्यानें हे जग पाहात असतांना आपली मति – बुद्धि ही नामरूपात्मक होऊ न द्यावी तरच बरे. तेथें मग द्वैतभावाची ती गोष्ट नाहीशी होऊन एक सुखच केवळ सदैव तें उरतें. अशा तऱ्हेच्या अभ्यासानें संसाराची व्यथा अथवा वारी सपते, नाहींशी होते व चित्त सद्‌गुरुचरणीं लीन होऊन जातें – एकरूप होतें.

मायेचा महिमा अचिंत्य, तिची तऱ्हा अमूकच आहे असे नाहीं; मायेची रचना अघटित. परि- च्छेदाने दृष्टोत्पत्तीस घेणारे ते अभावाचें. सन्निपातानें मत्त होऊन बरळत आहे अशी ही माया हिजवर भरंवसा तरी कसा ठेवावा ? म्हणून शहाण्या माणसानें तिकडे लक्षच देऊं नये. असंबद्ध अशी ही वैखरी – तेथे बालजल्पच एक तेथें बरें कां वाईट असे संकल्पच : सार असें कां सारतेचें अथवा मतिथा- र्थाचे असें कांहींच नाहीं; म्हणून जेथें योग्य असे कांहींच नाहीं तेथें अयोग्यतेची अशी गोष्ट तरी कुठची असणार बरे ? अहो, जो मुळीं मृतच आहे, त्यास आरोग्यतेचें कां रोगाचें कसलें निदान असणार ? असली

ही माया विचित्र असल्यामुळें मुळींसुद्धां विचारास पात्र नाहीं. म्हणून एकच सांगणें तें हें कीं सद्‌गुरुचरण सेवून असावें

(४) **विद्यानंदः**—मुक्त पुरुषाचे त्याचे देहावरील मीपण तत्त्वतः नाहीसें झाल्यानें ऐहिक दुःख सर्वथैव नाहींसें होणारें असतें. मग परलोकचें तें त्यास कर्म बरे बाधणारे होईल ? त्यास ज्ञान झाल्यामुळे अमुक एक पाप व अमुक एक पुण्य हेहि नाहींसे होतें. ज्ञान झाल्यावर सर्व कर्म देशोधडी होऊन जातात. अमुक एक काम करणे उरले असे नाहीं. मिळवायाचें तें मिळविले - प्राप्य हातीं आले - ज्ञान मनामध्ये बिंबले - धन्यता मानतो. जगात एवढे सुख दुसरें कसलेहि नाहीं. शास्त्रसद्‌गुरूचे धन्यवाद वर्णिले. धनमनतनानें निवलोणच करावें असे ते परम उपकारच स्मरणार. रात्रंदिवस सद्‌गुरुस्मरणच एक ते होत असणारे.

(५) **विषयानंदः**—विषय मिळाल्यावर – इच्छा तृप्त झाल्यावर – अंतर्मुख वृत्तीमध्ये आत्म्याचें जे प्रतिबिंब पडते त्यास विषयानंद म्हणतात (सत्व). सत्वप्रधानामध्येंच आनंद व्यक्त होतो, इतर ठिकाणीं होत नाहीं (शांत). सत्वगुणाच्या आनंदाचा आस्वाद रजोगुणी व तमोगुणी जे आहेत त्यांना मिळत नाहीं. जगात व्यापून असलेल्या ब्रह्मरूपाची ध्यान करण्याची रीत—सुख म्हणून ज होतें ते ब्रह्मरूपच होय. सत्ता, चैतन्य व सुख हे तीन ब्रह्माचे स्वभाव आहेत जड पदार्थांत सत्ता (अस्ति) व्यक्त असते. घोर व मूढ अशा दोन वृत्तींत सत्ता व चैतन्य (अस्ति-भाति किंवा सत्ता-प्रकाश) व्यक्त दिसतात. शांत वृत्तीमध्यें सत्ता, चैतन्य व सुख हे स्वभाव व्यक्त होतात. यासच मिश्र ब्रह्म असेंहि नांव आहे. सच्चिदानंद हा शब्द असत्, जड, दुःख आदि भावनांचा निवारक आहे, वस्तूचा (ब्रह्म) वाचक नव्हे क्षांति, विरक्ति व औदार्य या शांत वृत्ति होत. राग व लोभ या घोर वृत्ति होत. मोह व भय या मूढ (तमो) वृत्ति होत. शांत वृत्ती स्वच्छ आरशांत (चित्त) पाहण्यास मिळतात. गढूळ पाणी हे अस्वच्छ व अस्पष्ट वृत्ति होत. मिश्र ब्रह्म हे पाहिले असता मोक्ष सोपा होतो - सहज मिळणारा होतो शांत, घोर व मूढ या वृत्तींमध्यें ब्रम्हप्रचीति ती कशी तें सांगतो. घोर व मूढ या वृत्तींमध्यें सुखाग जेवढा लपलेला तो शांतवृत्तीरूप स्वच्छ आरशामध्ये स्पष्टपणें पाहण्यास मिळतो. अशा तऱ्हेनें सत्ता ( अस्ति जड पदार्थासंबधीं ) व ज्ञान (प्रकाश, राग, लोभ) दर्शक राजस व तामस (मोह,भय) वृत्ति असून, सत्ता (अस्ति), ज्ञान (भाति) व सुख (प्रिय) या तिन्ही सात्विक चित्तामध्ये भासणाऱ्या होत. याप्रमाणें कुठे एक, कुठे दोन तर कुठें तीन अशा या वृत्ती जगतामध्ये भरलेल्या आहेत, म्हणून त्यांना मिश्र ब्रम्ह म्हटले.

**ध्यानचतुष्टय (चतुर्विधध्यान)**:—जड पदार्थांत (काष्ठ, शिला आदींच्या ठायीं) नामरूप वगळून सत्ता पाहावी. घोर व मूढ अशा राजस व तामस वृत्तींत दुःख वगळून सत् व (प्रकाश्य तें जें) चित् पाहावें, म्हणजे बुद्धीवृत्तीनें चितावें. शांत म्हणजे सात्विक वृत्तीमध्ये या तिहींचे ध्यान करावें. उदासीन वृत्तीमध्यें निर्विकल्पाचें ध्यान करावे. उदासीनपणामध्यें वृत्तिहीनता असते. हा ध्यानाचा चवथा प्रकार आहे व हेच ध्यान उत्तम होय.

( संतांच्या संगतींत लिहिलेल्या बाबा गर्दे यांच्या पंचदशीवरून सारांशरूपानें. )

# काहीं पाठभेद

| ओंवी | चरण | चे जागीं | असेंहि आहे | ओंवी | चरण | चे जागीं | असेंहि आहे |
|---|---|---|---|---|---|---|---|
| ३ | ४ | येसी | येसी तू | ११३ | ४ | मिळ | मिळे |
| ८ | २ | तुझिया | तुझां या | ११४ | ४ | तसाची | तैसाची |
| २५ | १ | या व्यापका | व्यापका | ११५ | ३ | साडी | संडी |
| ३२ | २ | निदोष | निर्दोष | १२१ | ३ | काई | वाय |
| ३३ | ३ | कवणें | कवण | १२२ | २ | वोझा | वांसी |
| ३६ | ४ | श्रद्धा | श्रद्ध | १२८ | ३ | तीं फळे | तिये कर्मफळे |
| ३७ | १ | ठाकलियाहि | ठाकिल्याहि | १३५ | ३ | येकिच | येकिचि |
| ३९ | ३ | तेचि | ते | १३८ | १ | अगा | मग |
| ४० | १ | यर | येर | | २ | अवघेचि | आघवेचि |
| ४२ | ४ | कवणाहि | कवणीहि | १३९ | ३ | दुऱ्हावे | दुरावे |
| ४३ | २ | सर्वांहि | सर्वीहि | १४० | १ | यावया | याविया |
| ४५ | ३ | आपुलेनि | आपुलेचि | | ३ | अभ्यासचि | अभ्यासाचि |
| ४७ | ३ | कोंडिली | कोंडली | १४१ | २ | असे | गम |
| | ४ | हृदयाचिया | हृदयाचां | १४२ | २ | जो | तो |
| ४९ | २ | अधैर्याचे | आधेयाचे | | ३ | त्यागाहूनि | त्य हूनि |
| ५२ | १ | चौचकी | चोचकीं | १४४ | १ | तो | जो |
| | २ | संयतीची | सयतीच्या | | २ | काहीं | कंहीं |
| ५३ | ३ | महिषाचेनि | महिशाचेनि | | ३ | जैसा | जैसि |
| ६० | १ | अहितीं | आहितीं | १५१ | ३ | निरुपाचारु | निरोपचारु |
| ६२ | ३ | अंग | आंग | १५६ | ३ | वलभा | वल्लभ |
| ६३ | १ | तहानें | तहानेनें | १६३ | ३ | डोलो | पडलो |
| | १ | पियावी | प्यावी | १६७ | २ | अवयवा | अवेवा |
| | ४ | मवावा | मावावा | १७१ | ३ | जाहाला | जाला |
| ६४ | १ | पहुडणें | पौढणे | १८२ | २ | कोणीहि | कोण्हीहि |
| ७० | २ | बोचरिया | वोचिरिया | १९३ | २ | आपुलया | आपुलां |
| ७९ | २ | कायिका | काईक | | ३ | जाहला यालागीं | जयालागीं |
| ८४ | ३ | नौकोनिया | नौकुनिया | १९९ | २ | ज्याने | जैणे |
| ८५ | ४ | कोरान्न | कोराण्य | २०० | ४ | नोहेचि | नव्हेचि |
| ८६ | ३ | काईसनिहि | काईसेनहि | २०६ | ४ | आंगीं सूनि | आगिसुनी |
| ८७ | ३ | ते | — | | | | |
| ९० | ३ | सजुनियां | सज्जुनियां | २०९ | २ | न बोले | बोलोनि न बोले |
| ९१ | ४ | तरियावरी | तारियावरी | | ३ | जो | जे |
| ९२ | ४ | सायुज्याचिया | सायुज्याचिये | २२४ | १ | दोंवरी | दो वरि |
| ९३ | २ | चतुष्पादादि | चतुप्पदादि | २२७ | १ | प्राणापरौते | प्राणापरते |
| ९४ | २ | येकहि | येकिहि | | ३ | भक्त | भक्ति |
| १०२ | २ | इय | ये | २२८ | १ | जो हा | जे हे |
| १०४ | २ | मनबुद्धि | मनोबुद्धि | | २ | सागितला | सांगितले |
| १०६ | ४ | विषयीं | विषई | २२९ | ४ | स्थितिये | स्थिती ये |

## परिशीलन –

तेजस्वी, शांत, अखंड, समृद्धतेने एकाच मानाच्या, चिन्मात्र, मूर्त अशा श्रीमान् अनंताला नमस्कार असो !

दिशा व काल यांनीं मर्यादित नाहीं अशा अखंड अनंताला, चिन्मात्र मूर्तीला स्वानुभवैकमानाला, शांताला, तेजसाला, शांततेजसाला नमस्कार असो !

दिशा, समय व वेळ यांनीं मर्यादित नाहीं अशी जी समृद्धि – ऐश्वर्य – संपत्तीची, एकाग्रतेने – एकमताने शब्द – नाद – अनुभवाची, आदर व गौरवाने सन्मानिलेली, कीर्ति – बल – वीर्य – प्रभव कीर्तीची, एकाच मानाची – परिमाणाची, सर्वव्यापक अशी जी, तेजस्वी श्रीअनंताची चिन्मात्र मूर्ति – जे तप्त सुवर्णासारखे शांत तेज ( तैजस ) ब्रम्ह त्यास मी नमस्कार करतो. दिक्कालाद्यनवच्छिन्नये ! अनंतचिन्मात्रमूर्तये ! स्वानुभूति – एक – मानाय ! शांताय तेजसे ! ( तेजसे शांताय ! ) शांत तेज जें ब्रम्ह त्यास नमः ! नमस्कार असो ! नमन असो !

[ पा. २ – ओळ १४ ] ‘ जय हो ! जय हो ! ’ अशा वचनांनीं नमस्कार करीत आहे. आपला सत्कार करीत आहे गौरव करीत आहे. देवतेचे आगमनार्थ जय हो अशा अर्थानें जयजयकार करीत आहे. नमन करीत आहे. [ पा ७–७ ] ( अध्यात्म वद्येचे ) अध्यात्मविद्येचे. [ पा. ८–८ ] ( असे तें असून ) जे [ पा. ८–२३ ] ( पिशाचयोनी ) पिशाच योन × पैशाची [ पा ९–२८ ] ( जळजळणे ) ग्रासणें. [ पा १०–७ ] ( ते ) जे. ( मुळीं ) तेच मुळीं. [ पा ११–२२ ] ( देवयोनी ) उपदेवयोनी “ शुद्ध, उदार, प्रसिद्ध, आनंदकर अशा ब्रम्हशक्ति ! ब्रम्हरूपा अहो हे श्रीगुरुकृपादृष्टी ! ! ” हे संबोधनपर वाक्य पुढील पॅरेच्या सुरवातीस वाचणें:—पा ११–ओळ २७, पा १२–ओ. १७, ३४; पा. १३–ओ. १४, ३५; पा. १४–ओ ८, १८, पा १५–ओ. २७; पा. १६–ओ. १४, ३४; पा. १७–ओ. १, २७, ३४. [ पा १४–८ ] श्रीसद्गुरूच्या कृपादृष्टीने तुमची करुणार्द्र दृष्टी ज्यास अधिष्ठानाचें करते, तो सकळ विद्याच्या सृष्टीमध्ये धाता – सृष्टिकर्ता – निर्मिता – धारणपोषण कर्ता करणारा होऊन असतो; म्हणून आपले म्हणविलेल्याना जशी कल्पलताच एक अशा हे अंबे ! श्रीमंते ! करुणरूप= निरहंकृतीचे, शांत, गरीब, सालस असे. [ पा. १५ - १४ ] ( नास्तिकवाद ) अनियंत्रित, असमर्थ, स्वतंत्र-तर्य अस्तित्व × आस्तिक्य. मायावती : प्रद्युम्नपत्नी : पूर्वजन्मींची रती : मदनाचा जन्म पुन्हां होणार व तो शंकरास मारणार हें कळल्यावरून शबराच्या घरीं पाळलेली मुलगी म्हणून राहिली होती. माय = लाघवी, जादुगार, पिशाच माया = कपट, गारुड, जादू, अविद्या, ईश्वराची अघटित घटना. [ १५ ] दृष्टे ) दृष्ट लावणारीं, दुष्ट सत्वाचीं [ २४ ] ( महाप्रसादु ) महत् प्रसादन – महल्लोकींचे जे देव महाभार वागवीत असलेले, त्यांची महत् प्रसाददान कृपाच मजवर झाली कीं अहो – आपल्या, हे श्रीगुरो, अशा या वचनानें, आज्ञनें [ २६ ] ( रचनेसहित ) संदर्भासहित. [ पा. १७–१८ ] माझिये हृदयीं बुंथी । ते डोळयां सगुणप्रीति । वाचे नामसंपत्ति ऐसेंचि असो । म्हणोनि तुझे नाम आवडे हेचि प्रेम न विसंबे वर्म निजध्यास रया ॥१॥ श्रवण नामगोडी श्रवण नामगोडी । हीच आवडी देईं मना ॥२॥ तुझिये सगुण बुंथीचा । वासु व्हावा माझा हृदयीं ऐसा । निजसुखाचिया निजध्यास । तुझिये आवडी अनुसंधान । तुझिया स्वरुपीं मन डोळा बैसो । कां ध्यान हेचि रूप हेचि निजआवडी देईं कां दातारा । चुकवी येरझारा गर्भवासु ॥३॥ म्हणौनि रुखमादेवीवरा विठ्ठला । उदारा भावें जोडलासी आम्हां । श्रुतिपुराणें वर्णिती नेति नेति तुझा महिमा । तुझे नाम रूप सुंदर हेचि निरंतर देईं आम्हां सर्वोत्तमा रया ॥४॥ हे श्रीकृष्णा, रुखमादेवीवरा श्रीविठ्ठला, तुझी सगुण मूर्ति नित्य माझ्या अंतःकरणांत असावी, त्याच सगुण

मूर्तीविषयीं डोळयांत प्रेम असावें, वाणीमध्ये नामोच्चाराची संपत्ति असावी अशी माझी फार इच्छा असल्यामुळे मला तुझें नाम फार आवडतें. याच नामाच्या प्रेमानें मनाला निजध्यास लागून तुझा कधींहि विसर होऊं नये. कानांनींहि तुझ्या नामाचें श्रवण करण्याची गोडी धरावी अशी आवडी माझ्या मनामध्ये उत्पन्न कर स्वकीय आत्मस्वरूपाच्या निजध्यासानें तुझ्या सगुण मूर्तीचा वास हृदयांत नित्य असावा. तुझ्या आवडीचे अनुसंधान, तुझ्या स्वरुपाचे ठिकाणीं मन व डोळयांत ह्याच रूपाचे-सगुण मूर्तीचें-दर्शन नित्य असावें. अशी आवडी मला होऊ दे. हे श्रीकृष्णा दातारा! वारंवार गर्भवास घेऊन जन्ममरणाच्या येरझारा कराव्या लागणाऱ्या त्यांतून तूं मला सोडीव. अशी मला बुद्धि उत्पन्न व्हावी म्हणून रुखमादेवीवरा श्रीविठ्ठला! ह्या भावानें आम्हांला तुझी जोड झाली ज्याचे अंत करणांत तुझेविषयीं भाव नाहीं, त्यास तुझी प्राप्ति किती कठीण आहे म्हणून सांगूं! अठरा पुराणें, साही शास्त्रे, साक्षात् श्रुतिमुद्धां नेति नेति म्हणन तुझा महिमा वर्णन करतात अशा प्रकारच्या भाव बलानें तूं आम्हांला प्राप्त झालास म्हणून तुझ्या सुंदर नामरूपाच्या चिंतनाचा, हे सर्वोत्तमा श्रीनारायणा! आम्हांला सदोदित लाभ दे. ( ज्ञा गा ३४१ आळदी प्रत ) [ पा. १८-६ ] ( महाप्रसादच एक वांटून आला ) जाग जाग झणीं झटका रे। गुरुपदीं जाऊनि हटका रे। तरीच होईल सुटका रे। अगाधतेनें तो कृपाप्रसाद महत्त्वास आला - कृपा वर्षली!' [ २७ ] ओवी २८ वी येथे वाचावी व मगच 'अर्जुन उवाच' श्लोक पुढे येणारा होतो जसा का. विसाव्या ओवीनें प्रश्नप्रस्ताव साधला व २१ ओवीपासून २८ ओवीअखेर प्रबंध कां संवादसंगती का शंकानिवृत्ति जोडली, व ९ व्या ओवीनें श्लोकसंगति साधलेली [ पा १९-१२ ] ( अवधारिले ) अवधान - अवधारण - धारणाधर्म - पाहिले - समजलो [ पा २०-शेवटची ] ( भक्तीमुळे व्यक्तता येते ) भक्तीचें फळ भक्तिच - तेथे दुसऱ्या कशाचाहि आधार घेऊन भक्तीस येणें होतें असें नव्हे, तरी भक्ति हीच मुळीं आपल्या फलद्रूपतेस येणारी असल्यानें ती स्वयं फलरूप म्हटलेली [ पा. २१-४ ] ( अव्यक्त ) अनेक मूर्तीनाच मुळीं 'अव्यक्त' म्हटले जसें शतक्रतूस इंद्र म्हटले. [ शेवटची ] ( बरोबरीचे अशानें ) साक्षित्व, अध्यक्षत्व [ पा. २३-२२ ] ( जें कांहीं तुम्हीं ) यावर अर्जुनाने विचारले कीं, जें काहीं तुम्ही, अहो देवा! [ २५ ] ( शिफारस ) वाखाणणी, दिव्यता, महती. [ २६ ] ( गंमत ) गमती, मौजा, हरिखा. [ पा. २४-१३ ] ( अव्यक्त ) अनेक मूर्तीनीं घडलेले जें कांहीं एक व्यापकपण आकळण्यासारखे तें बहुव्यापकत्वाचें असे आंगच मुळीं तेथे तो व्याप्यव्यापक भाव परम ईशाचा तोच ते अनेकत्व कां अव्यक्तच जसें तेंच आतां व्यक्तीवर उभे होऊन तेथीलचा व्याप्यव्यापक गुण कां भाव तोच प्रभावास आणिला, भावाचा केला, प्रभावाचा झाला व आता तो देवच मुळीं जसा आपल्या एकतानतेस ह्या साधनानें आणिला गेला. [ २५ ] ( नीलबिंदु ) योगबीज, सरस्वतीबीज. [ ३२ ] ( आहांत ) आहे [ पा २६ २५ ] ( पुरुष होऊन ) जवळजवळ पुरुष होऊन [ पा २७-१३ ] ( आत्मार्पण ) सर्वस्व आपलें मजला अर्पण केले जसें; तेथें आत्मनिवेदन म्हटलें. [ ३१ ] ( अर्थ हा ...... नें ह्या ) अर्थ हा ह्या. [ पा. २८-१६ ] ( मी ) ज्ञानलक्षण [ पा. २९-२८ ] ( कूटस्थ ) क्षर व अक्षर असे दोन पुरुष आहेत. क्षर म्हणजे सर्व भूतें-अपरा प्रकृति-क्षेत्र; व अक्षर म्हणजे कूटस्थ-परा प्रकृति-क्षेत्रज्ञ [ पा. ३१-३१ ] ( विस्मृति ) 'तत्रापि न माहात्म्यज्ञानविस्मृत्यपवादः।' भक्तिसूत्र. [ पा. ३८-२२ ] ( माया ) मायिक. [ २८ ] ( संकल्परूपी ) विषयवासनारूपी [ खालून २ ] ( पाठ ) पाठीचें. [ पा. ३ -७ ] ( मागेच पाय ) अंगहीन प्रकार, भूतअंग कां अंगभूत असलेले तें स्वतःसच मागे लोटते व दुसऱ्यासच ती महती देऊन पुढे करणारें होतें. [ २२ ] ( शेरा येणें ) उपाधी टाकवून उपास्तीची ती जीवदशा न करितां. [ २६ ] ( तरी ) तरी निदान. [ ३० ] ( हितगुजाची ) हितगुजाची तसेच ज्ञानलक्षणाची [ पा. ४०-२९ ] ( माण-

सानें मानिलेलें गुरुपण ) अहो, सज्जनाच्या कां साधूच्या संगतीने ब्रम्हभावच एक मिळणारा, तेथें मग सहजच हे मन गुरुपणाचा का वडिलपणाचा मान महदुपकाराचा असा स्वतःत बिंबवते. [ पा. ४१-११ ] ( मुद्रेनें ) बाह्य जें त्यासच जीवनभाते मिळाल्यानें ही जी अवयवांची रचना ही आकारास यावीच - आणावीच आणावी अशी जी या अवयवाना देणगी – ती सहज योगाचे अंग ती अति निरुपम होय. [ २८ ] ( नागतत्त्व ) दिग्गजभार [ पा ४२-१ [ ( तारेच चमकणारे ) थक्क का स्तब्ध करणारे, जेथे जीवभाव जोडलेला हाच मुळीं का एकाग्रा बालिकेचा जसा का स्त्रीचा जेथे एक व्यर्थ तेचा असाच होणारा तो जाणिवेचा "तर" "पर" असेच म्हटले [ ७ ] ( तान ) ताणा [ पा ४४-१४ ] ( वाटमारीपणा ) वाटमारेपण. [ २५ ] ( निजनित्य ) निज नीच=नित्य. [ २९ ] ( सुखदुःखे ) सुखभारणी [ पा. ४५-१३, १४ ] तेथें हा मी ... ... काय उपयोगाचा ) हा मजकूर गाळा [ पा. ४६-३ ] ( श्रीगुरूचे चरणीं ) ज्ञानलक्षणाची जी व्यक्तिविभूति तिचे चरणीं प्रेमच एक ओपले. [ शेवटची ] ( डोळे वटारीत ) टवकारीत, न्याहाळीन ( विकाराची होणारी कदाचित् ). [ पा. ४७-१३ ] ( कसे ) कुठे [ १४ ] ( करून घेतो ) साधून असतां. [ २१, २२ ] ( ठिकाणीं स्थळ ) विकारवशतेच्या मोकळीकतेची हवा कदाचित् आपणावर ओढून [ २४ ] ( क्रमयोगाचा ) वज्रयोगक्रमाचा. [ ३२ ] ( युद्ध ) द्वंद्व. ( प्यालयासारखे ) प्यावी. [ ३३ ] ( खाल्ल्यासारखे असते ) खावी. [ पा. ४८-२९ ] ( तप करणें ) " सेवकास आज्ञा ती स्वामीची " अंगिहि येथे मानलेले. [ ३४ ] ( विहीर ) बुद्धीचे विशेष प्रदर्शन व्युत्पत्तीने कां काव्याने उचलिलेले. [ पा ५१-खालून २ ] (अविद्या) अनादि – अविद्या – अनिर्वाच्या कारणोपाधिरुच्यते। उपाधित्रितया-दन्यमात्मानमवधारयेत् ॥ आ बो १३ [ पा. ५२-३० ] ( संयोग ) स्थूलदृष्टि. [ पा. ५३-२१ ] ( स्थल ) स्थूल [ पा ५३-१ ] ( विश्वात्मक ) आपलेपण कां सर्वस्व [ ४ ] ( परमेश्वराला ) ईश्वरत्व. [ ५ ] ( विश्वात्मक ) सत्तात्मक. [ ३० ] ( कर्मांचा नाश होतो ) कर्मांचा परिणाम नच होणारा होतो [ पा ५५-३ ] ( माझच ) माझेच. [ ६ ] ( कुठेच ) देहसाधनाची का व्रताच्या भाराची [ ९ ] ( विकले गेले ) ईश्वरत्व, सर्वस्व, सत्तात्मक तेच त्यांनीं किमतीचे केले. [ २१ ] ( विश्वरूपामध्ये ) श्रद्धाः पुरुषः सगुणभार. [ पा. ५६-८ [ ( वस्त्राखालीं ) कृपावस्त्राखालीं. [ १० ] ( मूर्तीचा मेळावा ) " अनेक मूर्ति अव्यक्त " निराकारीं आकारास आलेल्या – निर्गुणाचे सगुणाचे करून. [ २९ ] ( कोरडी ) नच प्रेमाची. [ पा. ५७-२ ] ( पोटामध्ये ) कळवळल्यामुळे पोटामध्ये. [ खालून ६ ] ( तारू ) पांडुरग : ज्ञानलक्षणाचा. [ पा. ६०-२८ ] ( वाहिली ) पाळिली. [ पा. ६१-१५ ] ( योग म्हणजे क्रियारूप होऊन ) तप, स्वाधाय, ईश्वरप्रणिधानरूपी क्रियानीं : आचरणाचे कां व्यवहार प्रायश्चित्ताचे होऊन. [ पा. ६२-१२ ] ( एक साक्षीच ) एक गगनसारखा साक्षीच [ पा ६३-१५ ] ( महत्त्व सापडत नाहीं ) तसे तुला महत्त्व सांपडत नाहीं. [ १९ ] ( अर्थाचा ) वागर्थप्रौढीचा. [ २० ] ( मदर्थ ) पुरुषअर्थ [ २१ ] ( धर्मसिद्धी ) मनुष्यधर्म – पुरुषश्रद्धा – मदर्थ. [ २७ ] ( मोकळीक ) स्वतःचे तंत्राने चालणें. [ पा. ७१-शेवटची ] ( आपलें कां परावें ) हे माझे व तें त्याचे म्हणजे दुसऱ्याचें. [ पा. ७२-११ ] ( असणारे ) असणारे शुद्ध तत्त्व [ १५ ] ( दुसरेपणास ) दुसरेंपणाचे. [ २९ ] ( नटणें ) जिव्हानटी. [ पा. ७८-२६ ] ( जीव ) जग × देह. [ पा. ७९-२८ ] ( होऊन गेले." ) होऊन गेले." ( ज्ञा. गा ) [ पा. ८०-२८ ] ( सुदृढतेचे ) सुद्धदतेचे. [ पा. ८२-खालून २ ] ( गाय ) क्षर : सर्वाणि भूतानि : कूटस्थोऽक्षर उच्यते। अपरा प्रकृति × परा प्रकृति : क्षर × अक्षर : क्षेत्र × क्षेत्रज्ञ. [ पा. ८५-खालून ४ ] ( उपचार ) समाचार, गौरव, पूज्यभाव. [ पा. ८६ ३ ] ( इलाज ) उपाय. [ ६ ] ( उपचार ) समसमा : आकाश सम-सामावणें, [ ३० ] ( तिकडे ) स्वहिताकडे का पुरुषार्थाकडे. [ पा. ८७-२२ ] ( मूळच्या

रहिवाश्याचे ) वृत्तीचें वतनदारच जसे. [ शेवटची ] ( संत्रयींना हार देतें ) रूपांतराचें करणें × स्वतः- तच रमणें × दुसरीकडे नच पाहाणें ( वृत्ति ) उपक्रमाची भरणा [ पा. ८८-६ ] ( खपणाऱ्या ) शिष्टाचाराच्या. [ खालून ६ ] ( क्रियारूप ) ज्ञान-इच्छा-क्रियारूप [ खालून ३ ] ( क्रियाभार ] कुटुंबिन् क्रियाभार [ पा. ८९-२ ] ( हा ) कर्म. [ १० ] ( सर्व सिद्ध ) महत्तत्त्व महत्त्व. [ १३ ] ( आला ) यावा. [ १५ ] ( करणास ) करणारा [ २४ ] ( दिधलें ) जोडलें [ खालून ५ ] ( तो वल्लभा मी कांत ) रत्न व प्रकाश एक जसे [ पा. ९१-३ ] ( तुलना ) तुलना, तुळणा; प्रिया व प्रियकर या दोन्ही पारड्यात आपणच बसला. तेथे आतां ते कांटाळे समतोलाचें - एकाच मोलाचें झालें. [ खालून ३ ] ( बोलणें बोलों लागले होऊन ) बोलणें बोलते असे ते होऊन. बोलणें × आलिंगणें × देवपणाचें प्रत्यक्षत्वास येणे × देखणें झाले [ पा. ९३-७ ] (परिणाम) धालेंपणाचा परिणाम आयुष्याभिवृद्धीचा झाला : ज्ञानावस्था ही दीर्घायु झाली : तृप्ति-समाधान हें पूर्णावस्थेचें झाले. [ १३ ] ( जलचराप्रमाणें ) जलचरामुळे [ १६ ] ( मान ) मानून. [ पा. ९४-१ ] (काति) शांति [ १५ ] (बापेच) बाप्पेच [ १७ ] ( उपचारादिनीं ) आकाशाचें आकाशरूपांत सामावणें. [ १८ ] ( जोड चे ) जोडीचे [ खालून २ ] ( पृच्छाच ) क्षेमसंवादन. [ पा. ९५-५ ] ( भक्तीच पोंचली ) भक्तीच पोसली, भक्तीसच पोहोंचली [ ११ ] (दक्ष) दक्षिणा- दानी, दाक्षिण्य [ १८ ] (आरंभास) आरभशूर : पुनः पुनः आरभाचा असा : तेच तेच सुरवातीपासून अवलंबणें करणें, जें बोलणें इ : असा जो कांहीं त्यानें देहबुद्धीचा त्याग नच करून बोलणें केलेलें जसें कां, देहबुद्धिच आडविणारी जेव्हां तेव्हां, तेथे आरंभशूरच म्हटले गेलेले [ २२ ] (त्यागच) परित्यागी ( सत्वसमाविष्टः= मेधावी × योग × भक्ति × जोडणें × युक्त × छिन्नसंशय) [ पा ९६-९ ] (सभ भिरित) सभराभरित. [ १७ ] (जरूरीमध्यें) परिग्रह, संग्रह [ पा ९७-१७ ] (होय) होय. अशुचित्व, मालिन्य, अशुद्धि, मनाचें चाचल्य जें विचित्रतेच्या रंगास उचलणारे ते आतां वृत्तीस आले व आपल्या अनुकारास पाहूं लागले. (बाह्यहि) बाह्य मनोजाड्य, बाह्य मनोमळ (आंतरहि) अशुद्धि, अज्ञान, अंतरहि. [ १८ ] (होते - तेथे सर्व उरलें.) होतें निर्मळपण, उत्तमत्व तेथे सर्व उरले. [ १९ ] (मनाच्या ज्या वृत्ति) मनाच्या ज्या हरणे हरविणे वृत्ति [ ३० ३१ ] (मुक्ति मिळते.) मुक्ताचा संसार पाहाणे होते. [ पा. ९८-खालून ६ ] (दुसऱ्याला) देहधारीपणाने असलेलीं मुले, माणसे, बाळें, इ (वोज) निगा दुरुस्ती [ शेवटची ] (मेलेल्यास लज्जा ही न हींच लज्जेचें पावित्र्य, विनय हा जो मरून आहे त्याने जाणणेच नाही. [ पा. ९९-१ ] (बरें ?) बरें परती होणारी ? [ ५ ] (कर्मारंभालागीं) कर्मारंभालागीं तो योगभावाचा कां सत्वार्थाचा होय [ ६ ] (गुणसंग्रह) ब्रम्हलिखित कर्मदिव्य, तेथें मोक्षच एक सर्व लेखास म्हणजे योग्यतेस आला - लोक- संग्रह × अतीतता × पुरुषभार [ ८ ] (होते.) होतें मोक्षच एक तेथे लिहिला [ १० ] (सोहंभाव) शौच, शुचित्व, भावसंशुद्धि, हंस [ २३ ] (दाखविती) पाहविती. [ २४ ] (योग्यतेची) कर्मदिव्य प्रकृतीनेंच मुळीं निवृत्तीवर उभे होणारें, येथे देव × शद्व × देह एक वागविलें, जगास दाखविले, लोकांच्या डोळ्यासमोर केले, त्यांच्या नजरेत बसलें [ खालून ४ ] (निजध्यान) निजध्यान × नित्य ब्रम्ह × निजनारायण. [ शेवटची ] (रूप) नरजन्ममाहात्म्य. [ पा १००-१ ] (भक्तावरून) अशा भक्तावरून. [ २ ] (होतो.) होतो. समाधान जोडते. [ ७ ] ( भक्तिमान्यः) भक्तिमान् यः [ १० ] असा घ्यावा ) असा घ्यावा. आंधळयाचे जसें नेहमींच तोंड उघडें असणारें जसे - तेथें जणूं काय नहमीं बोलण्याकरितां हपापणेंच एक - असें नसावें ज्ञानेंद्रियांचें वेदन संवेदन भार न जुमानणारा होऊं नये. अज्ञानरूपी रात्र असूनहि तेथे जसें काय त्या अज्ञानाचा हर्ष कां आनंद मानणें तें - तें करूं नये. हर्ष या शद्वाचा अर्थ दांत दुखणें असाहि आहे; म्हणून येथें दिवस असतांना जे भोजन होणारें त्यासच

मानणें होते; पण रात्र असतांना कां दिवा लावल्यावर जो कांहीं भोजन – जेवण – प्रकार तेथे हर्षणें, हरिखणे, हपापणें, उगीचच हर्कणें, हंसणें हे शास्त्रदृष्टया दोषाचें असे मानलें आहे, म्हणून येथे अर्थ हा भलता घेऊं नये [ २२ ] (फायद्याची नाहीं) फायद्याची नाहीं ज्या गोष्टीपासून कां वस्तूपासून एकदां सुख जाहले, त्याच त्या गोष्टीची कां वस्तूची इच्छा करणे ते करूं नये इच्छा ही शांत राहो सौभाग्यकांक्षिण: अशी कन्या जेव्हां तेव्हां मोठयाच एका जबाबदारीची कां मनाच्या वैचित्र्यतेची एक अवस्था बाळगीत असलेली, तेथे तिचें ते पसंत होणें, न होणें, हे जसे का जीवभावाची आशानिराशा – आदोलनच एक कांहींच का एका निश्चयास येऊन नच असणारे असणे ते जसे-सौभाग्य मागणारे ते कन्येचे विलसणें तेथे नेहमींच आशा पोटीशीं बाळगून असणें जसें. [ ३० ] (योग्य तेंच) योग्य काम – कर्तव्यात असणे – तेच. [ खालून ३ ] हर्षित = हर्षाचा, हरिखाचा, हर्कण्याचा, लज्जेस येऊन हार खाणे जसे असा होत नाही [ शेवटची ] तो भक्त मला प्रिय होऊन माझा होतो. [पा १०१–१५ ] (न देखे) = मानीत नाहीं. [ २७ ] (भावाने) का भेदभावानें. [ खालून ५ ] (ज्याच्यापेक्षा) ज्या आत्मलाभासारखे विशेष [ पा १०२–११ ] (देहसंगाने असणे का नसणें ज्याला सारखें आहे ) निरासक्त असा : संगविरहित असा : संगविवर्जित असा सम, देहबुद्धीचा न होणारा असा – त्याने देहसंगच मुळीं टाकून दिलेला – तेथे योगभावच एक वागणारा : म्हणून ज्यास देहबुद्धीचीं माणसे भेटलीं अथवा ज्ञानी का योगभावाची माणसे भेटलीं तरी जो दोहोंसीं सम, निःसंग. सम्प्रदाचा असाच होऊन असणारा. [१०३–५] (साक्षी) गुणमध्यस्थ गृहस्थ जसा. [ ७ ] (असतो ) असतो अंगात अंग घालून (एकटा) असतो [ १४ ] ( जो आहे. ) जो साक्षीप्रमाणें आहे [ २३ ] (किंवा अपमानाने) किंवा अपमान कां अवमान केला काय असा, अपमानाने का अवमानाने. [२७] (हुंकारणारा) हुंबरणारा [२७] (तेथ जो) तेथ तो. [ ३० ] (तापाचे) तापाने. [ खालून ३ ] ( दक्षिणेकडील का उत्तरेकडून ) दक्षिणेकडील ( उष्ण ) कां उत्तरेकडील (थंड). [ पा १०४–७ ] (वचनांचीं) उक्तीचीं उपदेशरूपी सूत्रे-वाक्ये [ १४ ] (असे येथे उपमासौंदर्य,) असे येथे उपमासौदर्य [ १७ ] (रिपु कां मित्र) "रिपुमित्रां समान हरीचें देणें." [ १९ ] (उजेड) ज्ञानदानाने सढळ हाताचें देणें दिलें. (दुसऱ्याना) बाहेरच्याना (अंधार) आडवावे का अज्ञानात ठेवावे [ २२ ] (मानापमानाने) उक्ति ही अपमानिली नच पाळण्यानें, कां अवमानिली, दुर्लक्ष केली गेली, महत्त्व नाहीं म्हणून [ २३ ] (परिग्रह) नियमव्रतपरिपालन [ २९ ] (उदक) देहजलपाणी. [ ३३ ] (वृत्ति) मूर्ति. [ पा. १०५–१ ] (सेव्य) मंत्रादिनीं योग्य केलेले [ ७ ] (तुल्य) स्वतःस कर्तव्यावर आरूढ केले, तेथे समाधान परिणाम करणारे, तेथ स्वहिताचा धंदाच एक निदेस कां स्तुतीस तेथे महत्त्वाचें होणे नाहीं. (येनकेनचित्) यत्-किंचित तेनः येन चित् केन चित. येनकेनचित. जे कांहीं थोडेसे मिळाले, त्या मिळण्यावरच संतुष्ट होणारे बुद्धीचें मंडन, बुद्धि हीच समजाविली गेली, तेथे ज्ञानच एक वेदन पाहाणारे. [ पा १०६–८ ] (२१२) आकाशस्थिति=वायूस स्थिति, नित्यता, वस्ति, विश्रांती व शेवटीं आकाशच होऊन असणें जे. [ १३ ] ( जो आपण तिचा होत नाहीं. ) जो आपल्या शांत वृत्तीपासून–अवस्थेपासून–चळत नाहीं. [ १७ ] (एकाच पंक्तीस बसवून) कोणीं निंदिलें कां वंदिलें तरी एका नामावरच तो आरूढ असल्यानें त्यास दोन्हीहि सारखींच होत. [ खालून २ ] (सर्वत्रगः) सर्वत्रगो. [ पा १०७–खालून ७ ] (२१६) प्रकार=भेद : सादृश्य. [ खालून ६ ] (२१७) संचारू=पाऊलाच्या येण्यानें वेधच एक, विधिविधान ते लावावे जसें, उत्कट प्रेमाचें सुंदर दर्शन-रसप्रवाह. [ खालून ५ ] (२१८) शिरीं वाहे=आदर देतो, गौरव करतो, त्यास मानतो, सन्मानितो. (२१९) पुरुषार्थसिद्धी चौथी = " ब्रम्हभूतः प्रसन्नात्मा न शोचति न कांक्षति । समः सर्वेषु भूतेषु मद्भक्ति लभते पराम् ॥ १८५४ ॥ तो सच्चिदानंद ब्रम्हांत अभिन्नपणें स्थिर होण्यास योग्य झाल्यानें ब्रम्हभूत झाला. प्रसन्नचित्त असा तो कशाचा शोक करीत नाहीं व कशाची इच्छा करीत नाहीं – तो सम होत्साता तो सर्वांभूतीं पराभक्तीचा होतो.

